**अजोनी**—अजून पहा. 'सुवेष पतिव्रता मुनिकामिनी। कां जी अजोनी न दिसती ॥ ' –जैअ २८. २८.

**अजोबा**—आजोबा पहा.

**अजोरा**—पु. गाय वगैरे जनावराचा गर्भ. ( क्रि. टाकणें–पडणें–येणें ). [ सं. आ+जरायु=गर्भाशय ]

**अजोरा**—पु. कटकट. त्रास. 'गप्प बसा राव. उगीच अजोरा कां ? ' [ फा. आझुर्दा ]

**अजोळ**—अजूळ पहा.

**अज्यम**–अजम पहा.

**अज्जी, अज्जीबात**–अर्जी पहा. 'हे कायदे अर्जी रद्द करणेंहि धोक्याचें काम झालें असतें.' –इंम ३०४

**अज्तरीक मेहेर्बानी**–कृपापूर्वक 'अज्तरीक मेहेर्बानी, दर्खास्त करितात कीं व्याज माफ करावें.' –पया ४००. [ फा. ]

**अज्य**—न. तूप. 'कितीयेक ते आणिलीं अज्य तेलें ।' –राक १.७७. [ सं. आज्य ]

**अज्या**—क्रिवि. ( ना. ) इकडे. अथज्या पहा.

**अज्याइब**—अजाइब पहा.

**अज्रा**—अज्राहे पहा. **०एख्लास**–स्नेहपूर्वक. 'पारचे पाठविले असे; अज्रा एख्लास घेतला पाहिजे'. –रा १०.११८. [अर. इख्लास्]

**अज्राहे**—क्रिवि. रस्त्यानें; मार्गानें; पूर्वक; रीतीनें. [फा. अझ्+ राह्=रस्ता ]. **०खानगी**–घरोब्याच्या रीतीनें. 'आम्हाकडे अज्राहे खानगी सांगून पाठविलें होतें'. –रा ५.८५. **०दोस्ती**–मैत्रीपूर्वक. 'परंतु अज्राहे दोस्ती तुम्हांस गोरगुजार करून टवनो हे निमित्त उलट येईल.' –रा ५.१६४. **०मेहेरबानगी**–क्रिवि. कृपापूर्वक. 'खत अज्राहे मेहेरबानगी पाठविले तें पोंहचून खुशी हासल जाहली. ' –रा १०. २१२. **०हरामजादगी**–बेइमानीनें. 'तुम्ही अज्राह हरामजादगी स्वामींच्या पारपत्यकाराशी रुजू न होऊन मोरोपंतांशी रुजू होतां.' –रा. ११.४१.

**अज्रा मन्हामत**—क्रिवि. कृपेनें; कृपादत्त; बक्षीस. 'हे वतन.. यास अज्रा मन्हामत वतन करून दिले असे.' –रा ८.८७ [ फा. अझ्राह्+अर. मर्हमत=कृपा ]

**अज्रा(जरा)वळ**—स्त्री. लहान मुलीच्या गळयांत ( दृष्ट लागूं नये म्हणून ) घालण्याचा एक दागिना; दृष्टमण्यांची माळ. [वज्रावळ पहा. ]

**अज्रूय**—क्रिवि. रीतीनें; रुईनें. 'अज्रूय वाजबीच्या हक्क परस्तीच्या इन्साफाच्या रीतीनें इन्फिसाल करितील.' –पेअ ६१. [ फा. अझ्+रू+ए=मुळें; योगानें ]

**अझ**—अज ( पासून ) पहा.

**अझूण–णी, अझून**—अजून पहा.

**अट**—स्त्री. १ अडथळा; अडचण; अटकाव; हरकत; नड. २ चाक पुढें जाऊं नये म्हणून चाकास लाविलेला दगड किंवा घुणा; उटी. ३ ( ल. ) ठरलेल्या गोष्टीविरुद्ध आचरण घडूं नये म्हणून त्याबद्दल केलेला करार–शर्त; देण्याघेण्याविषयीं कुळाकडून जो निर्बंध करून घेतात तो. ४ हट्टीपणा; हेका; हट्ट; दुराग्रह. ५ घट्ट बसविलेला मांधा उचकटण्याकरितां तरफेप्रमाणें लावलेला दगड, खिळा, पहार वगैरे; जोर. ६ विण्याची किंवा सतारीची घोडी; सतारीच्या दांडीवरील हस्तिदंती पट्टी- हिच्यावरून तारा खुंटीला अडकविलेल्या असतात. ७ दोरीचा गुंता; गुंतवण; पीळ; अढी. ८ (ल.) मनांतील गांठ; विपरीत ग्रह ९हातमागाच्या परदेशी नांवाच्या खुंटयापुढें बांधलेली, करकोचे पाडलेली काठी– हिला विणावयाचे धाग्याचे पुंज निरनिराळे बांधलेले असतात. १० गोटया खेळतांना हातास व बोटांस जोर येण्यासाठी आधाराला जमीनीवर टेंकलेला अंगठा; किंवा जेथें असा अंगठा टेंकला जातो ती जागा. [ प्रा. का. अड–डु=आडवा, अडथळा. ]

**अट**—स्त्री. मोट वगैरे थांबल्यानंतर पाटांतून वाहणारें पाणी; ( अटत अटत राहिलेलें जें पाणी ). 'एवढया अटीनें वाफा भरेल, मोट उभी कर.' [ अटणें ]

**अटअट**—स्त्री. परिश्रम; त्रास. अटाअट, अटापिटा वगैरे पहा. [ सं. आर्ति; प्रा. अट्ट; का. अट ]

**अटक**—स्त्री. अट पहा. १ बंदी; अडथळा; अटकाव; प्रतिबंध; मर्यादा. 'जया सोहंभाव हा अटकु। ' –ज्ञा ६.११५; 'तुला कोठेंहि बंद अटक नाहीं.'–नल१२०. २ वचक;धाक; दबदबा. ३ कैद. 'जवाहरलाल यांना सरकारनें अटक केल्याबद्दल मिरवणूक निघाली.' –केसरी१६. ८.१९३०. **अटकेंत घालणें**–कैद करणें. **अटकेंत पडणें**–कैदेंत पडणें. ४ अडचण; नड; खोळंबा. 'तरी उरलें असे एक । थोर अटक मजलागीं ॥ ' –एभा ६.२६७. ५ (करार मोडल्याबद्दल) प्रायश्चित्त; दंड; शिक्षा. ६ कापड विणण्याच्या मागांत ज्यावर फणी आपटते तें लांकूड– वीण घट्ट, मजबूत व ठासून बसविण्याच्या कामीं याचा उपयोग होतो. ७ गाडीचा वेग बंद करण्याकरितां केलेला चाप; घुणा. ८गाडीची साठी व धुरे यांना जोडणारा दांडा. ९ सिंधुनदाच्या कांठचें एक गांव व तेथील सिंधुनदाच्या भागास दुर्लंघनीयतेमुळें मिळालेलें नांव. 'अगे मांडाव देत आले अटक उतरून नऊ कोसांवर ।' –ऐपो १२१. **अटकेवर झेंडे लावणें**– ( राघोबा दादानें अटकेपर्यंत मुलुख काबीज केल्यावरून ) शतकृत्य करणें; मोठा दिग्विजय मिळविणें. 'अटकेवर झेंडे न्याया यापुढें आणितां कोठुनि भरारी (राघोबा)। ' –विक ९. सतारीची घोडी;अट. –वि. न गवसणारें;हातीं न लागणारें. 'बाह्य शत्रु मरणात्मक । मन मरणासीही अटक ॥ ' –एभा २३. ७२३. २ कठिण; अवघड. 'निर्गुणाचा बोध अटक । ' –एभा २७. २५१. ३ अशक्य; अगम्य. 'ऐसें जें कांहीं एक । बोला बुद्धीसिही अटक ॥ ' –ज्ञा. १८.१४२०; 'माझेनि हस्तें काय घेणें । जें कां अटक सुरनरां ॥ ' –मुवन ६. ३८. [ प्रा. का. अड–अड्ड. ]

**अटकचटक-मटक**—स्त्री. १ लीला; चेष्टा; खेळ; नखरा. अटकचटक मटक दाउनि मन तुझें मोहिलें रे ॥' –अमृत २३.२५. २ एक खेळ; आटकमाटक पहा. [अटक+चटक. चटक द्वि. तुल० का. अटिग=खेळ्या; आटिके=खेळ; गु. अटकवाळु=चेष्टेखोर]

**अटकडी**—स्त्री. १ माळवदाची तुळईवरील लहान तुळई. २ छताच्या खालची तुळई, हिच्यावर नक्षी काढतात. ३ खिडकीचीं दारें उघडीं राहण्यास केलेली लोखंडी आंकडी. [का. अड–अट+कडी]

**अटकण**—न. अडकण पहा.

**अटकणें**—अक्रि. अडकणें; थांबणें; गुंतून पडणें; अटकाव, अडथळा होणें. ' इतकें बोलून अटकला. ' –बाळ २.१७३. [अटक]

**अटकर**—वि. बांधेसूद; नीटनेटका; आटोपशीर; व्यवस्थित. 'अटकर बांधा.' –क्रिवि. घट्ट; चापून चोपून; गच्च; आंवळ. [अटणें+कर प्रत्यय]

**अटकर**—वि. हट्टी; हेकेखोर; अडखोर; अडेल. [प्रा. का. अड्ड]

**अटकविणें**—उक्रि. थांबविणें; अडथळा करणें; प्रतिबंध करणें; अटक करणें. [अटक]

**अटकळ**—स्त्री. १ अजमास; अनुमान; अंदाज; सुमार; तर्क; मत; कल्पना. २ गणित किंवा इतर शास्त्रांतील नियम, सिद्धांत; रूढ किंवा लौकिकांतील चाल, रीत (कुस्ती, दांडपट्टा खेळण्याची, घोडयावर बसण्याची किंवा कोणतीहि विद्या-कला पार पाडण्याची). [सं. अर्ध+कल्=मोजणें; सांगणें. हिं. अटकल; गु. अटकल; सिं. अटकल]. **०णें**–उक्रि. १ ज्ञात होणें; माहीत होणें. ' गुप्त करो सदसत्कृत तत्काळ दहाजणांस अटकळतें ॥' –मोआदि २८.१. २ अंदाज करणें; कल्पना, तर्क करणें; निश्चित करणें-बोलणें-सांगणें. 'किती आहे तें मला अटकळत नाहीं.' **०पंचविशी**–स्त्री. आधारावांचून बांधलेला तर्क; अनुमान धपका; तर्क; अजमास; कल्पना; तगदमपटी. **०बाज**–वि. अंदाज करण्यांत तरबेज. **०बांधणें**–कल्पना करणें.

**अटकळणें**—अक्रि. अडक(ख)ळणें पहा.

**अटका**—पु. एक तांब्याचें नाणें; अर्धा रुक्का; अडका पहा. **म्ह०** 'अटक्याची कोंबडी आणि टका फळणावळ.' [सं. अर्धक]

**अटका**—पु. १ ग्रहण करण्याची शक्ति; व्याप; आटोका. २ अंदाज; अजमास; हिशेब; गणना. [सं. अर्ध+कल्; म. अटकळ]

**अटकाव(वा)**—पु. १ अटक; अडथळा; प्रतिबंध; प्रतिरोध; विघ्न; अडकाठी. २ कैद; अटक. ' त्यांच्या अटकावापासून...शोध लागेल. ' –टि २. २०१ [अटक]. **०ण-णी**–स्त्री. अडथळा; हरकत.

**अटकाविणें**—उक्रि. अटकविणें; अटकाव करणें; थांबविणें. [अटक–अटकाव]

**अटकाळ**—पु. दुष्काळ; महर्गता; दुर्भिक्ष; चणचण (पाऊस, पाणी, धान्य वगैरेची). (क्रि० पडणें, होणें). [अटणें+काळ]

**अटकी**—स्त्री. एक वनस्पति.

**अटकी**—स्त्री. अ(आ)ठकी; सागरगोटयांच्या खेळांत आठ सागरगोटे एकदम हातांत घेऊन नववा झेलण्याचा डाव. ' तुझ्यावर अटकी लागली. ' [सं. अष्टक प्रा. अट्ठक: म. अठक]

**अटकीचा दगड**—पु. शेताच्या सरहद्दीचा–बांधावरील दगड. [अटक]

**अटकें**—न. १ बैलावर लादलेल्या ओझ्याचा-पडशीचा-एका बाजूचा भाग. २ कुडतन; अखें (विडयाच्या पानांचें, भाजीचें, फळांचें वगैरे). [सं. अर्धक]

**अटकें**—न. अडथळा; अटकाव. [अटक]

**अटकोल**—वि. पान्हेचोर; पान्हा चोरणारी; हट्टी (गाय इ०). [अटखोर]

**अटखोर**—वि. हट्टी; हेकेखोर; अटीबाज; आग्रही. [अड–ट+खोर]

**अटंग-अटंग्य**—वि.(गो.)अवाढव्य;अफाट; भयंकर;विस्तीर्ण; घनदाट; निबिड. ' त्या अटंग्य रानांत तपाक बशिलो एक साधू ताका दिष्टी पडलों. ' [अथांग (अप.) अटव्य ?]

**अटघाट**—पु. स्त्री. अटाघाट; अटाआट; वायफळ श्रम; अटापिटा; वाटाघाट; काथ्याकूट. ' सभेमधें आटघाट । समाधान कैचें ।' –दा १९.२.७. [सं. अर्थ+ घात; प्रा. अटघात; किंवा सं. आर्त+घट् ?]

**अटघोळणा**—पु त्रास; उपद्रव; छळणूक; गांजणूक; हालहाल. (क्रि० करणें, होणें). [सं. आर्त+घोलन; प्रा. अट्टघोलण]

**अटण**—न. भ्रमण; भटकणें; हिंडणें; ' समर्थें भरतखंडीं अटणें केलीं । ' –सप्र ५८.३.५. [सं. अट्]

**अटणावळ**—स्त्री. सोनें, चांदी अटविण्याची मजुरी. [अटणें. प्रा. अट्ट= शुष्क होणें, सुकणें; का. अट्टु=आटविणें, शुष्क करणें]

**अटणी**—स्त्री. १ मूस. ' जन्म कर्माची आटणी । ' –दा ३. १.२. २ धातूचें वितळणें; रस होणें. ३ शोष; लुप्त होणें; सुकणें; वाळणें. ' पर्जन्यानें पृथ्वीवर उदक जें वाढतें तें सूर्यानें शोषणरूप अटणी लाविली आहे त्यामुळें अटलें जातें. ' ४ दाब; धाक; जरब; प्रतिरोधन. **म्ह०** १ दाळ घालावी दाटणींत लेक घालावी अटणींत. २ वरण दाटणी आणि बायको अटणी. ५ झिजणें; श्रम; यत्न ' तैशी लटिकियालागीं अटणी । विषयसाधनीं नरदेहा ॥ ' –एभा २.२२६. ६ क्लेश; त्रास. ' तेवीं आपलिया आटणिया । सुखें असतया प्राणिया ॥ ' –ज्ञा १७.२६१. ७ मिश्रण. [अटणें]

**अटणी**—स्त्री. १ गोणपाटाच्या मागांतील ताण्याचे धागे खालींवर होऊन मधून धोटा किंवा आडवा दोरा टाकण्यास जागा करण्याकरितां रुळासारखें वाटोळें लांकूड घालतात तें. २ गोणपाटाच्या

मागांतील धागे खालीं वर करणारीं दोन दांडकीं; हीं व गोमटें मिळून ओवी किंवा वही होते. [ अट ]

**अटणूक**—स्त्री. १ आटणें; कोरडें पडणें; दुर्भिक्ष; शोषण. २ (ल.) व्यापारांत उतरती कळा; अवकळा; जातापाय. [ अटणें ]

**अटणें**—अक्रि. १ ( उष्णतेनें ) घट्ट होणें, कमी होणें ( दूध, रस वगैरे ). २ आकसणें; आंखूड होणें; आकुंचन पावणें; आक्रसणें ( कापड इ० ). ३ कामास पडणें; खपणें; विवक्षित कार्याकडे विनियोग होणें. 'दोन्ही अंगरख्यांचें कापड एका अंगरख्याला अटलें.' (ल.) एकजीव-एकरूप होणें. 'मीचि होऊनि आटले । उपासिती।'—ज्ञा ८.१२६. ४ सोनें, चांदी वगैरेचा रस होणें; वितळणें. ५ ऱ्हास-क्षय पावणें; खर्च होणें (मालमत्ता, संग्रह वगैरेंचा). 'तैसें तुकयाचें धनधान्य समस्त । अटोनि गेलें जेथचें तेथें ॥' ६ घट्ट होणें; मजबूत होणें. 'नित्य मेहनत केली असतां शरीर अटून बळकट होतें.' ७ नाश होणें; लुप्त होणें; शुष्क होणें; वाळणें; नाहींसें होणें. 'साहावी माझी ओवी । साहाही आटली ।'—तुगा ३८४८; 'दुहोत भलते सदां तरि न लेशही आटती ।'—केका ५८. ८ —उक्रि. पीळ घालणें; वळणें. 'हें सुंभ तिपदरी अटून आण.' ९ त्रास देणें; बेजार करणें; निःपात करणें; निकाल करणें. 'अटीन सकळ त्रिभुवन । जैसें प्रल्हादाकारणें संपूर्ण । श्रीनृसिंहें अटिलें ॥' १० अटविणें; वितळणें (धातू). [ प्रा. अट्ट; का. अट्टु ]

**अटणें**—अक्रि. भ्रमण करणें; प्रवास करणें; फिरणें; भटकणें; हिंडणें. 'पुढें मृगयामिषें अटतां । गंगातीरा पातला ॥' [ सं. अट्= भ्रमण करणें ]

**अटता काळ, अटता पाया**—पु. ऱ्हासाचा, उतरता काळ; अवकाळ. 'धंदा करितां नये यश । अटता काळ यासि आला ॥' [अटणें+काळ, पाया]

**अटदार**—अटखोर पहा.

**अटन**—अटण पहा. उ० देशाटन, तीर्थाटन, भिक्षाटन, इ०. 'तीर्थे अटन विशेषें । हालि चालि करिते भिक्षुके ।'—ऋ २१.

**अटप**—पु. १ संकुचित करणें; थोडक्यांत आणणें; आकुंचितपणा—स्थिति. २ ताबा; वचक; अंमल; दाब. ३ व्यवस्थितपणा; सुटसुटितपणा; आटोप; आवर; उरक. ४ आटपणें; गुंडाळणें; बंद करणें; मोडणें. [ सं. आटोप ? का. अट्टु ? ]

**अटपणें**—उक्रि. १ एकत्र करणें; गुरफटणें; अकुंचित करणें. २ व्यवस्थित लावणें ( पुस्तकें, हत्यारें वगैरे ). ३ ताब्यांत घेणें; हातांत घेणें; गोळा करणें. 'बापाची संपत्ति वडील भावानें अटपली.' 'वारा पुढचा आला, शीड त्वकर आटप.' ४ उरकणें; झटपट करणें. 'स्नान-संध्या अटपून पढावयास ये.' ५ गांठणें; मजल मारणें; मिळणें. 'तूं पुढें गेलास तरी मी धांवत येऊन तुला अटपीन.' ६ संभाळणें; व्यवस्थितपणें चालविणें. उदा० संसार अटपणें. ७ संपविणें; खलास करणें. 'भांड्यांतला गूळ अटपला.' ८ आवरणें; थांबविणें; मर्यादा घालणें; दाबणें. 'धीर धरोनी आटप म्हणुनी बाष्पें मजसाठीं।'—केक ४१. —अक्रि. १ मरणें; नाश पावणें. 'पांच हजार फौज अटपली'. २ सुकणें; संपणें; नाहींसें होणें. 'या तळ्यांतील पाणी अटोपलें तेव्हां पक्षीदेखील गेले.' [ सं. आटोप ? ]

**अटपता, अटपशुद्ध, अटपसार**—वि. बेताचा; सुटसुटीत; टुमदार; बांधेसूद; लहानसर; सोइस्कर; ( शरीर, इमारत, कपडा ). उ० अटपसार अंगारखा. [अटपणें]. **अटपता करणें–घेणें–धरणें**– १ थोडक्यांत आवरणें; संकुचित करणें ( काम, धंदा ). २ शेवटास नेणें; संपवीत आणणें.

**अटपविणें**—उक्रि. १ एकत्र, एके ठिकाणीं, जमा करणें; गुंडाळणें. २ उरकणें; संपविणें; विल्हेवाट लावणें; फन्ना करणें ( काम, खाद्यवस्तु वगैरे ).

**अटपळ, अटफळ**—न. पासोडीच्या दोन तुकड्यांपैकीं प्रत्येक; कांबळ्याचा एक पट्टा. [ सं. अर्ध+पट ]

**अटपाअटप**—स्त्री. अवराअवर; विल्हेवाट; निरवानिरव; वारासार; विसकटलेल्या वस्तूंची जमवाजमव. [ अटप द्वि. ]

**अटपाट**—आटपाट, आठपाट पहा.

**अटबाज**—वि. हेकेखोर; हट्टी; मानी. [अट+बाज]. **अटबाजी**—स्त्री. हेका; हट्ट.

**अटरणें**—उक्रि. १ अक्रसणें; आंखडणें. २ रुसून बसणें; फुगणें; ताठणें. अठरणें, अवटरणें पहा. [ का. अट्टु; म. अठी, अठर. ]

**अटरफटर**—न. १ सटरफटर; रद्दी; लटरफटर; ऐलफैल. २ बडबड; वाचाळपणा; वटवट. —वि. अप्रस्तुत; निरुपयोगी. [सं. अ+स्फुट; प्रा. फुट. फुट. द्वि. ]

**अटवणें, अटविणें**—आटवणें पहा. **अटवून टाकणें**— (मंत्रानें भूत, सर्प, वगैरेस ) बांधून टाकणें; रोधणें.

**अटवल**—आटवळ पहा.

**अटवळा**—पु. शेताची राखण करण्यासाठीं किंवा धान्य उफणण्यासाठीं किंवा कडबा वगैरे ठेवण्यासाठीं शेतावर बांधलेला माळा; अटोळा. शिवाय अटाली, अटाळा पहा. [ सं. अट्ट=गच्ची, माळा+ वल्न ]

**अटवी**—स्त्री. जंगल; अरण्य; वन. 'अटवियेमाजीं जैसा । वन्हि रिघतां सहसा ॥'—ज्ञा १८.१५२१. [सं. तुल० का. अट=गति; ते. अडवी; 'अड' हा द्राविडी धातु व वी हा प्रत्यय ]

**अटव्य**—वि. घोर; निबिड ( रान—अरण्य ). 'वनें अटव्यें उल्लंघून।'—मुआदि २.९०. 'चोरांच्या अटव्य रानांत नेऊन सांडा।'—रोज्यू १६२. —न. अरण्य. 'द्वितिय वर अटव्या राघवा पाठवावें।'—राअ २८. [सं. अटवी ]

**अटस**—वि. अडस; लहान; घट्ट; मजबूत ( शरीर, बांधा ). –क्रिवि. आवळ; घट्ट; करकचून ( बसणें, जुळणें ). [ का. अट्टु, अ-ड्डिसु=अटवणें ]

**ॲटहोम, ०पार्टी**—स्त्री. मित्रमंडळींना छोटी मेजवानी, फराळ, उपहार. यावेळीं पदार्थ मांडून ठेवलेले असतात. पाहुण्यांनीं लागेल तें खावें. गाणें, नाच, खेळ वगैरे करमणुकीचे प्रकारहि फराळा-सोबत असतात. 'त्यांनां या औपचारिक गोष्टी आवडतच नसत. ॲट ०चें नांव काढलें कीं अण्डरसनसाहेबांचें डोकें उठत असे. –नपुक २३. [ इं. ]

**अटळ**—वि. न टळणारा; चुकवितां येणार नाहीं असा; न सुटणारा. [ सं. अ+टळणें. सं. अटल=स्थिर, भक्कम; का. तळर्= हालणें, चळणें ]

**अटा**—पु. प्रतिबंध; अडथळा. ' हृदय विकळ जेव्हां देहभावा अटा कीं । ' –राघा १४८. [ का. अड्ड; म. अट ]

**अटाअट**—स्त्री. १ वाण; उणीव; टंचाई ( पैसा; धान्य यांची ). २ कोरडे पडणें; वाळून जाणें; शुष्कपणा (विहीरी, नद्या यांचा). अट-भट पहा. [ अटणें ]

**अटाई**—स्त्री. १ अटविण्याची मजुरी. २ शुष्कपणा; कोरडेपणा.

**अटा-आट-घाट-पीटा-पिटी-पिट, अटाटी**—स्त्री. १ छळ; गांजणूक; नाश; कापाकापी. ' यादवांचेआं कटकां भीतरीं । पारकां आटाआटी केली थोरी ॥'–शिशु ९८८. २ त्रास; भगीरथ प्रयत्न; खस्त; दगदग. ३ थकवा; भागवटा; शीण. [ अटणें, घाटणें, पिटणें. लष्करचे लोक गांवीं उतरले असतां तेथील लोकांकडून आटा ( पीठ ) फुकट मळून घेत; तसेंच ऋणकोकडे तगाद्यास आलेला शिपा-ईहि करी. त्यावरून विनाकारण त्रास ( सरकारी किंवा सावकारी ). भातृसंवृ. हिं. अटा+म. पीठ ]. **अटापीट पाडणें**–मेटाकुटीस आणणें.

**अटांक**—वि. ( गो. ) टांक नसलेला. [ सं. अ+टंक. ]

**अटांगपटांग**—वि. लांबलचक; लंबाचवडा. ' अटांगपटांग बाता तेवढया पाहून घ्या. ' [ पटांग ( ण ) द्वि. ]

**अटाट**—स्त्री. श्रम; यातायात. 'ग्रंथ पूर्ण लिहून झाल्यावर छापून काढायची अटाट पडली. ' –नि ६१०. अटअट पहा. [ अट द्वि. ]

**अटाटा**—पु. खल; गाजावाजा; बोभाटा. 'आधीं उमासासू-बाईसारखी सच्छील बायको, त्यांत त्या रुपयांचा इतका अटाटा झालेला आणि त्या कशा मागतील '. –पकोघे. [ अट द्वि. ]

**अटाटी**—स्त्री. कष्ट; श्रम; दगदग; हाल. 'टाकिली अटाटी भोगावया ।' –दावि ३५. [ अट द्वि. ]

**अटानिमा**—पु. त्रास; अटाअट पहा.

**अटारणें अठारणें**—उक्रि. अंवटरणें पहा.

**अटारन्या घोळणें**—(व.) सतावून सोडणें. 'तुम्ही गेल्यावर आमच्या खूप अटारन्या घोळल्या त्यानें. '

**अटारा**—पु. १ काबाडकष्ट; ढोर मेहनत; मेटाकुटीस येणें. २ कष्टामुळें थकवा, ग्लानि येणें. ( क्रि० पडणें, पाडणें ).

**अटारे (रो) टा**—पु. १ सारा वसूल करणाऱ्या शिपायास (पीठ) रोटी वगैरे शिधा देण्याची रीत. २ किरकोळ काम; हलकीं कामें (दळणकांडण, मोलमजुरी वगैरे). ' दादला मेल्यापासून मी अटारेटा करून पोट भरित्यें.' ३ अटापिटा पहा. [ सं. अट्ट=अन्न; हिं. अटा+रोटी ]

**अटाला**—पु. (क.) घरचीं माणसें जनावरें; खटला; लष्करी तळाचें सामानसुमान; सरंजाम; मंडळी; अवजड सामान इ०. –ख ४७२१.

**अटाली**—स्त्री. मनोरा; मोठा वाडा; गच्ची; माडी; अटवळा; माळा. ' मोडिल्या गोपूर आटाळीं।' –मुवन ३.५; 'आटाळयावरि लोकलाज त्यजुनि बाळा उभ्या ठाकती'–शशिसेना ' वाटांबिही नामभरें अटाळ्या । पौरांगना वाजवितात टाळ्या ॥ ' –सारुह ५.१२. [ सं. अट्टाल, अट्टालक, अट्टालिका; प्रा. अट्टालग –य; ते. अट्टालकमु–वेशीवरचा मजला. का. अट्ट=माळा; सि. अट-हलो, आटालो; इं. ॲटिक=पोटमाळा. ]

**अटास**—( प्र. ) अट्टाहास; अट्टहास; प्रचंड उद्योग; अत्यंत परि-श्रम, मेहनत, कष्ट; अटाआट. [ सं. अट्ट=मोठे, फार+आयास=कष्ट]

**अटाळा-ळी-ळें**—पु. स्त्री. न. १ अटोळा; अटवळा; अटाली पहा. ' माड्या अटाळ्या आणि उंच भिंती ।' –सारुह ७.६८. २ (व.) अडगळीचा माळा. ' मोडकी खाट अटाळ्यावर पडली असेल. ' [ अटाली पहा. ]

**अटी**—स्त्री. १ मोहरमांत हातांत घालावयाची पिळदार दोरी; सैली; सुताची किंवा रेशमाची लड; कळी. २ अट–गोटीखेळ पहा. ३ हट्ट; अट. 'ऐसी एका अटीं । रितीं शिणती करंटीं ॥ ' –तुगा २७८४. ४ कष्ट; श्रम. [अट, अटा]. **०तटीचा सामना**–चुरशीचा सामना. [ अट+तट+सामना ]

**अटीचा**—वि. अटील; हेकेखोर; मानी. ' बिडकर खुर्देकर आटीचे।' –ऐपो २२२. [अट]. **०करार–बोली–खेळ**–पु. जो हरेल त्यानें अमुक शिक्षा भोगावी किंवा दंड द्यावा असें ठरवून खेळ-तात तो शर्तीचा खेळ. –**ची चाकरी–काम**–स्त्री. विशेष शर्तीवर करावयाची, चाकरी काम. **अटीबाज–खोर**–वि. मानी; अटदार. [ का. अड्ड; म. अट+फा. बाज–खोर ]

**ॲंटीमनी**—स्त्री. अंज धातु; सुरम्याची धातु. याचा मुख्य उपयोग छापखान्यांतील टाईप तयार करण्याकडे करतात. [ इं. ] **०क्रूड**–न. एक होमिओपॅथिक औषध; सर्दी व मस्तकशूळावर उप-योगी. [ इं. ]

**अटील**—वि. हट्टी; मानी; अटीचा. [ सं. अटल; म. अट ]

**अटीली**—अटाली पहा.

**अटीव**—वि. १ उकळून, अटवून घट्ट केलेलें (दूध, खीर वगैरे). २ वितळलेलें (सोनें). ३ ओतींव: वितळवून तयार केलेले. 'अटींवा लोहाचे खांब जैसे।' –ज्ञा १६.३७९. ४ कुस्ती इ० परिश्रमानें घट्ट–मजबूत बनविलेलें, पिळदार (शरीर). 'जो आटींव जेठिया ऐसा।' –मुसभा ६.१५३.५ संकुचित: अकुंचित: आखूड केलेलें. [अटणें. प्रा. अट्ट; का. अट्टु]

**अटीवाद**—पु. हेकेखोरपणाचा वाद: हट्टीपणानें भांडणें: हट-वाद पहा. [अट+वाद]

**अटु**—आटु–द्द पहा.

**अटुकमटुक**—अटकमटक पहा.

**अटुवें**—वि. संकुचित: घांकडें. 'अटुवे हियें आवली ॥' –ज्ञा ६.७७. [अटणें]

**अटुळणें**—आटुळणें पहा.

**अटेंडन्स**—पु. हजिरी 'अटेंडन्स अलावन्स'=हजेरी भत्ता. [इं]

**अटेन्शन**—न. (ड्रिल हुकूम) लक्ष; सावधान. [इं.]

**अटोका**—पु. शक्तीची किंवा सामर्थ्याची मजल, इयत्ता: योग्यता: आकलनशक्ति: अवांका, झेप. पोंच. [का. एटकु=आटो-क्यांत येणें; एट्किे=अटोका]

**अटोका(क)ट**—वि. १ अत्यंत; शिकस्तीचा; वरच्या दर्जाचा; अमर्याद; अचाट; (सद्गुण, अत्युच्च गोष्टी इ.). 'त्याचें अटोकाट ज्ञानहि लक्षांत येऊन,' –नि ५७६. २ अट्टल; वरचढ; अतिशहाणा; योग्य; जहांबाज; प्रचंड. ३ सर्व: समग्र; पूर्ण; एकूणएक (लहान थोर सर्व दर्जाचे). [सं. अट्ट=उच्च+काष्ठा=सीमा, दिशा: प्रा. अट्टकट्ठा. सं. आ+कंठ ?]

**अटोप-णें**—अटप, अटपणें पहा. 'त्या गुप्त कल्पना कोणास कळाव्या। कोणें येऊन आटोपाव्या॥' –दा १९.८.१८. –**अटो-पता–सार**–अटपता–अटपसार पहा.

**अटोपी**—वि. (व्यवस्था करण्यांत) हुशार: तरबेज: चपळ; चलाख. [अटपणें]

**अटोफळी**—स्त्री. आठ फळांचें वायन; प्रत्येक ब्राह्मणास आठ आठप्रमाणें ६४ फळांचें दान: अठफळी: अष्टफळी. [सं. अष्टफल]

**अटोमॅटिक**—वि. १ आपोआप चालणारें, होणारें; स्वयंसिद्ध. 'अटोमॅटिक रिव्हायव्हल' (विमा)=अपोआप चालू होणारी. २ न कळत घडणारें; केवळ यांत्रिक: बुद्धीच्या उपयोगाशिवाय. [इं.]

**अटोळा**—अटवळा, अटाळी पहा. 'वदोनि अटोळीं निजला घोरत।' –दावि ३४७.

**अटोळी**—स्त्री. १ फणसासारख्या कांहीं (खारीक, जांभूळ इ.) फळांतील बी; अठळी. आंब्याच्या कोयीलाहि म्हणतात. २ पुरु-षाच्या वृषणांतील दोन गोट्यांपैकीं एक; अंड. [सं. अस्थि–अष्ठि–अष्ठि; प्रा. अट्ठि=अपरिपक्व फळ; अटी. किंवा सं. अष्ठीला, अष्ठि-लिका=गोटी, गांठ; अट्ठिलिआ–अठळी.]

**अट्टरणें**—अटरणें पहा. **अट्टरणा पाडणें**–(माण.) जनावरांस खूप दमविणें.

**अट्टल**—वि. १ निपुण; हुशार; निष्णात. उ० अट्टल पोहणारा-धांवणारा; लिहिणारा. २ पक्का; वस्ताद: तरबेज; बेरकी; लबाड. उ०–अट्टल चोर [सं. हट्टचौरक=बाजारांत चोरी करणारा; प्रा. अट्ट-चोर: अट्ट (ल) चोर. 'ल' स्वार्थी प्रत्यय –भाअ १८३५]; **अट्टल** सोदा, वगैरे. ३ अस्सल: खरा. उ० अट्टलमित्र–स्नेही. ४ स्थिर; अढळ: निश्चल. [सं. अटल=स्थिर, अचंचल; प्रा. अट्ट=निर्लज्ज, बेश-रम: का. आटआळी=खेळाडू; हिं. अटल; बं. अटल.]

**अट्ट(ट्टा)हास**—पु. १ जोरानें, मोठ्यानें हसणें. २ मोठा आवाज, स्वर. आक्रोश. 'करि रुदन अट्टहासें।' –एभा३०.२३१. 'अचेतन पडिलें शरीर प्रेत। जवळी स्त्री आली धांवत। अट्टहासें शोक करित।' –ह ३३.२०८. [सं. अट्ट=मजला+हास]. अटास पहा. ०**धरणें**–महत्त्वाकांक्षा बाळगणें: हट्ट धरणें. 'मराठेशाही बुडवि-ण्याचा अट्टाहास धरून आपल्या अफाट सेनेसह महाराष्ट्रांत तळ देऊन बसलेला बादशहा यावेळीं कोणती गोष्ट करीत होता ?' –स्वप १३३.

**अट्टा**—पु. (वे.) विहिरीच्या तळाशीं बांधकामाच्या खालीं बसविलेली चौकट.

**अट्टाहास्य**—मोठा प्रयत्न; अट्टहास पहा. 'चोरासाठीं रद-बदल अट्टाहास्य। जळो जिणें दास्य बहुतांचें॥' –तुगा १८९४.

**अट्टी**—स्त्री. (कर्ना.) वाहाणा, जोडे यांचा तळ. 'या माझ्या वाहाणा दोन अट्टीच्या आहेत. [का.]

**अट्टी**—स्त्री. (क.) अट (१०) पहा. 'अट्टी न उचलतां गोटी मार.'

**अट्टीखोर–बाज**—वि. अटखोर पहा.

**अट्टीवाद**—पु. हट्ट; दुराग्रह; ठोक निश्चय. अटीवाद पहा. (क्रि० करणें, लावणें, धरणें.)

**अठ**—क्रिवि. (खा.) इथें; येथें; अठें पहा.

**अठंगुळा(ळें), अठंगूळ**—अठांगुळें पहा.

**अठताल**—पु. कर्नाटक संगीतांतील एक ताल. याचे मात्राप्रकार पांच आहेत: ते असे: १०,१२,१४,१८,२२. अष्टताल पहा.

**अठतीस**—अडतीस पहा.

**अठप (फ) ळें**—अटपळें पहा.

**अठफळी** अटोफळी पहा.

**अठरणें**—अटरणें पहा.

**अठरा**—वि. १ एक संख्याविशेष; १८. २ (सांकेतिक) पुराणें (मुख्य पुराणांची संख्या १८ आहे). 'कृष्ण वर्णुनियां श्रेष्ठ। चौघे गर्जताती भाट। अठरा मागध उद्भट। वंशावळी वर्णिती॥' –एरुस्व ६.७६. तो हा पंढरीचा राणा। पुसा सहा चौं अठरां जणां॥' –तुगा २५३९. [सं. अष्टादशन्; प्रा. अट्ठदह, अट्ठारस–ह; हिं. अठारह;

पं. अठारां; बं. आठार; उ. अठर; गु. अढार; सिं. अडहं ]. ०**अखाडे**–अखाडा पहा. ०**उपधान्यें**–न.अव. सजगुरा, भादली, वरी, नाचणी, बरग, कांग, खपले गहूं, मका, करडई, राजगिरा, मटकी, पावटा, मूग, वाल, कारळा, देवभात, सातू, अंबाडी. ( दुसरी गणना ) सजगुरा, नाचणी, वरी, मका, मटकी, राजगिरा, शिरस, पांढरफळी, जिरें, मेथी, वेणुबीज, देवभात, कमलबीज, पाकड, अंबाडी; भेंडीबीज, गोवारी, कुडयाचें बीज, यांमध्यें कोठें कोठें खसखस व पांढरा राळा घालून ही संख्या विसावर नेण्यांत येते. ०**उपपुराणें**–उपपुराणें पहा. ०**उपजा( या )ती**–स्त्री. अव. अठरापगड जातींप्रमाणें ज्या अठरा उपजाती आहेत त्या अशाः भिल्ल, कोळी, मांग, अंत्यज, चांडाळ, पुल्कस, जिनगर, सलतानगर, चर्मक, डोहर ( ढोर ), भाट, बुरुड, रजक, दांगट, मोचेकरी, खाटिक, लोणारी व कैकाडी. –स्वादि ६.५.३७–३८. ०**कचेरी**–स्त्री. ( म्है. ) राज्यकारभारांतील सर्व वरिष्ठ खातीं असणारी मोठी कचेरी; सेक्रेटॅरिएट. ०**कारखाने**–पु.अव. १ राज्यकारभारांतील खातींः(अ) उष्ट्र, खबुतर, जनान, जवाहीर, जामदार, जिकीर, तालीम, तोफ, थट्टी, दफ्तर, दारू, दिवान, नगार, पील, फरास, बंदी, मोदी व शिकार हे अठरा कारखाने. ( आ ) तोप, पील, उष्ट्र, फरास, शिकार, रथ, जामदार, जवाहीर, जिराईत, नगार, दारू, वैद्य, लकड, इमारती, मुदबख, कुणबिणी, खाजगत, थट्टी. ( इ ) खजीना, दफ्तर, जामदार, पील, जिराईत, अंबर, फरास, मुदबख, नगार, सरबत, आबदार, शिकार, तालीम, दारू, उष्ट्र, बकरे, तोप, सराफ. या तीन व आणखीहि कित्येक निरनिराळ्या याद्या सांपडतात. हे सर्व कारखाने सरकारी असून त्यांवर स्वतंत्र अधिकारी असत. सर्वांवर खानगी कारभारी मुख्य असे. ' त्याच्या अठरा कारखान्यांच्या गेल्या कळा । '–ऐपो १४२. २ ( ल. ) मोठ्या संसाराच्या किंवा व्यवहाराच्या शाखा–खातीं. [ अठरा+फा. कार्खाना ]. ०**खूम**–न. लोकांच्या अठरा जाती. सर्व प्रकारचे लोक; अठरापगड जात. 'या गांवांत एक मुकादम नाहीं, अठरा खुमाचे अठरा वेगळाले आहेत;' शिवाय –भाअ १८३४.४७. [ अर० कौम; फा. खूम=जात, ]. ०**गुणांचा खंडोबा**–पु. ( ल. ) १ सर्व (दुर्)गुणांनीं भरलेला; लुच्चा किंवा लबाड इसम; अट्टल सोदा. सोळा गुणांच्यावर कडी–जसा नाशिककर हा काशीकरापेक्षां शंभर पटीनें वरचढ तसा हा. २ अक्षयी रोगी; दुखणेकरी; अनेक रोगांनीं-दुःखांनीं व्याप्त. ०**जाती**–स्त्री.अव. कुंभार, तेली, कासार, तांबोळी, न्हावी, परीट, कलाल, कोष्टी, झारा ( झारेकरी ), महार (चांभार), जैन, जती, दुंडे, गुजर, मारवाडी, सोनार, सुतार, हलालखोर (कसाब). –कोको. अठरापगड जाती पहा. ०**टोप( पी )कर**–हिंदुस्तानांत आलेले युरोपियन आपल्या निरनिराळ्या देशरिवाजांप्रमाणें टोप्या वापरीत; तेव्हां त्यांना टोपकर असें नांव पडलें. १८ प्रकारचे (युरोपियन) टोपकरः १ फिरंगी ( पोर्तुगीज ); २ वलंदेज (हालंड–डच); ३ निविशयान ( नार्वेजियन ); ४ यम्रदोर ?; ५ ग्रेग ( ग्रीक ); ६ रखतार ? ; ७ लतियान ( लाटिन ); ८ यहुदिन ( ज्यू ); ९ इंगरे ( इंग्रज ); १० फरासीस ( फ्रेंच ); ११ कसनत्यान ( शेटलंडियन केल्टिक ? ); १२ विनेज (व्हेनेशियन ); १३ दिनमार्क (डेन्मार्क; १४ उरुस ( आयरिश किंवा रशियन ); १५ रुमियान ( रुमानियन किंवा रोमन ); १६ तलियान ( इटालियन ); १७ सुवेस ( स्विस ); १८ प्रेमरयान ( पोमेरॅनियन ). –भाइ १८३५. दुसरी एक यादी–फिरंगी इंग्लिश, फ्रान्सीस, सिंध, पावलिस्त, क्रिस्त, ब्रम्हेय, डौम, द्रुप, काज, सुस्त, नाग, जर्मिनी, कालील, बांक, चीन, युवरेर, दौंडी. –कोको. यांत नुसते युरोपियन येत नसून हिंदुस्तानाबाहेरील चिनी वगैरेहि लोक येतात. 'वडिलांची अठराटोपीकरावर सलाबत आहे.' –विवि. ८.३.५५. ०**तत्त्वें**–न. अव. महान् ( बुद्धि ), अहंकार, मन, दहा इंद्रियें आणि पंचतन्मात्रें –गीर १८५. ०**धान्यें**–न. मुख्य धान्यें–गहूं, साळ, तूर, जव, जोंधळा, वाटाणा, लाख, चणा, जवस, मसूर, मूग, राळा, तीळ, हरीक, कुळीथ, सावा, उडीद, चवळी. ०**धान्यांचें कडबोळें**–न. ( भाजणी–अठरा धान्यें भाजून केलेल्या पिठाचा एक खाद्य पदार्थ ). ( ल. ) १ निरनिराळ्या प्रकारच्या गोष्टींचें मिश्रण. २ अनौरस अपत्य; जारज. ३ भिन्न जातींचा संकर; संकरजात; संकर जातींतील व्यक्ति. ०**पगडजात**–स्त्री. १ तांबट, पाथरवट, लोहार, सुतार, सोनार, कासार, कुंभार, देवळक (गुरव), धनगर, गौळी, लाडवाणी, जैन, कोष्टी, साळी, चितारी, माळी, तेली, रंगारी. –स्वादि ६.५.३५-३६. जशी युरोपियनांत टोप्यांची –अठरा टोपकर–तशी हिंदु लोकांची पगड्या बांधण्याची तऱ्हा जातीजातींत वेगळी आहे; तेव्हां जितक्या जाती तितके पगड्यांचे प्रकार; यावरून सर्व जाती किंवा जातींचे लोक; एकूणएक लोक. २ अव्यवस्थित, मिश्र जनसमूहः नाना धर्मांचा जमाव. ' या यात्रेंत अठरापगड जात मिळाली आहे, तेथें सोंवळें काय पुसतां ?' [ अठरा+पगडी किंवा पगडा=फाशावरील संख्यावाचक चिन्ह ] ०**पद्मे वानर**–पु.अव. तरुणांचा जमाव, टोळी, सैन्य; वानरसेना. ( रामाला मदत करणारीं १८ पद्में वानरें होतीं ). ०**पर्वें**–न.अव. महाभारताचीं मुख्य प्रकरणेंः–आदि, सभा, वन, विराट, उद्योग, भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य, सौप्तिक, स्त्री, शांति, अनुशासन, अश्वमेध, आश्रमवासी, मौसल, महाप्रस्थानक व स्वर्गारोहण. ०**पर्वें भारत**–न. (ल.) मोठी कंटाळवाणी गोष्ट; लांबलचक, ज्यांत अनेक भारुडें व दुःखप्रसंग भरले आहेत असें कथन; चऱ्हाट. ०**पुराणें**–पुराणें पहा. ०**बाबू**–लबाड किंवा लुच्च्या लोकांची टोळी; आळशी लोकांचा कंपू; अव्यवस्थित लोकांचें मंडळ; बारभाई. ( हल्लीं ) कारकून वर्ग. बाबू पहा. [ बं. हिं. बाबू=राजेश्री; समान्य; आंइं. इंग्रजी लिहिणारा हिंदु कारकून ]. ०**भार वनस्पति**–स्त्री. पृथ्वीवरील सर्व वृक्ष–वनस्पति यांचा समुदाय. ' अठराभार वनस्पतींची लेखणी । '–ज्यं ३१.

**०वर्ण**—पु.अव. अठरा (पगड) जाती. यांची एक याद अशीः ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, कुंभार, गवळी, तेली, पांचाल (सोनार, सुतार, लोहार, तांबट, पाथरवट, हे पांच मिळून), कोष्टी, रंगारी, शिंपी, न्हावी, पारधी, महार, धनगर, परीट, मांग व चांभार. **०विसवे (विश्वे)**—वि. अतिशय; बहुतेक परिपूर्ण; जास्त प्रमाणाचें. विश्वा, विसवा पहा. [अठरा विसांश; वीस विसवांचा एक रुक्का, अठरा विसवे म्हणजे दोन विसवा कमी इतकें; बहुतेक पूर्ण] **०दारिद्र्य (दरिद्र)**—न. अतिशय गरिबी. 'त्याच्या घरीं अठरा विश्वे दरिद्र आहे.' 'अठराविश्वे दरिद्र पाणी वाहतें.' **०विश्वे-पापपुण्य-चौकशी-मूर्ख-धर्म-रोग** इ० वाक्प्रचार.

**अठलोंग**—क्रिवि. (खा.) येथपर्यंत; (व.) **अठलोक.** 'अठलोक आरता?' [सं. अत्र+लग्न]

**अठव, अठवगिरी**—पुस्त्री. आठवण; स्मृति; स्मरण; आठवण पहा. 'अठव देई सूर्यनंदना।' (क्रि० देणें, होणें).

**अठवडकरी**—पु. आठवड्याच्या आठवड्याला (आठ दिवसांनीं) व्याज मागणारा; पिळून काढणारा खिस्ती, सावकार. [अठवडा+करी]

**अठवडा**—पु. आठ दिवसांचा काल (रविवार ते रविवार दोन्ही दिवस धरून); महिन्याचा एकचतुर्थांश भाग; पंधरवड्याचा निम्मा. [सं. अष्टावर्त-अष्टवासर-अष्टवार; प्रा. अट्ठवाड, अट्ठाह; म. आठवडा; हिं. अठवाहा, आठवारा; सिं. अठिडयो; ते. अठावीढ]. **-डा-ड्या**—वि. १ आठ दिवसांनीं तापानें अजारी पडणारा; कधीं बरा तर कधीं दुखणेकरी (चाकर, मूल, इ०). २ आठ दिवस दूध देऊन नंतर तें देण्याचें बंद करणारी (गाय, म्हैस).

**अठवडे पा(वा)ईक**—वि. थोडे दिवस चालणारा किंवा टिकणारा; अठवड्याच्या मुदतीचा; (ल.) थोड्या मुदतीचा; लवकरच कामावरून दूर होण्यासारखा (सरकारी कामगार, नोकर, इ०). [अठवडा+सं. पदाति; प्रा. पाइक्क; म. पाईक=गांवकामगार. वाईक प्रत्यय]

**अठवण**—स्त्री. ध्यान; स्मरण; स्मृति; धारणा; धारणाशक्ति. आठवण पहा. 'पूर्व सुखाची अठवण देती। स्थळें कितीक विपिनीं॥' -मंमं १.

**अठवर**—वि. १ अविवाहत; विवाहाचें वय होऊन गेलें आहे असा; घोडनवरा-री. (कातकरी लोक अजून हा शब्द वापरतात). 'फुन भूतळीचेआं रायां अठवरां। माझेयां खांडयाचा करौनि नोवरा॥' -शिशु ७२७. २ निबर; निबरट. 'नुजवेची कव्हणें बोलें। आंगां आठुवरपण आलें॥' -शिशु २०८. [सं. अष्टि; प्रा. अट्ठी=अठळी; निबर; मोठा. अट्ठ+वर. तुल० अष्टवर्षा]

**अठवा**—वि. आठवा पहा.

**अठविणें**—आठविणें पहा.

**अठवें**—न. एक कैली माप; निठवें; अर्धाशेर; पायलीचा ८ वा हिस्सा. [आठ]

**अठसटि, अठसठ**—६८ संख्या; अड्डसष्ट पहा. 'अठसटि तीर्थांचा तोडरू।' -शिशु १४.

**अठहत्तर**—वि. ७८ संख्या; अठयाहत्तर पहा. [हिं.]

**अठळी**—अटोळी पहा.

**अठांगळें, अठांगुळें, अठांगूळ**—न. गर्भाधानसंस्कार योग्य कालीं व्हावयाचा राहिल्यास गर्भाच्या आठव्या महिन्यांत पुंसवन व सीमंत्तोन्नयन या दोन संस्कारांसह गर्भाधान संस्कार करतात. यांतील सर्व विधि गर्भाधानाप्रमाणेंच (ऋतुशांतीसह) करावयाचा असतो; अष्टमांगल्य पहा. 'मग जीवांचेनि मेळें। विकरलेंपणाचें आठांगुळें केलें॥' -शिशु ९०; 'तुझ्या भयानें आलों आम्ही आंगुळ कराया आठ॥' -होला ३९. [सं.अष्टांग-अट्ठंग? अष्ट+अंगुल?]

**अठायीं**—क्रिवि. १ अनाठायीं; भलत्या जागीं; एकीकडे. 'अठायीं ठेऊनिया नवनीत। मांजरा करवीं चाटवीत॥' २ धोक्याच्या जागीं; शरीराच्या नाजूक, गुह्य भागीं (दिलेला ठोसा, धक्का इ०). [सं. अ+स्थान; प्रा. ठाण-ठाय]

**अठाविसायुगीं**—क्रिवि. अठ्ठाविसाव्या युगांत. (ल.) कधींच नाहीं (चार युगांची एक अशा सात आवृत्त्या व्हावयाच्या, म्हणजे इतका लांबचा काळ, यावरून लक्षणेनें); कडच्या आदितवारीं.

**अठिवेठी**—स्त्री. येरझारा; जाये; जाणें-येणें. [सं. अत्र; खा. अठी=येथें. द्वि.]

**अठी**—स्त्री. कपाळावरील सुरकुती; अढी; वळी. 'एक ग्रास पाहतां दृष्टी। कपाळासी घालती अठी॥'. २ मनांतील गांठ किंवा विपरीत वाईट ग्रह. ३ सैली; अटी (१) पहा. ४ मिठी; ऐक्य. [का. अड्ड]. (क्रि० धरणें). **०घालणें १** कपाळ संकुचित करणें; नाखुशी-तिरस्कार दाखविणें. २ आलिंगिणें; कवटाळणें. **०कमरेस घालणें**—कमरेस विळखा घालणें; मिठी मारणें.

**अठी**—स्त्री. १ फळांतील बी; अटोळी; अठळी. २ (ल.) कठीण चिवट गोष्ट-मुद्दा-प्रसंग; अवघड, भानगडीची बाब. [सं. अष्टि; प्रा. अट्ठी]

**अठी**—क्रिवि. (खा.व.) इथें; येथें. [सं. अत्र]. **०तठी**—क्रिवि. इकडे तिकडे; येथें तेथें. 'अठीतठी काय फिरतोस?' [सं. अत्र+तत्र]

**अठीं-अठें**—क्रिवि.आठांनीं गुणिलें असतां. 'एकी अठीं आठ.' [आठ+ई, एं तृ०चे प्रत्यय]

**अढूर**—क्रिवि. (कु.) पुष्कळ; भरपूर. [सं. आढ्य; प्रा. अड्ड; का. अड्ड=संपन्न, पुष्कळ?]

**अढूळ**—अठोळी पहा.

**अठे**—क्रिवि. ( खा. ) अठीं; एथें; येथें. [ सं. अत्र ]

**अठोक(प) परब्रह्म**—न. (ब्रह्माचें एक गुणनाम ) १ असा-मासिक, सिद्ध किंवा असाधित शब्दाला ही उपरोधिक संज्ञा लावितात; मूळ शब्द. २ ( ल. ) मठ्ठ; दगड; ठोंब्या; ज्याला शिकविण्याचा कांहीं उपयोग नाही असा; निसर्गसिद्ध बाळ ! [ अठोक =अघड, अजात+परब्रह्म ]

**अठोनीवेठोनी**—वि. १ पिळदार; पट्टीदार. २ (ल.) वेडा-वांकडा; कमातरी. 'अठोनी वेठोनी बांधला मुंडासा । फिरतसे म्हैसा जनामधीं ॥' –तुगा ३१७४. [ अठीवेठी; अठी+वेष्टन; किंवा वेठ ( =वेष्टन ) द्वि. ]

**अठोपहार**—क्रिवि. नेहमीं; सतत; कायम; अष्टौप्रहर पहा. [आठ प्रहर. सं. अष्टौप्रहर] **०बत्तीस घड्या**–निरंतर; कायमपणें; सारखें चालू.

**अठोफळी**—अटोफळी ( वाण ) पहा.

**अठोळा-ळी**—स्त्री. अठळी; बी; अटोळी पहा.

**अठ्ठा**—पु. १ फांशाच्या खेळांत आठाचें दान. २ पत्त्याच्या खेळांत आठ चिन्हांचा पत्ता; अठ्या. [सं. अष्ट; म. आठ]

**अठ्ठावन-न्न**—वि. ५८ ही संख्या. [ सं. अष्टपंचाशत्–अष्टपंचाश प्रा. अट्ठावन्न; सि. अठवंजाह ; हिं. अठावन. ]

**अठ्ठावीस**—वि. २८ ही संख्या. [सं. अष्टाविंशति; प्रा. अट्ठावीसइ–अट्ठावीस; सि. अट्ठावीह; हिं. अठाईस. ]

**अठ्ठीं**—क्रिवि. ( पटाच्या खेळांत ) आठव्या घरांत. अटीं पहा. [ आठ+ई ]

**अठ्ठेचाळ–चाळीस, अठ्ठेताळ–ताळीस, अठ्ठयेचाळ–चाळीस, अठ्ठयेताळ–ताळीस**—वि. ४८ ही संख्या. [सं. अष्टचत्वारिंशत्; प्रा. अट्ठचत्तालीस; अट्ठतालीस; हि. अठतालीस; सिं. अठेतालीह ]

**अठ्ठेहत्तर, अठ्ठयाहत्तर, अठ्ठयेत्तर**—वि. ७८ ही संख्या. [ सं. अष्टसप्तति=प्रा. अट्ठत्तरि, अट्ठहत्तरि; हिं. अठत्तर; सिं. अठहतरी ]

**अठ्ठ्या**—पु. गंजिफा आणि पत्यांच्या खेळांतला आठचिन्हांचा पत्ता; अठ्ठा. [ आठ ]

**अठ्ठयाऐंशीं–यशीं–अठ्याशीं**—वि. ८८ ही संख्या, [ सं. अष्टाशीति; प्रा. अट्ठासीइ, अठ्ठासि; हिं. सि.–अठासी ]

**अठ्ठयाण्णव**—वि. ९८ ही संख्या. [ सं. अष्टनवति; प्रा. अट्ठाणउइ; हिं. अठाणवे; सि. अठानवे ]. २ (व.) बदमाष; लबाड.

**अड**—अ. कमीपणा, उणेपणा, दुय्यमपणा, न्यूनता, गौणता दर्शविणारें उपपद. हें लागून कित्येक सामासिक शब्द बनतात; जसें अडघोडा, अडधोतर; अडदंड, अडसर. इ०. **अडच्या** ऐवजीं कधींकधीं ' आड ' असें रूप येतें सामान्यतः देशावरील लोक **अड** असें योजितात; कोंकणांत **आड** असें वापरतात तेव्हां अड आणि आड यांनीं आरंभ होणारे शब्द एकमेकांत घुसडले जातात. त्याकरित इष्ट शब्द एकाखालीं नसल्यास दुसऱ्याखालीं सांपडेल. **सूचना**:– संस्कृत अर्ध या शब्दापासून बनलेले व कानडी अड्ड (=अडवा, हट्ट; दुराग्रह) या शब्दापासून बनलेले सामासिक शब्द यांचा घोंटाळा होऊं देऊं नये, म्हणून प्रथम अड–अर्ध पासून संभवलेले शब्द दिलेले आहेत; नंतर कानडी अड्ड पासून साधलेले शब्द घेतले आहेत. कांहीं शब्द या दोन्ही वर्गांतहि पडतील; पण ते कोठेतरी एका ठिकाणीं दिले आहेत. ज्यांचा संबंध या दोहों अडशीं नाहीं किंवा जे महत्त्वाचे वाटले, ते स्वतंत्रच दिले आहेत. [सं. अर्ध; प्रा. अड्ढ]. **०कणी**–स्त्री. तांदूळ, डाळ, इत्यादिकांची मोटी कणी; प्रसंगविशेषीं ही तांदूळ–डाळींतहि मोडते; फुटका, अर्धवट दाणा; कणी. ' कापुरांचिआं भांजनियां। वाटौनि मौक्तिकांचिआं अडकणियां ॥' –शिशु ५९१. **०काष्टा**–पु. धोतर वगैरेचा आखुड किंवा अपुरा मुडपा, काष्टा. आडकाष्टा पहा. **०कुडतें**–न. लहान कुडतें; कुडतें पहा. **०खंड**–पु. तुकडा; अर्धवट, अपुरा भाग. ' मालांत माती नसून अडखंड नसावेत. ' –मुंव्या २६. **०खप्या**–वि. १ अंगमेहनतीनें कांही कामें करून पोट भरणारा मुलगा; पोऱ्या. २ किरकोळ काम करणारा नोकर; आडकाम्या; बगल्या; दुसऱ्याच्या हाताखालीं काम करणारा. **०खोल**–न. १ बांधून न काढलेली , सरासरी खणलेली विहीर; रेताड जमीनींत खणलेली व न बांधलेली विहीर. २ केरकचरा टाकण्याची विहीर, खड्डा; होरलेली विहिर; अर्धीच खणून टाकलेली विहीर. **०गडी**–पु. कामकऱ्याच्या हाताखालचा गडी किंवा मजूर; मदतनीस; हस्तक; अडखप्या. **०गांव**–पु न. लहान खेडेगांव; मोठी बाजार पेठ नसलेलें पण ज्याच्या जवळपास मोठे रहदारीचे रस्ते नाहीत असा भररस्त्या वर नसलेला गांव; खेडें; वाडी; गांवढें गांव. **०गोखमा**–अडबाप्या; पोरगा; गोखमा पहा. **०गोण** –स्त्री. बैल वगैरेवरून वाहून नेतात ती धान्याची लहान गोणी. **०घर**–न. मुख्य घराजवळ बांधलेलें लहानसें घर किंवा छप्पर; झोंपडें; सोपा; पडवी. आउट हौस **०घोडा**–पु. लहान घोडा; प्रसंग-विशेषीं मोठ्या घोड्याचेंहि काम करणारा घोडा; तट्टू. **०जात**–आडजात पहा. **०जिना**–पु. दुसरा लहान जिना; मागील जिना; चोर जिना. **०जुना–जून**–वि. अर्धवट जुना; उपयोगानें कांहींसा नादुरुस्त झालेला. वापरलेला; निरुपयोगी. **०दाणा**–पु. घोड्यास खावयास हरभऱ्याव्यतिरिक्त, दिलेलें धान्य, दाणा; ( घोड्याचा दाणा म्हणजे हरभरा ). **०दाळ**–स्त्री. डाळीमधला मोठा किंवा जाड चुरा; अडकणी. **०धोतर**–न. लहान धोतर किंवा मोठा पंचा. अडपंचा पहा. **०नर**–स्त्री. स्त्रीत्व नसणारी; स्त्री–इंद्रिय असून ऋतु प्राप्त होत नाहीं अशी. **०पंचा**–पु. अगदीं लहान पंचा; **०पडदणी**–स्त्री. न्हातांना वेढून घेण्याची लहान पडदणी, वस्त्र; जुनेर. **०पन्हळ**–पु. अडनळ पहा.

०**पेठ**—स्त्री. अडगांव; छोटासा बाजारगांव. ०**फळें**—न.अव. अट-पळें पहा. ०**बंदर**—न. १ लहान किंवा विशेष व्यापारी महत्त्व नसलेलें बंदर २ गलबतांना तात्पुरतें नांगरण्याला पुरेसें, लहान, किंवा सुरक्षित नसणारें बंदर. ०**बाप्या**—पु. बालपण गेलें पण अजून बाप्या झाला नाहीं असा जवान पोऱ्या; तरणा बांड; सोळा सतरा वयाचा मुलगा; प्रौढपणा न आलेला माणूस. ०**बायको**—स्त्री. वधूटी; नुकतीच वयांत आलेली मुलगी (बारा-तेरा वर्षांची); अर्धवट प्रौढ बायको. ०**मुलगा**—पु. मुलगा; पोऱ्या; छोकरा; अडबाप्या. ०**म्हातारा**—पु. म्हातारपणांत प्रवेश करणारा; जरा उतार वयाचा माणूस; मध्यमवयस्क. ०**शहर**—न. लहान शहर. 'देऊळ जवळच हांकेवर होतें आडशहरांतलें तें, किती मोठें असणार?' —पुंद २४. ०**सोंग**—न. नाटकांतील दुय्यम किंवा हलका नट; हलकें, गौण पात्र. ०**स्वयंपाक-सैंपाक**—पु. चटण्या, कोशिंबिरी, भाज्या वगैरे मुख्य पदार्थांखेरीज इतर किरकोळ स्वयंपाक

**अड**—स्त्री. १ अडथळा; अटकाव; आडकाठी; प्रतिबंध. २ दुराग्रह; हट्ट; हेका ३ बोली; अट; शर्त वगैरे. इतर सर्व अर्थी अट पहा. [का. अड-ड्डु=आड, अडविणें, आडवा येणें, अडथळा करणें, विरुद्ध जाणें (तुल०) हिं. अड=भांडण]. ०**कट-कंठ**—पु. आडमार्ग; आडवाट; कठीण वाट. 'येई प्राणायामाचेनि अडकंठें। वगैता गा ॥' —ज्ञा ६.५५ [आड+कट=वाट,+कंठ] ०**कथा**—स्त्री. १ उपकथा; सहज, ओघानें आलेली गोष्ट; प्रसंगोपात्तकथा. 'आतां असो हे आडकथा। दशरथा लागली अवस्था ॥' —कथा ३.३.१६. २ विषयांतर; अवांतर कथा; आगंतुक गोष्ट ३ वाह्यात किंवा वाष्कळ भाषण. ०**कर**—वि. १ हट्टी; हेकेखोर; अटखोर पहा. २ अडून बसणारा; अडेल-(घोडा.) ३ गच्च बसणारा; कठीण; जड (कपडा इ०). [अड=अट+कर]. ०**काठी**—स्त्री आडकाठी पहा. ०**काम**—न. १ दुसऱ्या कामाच्या आनुषंगिक काम; मुख्य कामांत निघालेलें किरकोळ काम; बारीक काम; अडप अडप. २ सडा, संमार्जन, भाजी चिरणें इत्यादि स्वयंपाकाच्या अंगभूत गौण कामें. ०**काम-क्या**—वि. अडकामाच्या, किरकोळ कामाच्या उपयोगी; बारीक सारीक कामें करणारा. ०**कूट**—न. कुडण; कुंपण; कांपाउंड. आडकूट पहा. [आड+कूड]. ०**खर्च**—पु संसारास नित्य लागणाऱ्या अन्नवस्त्रादि जरूरीच्या मुख्य खर्चाखेरीज (प्रसंगविशेषीं उद्भवणारा पानसुपारी, ख्यालीखुशाली वगैरे संबंधीं) किरकोळ खर्च, किंवा जादा खर्च. ०**खळ-खुळा-खूळ**—पु. स्त्री. न. १ अडथळा; अटकाव; व्यत्यय; अडचण; अडगळ. (क्रि० करणें, घालणें, लावणें). 'कर्माकर्मे अव्यक्तमूर्ती। कैशापरी अडखळ ॥' —भवि १४.१५४. २ ठेंच लागण्यासारखी, अडथळा होण्याजोगी जागा. [अडखळणें]. ०**खाणें-दणें**—न. जेवणाशिवाय फळफळावळ, मेवामिठाई, यांसारखें दुय्यम खाणें; फराळ; उपहार; किरकोळ खाणें. ०**खोर**—वि. अडेल; आग्रही; हेकेखोर; हट्टी; अटखोर. ०**गल्ली**—स्त्री. बारीक बोळ; लहान गल्ली; मोठ्या रस्त्याला फुटणारा लहान रस्ता; चिंचोळ वाट. ०**गाळा**—न. (व.) बैलगाडीचा साटा. [म. गाळा किंवा का. गळे=वेळू, बांबू] ०**गिरा(ऱ्हा)इक-की**—वि. दुकानदारापासून प्रत्यक्ष विकत न घेतलेला किंवा त्याला विकत न दिलेला. ०**गिरा(ऱ्हा)इक**—पु. न. दुकानदारापासून प्रत्यक्ष विकत न घेणारा माणूस; दुकानदार नसलेला; बिनउदमी. ०**गोष्ट**—अडकथा पहा. ०**ग्राई(ह)क-की**—अडगिराइक पहा. ०**तट्टू**—पु. १ अडणारा, अडून राहणारा तट्टू; अडेल तट्टू. २ (ल.) अडून बसणारा; तिरसटपणा, हेकेखोरपणा धरून सरळ न वागणारा; अडलंड पहा. ०**ताळा**—पु. १ अडथळा पहा. 'कांहींच सद्भक्तां नसे अडताळा ॥' —दावि ५. [अडथळा अप.]. २ हिशेबाचा पडताळा. [अड+ताळा]. (क्रि० घेणें, पाहणें). ०**नळ**—पु १ न्हाटगाडग्याच्या कोळंब्यापासून मोठ्यापन्हळापर्यंत पाणी जाण्यास घातलेला दोन्हीं तोंडें बंद असलेला व एका टोंकास खालच्या बाजूस पाणी पडण्यासाठीं भोंक असलेला लहान आडवा पन्हळ. २ दार लावतांना दारावर बसविण्याची चिमणी. ३ पाण्याचा पाट चालू रहावा म्हणून मध्यें घातलेला लहान पन्हळ. ०**पसारा**—पु. सटरफटर; अडगळ; फालतूक वस्तू. ०**भिंत**—स्त्री. आडवी भिंत; आडोसा. 'अडभित तेथ लगडें आहे।' —सप्र २.१२. ०**मार्ग**—पु. आडवाट. ०**मिळकत-प्राप्ति**—स्त्री. जादा मिळकत—नफा; नेहमींच्या ठराविक प्राप्तीशिवाय मिळणारी अधिक मिळकत; नेहमींच्या प्राप्तीच्या मार्गाशिवाय इतर मार्गानें होणारी मिळकत. ०**रान**—न. १ आडमार्ग; एकीकडची जागा—स्थळ; रस्त्यापासून दूरचा प्रदेश. २ (ल०) वादविवादप्रसंगीं बोलण्याची, सरळ रीत सोडून धरलेली वांकडी रीत; विषयांतर; सरळ मार्ग सोडणें; आडरान पहा. ०**वळण-णी**—न. राजरस्त्यांत नसलेला, एका बाजूस असणारा प्रदेश; एकीकडचें, एकांत स्थळ. —वि. आडवळणांत असलेला(गांव वगैरे). —क्रिवि. मर्यादेपलीकडे; एके बाजूस; एकीकडे. ०**सट्टा**—पु. १ अजमास; अंदाज; बेत. (क्रि० पाहणें). २ टप्पा; पोहोंच; धांव; आवांका. ३ (ना.) अडचण. [हिं. अडसट्ठ; सि. अठिसठो; गु. अडसठो]. ०**सट्ट्यांत येणें**-(व.) अडचणींत येणें; कचाटयांत सांपडणें. ०**सर**—पु. आडसर पहा.

**अड**—आड पहा.

**अडऊं**—न. अरण्य; रान; अटवी. 'योगियां रीगतां अडऊं। —शिशु १०९. [सं. अटवी; प्रा. अडई]

**अडक**—स्त्री. न. आडनांव; कुलनाम; घराण्याचें नांव. [गु.

**अडकई**—स्त्री. (कु.) एक औषधि वनस्पति.

**अडकण**—न. अडथळा किंवा अटकाव करणारी कोणतीहि वस्तु; उ० घुणा, गाडी थांबविण्यासाठीं लावलेला दगड, दाराची खिटी, माळेची गांठ, अडसर, खिळा वगैरे. [अडकणें]

**अडकणी**—स्त्री. अडकवणें; थोपविणें; थांबविणें; अडचण; अडथळा करणारी गोष्ट. [ अडकणें ]

**अडकणें**—अक्रि. गुंतून राहणें; प्रतिबंध होणें; चिकटलें जाणें; पकडलें जाणें; कुंठितगति होणें; थांबविलें जाणें. [ अटक–अडक ]

**अडकणें**—न. पुरुषाचा एक सोन्याचा दागिना. –ऐरापुविवि ४२६. [ अडकण ]

**अडकवण**—स्त्री. ज्यामुळें अटकाव होतो ती वस्तु (गांठ, आंकडा, घोडा, फांसा इ०); अडकण. [ अडकणें ]

**अडकविणें**—उक्रि. थांबविणें; थोपविणें; हरकत करणें; अटकाव करणें; प्रतिबंध करणें; बंद करणें. [ अडकणें ]

**अडकळणें**—अडखळणें पहा.

**अडका**—पु. १ अर्धा रुका. २ (सामान्यतः) दाम; पैसा. 'शिष्यास न लाविती साधन। न करविती इंद्रियें दमन। ऐसे गुरु अडक्याचे तीन। मिळाले तरी त्यजावे॥' –दा ५.२.२१. ३ रुक्याचा चतुर्थांश. –शास्त्रीको. म्ह०–१ अडक्याची देवता (किंवा भवानी), सापिक्याचा शेंदूर; २ जळला तुमचा अडका माझा मूलच लाडका; ३ अडक्याची केली वाण, लोणच्याची केली घाण; ४ (व.) अडक्याचं दिडकं, पैशाचं सव्वा शेर=ज्याला हिशेब करतां येत नाहीं त्याची अशी समजूत करून देणें; ५ हातीं नाहीं अडका, बाजारांत चालला धडका. ४ जमीनीच्या मोजमापांत अर्धा रुका (६५ विघे विस्ताराची जमीन). [ सं. अर्द्ध रुका; अर्द्धक ]. **अडक्याचा घोडा**–(ल.) थोडक्या प्रयासानें व हलक्या मोलानें मिळणारी वस्तु.

**अडका**—न. (गोंडी) मडकें. 'अडका ते अडका कोसाला अडका.'

**अडकाअडकी**—स्त्री. गुंतागुत; अटकाव; अडथळा; विघ्न. [ अडकणें ]

**अडकाव-णी, विणें**—अटकाव-णी,–विणें पहा.

**अडकित्ता**—पु. १ सुपारी कातरण्याचें, कापण्याचें एक हत्यार–साधन; सरोता. २ (ल.) ताब्यांत किंवा प्रतिबंधांत ठेवणारा माणूस-वस्तु. 'वडिलांचा अडकित्ता असावा'=आपल्यापेक्षां मोठ्या व वरिष्ठ लोकांची भीति धरून वागणूक ठेवावी; शिस्तींत रहावें. [ का. अडकोत्तु (अडके=सुपारी; कोइत्तु=तासणें, कापणें); तुलु; इडकत्ति. ते. अडकत्तु ]. **अडकित्त्यांत घालणें–धरणें**–अडचणींत, पेंचांत धरणें; अनिष्ट स्थितींत अटकावून ठेवणें. **अडकित्त्यांत सांपडणें–पडणें**–संकटांत, पेंचांत सांपडणें–पडणें.

**अडकूल**—न. (व.) पोहे; भातकूल. [ सं. अर्द्र=शिजविलेले तांदूळ+कुट? ]

**अडकें**—न. अडथळा; अडकाठी; प्रतिबंध; विघ्न; त्रास. [ अडकणें ]

**अडखळण**—स्त्री. (अडखळ पहा). १ ठेंचकाळून पडण्यासारखी जागा–प्रसंग; अडखळ. २ एखादी वस्तु पडूं नये–सांडूं नये म्हणून केलेली योजना (उ० दौतीचा ठोकळा; दाराची खिटी, खीळ; जोडवें पडूं नये म्हणून केलेलें वलय, इ०). –णी–स्त्री. ठेंचकाळणी; अडखळण पहा

**अडख(खु)ळणें**—अक्रि. १ ठेंचकळून थांबणें; ठेंचकळणें; धडपडणें; गतिरोध होणें; अडणें. 'अडखुळलों भ्यालों म्हणती ते पतिव्रते।' –वसा ४. २ जिव्हादोषामुळें बोलतांना लागणें, अडणें; चावळणें; चांचरणें; गुटमळणें. 'तिनें भिऊन अडखळत आपलें वर्तमान सांगितलें.' –पाव्ह ४८. ३ कामांत कचरणें; धरसोड करणें; कांकूं करणें; नानू करणे (अडचणींत) सांपडणें; ४ गुंतणें; हात अडकणें. [ सं. अर्ध+स्खलन; का. अड्ड+खळण ]

**अडख(क)ळणें**—(कों.) आढळणें पहा.

**अडखळविणें**—उक्रि. ठेंचकाळावयास लावणें; गडबडविणें; अडखळायास लावणें (शब्दशः व ल.)

**अडगई**—स्त्री. महाळुंग सोलून, शिजवून त्यांत दहीं, हिंग, मीठ वगैरे घालून केलेलें रायतें, कोशिंबीर [ ? ]

**अडगव-णी**—स्त्री. रचना; लावालावी; व्यवस्था; यथायोग्य मांडणी. [ का. अडकु=रचणें, लावणें ]

**अडगवणी**—स्त्री. (कों.) भाताचें पीक तयार होऊन कापून वाळलें म्हणजे त्याचे भारे बांधून उडवी डाळतात ती कृति. 'काल आमची अडगवणी संपली.' [ का. अडकु=गंजी करणें, रचणें ]

**अडगव(वि)णें**—सक्रि. (कों.) १ योग्य जागीं, जागच्या-जागीं ठेवणें; व्यवस्था करणें. २ कामधंद्याकडे उपयोगास लाविणें; उपयोगी लावणें. ३ (ल.) मरणोत्तर व्यवस्था करणें; विल्हेवाट लावणें. 'म्हातारी एवढी अडगवली म्हणजे मी मोकळा होईन.' ४ निवडणें. [ का. अडकु=रचणें, नीट ठेवणें ]

**अडगळ**—स्त्री. निरुपयोगी, अडचण करणाऱ्या वस्तू–सामान; पसारा; परवड. –पु. (क्व.) अडसर. [ सं. अर्गला; का. अड्ड=आड+गळणें ]

**अडगा**—वि. (कर. कुण.) अडाणी; अशिक्षित; अज्ञ. 'अडगा माणूस निरुपयोगी आहे'; 'असा अडग्यासारखा काय करतोस?'

**अडगाई**—अडगई? ०**चाटाई**–लघळपणा? 'ऐसें लटिकेंचि अडगाई चाटाईनें बोलिला।' –पंच ३ १५.

**अडगुणबडगुण**—न. (प्रां.) फाल्तुक वस्तू; सटरफटर सामान; अडगळ. [ अडगवणें ]

**अडगुळेंमडगुळें**—वि. खेळकर–बोलकें(मूल). गाणें–'अडगुळं मडगुळं। सोन्याचं कडगुळं। रुप्याचा वाळा। तान्ह्या बाळा। तीट' (अर्थ) किती बाळ खेळतं! किती बाळ बोलतं! हातांत सोन्याची कडी, पायांत रुप्याचा वाळा घातला आहे. बाळा! तुला दृष्ट होऊं नये म्हणून तीट लावतें. –चिज १२. १९१६. [ का. आडु=खेळ+कुळी=कर याप्रमाणें प्रत्यय. मातु=बोल, भाषा+गार–कार ]

**अडघण**—वि. ( ना. )हट्टी; हेकेखोर; लवकर वठणीस न येणारा.

**अडग्राली**—स्त्री. आडमार्ग. -मनको. [ अडगळी ? ]

**अडच-च्च**—क्रिवि. गच्च; मजबूत ;घट्ट;आवळून, अडून.[अडणें]

**अडचण**—स्त्री. १ अरुंदपणा; चिंचोळेपणा; जागेचा अभाव; आकुंचितपणा; संकोच. २ गर्दी, दाटी यामुळें होणारा त्रास किंवा उपद्रव; गैरसोय. ३ सटरफटर; फालतूक सामान; अडगळ. ४ (ल.) पंचाईत; निकड; तारंबळ; लगबगीचें -घाईचें काम, वेळ, स्थिति; संकट; त्रास; निरुपायदशा. ५ वैगुण्य; टंचाई. [अडच]. ०येणें-सुतक येणें; रजःस्वला होणें; कांहीं विघ्न येणें. ०सांगणें-सबब, खेकटें, नड सांगणें; आपणांस अडथळा करणाऱ्या गोष्टी सांगणें. **अडचणीचें दुःख**—भलत्याच किंवा अवघड जागीं [ गुह्यभागीं ] झालेलें दुःख, आजार, विकार. म्ह० अ० आणि जांवई वैद्य. **अडचणींची वाट**—घोंटाळयाचा—अवघड रस्ता.

**अडचणणें**—अक्रि. गर्दी, दाटी, अडचण होणें; चिमटलें जाणें २ तारांबळ होणें; ओढ, निकड, ताण लागणें. [ अडचण ]

**अडचणूक**—स्त्री. घोंटाळा; गैरसोय; अडचण पहा. ०मोडणें—नड, अडचण नाहींशीं करणें; अडचण काढून टाकणें; विघ्न, संकट निवारणें.

**अडचणें**—अक्रि. १ आवळ, घट्ट होणें; दाटणें; अडस होणें; ( कपडा, बांगडी ). २ आवळणें; आवळून बांधणें; थोडया जागेंत समाविष्ट करणें ( वस्तू, ओझीं ). ३ ( ल. ) अडचणींत सांपडणें; संकटांत असणें. [ अडच ]

**अडची**—स्त्री. गाय, म्हैस इत्यादिकांचें दूध काढण्याच्या वेळीं त्या हालूं नयेत, लाथा मारूं नयेत म्हणून त्यांना अडचण होण्याजोगे जे दोन दोहींकडे वासे बांधतात ते [ अडच ]

**अडचें( जें )**—क्रिवि. ( अडचाच्या पाढयांत ) अडींच वेळां. 'पंचवीस अडचें साडे बासष्ट'. [ अडीच ]

**ॲडजर्न**—सक्रि. १ तहकूब करणें; लांबणीवर टाकणें. २ नियमित काम अपुरें राहिल्यास सभा पुनः बोलाविणें; दुसऱ्या बैठकीपर्यंत सभा तहकूब ठेवणें. [ इं. ]. ०मेंट—स्त्री. तहकुबी.

**अडज्यूटंट**—अजिटन पहा. [ इं ]

**अडंडळ**—वि. अढळ; बिनधोक. 'तरावया भवाब्धि प्रबळ। चरणाची नाव अडंडळ॥' —एभा ५.३७९. [प्रा. डिंडिल्ल=स्खलित; ढंढल्ल=भ्रमित ]

**अडण**—न. १ गाई-म्हशीची ओटी; कास; अडाण पहा. [ तुल० इं. अडर ]

**अडण**—स्त्री. १ सुपाच्या कांठाला मजबुतीसाठीं लावलेली कामटी. २ संकट; अडचण. 'धांवसी आडणीं ऐकोनियां धांवा। कइवारें देवा भक्तांचिया॥' —तुगा ८६८. -वि. हट्टी; माथेफिरू; स्वेच्छाचारी. [ का. अड्ड ]

**अडणा-णें**—पु. न. अडसर. 'पण स्वर्गसुखाच्या मंदिराच्या दाराला हा कोर्टिंगचा एवढा अडणा नसता तर फारच चांगलें.' —सु १११. [ सं. अर्गला; का. अडने=आडवें ]

**अडणी**—स्त्री. १ दिवा, भांडीं वगैरे जिन्नस ठेवण्याकरितां तिवई, चौरंग. 'अडणीवरि सोन्याचें ताट॥' —सुदा ३४. २ शंखाची बैठक तिवई. ३ अडसर. ४ लांकडी पाटास खालून लावलेले दोन लांकडी खूर. ५ (कों)दाराची कडी. ६ टेंका; आधार. 'पायाळा घालोनि वोडणी। धनुष्यदंडाच्या अडणीं। उचलोनि दोघीं दोघीं जणीं। वीर श्रेणी आणिल्या॥' —एरुस्व १२.२६. ७ सुपाची पुढील कामटी; अडणपट्टा. ८ मर्यादा; सीमा; रंगण. 'इंद्रधनुष्याचिये अडणी—। माजीं मेघ गगनरंगणीं। तैसें आवरिलें शार्ङ्गपाणी वैजयंतिया।' —ज्ञा११. ६०३. [ का. अड्डणिगे=तिपाई ]. ०वरचा (शंख)—पु. १ शंख; ( ल. ) मूर्ख; अशिक्षित माणूस. 'अशा तऱ्हेचे उद्गार अहोरात्र त्याच्या कानींकपाळीं पडल्यामुळें म्हणा पण शिकण्यासवरण्यांत तो अडणीवरचाच झाला.' —यशख. २ उच्च स्थानावर-अधिकारावर असलेला बेअकली माणूस.

**अडणूक**—स्त्री. १ अडचण;अडथळा; हरकत. 'परोपरीं सिकावणें। आडणुका सांगत जाणें॥' —दा १९.१०.१५. २ अट; हट्ट; विरोध. (क्रि० घेणें, धरणें). ३ अडवणूक; प्रतिबंध करणें. [का. अड्ड]

**अडणें**—अक्रि. १ प्रतिबंध—अडथळा होणें;अडकला जाणें; वेढला जाणें; खोळंबून राहणें. 'तरी मग सांग पां कैसेनि अडे।' —ज्ञा ६. ४०१. २ आवळ, घट्ट बसणें; अडस होणें; जेमतेम जाणें. ३ इनकार करणें; ना म्हणणें; नाकारणें; नडून किंवा रुसून बसणें; हट्ट धरून बसणें. 'दोघांचें ( जहाल मवाळ पक्षांचें ) जें कांहीं अडतें आहे तें कांहीं हेतूबद्दल नव्हे, कृतीबद्दल आहे.' —टि ३.२५३. ४ प्रसूतींत अडथळा येणें. ५ दाटणें; संकटांत सांपडणें—पडणें; चिमटलें जाणें. ६ चालतां चालतां थांबणें, स्तब्ध राहणें; पुढें पाऊल न टाकणें ( गाडी, घोडा इ.). ७ वेढणें; अडविणें; व्यापणें. 'सागरें कवणें ठायीं नाहावें हें गगनचि आडे आघवें॥' —ज्ञा ९.११. म्ह० १ अडली गाय फटके खाय. २ अडला नारायण गाढवाचे पाय धरी=प्रसंगीं श्रेष्ठ, शहाण्या माणसास ( नारायणास )मूर्खाचे पाय धरण्याची पाळी येते [ का . अड्ड ]. **अडतें( ल )धरणें-पाहणें-मोजणें**—संकटांत पडलेल्यास मदत न करतां उलटा आनंद मानणें; किंवा त्याच्या अडचणीचा फायदा घेणें; एकाद्याला नडविणें. **अडला नारायण**—अडचणींत सांपडलेला माणूस ( अडला नारायण गाढवाचे पाय धरी या म्हणीवरून ). **अडला भिडला**—संकटांत--अडचणींत पडलेला; त्रस्त. 'अडल्या भिडल्यासी वेगीं पार पाडूं।' —दावि ४२८. (अडणें याच्या रूपापुढें भिडणें याचीं रूपें लागून पुष्कळ शब्द बनतात. उ० 'अडलेंभिडलें काम असलें तर मला सांग.' 'अडलाभिडला कोण्ही आला तर त्याचा समाचार घ्यावा.').

**अडत**—स्त्री. १ सराफी किंवा व्यापारी व्यवहारांतला पत्र-व्यवहार किंवा देवघेव. २ त्या कामाबद्दल मिळणारा मोबदला; दलाली. ३ एकाद्या मालकाचा माल विकण्याकरितां ठेवणें, विकून देणें इ० क्रिया; एजन्सी; मध्यस्थी. ३ दस्तुरी; दुकानची पट्टी. ४ (कायदा) मुनीमपणा; गुमास्तेगिरी. [सं. अट्ट = बाजार; ते. अडिति]

**अडताल**—पु. एकताल, झंपाताल पहा. [का. अड. ते० अटतालमु]

**अडती**—स्त्री. १ प्रतिकार; अडवणूक; अडथळा; विरोध. २ सतारीची-वीण्याची खालची घोडी, चौकी. ३ (कों) दाराची खिटी. ०**घालणें**-मोडता घालणें. [अडणें]

**अडतीस**—वि. ३८ ही संख्या. [सं. अष्टत्रिंशत : प्रा. अठतीस]

**अडत्या**—पु. कोणत्याहि व्यापारामध्यें, देवघेवीचीं कामें करण्याकरितां, कारखान्यांत तयार केलेला अगर कोठारांत सांठविलेला माल खपविण्याकरितां, किंवा इतर व्यवहारांत आपल्या तर्फे जबाबदारी अंगावर घेऊन (अडत ठेवून) व्यवहार करणारा; मध्यस्थ; दलाल; गुमास्ता; एजंट. [सं. अट्टपति = बाजाराचा मोकदम ? अडत]

**अडथळणी**-(**णूक**)—स्त्री. हरकत; अडथळा पहा.

**अडथळणें**—उक्रि. प्रतिबंध-हरकत-अटकाव करणें; प्रत्यवाय, विघ्न आणणें; बंद पाडणें. [अडथळा]

**अडथळा**—पु. १ अटकाव; हरकत; अडचण; प्रतिबंध. २ खोळंबा; खोटी; गुंता. [अडणें (अड्ड) + स्थळ]

**अडदर-रा-रू**—पु. धाक; भय; भीति. 'तेथ दानवां अडदरू। नागार्जुनाचा दातारू ॥' -शिशु ३६३; 'ते वेळीं स्वर्गालागीं आदरु। कां नरकाचा अडदरु ॥' -ज्ञा १६.३१६. 'घाई अडदर लासीं सुहाडा ॥' -उषा १४२५. [सं. अट्ट = मोठी + दर]

**अडदरी**—स्त्री. खोल, अडचणीची, एकीकडची दरी, जागा. 'दंभमान तो पाहाडफत्तर। अडदरीं वागती पाशादि तस्कर'॥-दावि ७६१. [अ (आ) ड + दरी]

**अडदल**—पु. अडली; लष्करी कामगाराचा हुजऱ्या. 'अडदलीचे शिपाई.' [इं. ऑर्डर्ली]

**अडदांड-गा**—वि. धसमुसळ्या; धटिंगण; दांडगा व अडाणी; बेमुर्वत; रानवट. [अड्ड + दंड]

**अडदावा**—पु. गूळमिश्रित हरभऱ्याची डाळ. (ही तट्टांस खुराक म्हणून देतात.) -मोको. [हिं.]

**अडन**—संकट; अडचण; अडण २ पहा. 'पडलियां संसाराचियां अडनीं' -एभा. ११.४.

**अडना**—अडणा पहा.

**अडनाट-ड**—वि. अडनीड; अडनेड; अडनीट; नीट किंवा बरोबर, हिशेबाच्या दृष्टीनें पूर्ण, नसलेला-दहा, वीस, शंभर इ० ठोकळ संख्येचा-परिमाणाचा नसलेला, अधल्यामधल्याच संख्येचा-गैरसोयीचा. 'एक रुपयाचें होईल तें भात ने किंवा मणभर ने, अडनीड अकरा पायली नेऊ नको.' -क्रिवि. सोईस्कर नाहीं, अशावेळीं; अनिश्चितपणें; धड इकडे नाहीं, धड तिकडे नाहीं अशा तऱ्हेनें. 'आंत तरी बैस नाहींतर बाहेर तरी बैस, मध्येंच अडनीड बसूं नकोस.' [सं. अर्ध + नीतः का. नेट्टग; ता. निट्टु; म. नीट]

**अडनांव**—न. १ उपनांव; घराण्याचें-वंशाचें नांव; कुलनाम; आडनांव पहा. २ अयथार्थ नांव. 'जीभ जैं आगेंगूं जाये। मग रसना हें होये। आडनांव कीं ॥' -अमृत ६.६२; 'तैसें स्त्रीसंगें जें सुख। तें अडनांवामात्र देख ॥' -मुरंशु ३३५; [सं. अर्धनाम ? का. अड्ड+नाव; तु० का. अड्डहेसरु. अट्ट = मोठें, (श्रेष्ठ) + नाम. इं. सर (श्रेष्ठ) + नेम (नांव). हि. अडक]

**अडनांवाचा**—वि. केवळ नामधारी; फक्त नांवापुरता म्हणजे त्याप्रमाणें कृति-पराक्रम नसलेला ब्राह्मण, कारकून,' शिपाई इ०. 'रामाजीपंत आडनांवाचे कारकून परंतु कागदावर धड ओळ कांहीं ओढतां येत नाहीं.' 'नररत्न तोचि तूंचि स्त्रीरत्न उदंड आडनांवाचीं।' -मोरो. नलोपाख्यान.

**अडनीट-ड,-नेड**—अडनाट पहा.

**अडपझडप**—क्रिवि. १ चोरूनमारून; अयोग्य किंवा भलत्याच प्रकारें; कपटानें; 'अनेक उपायांनीं; नाना तऱ्हेनें; हरएक युक्तीनें; (प्राप्ति, डल्ला मिळ(वि)णें). २ लपूनछपून; गुप्तपणें (शिंदळकी, व्यभिचार करणें). कांहीं नामांशीं विशेषणाप्रमाणें उपयोग होतो. त्यावेळीं या शब्दाचे होणारे अर्थः-१ अप्रत्यक्ष; अनिश्चित; जादा (नफा, खर्च). २ लहान; हलकीं; किरकोळ (कामें, उद्योग). ३ संकीर्ण; मिश्र; अस्पष्ट (गोष्टी). बिनमाहितीचा; जमावांतील; किरकोळ; अप्रसिद्ध (इसम, माणूस). 'कांहीं अडपझडप सरदार विशाळगड सोडून पळण्याच्या बेतांत होता.' -स्वप १७३. [झडप द्वि. हिं. अडपझडप = गरज]

**अडपणें**—उक्रि. अडचणींत पडणें; दगदगीत पडणें; अडवणें. [का. अड्ड]

**अडपतादडपता**—वि. देखरेख करणारा; ताळ्यावर आणणारा; नियंता; दाबांत-धाकांत-जरबेंत ठेवणारा (आईबाप, वडील माणूस). 'अडपती नाहीं सासू दडपता नाहीं भाका.' [दडपता द्वि.]

**अडपदडप**—स्त्री. दाब, धाक, वचक.

**अडपैजणें**—अडपणें पहा. 'आणि सुखाचिया आर्ति। अड पैजेना ॥' -ज्ञा २-२९४. [अडपणें यांत ज चा समावेश]

**अडप-(फ)-ळ-ळें**—अटपळ पहा.

**अडफांटा**—पु. अडथळा; विघ्न; हरकत; आडफांटा पहा. [अड = आडवा + फांटा]. ०**काढणें-घेणें-फोडणें**—(कार्याचा) बिघाड करणें.

**अडबंक-ग, अडबंगा -गी, अडबांक**—वि. १ भसाडा; वांकडातिकडा; ढोबळ; भोपळमुती; भोंगळवार; ओबडधोबड. २ मूर्ख; स्वेच्छाचारी; अडमुठा; दुराग्रही; अडेल (घोडा). ३ ठोकळ. आडमाप. [सं. अर्द्ध + वक्र: १ + भंग = भग्न; हिं. अडबंगा. गु. अडबंग = हट्टी, मूर्ख]

**अडबंकी**—स्त्री. दाराची खीळ.-शर; अडवेकी पहा

**अडबंद**—पु.कटिसूत्र;करदोडा.'नासिलें अडबंद कौपिन माळा ।' –तुगा २८९७; 'कटीं अडबंद कौपीन ॥' –दावि २४०.[अड+बंध]

**अडंबर**—अवडंबर पहा. [सं. आडंबर]

**अडबाजार**—पु. बाजारच्या दिवसाखेरीज आडवारीं भरलेला बाजार; लहान, शिळा बाजार.

**अडबेलें**—न. गळ्यांत होणारा एक रोग –मनको.

**अडभंग**—अडबंग पहा. [अर्ध + भंग = भग्न]

**अडभर्गी भरणें**—धुमाकूळ; धिंगाणा, दंगा घालणें. [का आडु = खेळ. खेळाच्या भरीं भरणें]

**अडमड**—स्त्री. **अडमडा**—पु (कों.)लहान मुलाची चळवळ; चुळबूळ; अंगवळा; खोडकरपणा. **–ड्या**—वि. चपळ; वळवळ्या. **०णें**–१ खोडया करणें; चुळबूळ करणें (लहान मुलाबद्दल वापरतात). २ धडपडणें; ठेंचाळणें; त्रासांत, संकटांत असणें 'मर! राहा मेल्यासारखा अडमडत.' –आंमू ९. [प्रा. अडवडण=स्खलन. का. आडु माडु=खेळकर]

**अडमाप**—न. १ वाजवी, सरळ, खऱ्या मापापेक्षां कमी अगर जास्त असलेलें असें अधलेंमधलें माप (सव्वातीन शेरी किंवा साडे तीन शेरी पायली हें अडमाप). २ दिडकें माप' ३ (ल.)खोटें माप. –वि. प्रमाणशीर–बद्ध नसलेला; अडबंक. [सं. अर्ध किंवा का. अड्ड= आडवेंतिडवें + मापन]. **अडमापानें मोजणें**—बेस्मार, गैरशिस्त अंदाज बांधणें, अपेक्षा करणें; फाजील आशा धरणें.

**ॲडमिनिस्ट्रेटर**—पु. १ कारभारी; वहिवाटदार; (राज्य) कारभार चालविणारा; व्यवस्थापक. २ (कायदा) मयताच्या इस्टेटीची व्यवस्था पाहणारा (अधिकारी, इसम). [इं.]

**ॲडमिनिस्ट्रेशन**—न. कारभार; व्यवस्था. राज्यकारभार; राजशासन. [इं.]

**ॲडमिरल**—पु. १ आरमारावरचा मुख्याधिकारी. 'जपानचें ॲडमिरल यांनीं आपल्या जागेचा राजीनामा दिला.' –के १७-६-३०.

**ॲडमिशन**—न. प्रवेश (शाळांत वगैरे); प्रवेश करण्यास मोकळीक. [इं.]

**अडमुठ**—स्त्री. डोंगराळ शेतांत, जेथें नांगर चालत नाहीं तेथें मुठीनें धान्य पेरण्याचा प्रकार. [आड+मूठ]

**अडमु(मू)ठी**—वि. सुलभ; सहज; अनायासें; न कळत. 'तैसें आम्हां तुम्हां जाहलें। जें आडमुठीं तत्त्व फावलें ॥' –ज्ञा ६.४.

**अडमुशी, अडमुसा**–वि. १ गुदमरण्याच्या स्थितींत असलेला; गुदमरून गेलेला; श्वास कोंडल्यामुळे व्याकूळ झालेला. २ गठडी वळलेला (तापामुळे). (क्रि० पडणें, होणें). [सं. अर्ध+मुह्]

**अडमुसणें**—अक्रि. १ गुदमरणें; घाबरा होणें; जीव कोंडल्यासारखा होणें. २ (तापामुळें) गठडी वळणें; अडमुशी होणें. [सं. [अर्ध+मुह्]

**अडमुळीं**—क्रिवि. अकस्मात. – शर.

**अडमूट(ठ)**—वि.अडमुठा, अडमुठ्या, अडमुठ्या, अडमोट–ठ हीं इतर रूपें. १ अडाणी; अडदांड, मूर्ख; गांढवळ. २ पोऱ्या; आडबाप्या. [सं. अर्द्ध+मूढ; का. अडमुट्ट]

**अडमूठ-ठा**—वि. मुठींत न मावणारा; आटपशीर नसणारा; वेडावांकडा; बोजड; अकुशल. [अर्ध+मुष्टि]

**अडमोरी**—क्रिवि. बाजूस तोंड करून; तोंड फिरवून; आडमोरा पहा. 'शिवतां नये म्हणून माजघरामधें अडमोरी बसलें।' –पला ४४. [सं. अर्ध; का. अड्ड+मोहरा (मुख)]

**अडल**—स्त्री. अडचण; प्रतिबंध; आडल पहा. 'नानापुत्राचेया अडला।' –उषा ३५. 'दिशा झालिया सानुकूल। मधील गेले माया अडल।' –सिसं ३.५१. [अड]

**अडल**—स्त्री अडय. बदकाची एक जात. [सं. अटिल; प्रा. अडिल्ल]

**अडलंड**—वि. १ (प्रां.) प्रसंगीं आडवा किंवा विरुद्ध बाजूचा होणारा; गरजेच्या वेळीं धोका देणारा; संकटप्रसंगीं सोडणारा; तोंडघशी पाडणारा (इसम, घोडा). २ हेकट; हट्टी; कटकट्या; अडतट्टू. [अड्ड+लंड तुच्छतादर्शक प्रत्यय]

**अडला, अडलाऊ**—पु.स्त्री.न. (बायकांचें) एक शस्त्र; विळी; कोयती. (गो.) आदोळी. 'कीं प्रमदाचा बळिया। अडलाऊ तो ॥' –शिशु २६४. (सामान्यतः) शस्त्र; आढाल पहा. [सं. अड्ड=हल्ला करणें]

**अडलाओ, अडलाव**—पु.संरक्षण;पाठीराखेपणा. 'तूं धर्माचा कुढावा। तरि तेयांचा अडलाओ करावा।' –शिशु ४९१. [अ (आ) ड+लावणें]

**अडली**—नोकर; नैनातींतील मनुष्य; ऑडेली (अप.) पहा.

**अडलेपण**—न. १ हट्ट. 'जीव अति अडलेपणें। जे मागे मजकारणें।' –एभा १३.१५३. २ संकटांत सांपडणे. 'जीव अत्यंत अडलेपणें। ईश्वरासि 'धांवधांव' म्हणे।' –एभा ११.१७२.

**अडव**—न. जंगल; अरण्य. 'तरि वाघाचिये अडवे ॥' –ज्ञा १३.७६३. [सं. अटवी; प्रा. अडवी]

**अडव**—न. शेतांत उपटून ठेवलेले हरभऱ्याचे डाहळे; रोपें; मुठींत मावेलशी (हरभऱ्याची) पेंढी. [आडवा]

**अडव**–पु. १ अडचण; अटकाव; प्रतिबंध. २ परीक्षा; कसोटी. –सोहिमह. [अडविणें]

**अडवंकी–गी**—स्त्री.१ अडसर; खील. 'नवद्वारांचिया चौचकीं। बाणूनि संयतीची आडवंकी॥' –ज्ञा १२.५२. २ अडथळा; अडकाठी. [का. अड+वंकी=आंकडा]

**अडवट–ठ**—न. १ बीन तासींव–घडींव अनघड तुळई; तुळईच्या उपयोगी लांकूड; आडवें–मोठें लांकूड; आडवा सोट २ आडवी तुळई लाट, गज. ३ विणलेल्या कापडांतील आडवे धागे; आडवीण. ४ गोणीच्या दोन्ही तोंडांमधील–बैलाच्या पाठीवरील पटी. ५ गाडीची खरडी; उतरंडीवरून जातांना घसरूं नये म्हणून गाडीच्या मागच्या चाकांना घांसण्यासारखी एक आडवी काठी टांगतात ती. –पु. नथेचा मधला भाग– त्यांतील दोन मोत्यें. [का. अड्ड= आडवी+सं. वर्त–वट्ट–वट]

**अडवण**—स्त्री. न. १ अडवणूक; अडथळा; हरकत प्रतिकार २ अडचण; अडथळा करणारी किंवा थांबविणारी कोणतीहि वस्तु. अडकण; आडकाठी; उटी.

**अडवण**–स्त्री अडवी वीण; आडवीण; पूरण; बाणा (उभवण किंवा ताणा यांच्या उलट). [अड=आडवा+वीण]

**अडवणी**—स्त्री. (नाविक) १ अव. गलबताच्या दोन फळ्यांनां जोडणारे सरळ वळ किंवा आडव्या रांगा. २ एकव. समुद्राच्या पाण्याच्या झडीकरितां गलबताच्या दोहों बाजूंस बांधलेली लांकडी साटी. [का. अड्ड+सं. वर्ती]

**अडवणूक, अडवाई**—स्त्री. १ अडवण; थोपविणें; थांबविणे; अडथळा; हरकत; प्रतिबंध; अटकाव. २ (विप्र. अडवणूक) बहिष्कार; निःशस्त्र प्रतिकार; सत्याग्रह. 'अडवणुकीच्या मार्गानेंच सरकारास लोकांनीं वठणीवर आणलें पाहिजे.' –टि.३.१९९. [अडविणें]

**अडवण्या**—स्त्री. अव. ज्येष्ठा नक्षत्र व त्या नक्षत्रांत पडणारा पाऊस. [अड+ सं. वन–वण=पाणी]

**अडवण्या, अडवंता**—वि. थोपविणारा किंवा अडथळा करणारा; अडविणारा. [अडविणें]

**अडवर्णाचा**—वि. आडवर्णाचा पहा.

**अडवा–वें**—वि. १ उभा नव्हे तो; तिर्यग्; क्षितिजसमांतर पातळींतील. २ रुंद (उभा=लांब याच्या उलट). 'तो अंगानें अडवा आहे.' ३ तिरपा; वांकडा; आड.५ विरुद्ध; प्रतिकूल; उलटा; नुकसानकारक असा. 'त्याचें दैव अडवें आलें.' ४ प्रतिबंध करणारा. –क्रिवि. बाजूनें; बाजूवर; सामोरा. **०करणें**–आड आणणें; करणें. **०ठाकणें**–मध्यें येणें; अडथळा करणें. **०येणें**–१ गांठणें; भेटणें; मार्गांत येणें. २ विरुद्ध जाणें; नाउमेद करणें; प्रतिबध करणें. 'हा आडवा येईल कोण पाहो।' –सारु ८.२९. ३ (विप्र. अडवें येणें) गर्भांतील मुलानें सरळ न येतां प्रसूतिद्वाराशीं वांकडे होणें; अडून रहाणें. **म्ह०** (ल.) 'आडवें आलें असतां कापून काढावें' =मार्गांत कोणी जबरदस्त अडथळा आणला तर त्याचा प्रथम नाश केलाच पाहिजे. 'लोक म्हणती आडवें आलें। खांडून काढा॥' –दा ३.१.४०. ४ सामोरें जाणें; स्वागत करणें. **०घेणें**–१ दोषैकदृष्टीनें पाहणें; वांकडें घेणें; शंका घेणें. २ खरडपट्टी काढणें (विप्र.) आडवातिडवा घेणें. ३ मुलाला पाजणें. **०जाणें**–१ रस्ता ओलांडून जाणें. २ सामोरें जाणें. ३ हरकत करणें. **०टाकणें**–ओलांडणें. 'त्याचें घर आडवें टाकून जा.' **०झेलणें–झोकणें–टाकणें–देणें**–धोंडा, गोळा, वीट, घागर इ० वस्तू एका रांगेनें उभे राहिलेल्या लोकांच्या हातांतून एकाकडून दुसऱ्याकडे अशा देणें, नेणें. (अडवें) **नेसणें–लावून घेणें**–(बायकी) लहान वस्त्र, तात्पुरतें (स्नान किंवा वस्त्रांतर करतांना) गुंडाळणें, वेढून घेणें; उभें घेणें. **०पडणें**–१ भांडणतंटा तोडण्यास मध्यें पडणें; तडजोड करूं पहाणें. २ लोटांगण घालणें; दयेची याचना करणें; उद्दिष्ट कार्य थांबविण्याविषयीं विनंति करणें. ३ विघ्न–विरोध करणें. **०बोलणें**–१ मुद्दा सोडून बोलणें. २ वांकडे बोलणें; लावून बोलणें; विरुद्ध बोलणें. 'म्हणोनि घडलें बोलणें आडवें॥' –दावि १३५. **०लावणें**–१ परत पाठविणें. २ वस्त्रांतर करतांना किंवा स्नान करतांना आंखुड वस्त्र नेसणें; वस्त्र अपुरें व सैल नेसणें; उभें–आडवें नेसणें. ३ वांकडा अर्थ घेणें; बोल लावणें; निर्भर्त्सना करणें; अडथळे उपस्थित करणें. **०होणें**–१ (जमीनीवर) आंग टाकून लोळणें–निजणें; कलंडणें. २ (ल.) खालीं पडणें; ३ लक्ष होणें. ४ आड येणें; मध्यें येणें. **अडव्या अंगाचा–काठीचा–बांध्याचा–हाडाचा**–१ लक्ष. २ उंचीपेक्षां जास्त रुंद; आडवा वाढलेला. **अडव्या जिभेचा**—वांकडेंतिकडें बोलणारा; दुर्भाषण करणारा; भांडखोर. **अडव्या सुडक्याची बायको–रांड**–अत्यंत दीन, दुबळ (विधवेबद्दल किंवा एकाद्या बाईबद्दल बोलतांना ग्राम्य शिवी). 'तूं लहान झालास तरी पुरुष आणि मी मोठी झाल्यें तरी अ० बायको, माझे हातून काय दरबारांत बोलवेल?' **अडव्या हातानें देणें (हातीं देणें)**–लांच देणें. **अडव्या हातानें घेणें**–(ना.) खरडपट्टी काढणें. **अडव्यांत शिरणें**–१ वाम मार्गाचा अवलंब करणें; सरळ रस्ता सोडून जाणें. २ वांकडें बोलणें; विषयांतर करणें.

**अडवाअडव**—स्त्री. १ एकदम जोरानें अडथळा करणें. २ त्रास देऊन बेजार करणें; तगादा, निकड लावणें.

**अडवा उभा**—वि. क्षितिजसमांतर व उर्ध्वाधर; अडवा व उभा; उंच व लांबट; पसरलेला व ताठउभा; वांकडा व सरळ.

**अडवाट**—आडवाट पहा.

**अडवातिडवा**—वि.वांकडातिकडा; कांहींसा तिरकस, बांकदार. **०फुटणें**–वांकडेंतिकडें, कुरूप व बेडौल वाढणें–होणें–बनणें (शरीर, झाड). [का. अड्ड+सं. तिर्यक्]

**अडवारा**—पु. आडवारा पहा.

**अडवाल-ळ, अडिवाळ**—वि. अडेल; हट्टी; हेकेखोर ( मुलें ). [का. अड्ड+वाल प्रत्यय. तुल० मस्त-वाल ]

**अडविणें**—सक्रि. थोपविणें; थांबविणें; हरकत, अडथळा, अटकाव करणें; प्रतिबंध करणे. [ अडणे ]

**अडवी**—स्त्री. १ लहान अडणा; आडखिळी; गज; गराद (दाराचा-खिडकीचा). २ अडवा, अडवें पहा. [अडवा] . ०**पालखी**-स्त्री. रस्त्याच्या दोन्ही बाजूंनां पालखीच्या दांडयांची टोकें करून पालखी आडवी नेण्याचा मान. हा मान शृंगेरीच्या शंकरार्यांचा आहे.

**अडवी**—स्त्री. अटवी; रान; आडमार्ग; अरण्य. ' आढ्यु आतुडे आडवीं । मग आढयता जेवीं हारवी ॥ '-ज्ञा १३.२०५. [सं. अटवी]

**अडवीज**—वि. ( गो. ) बेकार; रिकामटेकडा. ' तूं ओंगी राव; तॉ पडला अडवीज '.

**अडवें**—न. ( कों. ) ( विप्र. ) उडवें; उडवी पहा.

**अडवेंउभें**—न. वांकडया मसलती-वेत; लबाडीचे डाव, कुवेडे. [ आडवा+उभा ]. **अडवें पाणी**-न. ( शेतबागायतींना ) नद्या, विहिरी, तळीं इ०चें पाणी-पावसाचें नव्हे. अडव्या पाण्याचा-नें असेहि प्रयोग प्रचारांत आढळतात.

**अडवेळ**—स्त्री. १ मुख्य वेळ सोडून दुसरा समय; अवेळ. २ सूर्यास्तापूर्वी घटिका दोन घटिका दिवस; संध्याकाळीं मुलें जेवतात तो काळ.

**ॲडव्हान्स**—पु. पैसे-रक्कम अगाऊ देणें; आगप, तसलमात; उचल. [ इं. ]

**ॲडव्होकेट**—पु. वकील. [ इं. ]

**अडशेरी, अडिश्री**—स्त्री. १ अडीच शेरांचें माप-वजन; (पूर्वी पांच शेरांची पायली असे त्याचा अर्धा. २ (हल्लीं) अधोली, अर्धीपायली. ३ नोकरांस दररोज किंवा महिन्याच्या महिन्याला दिलें जाणारें धान्य; मासिक वेतन; मजूरी ( एका दिवसाचा २॥ शेर वजनाचा शिधा, भत्ता यावरून ). [ अडीच+शेर सं. अर्धतृतीय; अडीच ]

**अडस**—वि. १ अडच-च; घट्ट; गच्च; आवळ; मजबूत बसणारी (खुंटी; खिळा वगैरे). २ (ज्यांत खिळा वगैरे गच्च बसतो असें) बारीक; चिवळ ( भोंक, बीळ, छिद्र वगैरे ). ३ आटोपशीर. ' तेणें परवटा वरिया अडस ।' -उषा २९; 'स्वरुपाची अडस ठेवण ।' -प्र १०५. ४ अडथळा करणारें. 'न संगे तयाचा अतिसो । ग्रंथोक्ती तेज आडसो । घालितासी कां ॥' -ज्ञा १३.६३३. [का. अडमु=कोंवणें, खेंचणें ]. **-सी, ०खोर-तट्टू**-वि. हट्टी; दुराग्रही; अडेल-तट्टू.

**अडसट**—अडसष्ट पहा.

**अडसटणें**—सक्रि. (क. ) अंदाज करणें; कच्चा खर्डा काढणें; अदमास पाहणें; अडसट्टा पहा.

**अडसण**—न. पाखडलेलें किंवा पाखडण्याकरितां सुपांत ठेवलेलें धान्य. [ ते. का. अडि-अड्डसु=माती+सण्=फेंकणें ? ].

**अडसण**—न. खळ्याळ गाईम्हशीची धार काढण्यासाठीं तिच्या भोंवती बांधलेल्या अडव्या काठ्या; अडची. [ अडचण ]

**अडसणी**—स्त्री. (गो.) आच्छादन. 'त्ये तेर अडसणी घालून दवर.' =त्याच्यावर आच्छादन घालून ठेव. [ अडोसा ]

**अडसणें**—सक्रि. सुपानें पाखडणें; निवडणें; निवड करणे 'आडसोनी शुद्ध करी वो साजणी ।' -तुगा २६१. [अडसण]

**अडसणें**—सक्रि. १ फांद्या तोडणें; छाटणें; खडसणें. २ आवळणें; घट्ट बांधणें. कसणें. -अक्रि. ३ रुसून बसणें; अडून रहाणें; हट्ट धरणें. ४ आड बसणें; लपणें. आश्रय करणें. ' आडसूनि अंधारी । खद्योत दीप्तिशि धरी.-अमृ ७.२. ५(ब) मानास चढणें; ताठणें; गर्व धरणें. ' इतका अडसूं नको एवढयांतच. ' [ अडम ]

**अडसणें**—अक्रि. अडचणें पहा.

**अडसंधी**—स्त्री. १ जांघ ( मांडीच्या मुळाशीं असणारा भाग); (क) कांख, कानाच्या मागील जागा इ० शरीरावरच्या अडचणीच्या जागांपैकीं. २ अडचणीची जागा. ३ रिकामा वेळ. ४ संकट; आपत्ति. ५ ( गो. ) अडगळ. [ अड+संधि ]

**अडसभडस**—वि. १ कांहींतरी चरबट; रुक्ष. 'साधुसंत अडस भडस । न खाती कां प्रश्न । दावि २७३. २ यथेष्ट; भरपूर. [ भडस द्वि. ]

**अडसर**—पु. आडसर पहा.

**अडसष्ट**—वि. ६८ ही संख्या. [सं. अष्टषष्टि; प्रा. अडसठ्ठी; हिं. अठसठ ]

**अडसांगड-डी**—स्त्री. १ लहान सांगड तराफा-तर. ' मोठें विस्तीर्ण पात्र तें सुजाउद्दवला यानें अडसांगडीनें रिकामें यावें जावें. -भाव ६४. २ पोहणाऱ्याकरितां केलेला ( दोन जोडलेले भोपळे इ०चा ) ताफा. [ सं. अर्ध+सांगड ]

**अडसांगडी-ड्या**—वि. अडसांगड चालविणारा. २ सांगड न घेतां पोहणारा.

**अडसांगडीं**—क्रिवि. सांगड न घेतां सांगडीवांचून; ( उतरणें-जाणें-पोहणें ).

**अडसाळ**—न. ( वे. ) कुळवाचें आडवें लांकूड (का. ).

**अडसुर्डी**—पु. (कर. ) गुळव्याच्या हाताखालीं काम करणारा.

**अडसून खडसून**—क्रिवि. हडसून खडसून; दाटून दबकावून; स्पष्टपणें; बजावून. [ हडसणें-खडसणें ]

**अडसो**—अडस पहा.

**अडहतेर-हत्यार**—न. किरकोळ शस्त्र, ( बंदुक, तोफ या सारख्या अन्यास्त्राखेरीज इतर कोणत्याहि हत्याराला हें नांव कोणी लावितात. तरवार, बंदूक इ० खेरीज खंजीर, कटयार, पेशकबज वगैरे ). [ सं. अर्ध+हत्यार ]

**अडहतेरी-हत्यारी**—वि. अडहत्यार बाळगणारा ( पूर्वीच्या फौजेंत सरकारी शिपायांखेरीज असे निराळे शिपाई लोक असत ).

**अडळ-ळू**—पु. ( नांगऱ्यानें हातांत धरण्याची ) नांगराच्या रुमणीची खुंटी-दांडा [सं. हर्डी=लांकडाची बेडी ?-का. अड्ड-अड =अडवा ]

**अडळ**—पु. १ अडल पहा. २ साह्य; मदत. ३ पृथकपणा. ४ विकल्प. [ अड ]

**अडळ**—पु. शोध; आढळ पहा

**अडळ**—पु. एक सुमुहूर्त. [ ? ]

**अडळ**—पु परिमळ ?-शर.

**अडळणें**—अक्रि. अडखळणे. [ अड-ळ ]

**अडाअड**—स्त्री. मोठा अडथळा; खोळंबा; अडचण; अटकाव -नागा १०२२ ( क्रि० करणें-घालणें-होणें ) [ अड+अड ]

**अडाअड**—अडाडी पहा.

**अडांख**—पु. अज रेघ; हिशेबाच्या कागदावरील आंकड्या-वरून ओढलेली रेघ. अज पहा [ अड+अंक ]. ०**ताळा**-बेरीज बरोबर आहे कीं नाहीं हें पाहण्याची रीतः प्रथम आडव्या रकान्यांतील रकमांची बेरीज करून ती उभ्या रकान्यांतील रकमांच्या बेरजेशीं बरोबर आहे किंवा नाहीं हे ताडून पाहणें.

**अडाखा**—पु. १ मेळ; ताळा; ठोकताळा. २ धोरण; युक्ति. ३ एक ताळा पाहण्याची रीत. ( रकान्यांतील सर्व रकमांच्या बेरजेंतून शेवटच्या रकमेखेरीज सर्व रकमा एकामागून एक वजा करून राहिलेली संख्या शेवटच्या रकमेशी मिळते कीं नाहीं हें पाहणें; मिळत असल्यास बेरीज बरोबर ). ४ ताळेबंद; तपशीलवार पत्रक. 'तुका म्हणे ताळा घातला अडाखीं।' -तुगा १२३८ [अडांख]

**अडाघडी**—स्त्री. जगाची रचना. 'क्षणिक जाणून अडाघडी। वेगें लावी प्रेमाची थिडी।'-ह १९.७६ [ अंड+घटना ? ]

**अडाडी**—स्त्री. १ प्रतिबंध; अटक; 'तमीं दाटती खद्योतकोडी। तेवीं अज्ञानीं कर्मांची आडाडी।' -एभा २७.३९. २ उत्कंठा;घाई. 'होत डोळ्या आडाडी। अभिनव गोडी कृष्णाची॥' -एभा ३१.३०. ३ गर्दी; पसारा; रगाडा. 'सर्व धर्मांची आडाडी। धायेंवीण बापुडीं निमाली ॥' -एभा ११.११०४. [अड+अड].

**अडाण**—न. १ शेती नसलेले किंवा न करणारे गांवकरी; शेतकऱ्यांउलट; बलुतेदारांपेक्षां हे निराळे. [सं. अज्ञान. का. अडने] ० **कबाड**—न. अडाण; खेड्यांतील कारागीर, व्यापारी, मजूर, कामकरी, इ० ( शेतकरी नव्हे ते). ( अडणारा; शेतकऱ्यांवर अवलंबून रहाणारा तो अडाणी-गांगा ८). [अडाण+काबाडी]. ०**चोट**-वि. अडाणी; मंदबुद्धीचा; घोडचुक्या करणारा; मठ्ठ. ०**जात**-स्त्री. अशिक्षित, रानवट, जंगली लोक; रीतभात माहीत नसणारे. ०**पट्टी**-स्त्री. शेतकरी व बलुतेदार या लोकांखेरीज बाकीच्या सर्व धंद्यांच्या व उदमी ( अडाण ) लोकांवर बसविलेला कर. अडाण-बाकी-वसुली वगैरे असे सामासिक शब्द अनेक होतात. ०**मत**-न. खेडवळ, विलक्षण, भलतेच विचार-समजूत-कल्पना वगैरे; हटवादीपणाचें मतः दांडकमत. ०**वस्ती**-स्त्री. बलुतेदार व शेतकरी यांवांचून बाकीच्या ( अडाण ) लोकांची खेड्यांतील अगर त्याच्या एकाद्या भागांतील वस्ती.

**अडाण**—न कासः ओटीः अडण पहा. [ सं. ऊधस्-न : ग्री. औथर; ज. युटर इं. अडर. ]

**अडाण**—न. पाटबंधाराः बंधारा ( डॅम ). [ अडण-णा ]

**अडाणा**—पु. गायन शास्त्रांतील एक राग. ह्या रागास षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गंधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, कोमल निषाध हे स्वर लागतात आरोहांत गांधार वर्ज्य व अवरोहांत धैवत वर्ज्य. ह्याची जाति षाडव षाडव आहे. वादी तार षड्ज व संवादी पंचम आहे गानसमय रात्रीचा तिसरा प्रहर. हा कानडा रागाचा एक प्रकार आहे.

**अडाणा**—पु १ अडचीः अडसण पहा. २ उसाच्या चरकाला बेल जुंपण्याचा दांडा-लाट. ३ दरवाजाचा अडणा; अडसर. [अड]

**अडाणी**—वि. १ अकुशलः अनिपुणः अनभ्यस्तः कलाहीन ( माणूस ); रानटी; ग्राम्यः जंगली; असभ्य; अशिष्ट; उद्धट; खेडवळ ( भाषा,रीतभात ); ओबडधोबड; वेडीवांकडी (वस्तु, पदार्थ). २ अज्ञानी न शिकलेलाः विद्याहीन. ३ बिगर शेतकरी; अडाण. 'थोड्याशा भांडवलावर व्याजबट्टा करणारे अडाणी त्यांचे दस्तैवज प्रपंचखर्चासाठीं होतात.' -गांगा १६०. **म्ह**०-१ अडाणी कुणबी दुप्पट ( दुणा ) राबे. २ अडाण्याचा आला गाडा, वाटेवरच्या वेशी मोडा ०**कबाडी**-पु. अव. १ अडाणकबाड पहा. २ ( व. ) पांढरपेशे; मजूर; काबाडकष्ट करणारे. ३ गांवढळ; टोणपे; वेडगळ. ०**गांठ**-चुकीची निरगांठ; सहज सुटणारी चोडगांठ. ०**जात**-स्त्री रानटी, अर्बुज जात( पठाण वगैरे ). [सं. अज्ञानी]

**अडात-थ**—पु. १ दरवाजा, फाटक, खिडकी इ० दारावर मजबुतीसाठीं खिळे मारून बसविलेला आडवा गज. २ बसायाच्या पाटाखालील आडव्या पट्ट्या किंवा पाय. [ का. अड+सं. स्थ ]

**अडातुटी-डी**—क्रिवि. मधून मधून; थांबूनः राहून राहून; केव्हांतरी; विसावा घेत घेत. [ सं. अर्द्ध+त्रुट् ]

**अडांबरी**—पु. ( कों. ) नैर्ऋत्येकडून वाहणारा वारा. ( हा आषाढाच्या सुमारास ४२ दिवस वाहतो. ) [ सं. आडंबर ]

**अडाव-वा**—पु. सालअखेर देणेंघेणें इ० व्यवहाराच्या सर्व हिशेबाचा सर्व साधारण मेळ पाहण्याचा तक्ता; जमाखर्चाचें पत्रक-झाडा-तेरीज-ताळेबंद; अडावबंद, अडावबाकी, अडाववसूल, अडावसूट वगैरे कांहीं सामासिक शब्द. २ खर्चाचा कच्चा खर्डा.

**अडावणी**—स्त्री. अडविणें. अडवणूक; अटक. 'त्याचे व आमचे तरांड्याची अडावणी केली.' –विवि ८.३.५५

**अडाळा**—(हेट.) विळी; मोरळी; अडला पहा

**अडिंबा**—पु. अडसर (दारा–खिडकीचा). [का. अड्ड–अड+?]

**अडिवा**—पु. संचार; वारें; रोस. 'शृंगाराचा अडिवा।' –भाए १८०. [सं. आटोप; प्रा. आडोव=आडंबर?]

**अडिवाळ**—अडवाल पहा.

**अडिशेरी–अडिस्त्री**—अडशेरी पहा.

**अडी**—स्त्री. (विप्र. अढी). फळें पिकविण्यासाठीं गवतांत घातलेले फळांचे थर. या व इतर अर्थांसाठीं अढी पहा.

**अडी**—स्त्री १ (व) जमीन खोदून केलेली लांब चूल; चर (सैपाकाकरितां). २ अडसर; अट; प्रतिबंध. 'गृहरक्षणार्थ कुलुपें, कड्या, कोयंडे, अडी, कटडे, महिरावी आदिकरून.. .. ...सर्व पदार्थ लोखंडाचेच करतात' –नाना मोरोजी, विग्रो ग्रं. २२२ [अ (आ) ड]

**अडी**—स्त्री. खळें; मळणीची जागा.

**अडीच**—वि. १ दोन आणि अर्धा. २ बुद्धिबळाच्या खेळां-तील घोड्याची दोन सरळ व एक आडवें घर अशा प्रकारची चाल. [सं. अर्धतृतीय; प्रा. अड्डाइज्ज (अडीच); पं. ढाई; सि.–हिं. अढाई; बं. अड़ाई]. ०**कीं**–न. अव. उजळणीचा प्रकार; शंभरा-पर्यंत अडचांचा पाढा. ०**पेडी वेणी**–स्त्री. दोन मोठे व मध्यें एक लहान पेड ठेवून घातलेली वेणी. ही वेणी चांगली रुंद व आंवळ येऊन तिच्या मागील बाजूस पन्हळ पडतो. ०**मासा**—पु (क. बे.) श्रावण घेवडा; हा २॥ महिन्यांनीं तयार होतो. याला अडीच माशाची शेंग असेंहि म्हणतात [अडीच+मास=महिना].

**अडीमोडी**—स्त्री. आडमोड पहा.

**अडील**—वि. १ अडेल; हट्टी, हेकेखोर; स्वेच्छाचारी. २ आश्र-यास असणारा; आड दडलेला. –क्रिवि. आड; आश्रयार्थ पुढें. [अड–आड]

**अडील**—न. कोणी कोणी मनुष्याच्या शरीरांतून रात्रंदिवस एका तऱ्हेचें तेज निघत असतें तें.–पवि. १२ [?]

**अडीश्री**—अडशेरी पहा.

**अडु**—स्त्री. १ दोन तुळया अगर चिरेबंदी फरशी यांत मजबुती-साठीं मारलेली लोखंडी पट्टी. २ वस्तु अडवून धरून कातरणारें यंत्र. ३ (व.) विहीर खणण्याची दीड फूट लांबीची मोठी छिणी; पाथरवटाचें एक हत्यार. [अड].

**अडुक**—वि. (कों.) तुरट; कडु.

**अडुमाडु**—न. माडु नांवाचें एक हत्यार. माडु पहा. –वि. १ (ल.) शूर; धीट; धाडशी; आडदांड (शिपायी, योद्धा, मारा-यास व मगवयास सिद्ध असा); (उप.) शेंदाडशिपाई; रगडमल; वीरपीर. तिम्मारखान. २ दांडगा; जबरा; अतिहुशार–निपुण (लेखक, वक्ता इत्यादीबद्दल गौरवपर किंवा व्याजोक्तिपूर्वक). –शिवदि ४०८. [माडु द्वि.]

**अडुमाडु**—वि. अलबत्यागलबत्या; कोणीतरी. (माडु=करणें या कानडी शब्दावरून कोणी कानडीसारखें–न समजण्याजोगें बोल-णारा) [का. माडु]

**अडुसष्ठ**—अडसष्ट पहा.

**अडुळसा**—पु. एक वनस्पति. औषध, रंग, खत वगैरे कामा करितां याचा उपयोग करतात. जुनाट कफविकार, क्षय, दमा या रोगांवर या वनस्पतीचा चांगला उपयोग होतो; याच्या पांढरा व काळा अशा दोन जाती आहेत. फुलें पांढरी. –वगु. [सं. अटरूष–अडळूस. हि अड़सा का. आडसोगे. गु. अरडुसो–अडुसी; ते० आडसार, आडापाकु; ता. आधडोड. लॅ. आधातोदा–वासिका]

**अडू**—पु. अड्ड पहा. शिवाय १ पिंजऱ्यांतील पक्ष्यांची बसा-वयाची दांडी. २ लाट; आडकाठी (लोकांनीं आंत घुसूं नये म्हणून देवळांत लांकडाचे दांडे उभे करून त्याला आडवें लांकूड बसवतात ते). ३ एखाद्या वस्तुस बांधलेली दोरी मजबूत बसण्यासाठीं किंवा आंवळण्यासाठीं जिनें पीळ देतात ती काठी. ४ तरफ लावतांना उप-योगांत आणलेला दगड किंवा ठोकळा; उटाळी; टेंका. –वि. हट्टी; हेकेखोर; अडेल. [अड]

**अडून**—क्रिवि. १ एकाद्याच्या आड उभें राहून किंवा एका-द्याच्या मागें लपून. २ एकाद्याच्या मध्यस्थीनें–कर्वी; मार्फत [आड होऊन] ०**गोळी मारणें**–आपण प्रत्यक्ष एकाद्याचें नुकसान न करतां परभारें दुसऱ्याकडून करविणें. शिवाय 'अहाडून पहाडून' पहा. ०**झडून**–क्रिवि. आडून; लपून छपून 'कोणी अडुनझडुन। अडचणींत दडुन। कोणी राहाती पडुन। खालती॥' –प्रला २०५. [अडून द्वि] ०**बोलणें**–अप्रत्यक्ष रीतीनें लागलसें छद्मी बोलणें.

**अडे**—न. (ना.) नदीकांठाजवळ असलेलें बावर.

**अडेक**—वि. (गो.) गौण; वरकरणी. [?]

**अडेचा**—वि. (गो.) कृत्रिम; उसना. 'निजा तें निजाचें, अडें तें अडेचें.'

**अडेजावबडेजाव**—पु. बडेजाव पहा. [बडेजाव द्वि.]

**अडेबाटको**—वि. (गो.) नवशिक्या. [अडेक]

**अडेल**—वि. अडखोर; हट्टी; दुराग्रही; हेकेखोर; अडून बस-णारा; खलेल [अड]. ०**गुण**–पु. अडचणीची–संकटमय-स्थिति; तारांबळ. 'कोणाचा अडेलगुण पाहूं नये.' ०**तट्टू**–न. हट्टी; हेके-खोर; अडेल माणूस.

**अडेशिरी**—(गो.) आहार; खाणें; अडशेरी पहा. 'अडेशिरी कितेंय पडल्याबगर तों कंन्नाच हालचों ना.'

**अडेसरी**—अडशेरी पहा.

**अडोंगीं**—क्रिवि. एका–आडबाजूस; एका बाजूनें; आडमार्गानें; सरळ रस्ता सोडून. [ का. अडंगु=लपणें ]

**अडोपर**—स्त्री. १ अटकाव; अडथळा; प्रतिबंध; विरोध; हरकत; अडवणूक. ( क्रि० करणें–दाखविणें–लावणें ). **म्ह०** महाराची अडोपर वेशीपाशीं ( आपणाला जे मागावयाचें तें महार वेस अडवून मागतो ). २ आग्रह करणें–धरणें. पाठीस लागणें; पिच्छा पुरविणें. ३ अडून बसणें; खनपटीस बसणें; एकच धरून बसणें. (क्रि० दाखविणें–धरणें–लावणें ). ४ सबबी, हरकती पुढें आणणें; शंका काढणें; कठिण करून ठेवणें. ( क्रि० धरणें ). ५ गरज; नसलें तर अडेल अशी स्थिति; जरूरी. ' आज चांदणें पडलें आहे कंदिलाची अडोपर नाहीं.' ६ ( सामान्यतः ) गुंता; रुद्धता; प्रतिबद्धता; अगतिकपणा. ( क्रि० पडणें–लागणें–होणें ). [ अड+पर प्रत्यय ? ]

**अडोशीपडोशी**—वि. जवळपासचा; शेजारपाजारचा; आसपासचा. ' गोपाळरावांचे अडोशीपडोशी लोक पकडून कैदेंत घातले तेव्हां त्याचा राग थोडासा शांत झाला. ' –विक्षिप्त १.१३. [ सं. प्रातिवेशिक; प्रा. पडवेसिअ; हि. पडोसी. पडोशी द्वि. हिं. अडोस पडोस; गु. अडोसीपडोसी ]

**अडोशींपडोशीं**—क्रिवि. आसपास; आसमंतात्, आजूबाजूस.

**अडोसा**—पु. आडपडदा; आच्छादन; आडबाजू करण्याकरितां उभारलेला कूड; दृष्टीस प्रतिबंध करण्यासाठीं केलेली पडद्यासारखी योजना; आसरा. ( क्रि० करणें–घेणें–देणें ). [ अड्ड+सं. वस् ]

**अडोळणें**—आडळणें पहा.

**अडोळसा**—अडुळसा पहा.

**अडोळा**—पु. आढें ( घराचें ). [ सं अट्टाल; का. अड्ड+ळा ]

**अड्डताल**—झंपाताल पहा.

**अड्डा**—पु. अखाडा पहा. १ जूट; संघ; एकत्र जमाव समुदाय ( गाडीवान, मजूर वगैरे विशिष्ट व्यवसायी लोकांचा ); २ तळ; गोट; नाकें; खुंट; चव्हाटा; अखाडा; बाजारांतील देवघेव करण्याची जागा; प्रवासी लोकांची विसावा घेण्याची–मध्यंतरीं उतरण्याची जागा. ३ सतत किंवा मोठ्या प्रमाणावर चालणारा व्यवहार–उद्योग. जसें–गाण्याचा–नाचण्याचा–वादाचा अड्डा. ४ आखाडा; तालीम; रंगभूमि वगैरे शोकाचीं ठिकाणें. ५ आळशी किंवा व्यसनी लोकांची जमण्याची–शिळोप्याच्या गप्पा मारण्याची–जागा. [ सं. अड्ड; का. अडमु=जमणें, जमविणें, किंवा सं. अट्ट ( हट्ट ) =बाजार ]

**अड्डा**—पु. ( क. ) आग्रह; हट्ट. ' खाणें थोडें पण अड्डाच जास्त.' [ अड–ट ]

**अड्डा**—पु. आढ्यता; बाणा; प्रौढी; प्रतिष्ठा; फुशारकी. क्रि० बाळगणें–' अरे तूं शिपाइगिरीचा अड्डा बाळगतोस आणि चोर येतांच पळालास कां ? ' [ सं. आढ्य; प्रा. अड्ढ ]

**अड्डा**—पु. ( विणकाम ) फणीच्या चोया करण्याची सुरी. ही लांकडी ठोकळ्यांत बसविलेली असते. [ तुल० इं. अड्झ=एक कुऱ्हाड; म. अडला. सं. का. अड्ड=हल्ला करणें ]

**अड्डावणें**—अक्रि. ओरडणें; बोंबलणें. [ सं. अट्ट+आरव ]

**अड्डितचारी, अड्डितभौमि**—स्त्री. ( नृत्य ) उजवा पाय नुसत्या बोटांवर उचलून तो एकदां डाव्या पायाच्यापुढें व एकदां मागें असा त्याला अगदीं चिकटून ठेवणें. [ सं. ]

**अड्डेकरी**—पु. अड्डा ठेवणारा इसम किंवा अड्ड्याचा मालक.

**अड्डेबाज**—वि. अड्ड्यावर जाणारा; अड्ड्यांत पडून असणारा.

**अड्डेबाज, अड्डेबाख्त**—वि. टेंभा–प्रौढी–शेखी मिरवणारा. [ अड्डा+फा. बाख्तन=खेळणें ]

**अड्याल**—वि. अलीकडील; इकडील. –क्रिवि. ह्या बाजूला; अलीकडे; इकडच्या बाजूला–अंगाला. 'आमचें शेत नदीच्या अड्यालच आहे.' [ प्रा. अड्ड=हा, ही, हें+ल ]. ०**पड्याल**–अलीकडे पलीकडे. [ तुल० आयल+पयल ]

**अड्याळू**—पु. (व.) लांकडी नांगरास मागच्या बाजूस हातीं धरण्याकरितां वीत दीड वीत लांबीचा एक खुंटा असतो तो. [अड+आळू प्रत्यय ]

**अॅड्रेस**—पु. १ भाषण; व्याख्यान. २ पत्ता; मायना. [ इं. ]

**अढंच**—वि. मोठा; थोर. ' अढंच अचाटे ऋषीदेवथाटे।' –दावि ३३३. [ आढ्य+अंच् ? ]

**अढण**—स्त्री.सुपाच्या तोंडाशीं असणारी कांबटी; अडण २ पहा.

**अढल**—वि. अढळ; हुशार. वाकबगार. ' अढलाचे बरकंदाज.' –समारो २.१८७.

**अढळ**—पु. १ आढळ; थांग; पत्ता; शोध; भेट; उपलब्धि. 'त्या श्लोकाचा मला पूर्वी अढळ झाला नव्हता. ' २ ज्ञानाचें–अनुभवाचें क्षेत्र; आटोका. 'ही गोष्ट माझे अढळांत नाहीं.' [ आढळणें ]

**अढळ**—न. अविनाशपद; स्थिरपद; मोक्ष. ' शरण येती त्यांचे न विचारिमी दोष। न मागतां त्यांस अढळ देसी ॥' –तुगा ८६८. –वि. १ अचल; कायम; स्थिर; दृढ. 'तेंचि प्रमेय एकवेळ । शिष्यीं होआवया अढळ । ' –ज्ञा १८.१२३८. २ खरा; खात्रीचा. ' हा बोलु तुझा कीर अढळु । मानूं आम्ही ॥ ' –ज्ञा ११.४९१. [सं. अटल=स्थिर; प्रा. ढल्=पडणें; हिं. अटल]. ०**पद**–न. अचल, निश्चल, कायम असें स्थान; स्थिरपद; कोठल्याहि गोष्टीमुळें जें जाण्याची–ढळण्याची भीति नाहीं असें स्थान–पद. ( ध्रुवताऱ्याच्या किंवा नक्षत्रांच्या अचलपणाला तसेंच स्वर्गांतील वैकुंठादि स्थानांना हा शब्द वापरतात ).

**अढळ**—न. १ नशीब. प्राक्तन. 'वैद्य म्हणती तये वेळीं । नव्हे बरवें यासि अढळीं ।' –गुरु ३०.४३. [ सं. अटल ]

**अढळणें**—अक्रि. अढळ होणें; भेटणें; दिसणें; सांपडणें; गवसणें; आढळणें; ज्ञानगोचर होणें; लक्षांत येणें. [ आढळणें ]

**अढा**—पु. १ काठी, खांब वगैरेंभोंवती घातलेला दोरीचा वळसा, विळखा. २ दोरीचा फासा; अढी; दुमड; पेंच. 'मी वावडी तूं एक सडा नको मारूं आडा.' –मभा २. ३ अव.ची उपयोग–अढे; अढपारडें पहा. [ का. अड्ड ]

**अढाउ(ऊ)**—पु. १ आढाव; सैन्यांत एक प्रकारची बरची बाळगणारा आड हत्यारी शिपाई; सामान्यतः सैनिक. शिपाई. 'भीतरी परवडी आढावाची। शस्त्रें उपटीं होतीं त्यांचीं ।' –एरुस्व ६.५१. २ सैन्यांतील परिचारक. जखमी झालेल्यांची सेवाचाकरी करणारा. अँब्युलन्समधील माणूस. 'अढाउ–करीं लोटूनी नेला । काठीचीये मानेवरी ॥' –उषा १६ [ सं अर्धधार्मिक–अड्डहाइअ–आढाअ–अढाऊ ]

**अढाऊ**—वि. ( व. ) १ बदमाष. लबाड. 'ही जात जात्या फार अढाऊ. कितीहि समजुतीच्या गोष्टी सांगा पण डोक्यांत उजेड म्हणून कसा पडणार नाहीं.' २ द्वाड; उनाड; मूर्ख. ३ न पेरतां आपोआप उगवणारा; मेहनत न करतां उत्पन्न होणारा. 'हीं झाडें अढाउच उगवलीं आहेत.' [ का. अड्ड–अड–अडव ]

**अढाचौताल**—पु. एक ताल; आडा चौताल पहा. [ हिं. ]

**अढाल**—स्त्री. ढाल; निशाण; झेंडा. 'फडकती तडकेंचि अढाला ।' –दावि ३७९.

**अढाव**—अढाऊ पहा.

**अढाव( वा )**—पु. अटाव पहा

**अढावेढा**—पु. १ अढा पहा. २ आळा; प्रतिबंध; आडकाठी. 'जिव्हेला अढावेढा असला म्हणजे मूर्खास बरा.' [ अढा+वेढा ]. **पायाला अढावेढा**—पायांत पाय ( घालणें–घुटमळणें ).

**अढाळ**—वि. (कों) अतिशय मोठें ( पात्र, गृह इ० ) –न. मोठेंस्थान (सिंहासन, अर्धासन). 'जें आदरिलें अढाळ । राजाश्रियेचें ।' –शिशु ७२६. [ सं. आधा ( न )+आल=मोठें. किंवा अर्धालय= अर्धासन ]

**अढी**—स्त्री. फळें पिकविण्यासाठीं गवतांत घालून ठेवण्याची केलेली योजना. **अढींत उतरणें**–अशा रीतीनें पिकणें. [ का. अडि=पक्वदशा ]

**अढी**—स्त्री. रास. ढीग [ का. अडकु=ढीग करणें. ते. अड= ढीग; सं. आढ्य ? ]

**अढी**—स्त्री. १ पायावर पाय ठेवून, तिढा देऊन बसण्याची रीत. २ फाल्गुन अमावास्येच्या दिवशीं शकून पाहून भविष्य सांगण्याची एक रीति ( ग्रामजोशी त्या दिवशीं देवळांत अठरा धान्यें निरनिराळ्या भोंकांत घालून त्यावर पानें झांकण घालतो. दुसऱ्या दिवशीं जें पान ओलसर झालें असेल त्या धान्याची पुढील सालीं सुबत्ता होणार असें भाकित करतो ). ३ धान्याच्या राशीवर कडब्याच्या पेंढया घालून केलेलें छप्पर. ४ ( कों. ) गाई, म्हशी यांचें दूध काढतांना त्यांना घालण्यांत येणारा भाला. ५ (गो.) चिरकामासाठीं केलेली योजना. ६ दोरीचा वेढा, विळखा, दुमड; मुरड; गुंता; अढा पहा. ( ल. ) अडचण; बांधा; नड. 'ऐशिया निरूपण घडमोडी । तुझेनि बोलें पडे अढी ।' –एभा २०.५६. ( क्रि० उलगडणें, पडणें ) ७ तेढ; मनांतील गांठ; विपरीत ग्रह; अनिष्ट शंका– विचार; रुसवा. ( क्रि० धरणें, पडणें ). 'कां मनिं धरलि अढी ।' ८ कपाळावरील मुरकुती वळी. 'भृकुटिये आढी घालोन। –रावि १०.३९. ९ रहाट गाडग्यामधील रव्यांच्या वरील आडवें लांकूड ( यावर माळ टाकलेली असते ) १० मिठी. 'चरणीं घालुनियां अढी । कांसव गजातें पै ओढी ॥' –मुआ ५. १०८. ११ ( व. ) स्वयंपाकासाठीं खणलेला चर [ का. अड्ड= आडवें; अडे=धीरा, टेंका ]. ०**खोर**–वि. मनांत तेढ बाळगणारा; खुनशी. ०**मारून निजणें**–अक्रि. डोक्याखालीं व पायाखालून पांघरूण दुमडून घेऊन निजणें; पांघरूण गुरफटून घेऊन निजणें.

**अढी**—स्त्री., पूजेचा एक विचित्र प्रकार ( बार्शी सोलापूरकडे ब्राह्मणांत ढुंगणाची पूजा करण्याची चाल आहे; तसेंच खंडोबाच्या ढुंगणाची पूजा करण्याची चाल अजून कांहीं टिकाणीं आहे असें सांगतात ). [ सं. आधि ? ]

**अढीच्यादिढी**—क्रिवि. अवाच्यासवा; अतिशयोक्तीनें; प्रमाणाबाहेर; उथळेपणानें; फाजील; बेसुमार. ( क्रि० बोलणें–वागणें ). [ दीड द्वि ]

**अढें**—न. १ घराच्या छपरावरचें दोन्ही पाख्यांमधलें लांब लांकूड; अडोळा (अडाणा पहा). 'घरा पंच वासे असे एक आढें।' –कचेसुच २. २ मानेच्या दोन्ही बाजूचा खांद्यावरील भाग ( शरीराचा, अंगांत घालावयाच्या वस्त्राचा, स्त्रियांच्या चोळीचा). ३ दोन माणसांनीं चालवावयाची करवत. ४ एकादी वस्तु फिरविण्यासाठीं त्यांत खुपसलेला गज, दांडा. (जसें उंसाच्या चरकाच्या लाटा फिरविण्याकरितां व बैल जोडण्याकरितां असलेलें लांब लांकूड; किंवा नांग उठविण्याच्या यंत्रांतील ( कापसन ) दांडा ). ५ चांभाराची कातडें वाळत घालण्याची आडवी दांडी तुळई. **एका अढ्या खालचा**–एका घरांतील-कुटुंबांतील. **अढ्याला पाय लावून निजणें**–किंवा झोंप घेणें=खुशाल, स्वस्थ पडणें; अत्यंत बेफिकिरपणें निजणें असणें. [ का. अड-अड्ड ]

**अढें**—न. कांस; ओटी ( गाय, म्हैस इ० जनावराची ).

**अढेकड**—पु. चाकाच्या अऱ्यांचीं दोन्ही टोंकें सांधणारा आडवा तुकडा. [ का. अड्ड+कड ]

**अढेपाट**—पु. अढ्याचें लांकूड; अढें.

**अढेपारडे** (**ढे**)—पु अव. जमीनीच्या उत्पन्नांतील गांव-पाटलाचा हिस्सा. पाटलांचे हक्क'–पाटलाच्या इनाम जमीनीला पासोडी व लग्नांतील त्याचा जो हिस्सा असतो त्याला शेलावाटी म्हणतात. सरकारांतून मिळणारा जो त्याचा पगार ती नेमणूक.

**अढेवेढे**—पु अव १ वेसूर आणि वेड्यावांकड्या ताना घेऊन केलेलें गायन. २ वांकडें तिकडें, आड फांट्याचे टाळाटाळीचे मुद्दे, हरकती, कांक्षा. ३ अळेपिळे; आडवे तिडवे वळसे. ०**घेणें**–सक्रि. कांकू करणें; अडचणी हरकती उपस्थित करणें. [का. अड्ड-अढा (ढी)+ सं. वेष्टन-वेढ]

**अढ्या**—पु. सूत काढण्यासाठीं किंवा मोकळें करण्यासाठीं ज्या दोन खुंट्यांभोंवतीं तें गुंडाळतात त्यांपैकीं प्रत्येक. [अढे]

**अढ्याकरवत**—पु. स्त्री. दोन्ही टोंकांस लांकडी मुठी असलेला दोघांनीं चालवावयाचा मोठा करवत; अढें. [अढें+करवत]

**अढ्याचौताल**—पु. एक ताल, आडाचौताल पहा. [हि.]

**अणकुची**—स्त्री टोंक;तीक्ष्ण बिंदु शेवट.'त्यांच्या (धोंड्यांच्या) अणकोच्या झिजल्या.'–भूव ६१. [सं. अणि+का. कुचि=लघुता ?]

**अणखर**—पु. दूध काढतांना शेवटच्या जोरानें पिळाव्या लागणाऱ्या लहान धारा [अणि+क्षर ?]

**अणखर**—वि. १ बळकट; मजबूत; टिकाऊ,भक्कम, (लुगडें सणंग –विशेषतः नारायण पेठी कापडास, कारण तें पक्क्या रंगाचें व टिकाऊ असतें, भरीव, शुद्ध धातूचे (दागिने) .२ कठीण-कठोर; तडकाफडकी; रोख ठोक; निर्भीड (भाषण वर्तन) ३ दु:खप्रद; मर्मभेदी. खोंचदार भाषण (वर्तमान-गोष्ट). ४ विलक्षण; चमत्कारिक. कधीं न घडणारी; अलौकिक. [का. १ अणिवर=उत्कृष्टता. सुंदरता वेतवात २ अणक=चेष्टा, निंदा]

**अणखी**—क्रिवि १ अधिक; जास्त; शिवाय २ पुन्हां परत. 'एकदां भेटीस गेलों होतों मग अणखी कशाला जाऊं ?' –उअ. आणि; व. अणिक पहा. [सं. अन्यत+क=अणिक]

**अणखुरणें**—अक्रि. दुधाचा पान्हा दाटल्यामुळें सड-आंचळ-ओटी ताठणें, तरारणें, फुगणें. 'गाय अणखुरली' [सं. अन+क्षर म. अणखर]

**अणगट**—स्त्री न १ (अंगापासूनची)फांदी; अणी. टोंक; अंकुर. 'विशिष्टां व्रतांचे फोक। धीराच्या अणगटीं नित्य।'–ज्ञा १५.१९१. [सं. अंग+गत]

**अणगें**—न. (गो.) तंबाकूची मोठी मोट; अखे. गठ्ठा. 'ताणें पांच अणगीं विकनी घेतल्यांत.' [का. अंडिगे=अखें. अर्धी गोणी]

**अणणु**—वि. स्थूल; मोठा 'अस्थूलु मी अणणु। जें कांहि तें मीं।'–गज्ञा १८ ११९१. तुल० 'स्थूलु मी अणु। जें कांहीं तें मी।'–(वें) ज्ञा १८.११९७. [सं. अन्+अणु]

**अणणें, अणणावळ, अणवाई, अणाआण**—आणणें पहा.

**अणदळ**—न (ना.) ताम्हन. [?]

**अणवुजणें**—अक्रि. चमत्कारिक–नवल–आश्चर्य वाटणें. [अण-बूज]

**अणबूज**—वि १ परका; अपरिचित; नवीन. २ चमत्कारिक; आश्चर्यकारक. [सं अन्+बुध; प्रा. अण+वुज्झ]

**अणवट**—पु. एक तऱ्हेचा रुप्याचा दागिना (पायांतील); पायाच्या आंगठ्यांत घालावयाचें जोडवें 'चटपट अणवट जोडव्याची झटपट. दाहीं बोटीं मेंदी रंगली।'–राला ६०. [वैदिक सं. अर्णवी=बोट+वृत्त. किंवा अण्=शब्द करणें. का. आणी=वाटोळेपणा+वृत्त–वेढ? गु. अणवट].

**अणवा**—वि. (गो.) १ न शोभणारा. हलक्या-कमी प्रतीचा. 'तो किल्या घेता? तो सामको अणवो.' २ अव्यवहारी; अडाणी; मूर्ख. [सं. अणु+वत्].

**अणवा, अणवाणी,** (क.) **अणवाई**—क्रिवि. अणव्या–उघड्या पायानें; अनवाणी पहा

**अणस**—न. (गो.) एक प्रकारचें भात. [सं. अणु तुल० कणिस (कण+स)].

**अणस**—स्त्री. (गो.) लोखंडाचा वाळा; वेढें. उ० मुसळाची अणस [का. आणि=वर्तुळपणा].

**अणसूट**—अनसूट पहा. 'अणसूट निर्मल चार वार्जा।'–वेसी स्व. ८.१०९.

**अणा**—आहणा पहा.

**अणा–णी**—पु.स्त्री आणा. एक सोळाश रुपया. आणा पहा.

**अणि–णी**—स्त्री. १ टोंक; शेवटचा बिंदु; अग्र. 'केंसाच्या अणी इतकेंमुद्धां हटविणारा प्राणी मला संसारांत दिसत नाहीं.' –पपप्र १०५. २ अंकुर; अग्र (वृक्ष, पर्ण इ० चा). ३ एनवेळ; अणिबाणीची वेळ 'अणी चुकली बारा वर्षांचा वायदा'=योग्य समय चुकला कीं बारा वर्षे काम होत नाहीं. ४ भोंवऱ्याची आर–अरी. ५ जोड्याचें बाकदार मुरडलेलें टोंक. ६ लगामाचें हातांत धरावयाचें टोंक–शेवट. ७ गाडीच्या आंसांत घालण्याची खीळ–खुंटी. [सं. अणि; ता. अणि=खीळ]. ०**दार**–वि. अणकुचीदार. टोंक असणारें ०**बाणी**–स्त्री. एनवेळ.

**अणि–णी**—उअ. आणि, शिवाय; अणखी. 'कदाचित् त्या देवी, अणि फणिमणींच्या पण मुली।'–केक ३३.

**अणिक–ख**—उअ. (कवितेंत) आणखी; आणि. –वि. वेगळा; भिन्न; विशेष; दुसरा; अन्य. 'जेथील तेथें आणिकीं। कामा नये सर्वथा।'–दा ७.९.१५ [सं. अन्यत्+क; प्रा. अण्ण+क].

**अणिमा**—पु. स्त्री. १ अष्ट सिद्धींतील एक, अणु एवढा लहान; अष्टमहासिद्धि पहा. 'दिले अणिमाद्यैश्वर्य अष्टगुण गा! या'

मोअनु ६.५१. २ अणुत्व; अतिशय सूक्ष्मपणा; बारकाई. [सं अणिमन्].

**अणिमोल**—अनमोल पहा.

**अणिया**—वि. अणीदार. 'पुढील अणिया भाले।' —उपा १८. —स्त्री. (गो.) गलबताच्या पुढचा (अणकुचीदार) भाग. [सं. अणि प्रा. अणिय=अग्रभाग].

**अणियाळें**—वि अणीदार, अणकुचीदार; टोकदार; तीक्ष्ण 'अणियाळिया दृष्टि।' —भाए ३६५, 'दीर्घ नासिक आणियाळें।' —एभा १४.८७५. [सं. अणि+आलुच्]

**अणीक, अणीकु**—अणिक पहा. उ. अणीक प्रकार, अणीक विध.

**अणीकसा**—वि. विलक्षण. असाधारण असामान्य. चमत्कारिक. [सं. अन्यत्+क+सदृश; म. अणिक+सा].

**अणीबाणी**—स्त्री. १ रागाची—क्षोभाची स्थिति; क्षुब्धता; हमरी-तुमरीवर येण्याची अवस्था (क्रि० येणे). 'मी मुरळीत बोलत असतां तूं अणीबाणीवर येतोस हें काय?' २ कार्य सिद्ध होण्याची जवळ आलेली स्थिति; ऐनप्रसंग सोक्षमोक्षाचीवेळ. 'आमची पंचाईत अणीबाणीस आली.' ३ निकडीचा, कठीण प्रसंग—समय. 'त्याची अणीबाणी त्यां संभाळली.' [अणी + बाणी. किंवा बाणी द्वि.]. ०चा **कज्जा-भांडण-लढाई-वाद्**—कडाक्याचा, निकराचा, जोराचा कज्जा वगैरे. ०चें **काम**—नाजूक काम; ऐनवेळेचें, अगदीं संपवेळेच पाहिजे असें काम ०**स येऊन नासणें**—ऐनवेळीं विघडणें—बिघाड होणें.

**अणु**—पु. १ पदार्थाचा स्वतंत्र रीतीनें अस्तित्व असणारा अतिसूक्ष्म भाग. रज कण (सूर्यकिरणांत जे धुळीचे कण दृग्गोचर होतात त्यांच्या षष्ठांशानें लहान असणारा). (इं.) मोलेक्यूल. 'जें पाहतां त्रिभुवन। अणुही नोहे॥' —ज्ञा १३ ३३१. २ कालाचा एक भाग—मुहूर्ताचा (४८ मिनिटांचा) ५,४६,७५,००० वा हिस्सा. ३ (संगीत) पावमात्रा काल. —वि. अति लहान; अल्प. सूक्ष्म. 'तुम्हासमचि हें गुणें अणु उणें नसे नाम हा।' —केका ७५. [सं.]

**अणुआर**—पु वारिक चुरा. चारचुरा. 'तेथ त्रिवर्गाचा अणुआरु। आडऊ निघाला जो अपारु। तो महाभारतप्राकारु। भोंवता केला॥' —ज्ञा १८ ३६ [सं. अणु + अर = अल्प?]

**अणुगुरुत्व**—न. (पदा रसा) वाफेचें विशिष्ट—गुरुत्व; अणुभार. (मोलेक्युलर डेन्सिटी)

**अणुभार**—अणुगुरुत्व पहा.

**अणुमन्द्रसप्तक**—न. (संगीत) मन्द्रनादापेक्षां स्वरानें नीच नाद असणारें स्वरसप्तक

**अणुमात्र**—वि. अगदीं थोडें किंचित; ईषन्मात्र; किंचिन्मात्र. 'तुज भय नाहीं अणुमात्र।' —राचि ९.६७

**अणुरेणु**—पु. अतिशय लहान कण; सूर्य किरणांत दृष्टीस पडतात असे जे धुळीचे वगैरे अति सूक्ष्म कण त्यांतील एक. (सामान्यत. अव. प्रयोग). 'अणुरेणु सूक्ष्मस्थूळा पार नाहीं। श्रुती नेती त्याही खुंटलिया॥' —तुगा २२०४. [सं. अणु + रेणु=धूळ] ०**जाल**—न. १ सूर्य किरणांतील अणु परमाणु. २ अतिसूक्ष्म कणांचा समुदाय. [सं.]

**अणुवाद**—पु (तत्त्व.) जगांतील सर्व वस्तुमात्राची उत्पत्ति अणूंपासून आहे व हे अणू अनंत काल आहेत असा सिद्धांत. [सं.]

**अणुसूट**—अनसूट पहा.

**अणेगा**—स्त्री आणेगा पहा

**अणेगीं, अणेकीं**—वि. अनेकीं, अनंत, पुष्कळ 'मायासूत्राची करोनि दोरी। जो ब्रह्मादिकां खेळवी अणेगीं परी।' —शिशु १. 'भणे हांचि खेळतुसे अणेकी खेळीं।' —दावि ३४०. [सं. अनेक]

**अण्णा**—पु. १ (मूळ अर्थ) वडील भाऊ. २ बहुमानार्थी टोपण नांव, लहान-मुलांनाहि लाडकें नांव म्हणून लावतात. [प्रा. अण्ण—अ; का. अण्णा=मोठा भाऊ]

**अण्णाठें**—न. (गो) पायलीच्या १६ व्या भागाएवढें एक माप. 'अण्णाठेंभर तांदूळ घेवून यॉ.'

**अण्वी**—वि. अणुरूप; सूक्ष्म. 'अण्वी जीवकळा तेथ। पहावी माझी॥' —एभा २७.१८७. [सं]

**अतः**—क्रिवि. म्हणून; एतदर्थ; अतएव, यामुळें; या कारणास्तव [सं.] ०**कारणात**—क्रिवि. अतएव, यामुळें; याकारणास्तव. ०**पर**—क्रिवि. म्हणून, यापुढें; पुनः (नकारार्थी वाक्यांत). [सं.]

**अतएव**—क्रिवि. याच कारणासाठीं; यासाठीं. 'एक परम हंसाचें लक्षण। ज्ञानपरिपाकें परिपूर्ण। अतएव शांति ओळंगे आंगण।' —एभा १८.१८४. [सं. अत एव]

**अतखानी**—वि. (प्रां) मत्सरी; दीर्घद्वेषी. [?]

**अतणें**—आतणें पहा.

**अतत**—उद्गा. एकाएकीं अचंबा, आश्चर्य वाटलें असतां निघणारा उद्गार; अबब! 'अतत केवढा हा नदीस पूर आला!' [सं. हा (आ) तात!]

**अततता**—स्त्री. १ चाचरें, अडखळत केलेलें भाषण; बोलतांना लागणें २ (ल.) कांकूं, नानू करणें, मागे घेणें; कचरणें. (क्रि० करणें, मांडणें, लावणें.). [ध्व.]

**अतताई,-त्याई-त्यायी**—वि. (क्रोधाच्या भरांत) साहसकर्म, त्रागा करणारा. (खोडकर द्वाड मुलाला लावतात.) [सं. आततायिन्]

**अतत्त्वार्थ**—वि. असत्य; अयथार्थ. 'अतत्त्वार्थ भाषणीं धरावें मौन।' —गुच ५३.८८. [सं. अ+तत्त्व+अर्थ]

**अतथ्य**—वि. खोटें; असत्य; बनावट. [ सं. अ+तथ्य ]

**अतद्व्यावृत्ति**—स्त्री. सर्व पदार्थांचा निरास करणें; आत्म्याशिवाय सर्व पदार्थ दूर करणें -वेगळे करणें. 'श्रुति 'नेतिनेति' येणें शब्द। अतद्व्यावृत्ती निषेधबोधें।' -एभा ३.६६७. [ सं. नतत्=अतत्+व्यावृत्ति=पृथक् करणें ]

**अतर**—अत्तर पहा.

**अतर्कित**—वि. अटकळ, कल्पना, तर्क न केलेलें; अनपेक्षित; अचिंतित; अगोदर लक्षांत न आलेलें; आकस्मिक; अकल्पित. [सं.]

**अतर्क्य**—वि. कल्पनातीत; अचिंत्य; गूढ; तर्क करण्यास कठीण. 'अतर्क्य महिमा तुझा गुणहि फार बा हे विधी'-केका २७. [ सं. ]

**अतर्पणीय-अतर्प्य**—वि. संतुष्ट करण्यास कठिण; समाधान न पावणारा; तृप्त न होणारा; असोसी. [ सं. अ+तृप् ]

**अतल-ळ**—न. सप्त पातालांपैकीं पहिलें. 'आताळो गेलों, पाताळो गेलों। तिथून आणली ... ...।' -लोककथा. -वि. अगाध; अतिखोल. [ सं. ]. ०**स्पर्श**—पु. ज्याचा तळ, ठाव लागत नाहीं असा; अतिखोल ( डोह वगैरे )

**अतल(ळ)स**—स्त्री. साटीन; रेशमी कापड; गर्भरेशमी कापड; काळसर लाल साटीण. 'अतळस कुतन्याहीं साहिऱ्या रुंदबोली।'-सारुह ३.४०. [ अर. अत्लस ]

**अतल(ळ)स**—पु. परिमळ; स्वाद ? -मनको. 'वडे धिरडीं स्वाद घेती। आतळस आपालांचा।' -दा १८.१.८.

**अतस, अतसिका, अतसी**—स्त्री. जवस; अळशी. 'ज्या सांवळ्या अतसिका कुसुमासमाना।'-वामन ४.३.६. [सं. अतसी; हिं. गु. अलसी; का. अगसी; बं. तिसी; म. अळसी]. ०**पुष्प**-न. जवसाचें फूल. 'नाना अतसपुष्पांचिया परी।' -रंयोवा ४३.

**अतक्षणीं**—क्रिवि. याचक्षणीं; याच वेळेला. [ सं. एतत्क्षण ]

**अतज्ञ**—वि. अनभिज्ञ; विषयाची पुरी माहिती नसलेला. [सं. अ+तज्ज्ञ ]

**अतां**—क्रिवि. सध्यां; यावेळीं; आतां. [सं. अतः; प्रा. अत्तो; सिं. इताम्]. ०**शां-शीं-शें-सा**-अलीकडे; हल्लीं; सध्यां.

**अताई-यी**—वि. १ शिक्षकाच्या मदतीवांचून नुसत्या परंपरेनें शिकलेला ( गवई, वैद्य ); विनाशिक्षक येत असलेली ( गायनादि कला ). २ ( ल. ) दक्ष; कुशल; प्रवीण. [ तुर्की अतालीक=खाजगी शिक्षक; हिं. अताई=विनामूल्य गाणारा व नाचणारा; गु. उत्तम गाणारा ]

**अतातय, अताता**—उद्गा. आश्चर्यदर्शक उद्गार; अतत पहा.

**अतात्त्विक**—वि. असत्य; असार; अवास्तविक; पोकळ; खरें नव्हे तें. [ सं. ]

**अतायत**—वि. आजन्म; तहाहयात; मरेपर्यंत. [फा. ता-हयात]

**अतार-री**—पु. १ सुगंधी अत्तरें करणारा-विकणारा; अत्तारी; आतारी; गंधी. २ ( व. ) बेगड, भिन्याचे कागद, रंग वगैरे विकणारा. [ अर. इत्र; फा. अत्तार-री ]

**अति**—क्रिवि. पुष्कळ; फार; अधिक; जास्त; अतिशय. 'हा अति बोलतो.' म्ह० १ अति सर्वत्र वर्जयेत्=कोणतेंहि वाजवीपेक्षां जास्त करणें टाळावें. २ अति तेथें माती. -शअ. ( नामापूर्वी हा उपसर्ग पुढील कांहीं अर्थांनीं योजतात. ) वरचढ; सरस; मार्गे टाकणारा; पलीकडे; वरून. उ० अति कठिन-क्रोधी-गर्व-मिष्ट-मृदु इ०

**अतिइच्छा**—स्त्री. ( विप्र. ) अतीच्छा; फार लोभिष्टपणा; अतिशय लुब्धपणा; असोशीपणा.

**अतिकरणें**—सक्रि. ओलांडणें; पलीकडे जाणें; अतिक्रांत होणें. 'निपजलें अन्न तैसें। दुपाहरीं कां येरें दिवसें। अतिकरें तैं तामसें। घेईजे तें॥' -ज्ञा १७.१५५. [ सं. अति+कृ ]

**अतिकाल-ळ**—पु. उशीर; अवेळ; विलंब; योग्य वेळ टळून गेलेला काळ. ( पेरणी, भोजन वगैरेस योग्य काळ जो वर्षाऋतु, मध्यान्ह इ० तो टळून अनुक्रमें शरदृतु, तृतीयप्रहर इ० पुढचा काळ ). ०**ळ्या**-पु. स्नानसंध्या, पूजा, भोजन इत्यादि नैमित्तिक कर्में उशीरां करणारा माणूस; अतिकाळीं वागणारा माणूस. [ सं. अति+काल ]

**अतिक्रमण**—पु. १ उल्लंघन; पराभव; अतिक्रांत करणें; ओलांडून जाणें. 'तैसा भेटलियां न करवे। अतिक्रमु॥'-ज्ञा १३.२५९; 'तेवीं असत्याचेनि अतिक्रमें। वाचा प्रकाशे सत्य संभ्रमें।' -एभा ३.५३५. २ ( ल. ) अमर्यादा; अपमान; अव्हेर ( गुरु, शास्त्र इत्यादिकांचा ); अनादर. ३ उल्लंघन; अतिक्रांतस्थिति. ४ (कायदा) अपराध; गुन्हा (आज्ञा, हक्क उल्लंघन केल्याचा). 'स्थावर मिळकतीवर अ० केल्याबद्दल नुकसान भरपाई.' सामा. शब्द-आज्ञातिक्रम, गर्वातिक्रम, कालातिक्रम, देशातिक्रम, मार्गातिक्रम, मर्यादातिक्रम, निद्रातिक्रम, भोजनातिक्रम. [ सं. ]

**अतिक्रमणें**—अक्रि. १ पलिकडे जाणें; उल्लंघणें. २ आज्ञामोडणें, तोडणें; अमर्यादा करणें; अवमानणें; अपराध करणें. 'व्यसनीं स्वयें नव्हे हा आर्य अतिक्रमिसि कां बुधा! याला?।' -मोसभा ५.३९. ३ पराभव करणें; जिंकणें. ४ व्यापणें.

**अतिक्रांत**—वि. १ ( काल, स्थल, मर्यादा, इ० ) ओलांडलेला; पलीकडे गेलेला. २ ज्यानें अतिक्रमण केलें आहे तो. ३ संपलेली; होऊन गेलेली ( गोष्ट ). ४ व्यापलेला. ५ जिंकलेला. [सं.] ०**करण**-( नृत्य ) नाचण्याची एक तऱ्हा ( पाय संकुचित करून एकदम वर उचलून पुढें पसरणें व पुनः उंच करून खालीं टाकणें ).

**अतिक्रांताशौच**—न. सुतकाचा अवधि टळून गेल्यानंतर समजल्यामुळें धरण्यांत येणारें सुतक. [ सं. अतिक्रांत+अशौच ]

**अतिगंड**—पु. सत्तावीस योगांतील सहावा योग. [ सं. ]

**अतिचर**—वि. अतिवेगवान; अतिचंचल ( ग्रह, मंगळ वगैरे ). अतिचार पहा. [ सं. ]

**अतिचार**—पु. १ ( ज्यो. ) एकाद्या ग्रहानें पूर्व राशीचा शेष शीघ्रगतीनें उल्लंघून दुसऱ्या राशीवर ( ठरीव वेळेपूर्वी ) जाणें. ' तेथ एकाची ते शीघ्रगती । एक ग्रह मंदगामी होती । अतिचार कां वक्रगती । मंडळभेदें येती एकत्र ॥ ' —एभा २३. ८२७. २ अति वेगवान माणूस, ग्रह इ० [ सं. ]

**अतिचौकस**—वि. फाजील, वाजवीपेक्षां जास्त चौकशी करणारा; अति चिकित्साखोर; छडा न छडा काढणारा. [चौकस पहा]

**अतिच्यार**—वि. मर्यादेबाहेर; फाजील; अतिचार. ' हा भाओ वाणितां जामी अतिच्यारी । तरी रसिकु कोपती ॥ ' —शिशु ७१९. [ अति+चर ]

**अतिछत्र(त्रा), अतिछत्रका**—१ शेपू (भाजी). २ न. वेखंडासारखा वास येणारें एक प्रकारचें गवत. ३ बडिशेप. [ सं. ]

**अतित**—पु. अतिथि पहा. ०**अभ्यागत**–अतिथि; वैरागी गोसावी, इ० पाहुणा. [ सं. अतिथि ]

**अतितत**—वि. अतिशय विस्तृत. ' पुरोभागीं जो हा अतितत सभामंडप असे । ' —सारुह ८.९२. [ सं. अति+तन्-तत ]

**अतिताई**—स्त्री. अतताई पहा.

**अतितार सप्तक**—न. तार सप्तकापेक्षां उंच सुरांचे सप्तक. [ सं. ]

**अतितृष्णा**—स्त्री. अतिशय लोभ; हांवरेपणा; अधाशीपणा; लब्धपणा. ' अतितृष्णा न कर्तव्या '. —सुभाषित. [ सं. ]

**अतित्याई**—स्त्री. अतताई पहा.

**अतिथि**—पु. १ पाहुणा; पांथस्थ. २ ऐन जेवणाच्या वेळीं आलेला, अनाहूत मनुष्य; अगांतुक पाहुणा. 'असा अतिथि धार्मिक स्तुतपदा ! कदा सांपडे।'—केका १२१. [सं.]. ०**काळ**–पु. पाहुणा येण्याची वेळ; (ल.) दोन प्रहर; जेवणाची वेळ. 'अन्न धावें निर्धारीं । अतिथिकाळीं परियेसा।'—गुच३२.२९. ०**द्वेष**–पु.आलेल्या अतिथी-बद्दलचा द्वेष किंवा अनादर. ०**पूजन**–न. अतिथींचा आदरसत्कार, स्वागत; ( गृहस्थाश्रमांतील एक मुख्य कर्तव्य ). ०**भोजन**–न. अतिथीला आपल्या पंक्तीला घेऊन करावयाचें भोजन; पाहुण्याला घातलेलें जेवण. ०**यज्ञ**–पु. पंचमहायज्ञांपैकीं दुसरा—मनुष्य यज्ञ. ०**वेळा**–स्त्री. अतिथिकाळ पहा. ०**संतर्पण**–न. ब्राह्मण भोजन; अतिथियज्ञ पहा; पंचमहायज्ञांपैकीं एक. 'अतिथि संतर्पण हा मनुष्य यज्ञ ।' —गीर २८८. ०**सत्कार**–पु. अतिथींचें आदरातिथ्य, मान-मरातब.

**अतिथ्यरीति**—स्त्री. अतिथींच्या सत्कारासंबंधीं-पद्धत-नियम. [ सं. आतिथ्य+रीति ]

**अतिदिष्ट**—आज्ञापित; अतिदेश पहा. [ सं. ]

**अतिदेश**—पु. १ प्रस्तुत विषयाच्या बाहेरील विषयास एकादा नियम, मुद्दा, विधान, तत्त्व लागू करणें; लागू पडेल त्या त्या ठिकाणीं लावणें. २ आज्ञा; हुकूम; आदेश. [ सं. अति+दिश् ]

**अतिनीलकिरणें**—न. अव. ( शाप. ) सूर्याच्या वर्णपटांतील नील किरणांच्या पलीकडचीं किरणें; ' अल्ट्रा व्हायोलेट ' किरणें.

**अतिपरमाणुविद्युत्कण**—पु. ( शाप. ) पदार्थाचा विद्युद्युक्त परमाणूपेक्षां लहान कण; इलेक्ट्रॉन.

**अतिपरिचय**—पु. अति स्नेह; फाजील सलगी; वाजवीपेक्षां जास्त संघटण. म्ह० अतिपरिचयादवज्ञा=कुणाकडे अति जाणें येणें असल्यास आपला आदर, मान राहत नाहीं. [ सं ]

**अतिपाड**—पु. १ अतिशय मोल, किंमत. २ (ल.) फार मोठी सीमा, मर्यादा ' ब्रह्मविद्या देतां उदारू । जे अति पाडाचे ॥ ' —विसिं १.१.४६. [ अति+पाड ]

**अतिपात**—पु. ( नियम ) भंग, उल्लंघन; अतिक्रमण; शास्त्र, रीतीभाती यांना न जुमानणें. [ सं. ]

**अतिप्रसंग**—पु. १ पराकाष्ठा; कमाल; अतिशयितता; अमर्यादा. २ वाईट परिणाम; अनर्थ. ' बोलतां बोलतां ( किंवा खेळतां खेळतां, वाद करतां करतां ) अ० झाला. ' ३ फार निकट संबंध; सलगी. ४ विषयांतर; अप्रासंगिक भाषण; पाल्हाळ. 'हा असो अतिप्रसंगु । न संडीं पां कथालागु । ' —ज्ञा ५.६६. [ सं. ]

**अतिबद्ध**—वि. अतिकृपण; चिक्कू. ' एकें उदारें अतिबद्धें । कुद्धें एकें ॥ ' —ज्ञा ११.१२६. [ सं. अति+बंध् ]

**अतिबळी**—वि. अतिशय ताकदवान, बलिष्ठ. ' अतिबळी बळी छळिला । ' [ सं. अति+बलिन् ]

**अतिभर**—पु. विपुलता; आत्यंतता; तीव्रता; पुष्कळपणा; फार जोर; चढ. 'व्ययेंचेनि अतिभरें । ' —विसिं १.६.२३.[सं. अति+भर]

**अतिमनुष्य**—पु. अतिमानुष पहा. ('सुपरमन'ला प्रति शब्द) ' ज्यांना अतिमनुष्यकोटीचा दर्जा प्राप्त झाला, ' —केले १.१८१. [ सं. ]

**अतिमर्याद**—वि. मर्यादेपलीकडे; सीमेपलीकडे; निःसीम; पुष्कळ; अतिशय; वाजवीपेक्षां जास्त; फाजील.

**अतिमात्र**—वि. क्रिवि. अतिशय; अतीव; अत्यंत; फार; पुष्कळ. ' रसु होआवा अतिमात्रु । ' —ज्ञा १३.६३५; ' कलकलती अतिमात्रें । ' विवि. ८.६.११९. [ सं. ]

**अतिमान**—वि. अतिशय; बेसुमार; अमर्याद; विवक्षित मर्या-देच्या पलीकडे गेलेला ( काम, क्रोध, वायु, पित्त इ०. ). ' ब्रह्मगोळ अतिमानें कोंदाटला । ' —सप्र ८.२०.१७. [ सं. अति+मान ]

**अतिमानुष**—वि. १ मनुष्याला असाध्य असें; अमानुष; अपौरुष; अमानव. २ अलौकिक; मनुष्यापेक्षां गुणानें अधिक,

**अतिमुक्ता**—स्त्री. १ मधुमाधवी; वीरवंती; माधवीलता; कस्तुरमोगरा. २ तिवस, टेंभुरणी. [ सं. ]

**अतिरथ-थी**—पु. १ रथांत बसून असंख्य योद्धयांशीं लढतो तो; मोठा योद्धा; वीर; शूर पुरुष. २ ( ल. ) वादविवादांत हार न जाणारा. [ सं. अतिरथ ]

**अतिरथीमहारथी**—पु. अव. मोठमोठे वीर; एकापेक्षां एक वरचढ, पराक्रमी पुरुष; श्रेष्ठ पुरुष. [ सं. अतिरथ+महारथ ]

**अतिरस**—पु. अतितीव्रता; अतिशयपणा; अत्युष्णता. 'ग्रीष्माच्या अतिरसीं । सबीजें तृणें जैसीं ।'—ज्ञा ९.१०१. [ सं. ]

**अतिराग**—पु. अत्यंत राग-क्रोध. —वि. अतिशत रागीट; क्रोधी 'अतिरागा भीक मागा । त्याहून रागा देशा त्यागा.' [सं.]

**अतिरिक्त**—वि. १ अतिशय; मर्यादेच्या पलीकडे गेलेला. 'पूर्वीच्या काळीं मराठी व इंग्रजी शाळेंत असतांना मुलें अतिरिक्त अभ्यास करीत होतीं.'—व्राविं १०६. २ पलीकडे; शिवाय, वर, निराळा, पुढें या अर्थी समासांत. उ० एतदतिरिक्त=याशिवाय; तदतिरिक्त=त्याहून निराळा. 'हें मला ठाऊक आहे; एतदतिरिक्त ठाऊक नाहीं.' [ सं. ]

**अतिरुद्र**—पु. रुद्राच्या १३३१ एकादशण्या. (रुद्राचीं ११ आवर्तनें=१ एकादशणी; ११ एकादशण्या=१ लघुरुद्र; ११ लघुरुद्र किंवा १२१ एकादशण्या = १ महारुद्र; ११ महारुद्र किंवा १३३१ एकादशण्या=१ अतिरुद्र ). 'अतिरुद्र केलें फळदशा ।'—गुच १९.८९. [ सं. ]

**अतिरेक**—पु. भरमसाटपणा; अमर्यादपणा; पराकाष्ठा; विपुलता; आधिक्य; कळस. [ सं. ]

**अतिरोग**—पु. कफक्षय रोग. [ सं. ]

**अतिवयस्क**—वि. १ वयातीत; म्हातारा; अतिवृद्ध; उतार वयाचा. २ ( विवाह; विद्यार्जन इ० ला ) असमर्थ नालायक. [ सं. अति+वयस्+क प्रत्यय ]

**अतिवस**—वि. पुष्कळ; बहुवस; अतिशय. 'तैसें सकल जीवांचें जीवन । जें अतीवस प्रसन्न ।'—ऋ ३२. [सं. अति+वस् ]

**अतिवाद**—पु. १ हेकडपणाचा वाद; वितंडवाद; 'आम्हांसमक्ष करिशी अतिवाद, त्यजुनि लाज आर्येशीं ।'—मोसभा ६.३६. २ निंदा; अपशब्द; कठोर भाषण. —द्दी—वि. अतिवाद करणारा. [ सं. ]

**अतिविष-षा**—न. (विप्र. अतिविख) एक औषधि वनस्पति. ही ज्वरघ्न व शक्तिवर्धक आहे. अपचन, उलटी होणें, हगवण व खोकला या विकारांवर हिचा उपयोग होतो. साल पांढरी-तांबडी अगर काळी असते. हें औषध बाळगुटींत घालतात. वस्त्र रंगविण्याच्या कामीं सालीचा उपयोग होतो. —वगु १.१९. [ सं. अतिविषा; का. अतिविषा. हि. अतिस; गु. अतवस; बं. आतईच; ते. अतिवासा; लॅ. ॲकोनिटम; इं. ॲकोनाइट ]

**अतिवृष्टि**—स्त्री. अतिशय पाऊस; अनर्थकारक वृष्टि. [ सं. ]

**अतिव्यय**—पु. उधळेपणा ( मितव्ययाच्या उलट ); बेताल खर्च; उधळपट्टी. [ सं. ]

**अतिव्याप्ति**—स्त्री. १ वाजवीपेक्षां अधिक विस्तार; फाजील गोष्टींचा समावेश; मर्यादेचें उल्लंघन; अतिविस्तृतता. २ ( न्याय ) अलक्ष्यांवर लक्षणाची व्याप्ति; व्याख्येय जातीमध्यें ज्या ज्या वस्तूंचा समावेश व्हावा अशी इच्छा असते त्यांखेरीज एखाद्या निराळ्या वस्तूचा समावेश होतो असें दिसेल तर त्या व्याख्येमध्यें 'अतिव्याप्ति' हा दोष आहे असें म्हणतात. उ० 'पदार्थाची देवघेव करण्याच्या साधनास नाणीं म्हणतात,' अशी नाण्याची व्याख्या केल्यास बायका वोहऱ्यापासून भांडीं घेऊन त्यांबद्दल त्यास जीं फाटकीं चिरगुटें देतात त्यांसहि नाणें म्हणावें लागेल; म्हणून वरील व्याख्येंत अतिव्याप्ति हा दोष आहे. —मुको ४१. [सं.]

**अतिशय**—पु. १ वैपुल्य; बाहुल्य; विपुलता; भरमसाटपणा. २ अतिरेक; अत्याचार; दांडगाई. 'जो हा करूं अतिशय । कांहीं तुम्हां दया नये ।'—तुगा ५२५. ३ मेजवानींत जेवण्याचा आग्रह. ४ अति प्रसंग; अनर्थ. 'तेवींचि संजयो म्हणे चित्तीं । हा अतिशयो या नृपती ।'—ज्ञा १७.४३१. ५ निकड; तक्रार; त्रागा; जिकीर; करडा अंमल. 'तथापि अतिशय करतील.'—रा ३.४३६. ६ नेट; माथेफोड. 'म्हणे भगवत्सत्ता प्रमाण येथें । मी अतिशय व्यर्थ कां करूं ॥' ( क्रि० करणें ). [ सं. ]

**अतिशय**—वि. फार; विपुल; बहुत; वाजवीपेक्षां जास्त; भरमसाट.

**अतिशयित**—वि. अतिशय; फार; मोठें; पुष्कळ; विपुल. 'अतिशयित भाग्य त्याचें स्वीयहि अतिशयित दुःख कळवीलें ॥'—मोसभा ३.३९. [ सं. ]

**अतिशयेंकरून**—क्रिवि. आग्रहानें 'अतिशयेंकरून बोलावून'—ख १९१९.

**अतिशयेंसी**—क्रिवि. अत्यंत; विपुलतेनें; भरपूरपणानें. 'ऐसें आवर्षण आलें । तेणें घरचि बुडालें । पुढें देसीं सुभिक्ष जालें । अतिशयेंसी ॥'—दा ३.५.११.

**अतिशयो**—अतिशय पहा.

**अतिशयोक्ति**—स्त्री. १ स्वाभाविक गुणापेक्षां अधिक करून सांगण्याची रीत. २ वाचालता; अति बडबड; चाटाई. ३ एक अर्थालंकार. वस्तूचें लोकमर्यादेच्या बाहेर प्रतिपादन केलें म्हणजे हा अलंकार होतो. याच्या प्रकारांत ( अ ) भेदीं अभेदाची, (आ) अभेदीं भेदाची, ( इ ) योगीं अयोगाची-संबंधीं असंबंधाची, (ई) अयोगीं

व्यवस्था. ( क्रि० येणें; आणणें; घालणें. ). 'हें आतां आळाबांधा येणें कठिण दिसतें.' **आळाबांधा कढाडप**–(गो.) १ (एखादें काम) उरकीत आणणें. २ (पातळ पदार्थ) घट्ट करीत आणणें; आटविणें; आळावप. [ आळा+बंध ]

**आळाशी**—( व. ) अळशी, अळाशी पहा.

**आळास**—पु. ( गो. ) मोठ्यानें रडतांना कोंडून धरलेला श्वास. ०**परतणें** ( पर्तुंवप )–रडतांना श्वास कोंडून धरला असतां होणारी अवस्था. [ का. अलु=रडणें; अलु कूसु=रडणें रडका ( मुलगा ); किंवा आळा+श्वास ? ]

**आळिक**—वि. क्षुल्लक. 'हें अवघेंच विचारितां आळिक.' –भाए ७०. [ सं. अलीक=थोडें ]

**आळिका**—स्त्री. ( अव. ) अळी; कृमि; कीटक. अळिका पहा. 'आळिका म्हणती आमुचें घर । काष्ठामधें।' –दा १.१०.३८. [ सं. अलीक=क्षुद्र; का. आळि=वर्तुळ; तुल० सं. अलि=विंचु ]

**आळिका**—वि हट्टी; हांवरा. अळका पहा. 'अधीर आळिका अनाचारी । अंध पंगु खोंकलेकरी।' –दा २.३.३३. 'बाळक देखोनियां आळिकें । कीर्तनाचिया कौतुकें।' –अमृत ध्रवच १४. [ अळका ]

**आळिता**—अळता पहा.

**आळियाडें**—न. हट्ट; छंद; अळि, अळका. 'पाहां पां माते तुम्हांसांगडें । माहेर तेणें सुरवाडें । ग्रंथाचें आळियाडें । सिद्धी गेलें।' –ज्ञा १८.१७७५. [ अळि ]

**आळी**—स्त्री. गल्ली, ओळ. अळी पहा. ०**कर**–अळीकर पहा.

**आळी**—स्त्री. कीड. अळी पहा. 'कीं अधर्माची आळी वाढे। पीक बुडे तेणेंही।' –एभा १०.५१५.

**आळि-ळी-च**—स्त्री. १ हट्ट; छंद; रळी; (लहान मुलांची) तीव्र इच्छा, हेतु, मनीषा, लाड. 'तें आळि करौनि मागे जेवण।' –दाव २९६. 'आळी घेऊन जन्मा आले। कित्येक प्राणी।' –दा ९.८.२२. 'एके दिवशीं प्रातःकाळीं। कृष्ण घेऊन बैसला आळी।' –ह ६.६. २ लडिवाळपणाचें, हट्टाचें भाषण. 'आळि बोलैति धाकुटें विदावंतीसी।' –शिशु ३५३. [ का. अलु=रडणें ] ०**कर**–वि. १ हट्टी; छांदिष्ट; हेकेखोर ( ल्हानमूल ). 'आळिकर त्याचें करिसी समाधान। अभयाचें दान देवोनिया।' –तुगा ५२१. [ आळ=हट्ट ]

**आळीपाळीनें**—क्रिवि. एकामागून एक; आल्टून पाल्टून; बादलून बदलून. [ आळी=रांग; किंवा पाळी द्वि. ]

**आळींव**—अहळींव पहा.

**आळुकणें**—क्रि. तीव्र इच्छा असणें; हपापणें. 'जिहीं आपपणें नाहीं देखिलें। तेचि इहीं इंद्रियार्थी रंजले। जैसें रंक का आळुकैलें। तुषातें सेवी।' –ज्ञा ५.११०. [ अळका पहा. ]

**आळुका-की**—वि. अळका पहा. 'कैसी स्वसुखाची आळुकी। जे दोनीपणें भिडोनि एकीं।' –अमृ १.५. 'म्हणे पती भुकेचा आळुका फार। यासि न होय निराहार।' –महिकथा ३३.१५३. 'परी क्षुधेचा आळुका बहुत म्हणवोन। नये घडोनि सर्वथा।' –महिकथा ३५.१६९.

**आळुकेपण**—न. आसक्ति; हांव; हांवरेपणा; छंद; लोभ. 'ते आळुकेपणें जडली। अति सत्वर श्रीकृष्णि।' –रास ४.७२. 'तेथें आळुकेपण ब्राह्मणें। जैसें कीजे।' –गीता १.४९३. [ अळका ]

**आळुकेपिळुके, आळेपिळे, आळोके पिळोके**—अळेपिळे पहा.

**आळुबाय**—पु (गो.) लाडिकपणा. अरवळ, अर्वळ पहा.

**आळुमाळ, आळुमाळु**—अळुमाळ पहा. 'वाचे आलया आळुमाळ।' –गीता २.१५८९.

**आळू**—न. एक भाजी. अळू पहा.

**आळू**—स्त्री. उंसावरील कीड. 'उंसास मुख्य उपद्रव वाळवी, आळू आणि हमनी या सूक्ष्म प्राण्यांपासून फार होतो.' –कृषि ४६३. [ अळी ]

**आळू**—न. एक जंगली कांटेरी झाड व त्याचें फळ. हें तांबड्या मातींत होतें. फळ सुमारें पेरूयेवढें असून पिकल्यावर तपकिरी रंगाचें होतें. त्यास एक प्रकारचा वास येतो. अळू पहा.

**आळें**—अळें पहा. 'शरीर विटाळाचें आळें। मायामोहपाश जाळें।' –तुगा ७३९.

**आळेण**—न.( गो. ) आमटी वगैरे कालवण घट्ट होण्यासाठीं लावावयाचें पीठ. अळण पहा.

**आळेपिळे**—पु.अव. अळेपिळे पहा. 'अभिमानाचे आळेपिळे। महत्त्व उमासे येती बळें।' –एभा ८.२१२.

**आळेवणें**—अक्रि. (गो.) ( अळणामुळें आमटी ) दाट होणें. [ अळणें ]

**आळोंच**—स्त्री. कानगोष्ट; कानमात. 'बहिर्‍यांचा घरीं कवणकवणा आळोंचु सांगे।' –भाए ५५४. [ सं. आ+लोच् ]

**आळोंचणें**—अक्रि. हळूच कानांत सांगणें, बोलणें; कानगोष्टी करणें. 'हितगुज आळोंचासी। हृदयींचें गोड सांगावयासी।' –एभा २४.३०१. 'तो नेणो काइ आळोंचोनि गेला।' –भाए ६२. [ सं. आ+लोच् ]

**आक्षिप्त**—वि. १ आक्षेप केलेला, घेतलेला; नामंजूर केलेला; अडथळा-हरकत आणलेला ( वादविवादांत प्रतिपक्ष्यानें अडवलेला ). २ अमान्य. [ सं. ]

**आक्षिप्त-अंगहार**—न. (नृत्य) नूपुरकरण करून विक्षिप्तकरण करणें, मात्र या करणांत हातपाय सारखे पुढेंच फेंकणें, व अलातक, विक्षिप्त, उरोमंडळ, नितंब, करिहस्त, व कटिच्छिन्न हीं क्रमानें करणें. [ सं. ]

**आक्षिप्त(करण)**—न. ( नृत्य ) हात व पाय भराभर पुढच्या बाजूस फेंकणें. [ सं. ]

**आक्षिप्तरेचित(अंगहार)**—न. (नृत्य) हात पाय रेचित करून स्वस्तिकें करणें, मग तीं स्वस्तिकें मोडून पुन्हां रेचित व स्वस्तिक करून हात, पाय पुन्हां रेचित करणें. नंतर रेचितावर येत असणारे पाय उडी मारल्यासारखें करणें, नंतर उद्वत्त, आक्षिप्त, उरोमंडल, नितंब, करिहस्त व कटिच्छिन्न करणें हीं क्रमानें करणें. [सं.]

**आक्षिप्तरेचित(करण)**—न. (नृत्य) डावा हात हृदयावर ठेवून उजवा हात दूर करून रेचित करणें, नंतर तो रेचितहस्त तोंडासमोरून डोक्यावर नेऊन उचलून धरणें. [ सं. ]

**अक्षिप्तिका**—स्त्री. ( संगीत ) स्वरांत, तालांत लिहिलेली चीज; ( इं. ) नोटेशन. [ सं. आ+क्षिप् ]

**आक्षेप**—पु. १ ओढणें; खेचणें; आकर्षणें. ' लगाम हातीं असला म्हणजे घोडयाचा पाहिजे तेव्हां आक्षेप करावयास सांपडतो. ' २ ( ल. ) मोहित करणें; आकर्षिलेली किंवा मोहित अवस्था. ' त्याचें चित्त परमार्थाकडे लागलें आहे, त्यास विषयाच्या गोष्टी सांगून त्याचे चित्ताचा आक्षेप करूं नका ! ' २ ओढून धरणें; मागें घेणें; आढेवेढे घेणें; शंकाकुशंका काढणें; आवश्यक म्हणून वाट पाहणें; खोळंबून राहणें ( एखादा माणूस किंवा वस्तु नाहीं म्हणून ); अडून बसणें. ( क्रि० घेणें, धरणें ). ' कोणाचा आक्षेप न घेतां स्वतः फडशा करीन. '' हा माल गिन्हाईक आला म्हणजे विकून टाका, माझा आक्षेप धरूं नका. ' ३ ( ल. ) अनुमान निघणें; सोबत, बरोबर येणें; बरोबरच बोध होणें; ध्वनित, गर्भित असणें; गर्भितावस्था. ' माझें ऋण घेतलेंस तें दे—या वाक्यांत ऋणानें व्याजाचा आक्षेप होतो. ' ४ हरकत; आडखाठी; विरोध. ( वादांत प्रतिपक्ष्याचा मुद्दा किंवा बाजू ). ' त्यांनीं घेतलेले आक्षेप धडधडीत खोटे आहेत. '—केले १.३६१. ५ शंका; संशय; शंकाप्रश्न. 'श्रोतयांनीं आक्षेप केला । ' —रावि ३. ६ आग्रह; हट्ट; सूचना. ' नाहीं ग्रंथारंभसंकल्प । नव्हता श्रोतयांचा आक्षेप । ग्रंथीं उजळला कृष्णदीप । सुखरूप हरिकथा ॥ ' —एरुस्व १८.६९. ' दुर्योधनेंही आक्षेप । केला असे भेटीचा । ' —मुसभा १३.४९. ७ निंदा; कुटाळी; दूषण; टपका. ८ एक अलंकार (व्याजोक्ति—व्यंजोक्तीप्रमाणें); एखादा आक्षेप घेऊन तो खोडून टाकण्याचें वर्णन असतें तेथें आक्षेप अलंकार होतो. बोलावयाचें तें अर्धवट बोलून एखादा विशेष अभिप्राय व्यक्त केला असतो तेथेंहि हा अलंकार होतो. जसें—नसेन दिसलो कसा नयनसर्वसाक्षी रवी । विषाद धरिला म्हणो न सुरभी विषक्षीर वी । ' —केका ४. [ सं. आ+क्षिप् = फेकणें ]

**आक्षेपक**—वि. आक्षेप घेणारा, काढणारा. —पु. वातरोग; मज्जातंतूंचा रोग; आचके; आंकडी; ( इं. ) कन्व्हल्शन; [ सं. ]

**आक्षेपणें**—उक्रि. ( काव्य ) ओढून घेणें; आकर्षणें; चटक लावणें. २ हरकत घेणें; नामंजूर करणें; अमान्य करणें; ३ शंका काढणें. ' मागां श्रोतीं आक्षेपिलें । जी ये ग्रंथीं काय बोलिलें । तें सकळही निरोपिलें । संकलीत मार्गें ॥ ' —दा १.१.२७. [ आक्षेप ]

**आक्षेपार्ह**—वि. दोषार्ह; आक्षेप घेण्याजोगें. [ सं. ]

**आक्षेपून**—क्रिवि. ( काव्य ) निक्षून; प्रत्यक्ष बजावून; बुद्धिपुरःसर; मुद्दाम; जाणून बुजून; आवर्जून. [ आक्षेप ]

**आक्षै**—क्रिवि. अक्षय (अप.) ' कीं हें सुखाचीं तारुवें लोटलीं । आक्षै आनंदें उतटलीं । ' —दा १.७.३१.

**आज्ञप्त**—वि. आज्ञापिलेला; हुकूम केलेला; सांगितलेला. [ सं. आ+ज्ञा ]

**आज्ञप्ति**—स्त्री. आज्ञा पहा. ' आमात्यराज, ही विज्ञप्ति कां ? आज्ञप्तीच मी समजेन ' —चंद्रगुप्त २०१.

**आज्ञा**—स्त्री. १ हुकूम; आदेश; ताकीद. सामाशब्द—राजाज्ञा; शास्त्राज्ञा; वेदाज्ञा इ० २ वेद, शास्त्र इत्यादिकांस म्हणतात. —मनको. ३ होय, बरें, इच्छेप्रमाणें करतों या अर्थी. वरिष्ठांनी आज्ञा केली असतां सेवकजन ' आज्ञा ' या शब्दानें उत्तर देतात; ४ तंत्रशास्त्रांतील षट्चक्रापैकीं एक. योगशास्त्रांतील एक भुकुटीस्थ चक्र. ' आधारादि भेदुनि । आज्ञावरी ॥ ' —ज्ञा १८.१०३८. **०वंदणें—नमस्कारणें—पाळणें**—आज्ञा शिरसामान्य करणें. ' आज्ञा वंदोनि निघाला तेव्हां ' ' तयातें वोळखावया हेचि संज्ञा । जे जगें नमस्कारिजे आज्ञा ॥ ' —ज्ञा १०.३११. **०देणें**—१ कामावरून दूर करणें; बडतर्फ करणें. २ निरोप देणें. **०मागणें**( जाण्यास )—परवानगी घेणें; निरोप घेणें. **०दशक**—न. ( ख्रिस्ती ) दशाज्ञा; परमेश्वरानें मोशाला सीनापर्वतावर ज्या दोन दगडी पाटया दिल्या होत्या त्यांवरील लेखाचें नांव. पहिल्या चार आज्ञांमध्यें मनुष्याचीं देवाशीं आणि बाकीच्या आज्ञांत मनुष्याचीं मनुष्यांशीं कर्तव्यें सांगितलीं आहेत ) —अनु ४.१३;१०.४. ' आणि पाटयांवर त्यानें ( मोश्यानें ) कराराचीं वचनें म्हणजे दहा आज्ञा लिहून काढिल्या ' —निर्ग ३४.२८.

**आज्ञाकर—कर्ता—कारी, आज्ञांकित, आज्ञाधारक—धारी, आज्ञाधीन, आज्ञानुसारी—वर्ती**—वि. आज्ञा पाळणारा; आज्ञेप्रमाणें वागणारा; अंकित; आश्रित; आज्ञाधारक. हा शब्द पत्राच्या शेवटीं आपली आज्ञा पाळणारा सेवक ( इं. युवर मोस्ट ओबिडियंट सर्व्हंट ) या अर्थी लिहितात. [ सं. ]

**आज्ञाचक्र**—न. भ्रूमध्यस्थानीं असणारें चक्र; आज्ञा अर्थ ४ पहा. ' नाकाचें अग्रसांडूनि दूरी । दृष्टी ठेवावी नासाग्रीं । ते ठायी बैसें आज्ञाचक्रीं । योगगंभीरीं योग्यता ॥ ' —एभा १४.४१२. [ सं. ]

**आज्ञातिक्रम—ण**—पु. आज्ञा मोडणें; आज्ञेचें उल्लंघन; हुकुमाच्या विरुद्ध जाणें. [ सं. आज्ञा+अतिक्रम ]

**आज्ञापणें—पिणें**—उक्रि. आज्ञा करणें; हुकूम करणें; ताकीद करणें; सूचना करणें. ' आज्ञापिला निजपिता वसुदेव देवें । '' आणीक कथा राहिल्या अपार । मग रुक्मिणीवर आज्ञापी । ' ' प्रियाहि

अशि जाहली तुज कुकार्ये आज्ञापिती।' –केका ८३. २ सोंपविणें; स्वाधीन करणें; ताब्यांत देणें. 'प्रधानास राज्यकर्म आज्ञापून राजा आपण ईश्वराचें ध्यान करीत बसला.' [आज्ञापन]

**आज्ञापक**—वि. आज्ञा करणारा; हुकूम करणारा (धनी इ०)' 'वाचासिद्धि पावाल। आज्ञापक होआल।' –ज्ञा ३.९९. [सं.]

**आज्ञापत्र**—न. १ सरकारचें हुकूमाचें पत्र; सरकारी हुकूम; मराठी राज्यांत छत्रपतींच्या खुद्द पत्रास आज्ञापत्र म्हणत २ (सामा.) मोठ्याकडून लहानास गेलेलें पत्र. ३ लेखी हुकूम; शासनपत्र. ४ (ख्रि.) राजा, बिशप वगैरे अधिकारी वर्गाकडून एक्लेसियेला अथवा मंडळीला आलेला हुकूम. 'त्याच वेळेस.... आज्ञापत्रें, आवाहनपत्रें असल्यास वाचावीं' –साप्रा ७०. (इं) ब्रीफ. [सं.]

**आज्ञापत्रिका**—स्त्री. (बडोदें) सरकारी हुकुमांचें प्रसिद्धी पत्रक; सरकारी वार्तापत्रक; सरकारी गॅझेट. [सं.]

**आज्ञापन**—न. हुकूम करणें; आज्ञा करणें; सूचना करणें; समजावून सांगणें; ताकीद; आदेश [सं.]

**आज्ञापनीय**—वि. आज्ञा करण्यायोग्य. [सं.]

**आज्ञापालक**—वि. आज्ञांकित, आज्ञाधारक; आज्ञा पालन करणारा; अंकित; सेवक; अनुचर; प्रजा. [सं]

**आज्ञापालन**—न. आज्ञा पाळणें; हुकूम मानणें; आज्ञांकितता [सं.]

**आज्ञापित**—आज्ञप्त पहा.

**आज्ञाप्य**—वि. आज्ञापनीय पहा.

**आज्ञाभंग, आज्ञालंघ, आज्ञोल्लंघन**—पुन. आज्ञा मोडणें; हुकूम तोडणें; आज्ञेविरुद्ध वागणें.

**आज्ञार्थ**—पु. (व्या.) बोलणारा आज्ञा, उपदेश किंवा प्रार्थना करतो असा जो बोध क्रियापदाच्या रूपापासून होतो तो.

**आज्ञार्थी**—वि. (व्या.) बोलणारा आज्ञा, उपदेश किंवा प्रार्थना करतो असा जो बोध ज्या क्रियापदरूपापासून होतो तें क्रियापदाचें रूप.

**आज्ञासिद्ध**—वि. ज्याची आज्ञा सिद्ध झाली आहे असा; ज्याची आज्ञा सर्वत्र पाळली जाते असा (ईश्वर) 'मी मनें वाचा देहें। करी तें कैसें नोहे। कें मजवांचूनि आहे। आज्ञासिद्ध आन।' –ज्ञा १६.३५५. [सं.]

---

# इ

**इ**—मराठी वर्णमालेंतील तिसरें अक्षर; व स्वरमालेंतील तिसरा स्वर. अक्षरविकासः–मुख्य चार अवस्था. पहिली इ. स. तिसऱ्या शतकांतील अशोकाच्या गिरनार शिलालेखांत, दुसरी इ. स. ४९३. मधील एका दानपत्रांत, तिसरी हैहयवंशी राजा जाजल्लदेव याच्या काळांत व चवथी इ. स. १२७३ सुमारच्या लेखांत आढळते. –ओज्ञा.

**इ, ई**—सना. हा, ही, हें. 'तें समस्तीं इहीं भोगावें।' –ज्ञा १. २१७. 'ई उनाअनें वागाल ओहवां आली.' =हें ऐकून वाघाला हंसूं आलें –भिल्ली भाषा १७ [सं. एतत्, इदम्; प्रा. ईअ]

**इ**—चा, ची, चें, षष्ठीचा फारसी प्रत्यय. हा प्रत्यय मराठींत शके १४५० च्या सुमारास घुसला असें राजवाडे यांचें म्हणणें आहे. शके =सं. शक+फा. इ. शके १८४९ =शक+इ+ १८४९. =१८४९ चा शक. 'श्री कारवे व कोडिवले व वडिगाऊं राजमुद्रा मुख्य समस्त इ असिर्वाद' –शके १४२९ मधील एक पत्र. यांतील समस्त इ=चे समस्त –भाइसंवृ १५. [फा.]

**इ॥**—अ. इस्तिकबाल (अमुक काळापासून)चा संक्षेप. 'सचें कापड इ॥ माहे रमजान उर्फ मार्गेश्वर.' –भाव १०. ३. ११६. [अर. इस्तिकबाल=भविष्यकाल]

**इआ**—सना. या, ह्या. 'भयानका इआ। एके न भिये एति भवभया।' –ऋ २४ [सं. इदम् प्रा. ईअ]

**इकडचा-ला, इकडील**—वि. या ठिकाणचा, बाजूचा, दिशेचा, रस्त्याचा; इकडे असणारा. **इकडचा डोंगर तिकडे करणें**–मोठें अचाट, अवघड काम करणें **इकडला गड तिकडे नेऊन ठेवणें**–अर्थ वरील प्रमाणें, पण वायफळ बडबड करणाऱ्यासंबंधीं योजतात. **इकडला लुच्चा तिकडला चोर**–(व) दोन्हीकडून थपडा खाणारा [इकडे]

**इकडचा तिकडचा**—वि. या बाजूचा, आणि त्या बाजूचा; या ठिकाणचा व त्या ठिकाणचा; म्हणजे निरनिराळ्या ठिकाणचा, बाजूचा, विषयांचा; कोठला तरी; चार (अनेक) ठिकाणचा. [इकडेतिकडे]

**इकडून**—क्रिवि. या दिशेहून–ठिकाणाहून–बाजूकडून. (कुण. रूप) इकडनें [इकडे+हून] ०**तिकडून**–क्रिवि. येथूनतेथून; आजूबाजूंनीं; कोठूनतरी; कसेंतरी

**इकडे-स**—क्रिवि. १ या बाजूस, दिशेस. २ येथें, या जागीं. ३ घरीं; स्थानीं; कडे या अर्थी. 'त्याचे इकडे' 'माझे इकडे.' एथें पहा. [हा+कडे; का. ईकडे; ते. इक्कड, अक्कड]

**इकडे**—पु. (बायकी) पति, नवरा. बायका नवऱ्याचें नांव घेत नाहींत, तेव्हां इकडे (=आपला पति) ही मोघम संज्ञा योजितात. कधीं **इकडून** असाहि प्रयोग आढळतो. 'काय मेल्यांची छाती लागली आहे इकडच्यापुढें उभें राहाण्याची!' –प्रच १३७. 'काळजी इकडची वाही.' –संग्रामगीतें ४९.

**इकडेतिकडे**—क्रिवि. येथें तेथें; या बाजूस त्या बाजूस; आसपास. –स्त्री. (ल.) टंगळमंगळ; कुचराई; लपंडाव. (क्रि० करणें; लावणें; मांडणें). **इकडे आड तिकडे विहीर**–दोन्हीकडे

सारख्याच अडचणी, संकटें असणें, व त्यांत सांपडणें. [ इकडे + तिकडे ]

**इकणें, इकत, इकार**—हे व यांसारखे शब्द विकणें, विकत, विकार या शब्दांत पहा. (कुणबाऊ बोलींत वच्या जागीं इ योजितात).

**इकरम**—पु देणगी; दया; कृपा. [ अर. अक्राम = देणग्या; करीमचें अव. अप. ]

**इकरा**—वि. ( गो. ) अकरा. [ अकरा अप. ]

**इकरार**—पु. १ कबुली; करार; ठराव. २ जबानी ( लेखी किंवा तोंडी ). 'पर जिल्ह्यांतील साक्षीचा इकरार घेऊन पाठवणें-विषयीं जडजानें जडजास लिहावें.' —न्यामे ३४. [ अर. इक्रार वचन, खात्री, कबूली ] ०**नामा**—पु लेखी ठराव, कबुली; कबुलायत. [ फा. ]

**इकलजमकी**—स्त्री. पाठपुरावा. 'तुझे कितेक मशाकती व इकलजमकी व ममलती केली ...' —शिवचरित्रप्रदीप ८४. [ अर. ]

**इकला**—वि. ( व्यापारी ) अकरा भाजीपाल्याचा सौदा करतांना असे सांकेतिक शब्द वापरतात. [ अकरा. गो. इकरा ]

**इकळी-ळूत**—स्त्री. ( कुण. ) किळस; कळमळ, ओकारी ( क्रि० येणें ). [ उकळी ? ]

**इकुडच्या-ला, इकुडील**—वि. ( प्र. ) इकडचा पहा.

**इकून तिकून**—क्रिवि. ( कुण. ) इकडून तिकडून पहा. 'गाडी इकून आली व तिकून गेली.' [ इकडून, तिकडून अप. ]

**इक्तीदार**—पु. १ अनुयायी; अनुकरण करणारा. २ ( ल. ) विश्वासू. [ अर. इक्तिदा=अनुकरण, अनुचरण. ]

**इक्तो ( इकतो )**—वि. ( राजा. कुण. ) इतका ( अप. ) पहा.

**इक्बाल**—पु नशीब; सुदैव; भरभराट. [ अर इक्बाल = भरभराट ]

**इक्रार**—इकरार पहा.

**इख**—पु. ( गो. ) विष; विख. 'तो इख खॉन मरतोलो खे' [ सं. विष. ]

**इखण**—न. हत्यार; साधन; उपकरण, विखण [ सं. ईष्—ईषिका= हत्यार; शस्त्र; साधन ? ]

**इखंनपाखंन**—न. ( व. ) शेतकीचें हत्यार. 'शेत वाहतो म्हण तोस कांहीं इखंनपाखंन आहे का ?' [ इखण द्वि. ]

**इखलास**—पु मैत्री; स्नेह; प्रीति; अंतःशुद्धता; मनाचा निर्मळपणा; निष्कापट्य. [ अर. इख्लास् = मैत्री, प्रेम ] ०**नामा**—पु. स्नेहाचें पत्र; मैत्रीचें पत्र; स्नेह्यासोबत्यांमध्यें एकमेकांच्या पत्राला म्हणतात. [ अर. इख्लास्+फा. नामा ]

**इखलासी**—वि. स्नेहपूर्ण; प्रीतीयुक्त; चाहता; प्रेमाचा. [ अर. इख्लास् ]

**इखळा**—पु. ( सुतारी धंदा ) खिळे वगैरे उपटण्याचा चिमटा. [ उखळणें. ]

**इक्तीति**—( कुण. ) यत्किंचित्. [ इक्ति=इतकी; सं. इयत्तक ]

**इंगणें**—अक्रि. काळजीनें, श्रमानें, आजारानें किंवा इतर कारणानें भारावून जाणें; गलित होणें; टेंकीला येणें. [ वेंग(ध)णें ]

**इगत-इगुत**—स्त्री. ( कुण. ) युक्ति; उपाय. [ युक्ति अप. ]

**इंगरेज**—पु. १ इंग्रज माणूस, लोक; ब्रिटिश. २ साहेब; गोरा. [ इंग्रज; इंग्लिश; पो. इंगलेज ]

**इंगरेजी**—स्त्री. अशुद्ध अंग्रेजी. १ इंग्रजी भाषा. २ इंग्रजांचा अम्मल; ब्रिटिश अमदानी. [ पो. इंगलेजी ] —वि. इंग्रजांचा; इंग्रजी भाषेसंबंधीं; इंग्रजी; ब्रिटिश. ०**दारू**—स्त्री. १ तापट, चिडका, संतापी माणूस. २ हुषार, चलाख माणूस; तडफदार माणूस. [ इंग्रजी दारू जलद पेटते यावरून ]

**इगर्ज**—स्त्री. ( गो. ) ख्रिस्ती कॅथोलिक पंथीयांचें देऊळ. [ पो. इगर्जे ]

**इंगळ-ळा, इंगोळ**—पु. ( व. गो ) जिवंत निखारा; विस्तव; अंगार. 'कैची सुखनिद्रा आंथरुणीं। इंगळांच्या।' —ज्ञा ९.५०१. 'आंगीं लागतांतीं कमळें। इंगळें जैसी' —शिशु ७५७. 'संसार हाचि दुःखमूळ। लागतील दुःखाचे इंगळ।' —दा ३.२.१. दुसऱ्याच्या घरावर असा इंगोळ ठेवणें चांगलें नाहीं.' [सं. अंगार; प्रा. इंगाल ]. **म्ह०** इंगळ हातीं धरवेल पण हा हातीं धरवणार नाहीं= एखाद्या तापट माणसास उद्देशून म्हणतात. **इंगळासारखा लाल होणें**—रागानें चेहरा तांबडा होणें; अतिशय रागावणें. **इंगळासारखे डोळे**—लाल भयंकर डोळे ( अतिशय रागानें असे डोळे होतात ).

**इंगळा**—पु. एका जातीचा मुंगळा. [ सं. अंगार; प्रा. इंगाल ]

**इंगळी**—स्त्री. १ विंचवाची एक जात; ही आकारानें विंचवापेक्षां मोठी असून काळी व अतिशय विषारी असते. २ ठिणगी; निखारा; विस्तव; इंगळ पहा. 'जेवीं वेळु वाढवी वेळुजाळी। वेळुवेळवां कांचणी मेळीं। स्वयें पाडूनि इंगळी। समूळ जाळी आपण्यातें।' —एभा २३.६८९. ३ ( सोनारी धंदा ) तापलेल्या मुशींतील रस ओतण्याकरितां उपयोगांत आणावयाचा इंग्रजी साताच्या आंकड्याप्रमाणें असलेला पोलादी चिमटा; साडशी. ( इंगळीच्या नांगीच्या आकारावरून. ) [ सं. अंगार; प्रा. इंगाल ]

**इंगा**—पु ( चांभारी धंदा ) चामडें ओढून घोटून ताणण्याचें व मऊ करण्याचें ( उलथण्यासारखें ) हत्यार. ०**दाखविणें**—खोड मोडणें; आपलें सामर्थ्य दाखविणें. 'तुला दाखवितो कोतवाली इंगा.' —नामदेव नाटक ८५. ०**फिरणें**—गर्वपरिहार होण्याजोग्या अडचणींत सापडणें; संकटांमुळें नरम येणें; जर्जर होणें; त्यामुळें शुद्धीवर येणें; डोळे उघडणें. **म्ह०** इंगा फिरे, मुंगा जिरे. २ नांगरलेल्या जमिनींतील ढेकळे फोडण्याचें लाकूड. [ सं. इंग्=फिरणें, हलणें ]

**इंगित**—न. १ खूण; खुणेकरितां सूचक हावभाव किंवा मुद्रा 'या इंगितें जाणविलें कुमारा।'–आमा २४. २ अभिप्राय; अंतस्थ हेतु; योजना. 'सोळासंस्कारांपैकीं केवळ विवाहालाच अलिकडे इतकें प्राधान्य कां आलें यांतील इंगित आमच्या मतें हिंदू लोकांची -हासकाळीं अति वाढलेली विषयलंपटता हेच असावें.'–टि ४. १३८. ३ (व्यंगित अप.) व्यंगोक्ति; औपरोधिक भाषण. ०ज्ञ–वि. इंगित जाणणारा; आकारावरून अभिप्राय जाणणारा. [सं.]

**इग्नेशिया**—स्त्री. (होमिओपाथी) प्लेगप्रतिबंधक व प्रतिहारक बी. [इं.]

**इग्यारावी**—वि. (भिल्ली) अकरावी. 'गोट इग्यारावी.' [हि. ग्यारह]

**इंग्रज, इंग्रेज**—पु १ इंगरेज पहा. 'जावी जंगी फिरंगी। इंग्रेज बहुधा रक्त रंगी। मलेवार नौकामार्गी। विप्रकर्ते दंडिले।'–मुसभा ८.१२७. २ (कों) दोन फाशांनीं व चार रंगांच्या सोंगट्यांनीं खेळण्याचा एक डाव. यांत पेशवे (पिंवळ्या) आपल्या शिंदे (हिरव्या) होळकर (काळ्या) साथीदारांसह एका बाजूला व इंग्रज (तांबड्या) दुसऱ्या बाजूला असून इंग्रजांना इतरांनीं हरविलें म्हणजे 'इंग्रजांची टिमकी बजावली' असा टोमणा मारून डाव संपतो. –न. पोलाद; लोखंडाचा एक प्रकार.

**इग्रज, इग्रेज**—(गो.) इगजें पहा. 'सकळेक तेपली प्रवेसनी। तेथें देखिली इग्रजेची आइती। पुर्न शृंघार शोभती। चोउं कडां।'–ख्रिपु. १.१.१७२.

**इंग्रजी, इंग्रेजी**—इंगरेजी पहा. 'इंग्रजी साम्राज्य, व्यापार, राज्यपद्धति, माल इ०; ०गहाण—वि. (कायदा) जेथें धनकोला मिळकत तबदील करून देऊन ऋणको ठराविक मुदतींत कर्ज फेडण्याचा करार करतो व स्वतः जातीनें कर्ज फेडण्याची हमी घेतो व कर्ज फेडल्यास मिळकत धनकोनें परत करावी असें लिहून देतो त्या व्यवहारास इंग्रजी गहाण (इंग्लिश मार्टगेज) म्हणतात.

**इग्लाई**—स्त्री. (भिल्ली) अधाशीपणा. 'खाऊली वोखत इग्लाई केवों नेल.'–भिल्ली भाषा २५. [गं. ग्लसु=खाणें]

**इंग्लिश**—वि. १ इंग्रेज, इंगरेजी पहा. [इं.] २ परदेशी; विलायती. ०कट–वि. १ (सराफी) यूरोप अमेरिकेंत कांतून, पैल पाडलेलें (रत्न). २ इंग्रजी पद्धतीचा (कपडा, पदार्थ इ०) ०बॉडी–(छाप.) एक प्रकारचा छापण्याचा, चौदा पॉइंटचा टाईप. हा पायका टाईपपेक्षां जरा मोठा व ग्रेट प्रायमरपेक्षां जरा लहान अक्षरांचा असतो. [इं.]

**इघड**—पु. (कु.) विघाड. 'तेंचो इघड झालोमा' [विघाड]

**इंच**—पु. फुटाचा बारावा भाग; अंगुळ; तसू. 'दोन इंच हास'–नाकु ३.५. [इं.; लॅ. उन्सिआ=१२ वा भाग.]

**इचकट, इचकटणें, इचकणें, इचका**—विचकट, विचकटणें, विचकणें, विचका पहा.

**इचका**—पु. एका प्रकारची गोफण.

**इचका**—पु. १ एका प्रकारचें गवत व त्याचें बीं. तृणधान्यांत याचा समावेश होतो. २ एक झुडूप. याचीं पानें खाण्यास हरकत नसते. विचका पहा.

**इचका**—पु. एक प्रकारचा मासा. इचना पहा.

**इचकाइंधन**—वि. (व.) अव्यवस्थित; मोडतोड झालेलें. [विचका+इंधन]

**इचकी**—स्त्री (व.) महामारी. [सं. विषूचिका]

**इचकोपा-बा**—पु. नाश; विध्वंस. विचका; विचकोपा–बा पहा. (क्रि० होणें, करणें). 'चोकुन मग इचकोवा तोवा हाय सुकुन गेले ओठ।'–अफला ६१. [विचका]

**इचना**—पु. फक्त पावसाळी दिवसांत सांपडणारा लहान मासा. यास पुण्याकडे इचका–की म्हणतात. याच्या छातीपोटावर दोन व पाठीवर एक असे पंख असून अंगावर अनेक रंगी ठिपके असतात.

**इचर**—वि. (व.) विरळ [सं. विचर] ०कुंधा–पु. विरळ झालेला कुंधा (एक प्रकारचें गवत).

**इचा–ची**—हिचा–ची (ही या सर्वनामाची षष्ठी) ०भन–उद्गा. मूळ अर्थ शिवीसारखा. पण पुढें आश्चर्याचा, हेटाळणीचा उद्गार बनला. 'अरे च्या!' 'पशुपति:-(स्वगत) 'इचीभन हाथ रामदा मान आवानांच!'–वाय २.२. [हिची बहीण]

**इचार–ण**—विचार–विचारणें पहा.

**इचु, इंचु**—पु विंचू. [विंचू अप. सं वृश्चिक, प्रा. विच्चु]

**इचक**—वि. (व. ना) खोडकर, खट्याळ. 'पाटील! म्हटलं तुमचं पोर तसं आहे हुशार' 'पण इचक मोठं!' [विचकणें]. ०दागी–वि. (ना.) खोडकर.

**इच्छा**—स्त्री. १ वासना; वांछा; आशा; आकांक्षा; मनोगत; मनीषा; आवड. सामाशब्द–इच्छापूर्वक; इच्छापुरःसर इ० २ (गणित) इच्छांक; त्रैराशिकांतील प्रमाणसजातीय राशि. आद्यंक, मध्यांक व अंत्यांक किंवा इच्छांक हीं तीन पदें असतातच, चवथें इच्छाफल (उत्तर) काढावयाचें असतें. उ० पांच रुपयांस दोन मण, तेव्हां चार रुपयांस किती? येथें पांच हें प्रमाण व चार ही इच्छा. [सं. इष्] ०तृप्त–क्रिवि. इच्छेची तृप्ति होईपावेतों, इच्छा परिपूर्ण होईपर्यंत. ०तृप्ति–स्त्री. मनीषा सिद्धीस जाणें; हेतु, वासना सफल होणें. ०दान–न. इच्छिलेलें दान देणें, इच्छा पुरी करणें. ०दानी–वि. इच्छादान करणारा; ज्याची जी इच्छा असेल ती पुरविणारा. 'तुका म्हणे इच्छा दानी। पुरवी आवडीची धनी।' ०पूर्ति–स्त्री. इच्छेची फलद्रुपता, पूर्तता; इच्छातृप्ति. ०फल–न. (गणीत) त्रैराशिकांतील चौथें पद (उत्तर). मध्यपद आणि इच्छांक यांचा गुणाकार करून त्यास

आदिपदानें भागिलें असतां इच्छाफल येतें ०**भंग**–पु. इच्छेची पूर्ति न होणें; आशा निष्फळ होणें. निराशा. ०**भोजन**–न. १ तृप्ति होई-पावेतों जेवणें. २ भरपूर जेवण. ३ इच्छित पदार्थ (ब्राह्मणांस) खाऊं घालणें. ०**मरण**–न इच्छेस येईल तेव्हां मरण येणें, मरणें; पाहिजे तेव्हां मरण आणण्याची शक्ति. ०**मरणी–मृत्यु**–वि पु. इच्छा होईल तेव्हां मृत्यूस निमंत्रण करणारा; इच्छामरणाचा ईश्वरी प्रसाद असणारा. 'ख्यातयशस्वी इच्छामृत्यु तुम्ही कुरु कुळांत वासवगे ।' –मोउद्योग ११८७ ०**लाभ**–पु. इच्छित वस्तूची प्राप्ति, इष्टलाभ. ०**वान्**–वि. इच्छा असणारा; इच्छायुक्त ०**विनाश**–पु. इच्छाभंग; इच्छादमन, आत्मसंयम. ०**विलास–विहार**–पु मानेल तेव्हां, मानेल तें खेळणें, मनसोक्त विलास, चैन करणें. ०**शक्ति**–स्त्री इच्छेचें सामर्थ्य; संकल्पशक्ति. इच्छा हीच शक्ति; (इं.) विल्पॉवर. ०**सिद्ध**–वि. इच्छेप्रमाणें सिद्ध किंवा अगिद्ध ठरवितां येण्यासारखा ०**स्वातंत्र्य**–न. इच्छेची स्वतंत्रता. प्रवृत्तिस्वातंत्र्य. ०**क्षय**–पु इच्छाविनाश पहा

**इच्छाधीन**—वि इच्छेप्रमाणें चालणारा 'इच्छाधीन जे स्नायू आहेत, म्हणजे जे स्नायु मनांत आल्याबरोबर आपल्या शरीराचे अवयवांचे ठिकाणीं . गति उत्पन्न करितात '–मराठी ६ वें पुस्तक (१८७५) २६०. [सं. इच्छा+अधीन]

**इच्छानधीन**—वि. इच्छेबाहेरचा; स्वतंत्र. 'रक्ताशय हा एक इच्छानधीन स्नायूच आहे ' –मराठी ६ वें पुस्तक (१८७५) २६० [सं इच्छा+अनधीन]

**इच्छांक**—पु (गणित) इच्छा अर्थ २ पहा.

**इच्छिक**—वि. इच्छा असणारा; आकांक्षी. 'पूर्वील मोयरा लग्नाचा इच्छिक ।' –व ५. [सं. इष्–इच्छ्+क]

**इच्छिणें**—सक्रि. इच्छा करणें, धरणें आकांक्षा असणें. चिंतणें; वांछिणें; हेतु, मनीषा असणें; लोभ धरणें. [सं इष्–इच्छ्] **म्ह**० १ इच्छिलेलें साधेल तर दरिद्र कां बाधेल २ इच्छी परा येई घरा= दुसऱ्याचें वाईट जें चिंतिलें असेल तें आपणांवरच येते

**इच्छित**—वि. इच्छिलेलें; चिंतिलेलें; वांछिलेलें. [सं.]

**इच्छु**—वि. इच्छा करणारा; इच्छक; इच्छिक पहा. सामाशब्द–विद्येच्छु; द्रव्येच्छु; मोक्षेच्छु. [सं.]

**इछा**—स्त्री. (रामदासी वाङ्मय) इच्छा. 'मानिलें देवें हे पुरविली इछा ।' –दावि २१. 'वनफळभोजनीं इछा कांहीं ।' –सप्र २.४. [इच्छा अप.]

**इजखीलाल**—पु. घोड्याचा एक रोग. हा रोग पाठीचा असून त्यामुळें पाठ सुस्त होते व कणा फाटतो. –अश्वप २ ३००. [उर्दू]

**इजगो**—स्त्री. (व.) चिकित्सा; विचका. हा शब्द द्विरुक्तीनें वापरतात. 'याला दाखीव त्याला दाखीव असी इजगो इजगो झाली.' [विचका ?]

**इजट**—न. (कर्ना.) इजाट; ऊद; कांडेचोर; मूळ खाणारें मांजर. (माण.) ईजाट. [का.]

**इजत, इजतआसर–खाऊ, इजती**—इज्जत पहा.

**इंजन**—न. शक्ति उत्पन्न करणारें यंत्र; चालक यंत्र; गतियंत्र; इंजनाचे स्टीम (बाष्प), ऑईल (तेल), गॅस (धूम), कॉम्प्रेस्ड एअर (पीडित वायु) वगैरे पुष्कळ प्रकार आहेत. [इं. एन्जिन]

**इंजनवारा**—पु (व) पंखा; पंख्याचा वारा. विंझणवारा पहा. 'इंजनवाऱ्यानें वारा घाल.' [विंझणा+वारा]

**इजबळ**—स्त्री. (व ना.) एका जातीची पाल. विसाप ? [सं. विसर्प ?]

**इजमायली**—वि १ कच्चा, जुजबी (हिशेब, गांवचा ताळेबंद). २ (कों.) कामचलाऊ; हंगामी, कच्चें; तात्पुरतें (इमारत, काम वगैरे). [फा. इज्माल=सारांश, तात्पर्य.]

**इजलास**—स्त्री. बैठक; सभा; अधिवेशन; सेशन (कोर्टाचें.). [अर. इज्लास्]

**इजवटा**—विजवटा पहा.

**इजळणें**—विजळणें पहा.

**इजा**—स्त्री. अपाय; पीडा; त्रास; उपद्रव. 'ताकुकियास इजा न लागे ऐसा बंदोबस्त होऊन तजवंतारा पत्रें यावीं.' –रा ७.११७. [अर. ईझा]

**इंजाई**—वि. दिसण्यांत सुरेख; चकाकित; भपकेदार; दिखाऊ पण पोकळ [सं. इंध्=चमकणें ?]

**इंजाईत**—वि. लुकसान, नुसकान; दिखाऊ (कापड), कमजोर, नि:सत्व (लांकूड, इमारत); चांगलें न बनविलेलें, तयार केलेलें (काम वगैरे) [सं इंध्=चमकणें ?]

**इजाफत**—स्त्री १ (इनामदारास) वतनास कायम जोडून दिलेलें गांव; इजाफत इनाम; २ इतर राजांकडून किंवा परराष्ट्रांकडून येणाऱ्या जाणाऱ्या देणग्या किंवा नजराणे यांचा हिशेब ठेवणारें खातें; इजाफतखाना; हा जो खर्च होतो त्यास इजाफत खर्च म्हणतात. याच्या उलट मुजाफत व मुजाफतखर्च. –स्त्रीन. आधिक्य; वाढ; वढती. –वि. अधिक; जादा; जास्त. [अर. इझाफा=वाढ, आधिक्य] ०**गांव**–इजाफत अर्थ १ पहा. ०**जमा**–स्त्री. १ कर्ज, नजराण्यांची विक्री वगैरे निरनिराळ्या नवीन साधनांनीं सरकारनें गोळा केलेला पैसा; तह, तौफेर, नार्णेचढाव, वरपाडा, पारखाव, वाजगस्त, वटाव, भेटी, यादगार, उलफा, तफावत, सौकत, नालबंद, वैतें, नदीकिनाराउत्पन्न (टरबुजें वगैरे), तळ्याच्या कांठचें उत्पन्न, महालोमहालचें उत्पन्न, हुजुरून आलेली रक्कम, वैल्कटी, सनदसूद, गुजारत, मूस, कवडी, कचकलबाजी, गुराची नियोजी वगैरे बाबी यांत येतात. –भाअ १८३४. ४४. २ एका सुभ्यांत किंवा महालांत दुसऱ्या महालाचा जमा झालेला वसूल. मुजाफतखर्च पहा. 'जव्हेरखान्यांतून एखाद्या कारखान्याकडे जिनसा दिल्या

गेल्या म्हणजे त्या कारखान्यांत जव्हेरखान्याच्या नांवानें इ० होऊन खर्च कारखान्यांत दाखल होई.' –जनि (बडोदें) ४. ३ जप्त केलेल्या एखाद्या गांवचा वसूल.

**इजाफती**—वि. इजाफत (जमे) संबंधीं.

**इजाफा**—पु. १ गांव इनाम: नेमणूक; तनखा; नजराणा. २ वाढ; वढती. 'इजाफा पंचहजारीचा देणार.'–रा १.१७९. [अर. इझाफा=वाढ]

**इजा, बिजा, तिजा**—अ. १ एकामागूनएक असे तीन वेळां; दोनदां झालें कीं तिसऱ्यांदां झालेंच पाहिजे अशा कल्पनेनें तिसऱ्या वेळीं वापरतात. –स्वप ६७. (क्रि. होणें; सांगणें) २ (ल.) वारंवार; कैक वेळां. [बीजुं, तीजुं हे दोन व तीन या अर्थी गु व बिजा, तिजा, हे हिंदी शब्द यांस जुळणारा असा एक इजा शब्द या अर्थी केलेला दिसतो; तुल० का. इज=दोन]

**इजायली, इंजायली**—वि. १ अगदीं सामान्य, जंगली, रायवळ इमारती लांकूड; इंजायली (रायवळ) विरुद्ध साग, साग खेरीज इतर लांकडाला हा शब्द योजतात. २ रायवळ लांकडाचें बांधकाम. [अर. अजाल=हलकें.]

**इजार**—स्त्री. विजार; पायजमा, सुर्वार; चोळणा; पाटलोण. 'इजारा पेजारा मुक्तलग सकळा।'–सप्र ७.११ म्ह० जो इजार शिवील तो भोंक ठेवील. [फा. इझार्]

**इजारत, इजारा**—स्त्री पु. १ खंड; मक्तेगिरी; विशिष्ट करार; भाडेपट्टा; चढलावणी (एखादें खेडें किंवा ओसाड जमीन ३०–४० वर्षांत वसाहत करण्याच्या किंवा लागवडीस आणण्याच्या करारानें देणें); धारा. 'शेरीफाकडे शायरचा इजारा असे, आणि त्यास दरवर्षी त्याजबद्दल ठराविक रक्कम सरकारांत भरावी लागत असे.' –इंमू ५४. २ (ल.) जबाबदारी. 'सर्व इजारत मन्त्र्याची तुम्हया-वर आहे.' –चित्रगुप्त ९२. [अर इजारह्–इजारा]

**इजारदार**—पु. इजारा घेणारा, मक्तेदार; ठेकेदार; कंत्राट-दार. 'त्यावेळेस इतर इजारदारांप्रमाणें यांच्याकडेस कांहीं सर-कारी बाकी होती.'–विक्षिप्त १.५०. [अर इजारा+दार्]

**इजारदारी**—स्त्री. मक्तेदारी.

**इजारपट–पट्टा**—पु १ इजारदाराची सनद. २ गांवांतील किंवा विशिष्ट हद्दींतील शेतांची जंत्री, फेरिस्त. ३ गांवच्या मुख्य पाटलाला दिलेला वार्षिक वसुलाचा हिशेब, जमाखर्च. ४ गांवचा ठराव होऊन जो कागद पाटलास देतात तो. [अर. इजारा+पट्ट]

**इजारी**—वि. (जुन्नरी) गुडघ्यापर्यंत पाय पांढरे असणारी; विजारी. (मेंढी वगैरे प्राणी). 'ही मेंढी इजारी आहे.' [फा. इझार]

**इजितपत्र, इजीत जाणें**—अजितपत्र–अजित जाणें पहा.

**इंजिनियर, इंजिनेर, इंजनेर**—पु. यंत्रकाम किंवा बांधकाम जाणणारा; स्थापत्य(इंजिनियरिंग)शास्त्रज्ञ, यंत्रशास्त्रवेत्ता. 'जे प्रयोग शेकडों वर्षें बसून गेले आहेत, कीं भापेचा आणि त्यांचा जगोंकाय एकच जीव होऊन गेला आहे, त्यांस व्याकरणानें उपटून टाकण्याचा यत्न करणें म्हणजे इंजनेरास सडक बांधावयाची असतां त्यानें मधील डोंगर व पर्वत उपटून दूर फेंकून देण्यासारखेंच कृत्य आहे!' –नि १२४. [इं. इंजिनिअर]

**इंजिनियरिंग**—न वास्तुशिल्प; स्थापत्यशास्त्र; यंत्रशास्त्र.

**इजूक लागणें**—क्रि. (माण.) दुखणें लागणें. [इजा]

**इजांगत**—स्त्री. (कु.) दुष्ट अपघात; संकट; अरिष्ट. [इजा]

**इज्जत, इजत**—स्त्री. १ अब्रू, प्रतिष्ठा; मान; थोरवी; कीर्ति 'हे गोष्ट थोरपणाचे इज्जतीस लायख नव्हे.' –गेस्फुले (शिवा-जींचें मालोजी घोरपडयास पत्र). 'सरकारची इज्जत सत्या ग्रहींनीं मीठ लुटलें तेव्हांच गेली.' –के २७.५.३०. २ पत्राच्या आरंभीचा बहुमानार्थी मायना. [अर. इझ्झत्=प्रतिष्ठा] ०**खाणें, घेणें**–क्रि दुर्लौकिक करणें. ०**आसार**–वि. सुप्रतिष्ठित; सन्मान्य; नामदार. फारशी पत्रांतून नांवाच्यापूर्वी हा बहुमानवाचक शब्द किंवा पदवी योजतात. –रा १८.५०; १५.२७१. [फा. इझ्झत्] ०**खाऊ, घेणा**–वि. १ एखाद्याची अब्रू किंवा मान कमी करणारा; बुडविणारा; आश्रयदात्याची बेअब्रू करणारा (नोकर, वस्त्र, घोडा, इ०) २ घोंटाळा माजविणारा; कार्यनाश करणारा; मूर्खपणा पदरीं बांधणारा; अब्रू घेण्यासारखा. ०**दार**–वि. प्रतिष्ठित. [फा.] ०**पन्हा, –महा**–वि. सुप्रतिष्ठित; श्रेष्ठ; नामदार (एक पदवी). –रा३.४३. [फा इझ्झत्+पनाह्, मआब्] ०**लायक**–क्रिवि. प्रतिष्ठे प्रमाणें; माफक मरातीब. 'सिरपाउ इनामत देतात ते अवघ्या सर्दा-रांसहि इज्जत–लायख पेणें.' –रा ६.२१०. ०**हुर्मती**–स्त्री. मान-पान 'पेशजी यांच्या वडिलांवी इज्जत हुर्मती चालली आहे तसी यांची चालविणें.' –वाडसनदा १६.

**इज्जती, इजती, इज्जतीचा**—वि अब्रूदार; प्रतिष्ठित; सन्मान्य.

**इज्जती–दस्तगाह**—प्रतिष्ठा–निधी; श्रेष्ठ; सन्मान्य. –रा १८.५० [अर. इझ्झत्+दस्तगाह]

**इज्ना**—पु तावा; सत्ता. 'जो कोणी सवाईसिंगाचे इज्न्यांत येईल त्यास राज्य द्यावें.' –जोरा १०७. [अर. इझ्न=परवानगी.]

**इज्न्यांत**—क्रिवि. आधीन; लगामी.

**इज्हार**—पु जाहीरनामा; प्रसिद्धीकरण, ताकीदपत्र; नोटीस; समन्स. [अर. इझ्हार्=प्रसिद्धीकरण]

**इंझणा**—(व) विझणा पहा.

**इझाइल–यल**—इझायल पहा.

**इंझाळ**—पु. (व.) १ पाटाच्या खालच्या बाजूस लावलेला आडवा दांडा; पाय; अडात पहा. २ कवाडाला लावलेला आडवा दांडा. इंडाळें पहा.

**इझीचेअर**—स्त्री. आरामखुर्ची; जीवर झोंप घेतां येईल किंवा पाय लांब करून बसतां येईल अशी एक प्रकारची खुर्ची. [ इं. इझी+चेअर ]

**इट**—स्त्री. वीट पहा. ' तिहीं गुणाचिए इटेचेनि पांडे ।'-शिशु ९८. [ सं. इष्टका; प्रा. इट्टा. ]

**इटकर–कूर**—न.स्त्री. विटकर पहा.

**इटकुली–मिटकुली**—वि. लहानशी; एवढीशी. ' इटकुली मिटकुली गोष्ट सरो तुमचें आमचें पोट भरो. ' [ इतुकली ( सं. इयत्कल) ची द्वि.; तुल० का. इटकु=अकुंचितपणा. ]

**इटकार**—वि. (व.) अटकर; हट्टी; अडेल. [ अटकर अप. ]

**इंटर, इंटरक्लास**—पु. आगगाडीमधील थर्ड ( तिसरा ) आणि सेकंड ( दुसरा ) यांमधील वर्ग. [ इं. इंटर=मधला ]

**इटा**—पु. भाल्यासारखें एक शस्त्र; वीट; सांग. या भाल्याची लांबी सहा फूट असून पुन्हां त्याच्या शेवटास सहा फूट लांबीची दोरी बांधलेली असते, ती मनगटाला गुंडाळून इटा फेंकतात. म्हणजे याचा मारा वाराफुटांपर्यंत चालतो. पट्ट्यापेक्षांहि हा मारा जास्त असल्यामुळें ' दहा पट्टेकरी तर एक इटेकरी ' अशी म्हण पडली आहे. ईट पहा. [ प्रा. इट्ठि=खेंचणें ( ? ); ते ईट; हि. ईठि. सं. यष्टि. ]

**इटाळ–णें–सी**—विटाळ पहा.

**इंटाळ, इंठाळ**—( कुण. ) विटाळ पहा. ' आमचा इंटाळ झाला. '—के १.७.३०.

**इटाळी**—स्त्री. आळ; आरोप, किटाळ. ' ऐकें गे यशोदे जननी । अवघी लटकीच याची करणी । आम्हांवरी इटाळी घेऊनी । नसतीच उठतो गे ॥ '—ह ७.२५७. [ किटाळ, विटाळ अप. ]

**इटाळें**—विटाळे पहा.

**इटी, इटीदांडू**—विटी, विटीदांडू पहा.

**इटीमिटी–टी**—स्त्री. ( काव्य ) दृष्ट लागूं नये म्हणून ओंवाळून टाकतात ती ( पायाची माती ओवाळतात किंवा ती कपाळाला लावतात, किंवा मीठमिरच्या ओंवाळून टाकितात ) अलायबलाय; इडापिडा, निंबलोण. ' झणीं लागेल वाग्दृष्टी । म्हणोनि घेतली इटिमिटी । निंबलोण उठाउठी । करी गोरटी निजभावें ॥ '—एरुस्व १४.९१. [ का. मिडी=दुःख, बोटें चाळविणें; किंवा, मिटी=हिं. मट्टी, माती ? ; मिठी=मीठ ? . ]

**इटेकरी, इटेबरदार**—पु. १ इटा हत्यार धारण करणारा, बाळगणारा शिपाई. —भाअ १८३२ ( गो. ) इटेकार. [ इटा+कर; इटा+फा. बर्दार=धारण करणारा ]

**इटेबंदी**—वीटबंदी पहा.

**इठाळ**—स्त्री. ( राजा. ) ताक वगैरेस वास, स्वाद लागावा म्हणुन विटेचा किंवा चापट दगडाचा तुकडा लाल तापवून वर लोणी, मोहऱ्या इ० घालून ताकांत बुडवितात तो दगड किंवा विटकर. [ इट–वीट पासून. ]

**इड**—स्त्री. एक भूषण; अलंकार; तोरण. ' कीं आकाशां इड बांधिली । कापुरकेळीची । '—शिशु ३३३. [ सं. ऋद्धि; प्रा. इड्ढि; का. इडु=दागिना ]

**इडकणें, इडकावणें**—अक्रि. (व.) १ नखरे करणें; चेष्टा करणें. ' असा इडकाऊं नकोस. ' २ नटणेंमुरडणें. ३ लाडणें. [ सं. ऋद्ध; प्रा. इड्ढ; का. इडु=दागिने घालणें ]

**इडगंट**—न ( कर्ना. ) गुप्त धन. [ का. इडु=ठेवलेलें+गंट=गांठोडें ]

**इडगळला**—वि. (व.) घाणेरडा; ओंगळ; ओबडधोबड. [ इड+गळणें ? ]

**इडनिंबू–लिंबू**—ईडनिंबू पहा.

**इडपाड**—पु नेट; आवेश; जोर, श्रम. ईडेपाडें पहा. [ सं. ईर्षा; म. ईर ]

**इडरी–ली**—स्त्री ( कर्ना. ) धिरडें; उडीद व तांदूळ यांचें पीठ आंबवून त्यांत तिखटमीठ घालून गोल थापट्या करून उकडतात तें खाद्य. हें सांदणासारखें असतें. ' पूर्ण चंद्राचा अनुकारी । चोखाळपणें भजिजे इडरीं । '—ऋ ८१. [ प्रा. इड्डरिया=मिष्टान्न; का. इड्डली ]

**इडा**—पु. नाभिचक्रापासून निघून डाव्या नाकपुडींतून वाहणारी एक नाडी ही योग व स्वर शास्त्रांत प्रसिद्ध आहे. हिला चंद्रनाडी म्हणतात. पिंगला व सुषुम्ना यांच्या बरोबर इडेचा उल्लेख येतो. ' इडा पिंगळा एकवटती । '—ज्ञा ६.२४४. ' इडेनि करावा प्राण पूर्ण । '—एभा १४.४२०. [ सं. ]

**इडापिडा**—स्त्री. ( बायकी ) सर्व त्रास; संकटें; अरिष्टें; दुःखें ( ओवाळतांना किंवा दृष्ट काढतांना बायका म्हणतात ). ( क्रि०जाणें; नाहींशीं, दूर होणें ). म्ह० १ इडापिडा जाओ बळीचें राज्य होओ. २ इडापिडा टळो, पाप अमंगळ पळो. ' जीवभावाचें निंबलोण ।गुरूसी मी करीन आपण । इडापिडा मी घेईन जाण । तें लोणलक्षण मज लागो ॥ '—एभा १२.५५७. [ पीडा द्वि. ]

**इंडाळें**—न. (व.) १ वाडाच्या चौकटीमधील आडवें लांकूड. इंझाळ पहा.

**इंडियन**—वि. हिंदुस्थानसंबंधीं. —पु. १ हिंदी माणूस; हिंदुस्थानचा रहिवासी. २ अमेरिकेंतील मूळ रहिवासी; रेड इंडियन. [ इं. इंडिया=हिंदुस्थान ]

**इडी**—विडी पहा.

**इडूरी**—स्त्री. एक पक्वान्न; इडरी पहा. 'पूर्ण परिपूर्ण पुरिया। सवाह्य गोड गुळवरिया। क्षीरसागरींच्या क्षीरधारिया। इडूरिया सकुमारा।' –एरुस्व १४.११९. [प्रा. इडूरिया=मिष्टान्न, का. इड्ली]

**इडेंपाडें**—क्रिवि. १ आवेशानें; ईर्षेनें. २ श्रमानें; कष्टानें. 'भाले त्रिशूळ इडें पाडें। घे घे म्हणोनि टाकिती।'–मुआदि ६.३९. 'परि न पाहेचि देवाकडे। तेणें देवासी परम सांकडें। मी आलों येथें इडेंपाडें। तें येणें व्यर्थ केलें।' –स्वादि ३.३.२९. [सं. ईर्षा; म. ईर; ईड द्वि.]

**इणंग**—न (गो.) एक लहान मासा. याला फार कांटे असतात.

**इणा, इणां**—पु. (कु.) तंबोरा; विणा. 'इण्याची तार तुटली.' [सं. वीणा अप.]

**इत**—(शाप) अम्लाचा अनाम्ला (वेस) वर परिणाम होऊन जे क्षार बनतात त्यांना हा प्रत्यय लावितात. (इं.) एट्. उ० गंधकित (सल्फेट), कर्बित (कॉर्बोनेट), नत्रित इ० [प्रत्यय]

**इतउपर**—क्रिवि यापुढें; आतांपासून; येथून पुढें; इतःपर [सं. इतः+उपरि.]

**इतका-ला**—वि. एवढा; एवढा मोठा (परिमाणाचा, मापाचा, संख्येचा) एवढा पहा. 'दर एका जिनसाला इतकाली किंमत यावी लागली.' मराठी सहावें पुस्तक (१८७४) १९२. [वैसं. इयत्तक; सं. इयत्; फ्रें. जि. केती.; ते. इंते]

**इंतकाल**—पु. मृत्यु; अंतकाल. 'महमदअलीखान वालाजाह यांचा इंतकाल छ. २७ माहे रविलावली जाल्याचें वर्तमान आहे.' –रा ५.२०३. [सं. अंतकाल; अर. इंतिकाल्=मृत्यु; गमन]

**इतकावा**—वि. या प्रमाणाचा, मर्यादेचा, पायरीचा, अवस्थेचा (एखाद्या मालिकेंतील, आवृत्तींतील) [इतका]

**इतकासा**—वि. अगदीं लहान प्रमाणाचा; इवलासा; जरासा; लहान; थोडा; (व. ना.) इतकुसें. [इतका+असा]

**इंतजाम**—पु. १ बंदोबस्त; व्यवस्था; निकाल. 'सर्कारचे कामाचा पक्का इंतजाम.' –जोरा १२९. २ इतमाम पहा. [अर. इंतिझाम् =व्यवस्था]

**इंतजारी**—स्त्री. मार्गप्रतिक्षा; वाट पाहाणें. 'त्याचा जवाब केव्हां येईल याची इंतजारी आहे.' –रा ५.१२८. –वि. मार्गप्रतीक्षक; उत्सुक. 'उत्तराविषयीं लवकर आज्ञा जाली पाहिजे; नबाब फार इंतजारी आहेत.' –रा ५.१२४. [अर. इंतिझार् =अपेक्षा, प्रतीक्षा]

**इतपत**—वि. एवढें; या प्रमाणांत; इतकें. [सं. इयत्परिमित]

**इतःपर**—क्रिवि. यापुढें; यानंतर; अनंतर; अतःपर. [सं.]

**इतफाक, इत्यफाक**—पु. सहविचार; एकविचार; सल्लामसलत. 'याचा बंदोबस्त कळेल तसा आम्ही राजश्री पंतप्रधान याचे इतफाकानें करूं.' –रा १.२६१. 'त्या गोष्टीचा इत्यफाक या शादीचे खुशीचे समारंभांत घडावा हें फार चांगलें' –रा ७.५१. [अर. इत्तिफाक्=ऐक्य]

**इतबार**—पु १ विश्वास; इमान; श्रद्धा; भरंवसा. 'आतां इतबार कोणाचा येत नाहीं. –सभासद २९. २ प्रतिष्ठा; पत; मानपान. 'कोणा इतबार याचा घरीं'–सला ११. [अर. इअतिबार्=विश्वास श्रद्धा] ०पण–न. श्रद्धाळुपणा; विश्वास; भरंवसा; खात्री. –रा १५.३७२.

**इतबारात**—स्त्री. मानपान; इतबार अर्थ २ पहा. 'शिवाय स्वारीखर्च व इतबारात पावती होती.' –पेदसमा ११०. [अर. इतबार्]

**इतबारी**—वि. विश्वासु; प्रामाणिक; भरंवशाचा; अमीन. 'म्हणे तुम्ही धन्याच्या बऱ्यावरी। पहिल्यापासूनि आहांत इतबारी।' –अफला १५. [अर. इअतिबारी]

**इतमाम**—पु. लवाजमा; खटला (दासदासी, पालखी, घोडा, इ०); सरंजाम; दर्जाप्रमाणें खाजगी किंवा सरकारी तैनात. 'इतमाम ज्याचा त्याला। मराठे मुसलमानांला।'–ऐपो २३२. [अर. इह्तिमाम्=व्यवस्था, बंदोबस्त]

**इतमामी**—वि. इतमाम ठेवणारा, असणारा; सरंजामी; लवाजमेवाला. [अर. इह्तिमाम्]

**इतमाम्या**—पु. व्यवस्थापक; रखवालदार; नोकर. 'वाणकरी व इतमामे पुण्यास रखवालीस पाठविले.' –खरे १.४३३. [अर. इह्तिमाम्]

**इतर**—वि.सना. अन्य; निराळा; येर; दुसरा; वेगळा. [सं.] ०**पितर काढणें**—(व.) नातलगांवरून शिव्या देणें; मायबहीण घेणें. [पितर द्वि.] ०**विशेष**–वि. उरलेलें; राहिलेलें; अवशिष्ट; किरकोळ (बाबी, गोष्टी).

**इतरणें**—अक्रि. १ (व. ना.) १ खोडया, चेष्टा, चाळे, नखरे करणें; उनाडणें. 'अरे! असा इतरतोस काय?' (हा अर्थ हिंदुस्थानींत आढळतो). २ अवांतर गोष्टी करणें, सांगणें; विषयांतर करणें. 'सांगशील तर सांग लवकर, इतरूं नको असा' [सं. इतर]

**इतरत्र**—क्रिवि. अन्यत्र; इतर ठिकाणीं; दुसरीकडे. [सं.]

**इतरथा**—क्रिवि. १ दुसऱ्या प्रकारें; निराळया रीतीनें; अन्यथा. 'नसता दासजित प्रभु, करितां सारथ्य कां इतरथा तें।' –मोभीष्म ४.२०. २ उलटपक्षीं 'कांची शोभे वदुं इतरथा भूषणें दूषणें हीं।' –कर्म २. २९. [सं.]

**इतराज**—वि. अप्रसन्न; रुष्ट; नाराज. 'न जावें तरी खावंद इतराज होतात.' –पारसनीस ब्रप १३८. [अर. इअतिराझ्=आक्षेप घेणारा]

**इतराजी**—स्त्री. अप्रसन्नता; गैरमर्जी, अवकृपा; नाराजी. 'एकी-कडे सत्ताधीशांची इतराजी व यामुळें मुखाची हानि.' –मृग्रपदार्थ नियम १४४. [ अर. इअतिराझी=राग; अवकृपा ]

**इतरायेल**—वि. (खा.) वात्रट; चावट. 'तो इतरायेल पोऱ्या माह्या वाटी जातो.' [ इतरणें. ]

**इतरेजन**—पु अव. कांहीं नात्याचा संबंध नसलेले; परके; कांहीं हितसंबंध नसलेले. 'मिष्टान्नमितरे जनाः' –मुभा. 'म्हणून इतरेजन कांहीं तरी त्यांत दोष काढीत राह्यचेच.' –विचारविलास २७०. [ सं. इतरे+जनाः लॅ. इतेरम; हिब्रू इतेर ]

**इतरेतर**—सना.वि. परस्पर; अन्योन्य; एकमेक. [ सं. इतर+इतर ] –पु. (व्या.) द्वंद्व समासांतील एक भेद (समाहारद्वंद्वाच्या उलट) ज्यांतील पदें आणि किंवा व या अव्ययानें जोडली असून तें अव्यय अध्याहृत असतें तो इतरेतरद्वंद्वसमास. उ० हरिहर, आईबाप, इ० [ सं. ]

**इतलतितल**—वि. (गो.) चंचल; धरसोड वृत्तीचा; लहरी. –क्रिवि. लहरीपणानें; धरसोडीनें, चंचलपणें. (क्रि० करणें; बोलणें; चालणें; लावणें; मांडणें). [ कुण. इतलें=इतकें+तितलें=तितकें; हिं इधरतिधर ]

**इतलसार**—पु घोड्याच्या अंगावरील एक वाईट भोंवरा; हा कुळ्यावर असतो. ही एक घोड्याची खोड मानतात.

**इतला-इतलां**—वि.सना. (खा. कों.) इतका. 'इतला मधार कथाइन उनोर?' =इतक्यामध्यें कोणीकडून आलास रे. [ इतका ]

**इतलाख, इतलाख नेमणूक**—स्त्री. सरकारी तिजोरींतून किंवा कोठारांतून मिळालेली ठराविक नेमणूक; इनाम. 'पांचशें रुपयांचा गांव व पांचशें रुपये इतलाख.' –वाडसमा १.३६. [ अर. इत्लाक्=स्वातंत्र्य ]

**इतलाख-खी**—वि. कधीं इतलाक-की १ स्वतंत्र; निराळा; मोकळा. २ पगारी (गैरसरंजामी फौजेला योजितात, किंवा एका खात्यावरचा नोकर दुसऱ्या खात्यांत काम करीत असला किंवा जादा नोकर नेमला असला म्हणजेहि हा शब्द योजतात. जसें-इतलाखी फौज, नोकर वगैरे.) सात हजार फौज इत्लाख रोजमऱ्यावर ठेवावी.' –ख ८.४३२२. [ अर. इत्लाक्=स्वातंत्र्य ]

**इतलाखी**—स्त्री. सख्य; मैत्री. 'रियासतींत मोटी गोष्ट कीं वचनाची कायमी, त्यांत तलवून मिजाजी (लहरीपणा) झाल्यास व इतलाखी वातल होऊं लागल्यास लाचार.' –ख ७.३५७४. [ अर. इत्लाक् ]

**इतल्ला**—पुस्त्री. १ संबंध; हित; लक्ष, गुंता, लोभ. 'हरतऱ्हा करोन त्याचे (शिंद्यांचे) परिघांतून आपले पेठेंत येऊन राहिलों, त्यांचा इतल्ला आम्हांकडे नाहीं.' –ख १०.५६०६. २ वार्ता; खबर; वातमी (विशेषतः सरकारास दिलेली). (क्रि० करणें; देणें; सांगणें; लिहिणें). [ अर. इत्तिलाअ=ज्ञान, समज ]

**इतल्लेपत्रक-रपोर्ट**—नपु सरकारी बातमीदाराचा लेखी अहवाल; वार्तापत्र; (सामा.) वातमीपत्र; अहवाल. [ अर. इत्तिल्लाअ+पत्रक; इं. रिपोर्ट ]

**इतवा**—वि. इतका, इतकावा पहा.

**इतवार**—पु. (हिं.) आदितवार; रविवार. [ सं. आदित्य+म. वार ]

**इतस्ततः**—क्रिवि. इकडेतिकडे; इकडूनतिकडून; अस्ताव्यस्त; अनिश्चितपणें. 'मी इतस्ततः दिवसभर भटकलों.' [ सं. ]

**इंताजी**—वि. (व.) मिजासखोर; फार नाजूक; चवढाळ; चोखंदळ. 'त्याला कांद्याचा वास नाहीं चालत, असा इंताजी आहे.' [ अर. इंतिझाम्=व्यवस्था ]

**इति**—अ. १ (या) प्रमाणें, असें, अशा तऱ्हेनें इत्यादि शब्दांप्रमाणें सारखेपणा किंवा एकरीत दाखविणारें अव्यय. २ अखेर; शेवट; समाप्ति, इतिश्री पहा. [सं.] ०**कर्तव्यता-क्रिया**–स्त्री. १ पद्धत; मार्ग; रीत (एखादी गोष्ट करण्याची); कार्यक्रम; मुळापासून शेवटपर्यंत क्रमानें अनुष्ठान जींत आहे असें कार्य. २ कर्तव्य; करणीय; यापुढें करावयाची कामगिरी. ३ कर्तव्याची समाप्ति; अखेरी. ०**कृति**–स्त्री. (अर्वाचीन) शिष्टसंमत आचार; वागण्याची पद्धत; (इं.) एटिकेट. (गोविंदाग्रजानें हा शब्द रूढ केला). ०**श्री**–स्त्री. १ शेवट; समाप्ति. इतिश्री असे शब्द पुराणांतील अध्यायांच्या शेवटीं ('इतिश्रीस्कंदपुराणे रेवाखंडे ...) येतात त्यावरून.' 'तगटी इतिश्र्या कराव्या।' –दा १९.१.१९ (क्रि० करणें; होणें). २ (ल.) अखेर; मृत्यु. 'तूं आज कबूल झाला असतास म्हणजे बारभाईची इतिश्रीच होती.' –ईप ४३. ०**वृत्त**–न. अहवाल; हकीकत; इतिहास; रिपोर्ट.

**इति-ती**—पु. (रामदासी वाङ्मय) यति. 'इति महानुभाव गाइत्री पूजन।' –दा ४.५.४. 'ज्याचे गृहीं इति जेविला। तेथें स्वयें परमात्मा तृप्त जाला। इति आणि परमात्मयाला। वेगळिक नमे सर्वथा।'–स्वादि ८.२.५७. 'इती भीइती भांडती दीर्घ द्वेषें।' –दावि ३९४. [ सं. यति ]

**इतिमासांव**—न. (गो.) सूचना; बोलावणें; नोटीस. [ पो. इंतिमासांव; इं. इंटिमेशन ]

**इतिला**—वि. इतका; इतला पहा. 'इतिला निश्चयो करूनि।' –गीता २.२२०८.

**इतिहास**—पु. १ प्राचीन काळीं घडलेल्या हकीकतींचें लेखी किंवा परंपरेनें आलेलें वर्णन; जुनी कथा; शब्दप्रमाणाला प्रतिशब्द म्हणून हा शब्द योजतात. २ (सामा.) एखाद्या गोष्टीची साग्र माहिती; इत्थंभूत हकीकत; वृत्तांत; कथा. [ सं. इति+ह+आस=असें झालें, होतें. ]

**इतिहासणें**—सक्रि. ( अर्वाचीन काव्य ) इतिहासांत समाविष्ट करणें, अमर करणें. 'मराठकर्तृत्वा दे संधि इतिहासाया नांव।' –जननीजनकज ( घेइ आइचें नांव ).

**इतिहासशास्त्र**—न. अर्वाचीन पद्धतीनें संशोधन, चिकित्सा, पांडित्यपूर्वक इतिहास लिहावयाचें शास्त्र. [ सं. ]

**इतुका–ला**—सना. वि. ( काव्य. ) इतका पहा. 'दान इतुलें या मज दीना।' –तुगा ३४४. 'इतुक्याहि दिसांत रणीं ज्याचें बहु भय धरूनियां पोटीं।'–मोकर्ण ६. ५३. 'हेंहि असो कीं इतुली मातु।'–मुसभा ५. १३१. [ इतका; गो. इतुलें ]

**इत्तदाय**—पु. आरंभ. 'ज्येष्ठमास इत्तदायपासून तागायत पौषपर्यंतचा मज्कूर' –जोरा ५८. [ अर. इब्तिदा=आरंभ ]

**इत्तिफाक**—पु. १ संमति; कबुली. २ मैत्री; स्नेह. ३ दैव; योग. इत्तिहाद. [ अर. इत्तिफाक=बरोबरी, मैत्री, सख्य ]

**इत्तिहाद, इतेहाद**—पु. ऐक्य, मैत्री, दोस्ती. 'असे श्रीमंतांचे मनांत येणें हें इत्तिहादास चांगलें नाहीं.' –रा ५. ३०. 'आमची दोस्ती आणि इतेहाद पूर्वीपासून जो आहे त्यांत खलल न यावा.' –रा ५.३०. [ अर. इत्तिहाद्=ऐक्य, मैत्री ]

**इत्थंभूत**—वि. जशी घडली तशी; सविस्तर; तपशीलवार ( गोष्ट, वर्णन, निवेदन, प्रतिपादन, विचार, प्रकार वगैरे ). [ सं. इत्थम्=असें+भूत=घडलेलें ]

**इत्यर्थ**—पु. सारांश; तात्पर्य; सिद्धांतरूप अर्थ. 'तरी तूं इत्यर्थाचें सार। इतुलें जाण' –ज्ञा १८.१४६. –ख ४३०४. [ सं. इति+अर्थ ]

**इत्यादि–क**—वि. वगैरे; हे व इतर. 'तत्त्वांची अभिवृद्धि कशी झाली इत्यादिक गोष्टींचा विचार वास्तविक पाहतां आमचा आम्हीच करावयास पाहिजे होता' –टि ४. १२६ [ सं. इति+आदि,+क ]

**इत्रावणें**—क्रि. ( व. ) खोड्या करणें इतरणें अर्थ १ पहा.

**इंत्रुज**—न. ( गो. ) ख्रिस्ती लोकांचा शिमगा. [पोर्तु. इंत्रुडो]

**इत्सा**—स्त्री. ( काव्य ) इच्छा ( वस्तु मिळण्याची ). 'ते देत इत्साभोजन। दीप तरी चिंतामणिरत्न। छाये करिती चिंतितभोजन। कल्पतरूचे।'–कथा २.१२.५७. [ आदित्सा ( =घेण्याची इच्छा ) –आइत्सा–इत्सा. ( राजवाडे ) भाअ १८३४; इच्छा–इत्सा ]

**इथचा, इथला, इथपर्यंत, इथपावेतों, इथवर, इथून, इथें**—एमध्यें पहा.

**इथरणें**—अक्रि. बेशिस्त, गैरसुर्थे वागणें; खवळणें; बिघडणें? बिथरणें. [ बिथरणें अप. ]

**इथिल**—न. (शाप) एक रासायनिक मूलद्रव्य; सामान्य अल्कहल; इथ्र व दार्वम्ल यांतील मूलकांस हें नांव आहे. (इं. ) एथिल. ०**अदिद**–न. एथिल आयोडाईड; हायड्रोऑडिक इथर; यास मधुर वास असून हें वर्णहीन व रसरूप असतें. ०**अल्कहल**–न. मद्यार्क. हा कित्येक फळांत सांपडतो. हा निर्गंध असून यास तिखट व दाहक अशी रुचि असते दिव्याच्या सान्निध्यांत पेटतो व हवेंत उघडा राहिल्यास उडून जातो. ०**नत्रित**–पु. नायट्रिक इथर; नत्र इथ्र; याचा वास मधुर असून ज्वाला पांढरी असते, उष्ण केला असतां याचा स्फोट होतो.

**इथिलीन**—पु. (शाप.) एक वायु. हा दगडी कोळशांत सांपडतो; हा तैलयुक्त, रंगहीन, आणि पारदर्शक असून यास मधुर पण लसणीसारखा वास येतो. [ इं. ]

**इथुन**—पु ( शाप ) एक उत्कर्ब. ( संतृप्तवर्ग ) ( इं. ). इथेन.

**इथ्र**—पु. ( शाप. ) ईथक; तेजोवाहक पदार्थ; सूक्ष्मवायु. [ इं. ईथर. ]

**इदगा**—पु ईदच्या प्रार्थनासमारंभाकरितां मुद्दाम तयार केलेली जागा. [ फा. ईद्+गाह् ]

**इदंता**—स्त्री. हे पणा; हें असा निर्देश. 'मग इदंतेसि वाळलें।' –ज्ञा १५.२६७. [ सं. इदम्+ता ]

**इदबार**—पु. विश्वास. इतबार पहा. 'आम्ही दुर देशी राहाणार, नाहीं इदबार कोणाचा धरीत।' –होला १७७.

**इदमपि**—सना.वि. हें देखील; हेंहि; हें सुद्धां. 'इदमपि धनं जितं ते शकुनि म्हणे दीप्तपावक पटानें।' –मोसभा ४.५५. [ सं. इदम्+अपि ]

**इदमित्थ**—न. सर्व कारभार; एकंदर सर्व गोष्ट; सगळें ( जाणावयाचें, सांगावयाचें, करावयाचें ) [ सं. इदं+इत्थं ]

**इदला**—वि. ( कुण. ) इतका. इतला पहा.

**इदवळा, इदवाळा**—क्रिवि. ( कु. गो. ) यावेळीं; एव्हां; एवढ्या वेळीं. [ सं. इयत्+वेला ]

**इदळ**—न ( गो. ) १ पावसाळ्यानंतर पेरण्यांत येणारीं धान्यें; रबीचें पीक, पाणथळ जमीनींत घ्यावयाचें पीक. २ पाणथळ जमीन.

**इंदळस, इंदळसकुटा**—वि. ( कु. ) भोळसट.

**इदारणा, इदारणें**—विदारणा–णें पहा.

**इंदिन**—पु. ( शाप. ) हा एक उत्कर्ब ( हायड्रोकार्बन ) आहे. दगडी कोळशाचें आंशिकपातन केलें असतां त्यांत हा सांपडतो. [ इं. इंडिन ]

**इंदिरा**—स्त्री. लक्ष्मी; विष्णुपत्नी; कमला. 'जें होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें।' – नल९. [ सं. ] ०**वर**–पु. इंदिरेचा पति; विष्णु. [ सं. इंदिरा+वर ]

**इदी**—स्त्री. सणावारीं दिलेली भेट. [ फा. ईदी ]

**इंदी(दि)वर**—न. कमल; नील कमल; निळया कमळाचें फूल. 'फांकलिया इंदीवरा। परिवारु नाहीं धनुर्धरा।' –ज्ञा १३. ३६१. [ सं. ]

**इंदु**—पु. चंद्र. ' जो मम नयनचकोरा इंदू ' –संगीत रामराज्यवियोग ५७. (समासाच्या शेवटीं) जसें–मुखेंदु; पूर्णेंदु. [ सं. ]
०**वार-वासर**–पु. सोमवार.

**इंदुरी**—वि. इंदूर शहरासंबंधीं ( पागोटें, वस्त्र, बुक्का इ० ).

**इंदुवदना**—वि. १ चंद्राप्रमाणें जिचें मुख आहे अशी (स्त्री). २ (ल.) सुंदर, रूपवती स्त्री; तरुणी; कुमारी. ३ एक समवृत्त. अक्षरें १४, गण भजसनगग; उ० कायकरि काळकळि नीलगल विर्त्ती। ध्याल जरि वालभरि वैमुनि निवार्ती। भाळशिखि बाळशशिमंडण भवारे। सांव शिव सांव शिव सांब शिव गारे ॥ ' –निमा ( सांबशिवाष्टक ) १. [ सं इंदु + वदन ]

**इद्दत**—स्त्री. ( मुसलमानी कायदा ) घटस्फोटानंतर तीन महिन्यांची मुदत. ' ज्या स्त्रीचा नवरा नुकताच मयत झालेला असेल किंवा ज्या स्त्रीला तिच्या पहिल्या नवऱ्यानें काडी मोडून दिली असेल अशा स्त्रीच्या इद्दतीच्या मुदतींत तिच्याशीं लग्न लावलें तर तें फासीद आहे परंतु रद्दबातल नाहीं ' –घरचा कायदा ७३. [ अर. इद्दत ]

**इंद्र**—पु. १ देवांचा राजा; स्वर्गलोकचा व पूर्व दिशेचा अधिपति; मेघ, पाऊस यांची ही अधिष्ठात्री देवता म्हणून फार प्राचीन काळापासुन मानतात. ' प्रिया वाखाणिजे अमरेंद्र । कृष्ण इंद्राचाहि इंद्र । ' –एरुस्व १.७८. २ ( समुदायामध्यें ) राजा, श्रेष्ठ, वरिष्ठ व्यक्ति; नायक; मुख्य; पुढारी. सामाशब्द–नृपेंद्र; खगेंद्र; विंध्रेंद्र; फणींद्र; पक्षींद्र. ३ गोसावी, संन्यासी, यांच्यांतील एक पंथ; या पंथांतील व्यक्ति. ४ ( सामा. ) राजा. [ सं. ] **म्ह०** इंद्रायतक्षकायस्वाहा–( जनमेजयानें सर्पसत्र केलें त्यांत सर्व सर्पकुलें अग्निकुंडांत पडलीं, परंतु तक्षक इंद्राच्या पाठीशीं दडला तेव्हां जनमेजयानें ' इंद्रायतक्षकायस्वाहा असा मंत्र म्हणून आहुति देतांच इंद्रासह तक्षक आकर्षिला जाऊं लागला. या कथेवरून )=एखाद्यानें शत्रूला चुकविण्याकरितां दुसऱ्याचा आश्रय केला असतां शत्रु प्रबल असल्यास त्या आश्रयदात्यासह आश्रिताची उचलबांगडी होणें या अर्थी ही म्हण योजितात. ' जॉनसनसारख्या रसिकांनीं...ज्यास कवित्वसिंहासनावर आरूढ करवून सर्वांच्या अभिनंदनास पात्र करून ठेविलें होतें त्यास मेकॉलेप्रभृति अर्वाचीन निबंधकारांनीं पदच्युत करून ' इंद्रायतक्षकायस्वाहा ' या न्यायानें जॉन्सनप्रभृति मोर्चेलवाल्यांसहि त्याबरोबरच खालीं ओढलें. –नि ८७६ [ सं. ]

**इंद्रकट**—न. ( कों. ) आढ्यापासून पाख्यापर्यंतचे खालीं असलेले वासे टेकून राहण्यासाठीं तुळयांच्या टोकावर आडवें लांकूड बसविलेलें असतें तें; भितींत बसविलेलें बहालाच्या खालचें आडवें लाकूड. [ सं. इंद्र+काष्ठ ]

**इंद्रकल्याणी**—वि. ( माण ) विद्रूप; विद्रूप स्वरूपाचा. [ इंद्राविद्रा+कल्याणी ]

**इंद्रकापशी**—स्त्री. कापसाच्या झाडाची एक जात. देवकापशी [ सं. इंद्र+कार्पास ]

**इंद्रकीट, इंद्रगोप**—पु. एक प्रकारचा पावसाळी तांबडा (कधीं पांढरा ) किडा; कुंकवाचा किडा; सोमकिडा; मृगनक्षत्रांत हा उत्पन्न होत असून याच्या पाठीवर सहा ठिपके असतात. ' इंद्रगोप धुतले पाउसें । पद्मरागीं जडत्व असे । ' –ऋ ८६. [ सं. ]

**इंद्रकील**—पु. १ मंदराचलपर्वत; २ घोट्याचा सांधा; घोट्याची खीळ. [ सं. इंद्र+कील ]

**इंद्रगेळ**—न. १ पायाच्या घोट्याचा भाग; यावरून पुढील श्लोक म्हणतात. ' इंद्रगेळंच धोत्रंच '=गुडघ्यापर्यंत धोतर, पंचा. २ गुराच्या टाचेवर ( खुरावर ) मागील बाजूस जो वाढलेला मांसल भाग असतो तो; पायाचा एक भाग. [ इंद्र+गळ ]

**इंद्रचाप-धनु-धनुष्य**—न. आकाशांत पावसाच्या तुषारांवर पडणाऱ्या सूर्यकिरणांच्या योगानें दिसणारी धनुष्याकृति. याचा आकार अर्धवर्तुळाकार असून वर्तुळाचा मध्यबिंदु पाहणारा मनुष्य आणि सूर्य यांस जोडणाऱ्या रेषेवर असतो. या धनुष्यांत तांबडा, नारिंगी, पिंवळा, हिरवा, निळा, पारवा व जांभळा असे सात रंग असतात. प्रकाशकिरणांचें वक्रीभवन व परावर्तन यांच्या योगानें इंद्रधनुष्य पडतें. [ सं. ]

**इंद्रजव**—पु इंद्रबीज; कुडयाचें बीं. [ सं. इंद्र+यव; हिं. इंदजौ; गु. इंदर+जव. ]

**इंद्रजाल**—न. मंत्रविद्या; जादुगिरी; जादुटोणा; गौडबंगाल; भानामती; हातचलाखी; माया. ' हें सर्व इंद्रजालच माझ्या दृष्टीस पडत आहे. ' –कमं ३. [ सं. इंद्र+जाल=जाळें ]

**इंद्रज्योत**—इंद्रजव पहा.

**इंद्रधनुष्य**—इंद्रचाप पहा. ' नाना रंगीं गजबजे। जैसें इंद्रधनुष्य देखिजे। ' –ज्ञा १५.२४०. ' तेही क्षणिक जैसी रेख। व्योमीं इंद्रधनुष्याची। ' –मुरंशु २७५.

**इंद्रध्वज**—पु. पाडव्याच्या दिवशीं उभारतात ती गुढी. गुढी पहा. [ सं. इंद्र+ध्वज=निशाण ]

**इंद्रनील-ळ**—पु. एक रत्न; उंची नील. ' पिळून इंद्रनीळ किळी। वोतली कृष्णतनू सांवळी। पाउलें सुकुमार कोंवळीं। घोटीं निळीं दोहीं भागीं। ' –एरुस्व १.२३. [ सं. ]

**इंद्रफणी**—पु. १ इंद्रजाल विद्येनें दोरीचा दिसणारा साप. –मनको २ इंद्र व शेष. ३ मांजर व सर्प. ' दोघां ऐसीं तीन चालती। अवगुणी अष्टधा प्रकृती। अधोधें सांडून वर्तती। इंद्रफणी एसीं। ' –दा १५.५.१. [ सं. इंद्र+फणि ]

**इंद्रबाही**—स्त्री. दरवाज्याच्या फळीचे दोन बाजूचे दोन व एक मधील असे उभे तुकडे. [ सं. इंद्र+बाहु ]

**इंद्रभुवन**—न. १ इंद्राचा राजवाडा; इंद्रलोक. २ ( ल. ) अत्युत्कृष्ट व टोलेजंग राजवाडा. [ सं. इंद्र+भुवन ]

**इंद्रमढें-ढें**—न. अगदीं कृश, अशक्त, रोड, मढ्यासारखा मनुष्य. [ सं. इंद्र+मढें ]

**इंद्रलोक**—पु. स्वर्गांतील इंद्राची निवास भूमी; ज्या प्रदेशांत इंद्र रहातो तो स्वर्गाचा भाग. [ सं. इंद्र+लोक ]

मोडल्यावांचून थंडी पडत नाहीं.' 'गळवाचा उग्रम मोडला नाहीं.' [सं. उग्र]

**उग्रस**—वि. उग्रट पहा.

**उग्रा**—स्त्री. विना. (संगीत) एकविसाव्या श्रुतींचें नांव. [सं.]

**उग्राणी**—पु. (दक्षिण कानडा) खेडेगांवांतील एक विशिष्ट सरकारी नोकर; पाटील. [का. उग्राण=सरकारी कोठार] –स्त्री. वसूली; वसूल करणें. उगराणी पहा.

**उग्राबागरा**—उगराबागरा पहा.

**उग्रासन**—न. योगशास्त्रांतील एक आसन; पश्चिमोत्तानासनाप्रमाणें डोकें ढोंपरावर न टेकतां ढोंपरांत भरून शक्य तितकें जमिनीजवळ लावणें, अशा प्रकारचें आसन. –योगशास्त्र. ३४९. [सं. उग्र+आसन]

**उघटणें**—क्रि. प्रत्यक्ष मांडलें जाणें; उघडणें पहा. 'ज्यां पाटगीं जें कोणें उघटें।'–शके ११२८ चा पाटणचा शिलालेख. [सं. उद्+घट्=उग्घट्=उघट.]

**उघटा**—(गो.) उघडा पहा. करंडो उघटो कर.

**उघड**—वि. १ स्पष्ट; व्यक्त, उकललेला 'मनीं आहे तें उघड। बोल पां मुखें।'–ज्ञा ११.४४२. २ स्वच्छ; ढळढळीत; जाहीर; प्रकट; सार्वजनिक; महशूर; गुप्तवेषरहित. ३ दुर्लौकिक झालेलें. –स्त्री. १ निरभ्र आकाश; हवा स्वच्छ असणें; उघाडी; उघडीक; पाऊस थांबणें. २ दुर्लौकिक (एखाद्या गोष्टीचा) –क्रिवि. प्रसिद्ध पणानें; जाहीर रीतीनें (फिरणें, सांगणें, बोलणें). [सं. उद्+घट्; प्रा. उग्घड] **उघडकीस येणें**–परिस्फोट होणें; गुप्त न राहणें; जाहीर होणें **उघडकीस आणणें**–परिस्फोट करणें; प्रसिद्ध करणें; जगजाहीर करणें.

**उघडगांड-ड्या**—वि. नेहमीं शेपटी हालविणारा (त्यामुळें ज्याची गांड उघडी पडते तो घोडा, घोड्याचें एक अशुभ लक्षण).

**उघडझांक-प**—स्त्री. वारंवार उघडणें–झांकणें (दार, पेटी, डोळे, पंख वगैरे), उघडण्या–झांकण्याची क्रिया; आकाशांत ढग येणें–नाहींसे होणें; काढणें घालणें (पडदा वगैरे).

**उघडणें**—उक्रि. १ आच्छादन काढणें; खुलें, मोकळें करणें (पेटी, दार.); उकलणें. २ उघडकीस आणणें, गुप्त गोष्ट फोडणें, प्रगट करणें, प्रसिद्ध करणें. –अक्रि. १ मोकळें–खुलें होणें. २ (पाऊस) थांबणें; ढग नाहींसे होणें; आकाश निरभ्र होणें, (हवा, पाऊस) स्वच्छ होणें. ३ उत्कर्ष होणें; उदयास येणें (दैव); ऊर्जितदशा येणें. [सं. उद्घाटन; प्रा. उग्घाडण; सिं. उघिड़णु]

**उघडदोरा**—पु जे दोर दोहींकडे धरून ओढले असतां बटवा, कसा इत्यादि उघडला जातो असे लावलेले असतात, त्यांपैकीं प्रत्येक; ओढदोरा. [उघड+दोरा]

**उघडभावई**—स्त्री. (व.) उघडपणा; कांहीं प्रतिबंध, अडोसा नाहीं अशी स्थिति. 'घर सांपडलें तें असें उघडभावईचें, मग सुरक्षितपणा कसा वाटावा.' [उघड+भाव]

**उघडमराठी**—उघडीमराठी पहा.

**उघडमाथा**—क्रिवि. १ उघडपणें; प्रसिद्धपणें; उघडउघड, निःशंकपणें; राजरोस. २ (उप.) निर्लज्जपणें (फसविणें, उघडकीस आणणें इत्यादि.)

**उघडमीट**—स्त्री. पुनःपुन्हां उघडणें, मिटणें (डोळे, ओठ, फुलें इ०); उघडझांक पहा.

**उघडवाघड**—क्रिवि. उघडपणें; प्रसिद्धपणें; उघडउघड; स्पष्टपणें. [उघड द्वि.]

**उघडवासरा-वासारा**—पु. उघडी, मोकळी जागा; निष्प्रतिबंध जागा किंवा स्थिति. [उघड+वास]

**उघडवासऱ्यांत**—क्रिवि. उघड्या–मोकळ्या जागेंत (मैदानांत, पटांगणांत); चवाठ्यावर; खुल्या हवेंत; हमरस्त्यावर. [उघड+वास]

**उघडा**—वि. १ मोकळा; खुला; न झांकलेला; अनाच्छादित. २ स्पष्ट; प्रगट; व्यक्त; विशद; आविर्भूत; स्वतःसिद्ध; ढळढळीत, गूढ; गुप्त नव्हे असा. ३ लोकविख्यात; प्रसिद्ध; महशूर; जगजाहीर, सर्व लोकांस माहित असणारा. ४ ज्यास सांभाळ करणारा कोणी नाहीं असा (पोर, राज्य इ०); 'आईबाप मेल्यापासुन हें पोर उघडें पडलें आहे.' अरक्षित; निराश्रित (स्थळ, प्रदेश, माणूस). (क्रि० पडणें). ५ मोकळी; स्वच्छ (हवा). ६ अंगांत कपडा न घातलेला; नग्न (कमरेच्या वर); पोशाख नसलेला; फक्त धोतर नेसलेला; केवळ मध्यवेष्टित. 'वाऱ्यांत अंगणांत उघडा हिंडूं नको.' **म्ह०** नागड्यापाशीं उघडा (किंवा उघड्यापाशीं नागडा) गेला सारी रात्र हिंवानें मेला. ७ सवंध नग्न; नागवा; अगदीं वस्त्रहीन. 'बा! ढळतां तिळहि पदर भावी व्यजनासि साग रामा जी। ती खळसभेंत उघडी पडत्ये न पडोनि सागरामाजीं।' –मोसभा ५.७७. ८ अनाच्छादित; बोडका; बुच्चा; ओका. ९ निर्भीड; स्वैर; दाही दिशा मोकळ्या असलेला. **०करणें**–१ निराश्रित करणें. २ उघडा पाडणें पहा. **०पडणें**–निराश्रित, अनाथ होणें. 'अर्थातच हरणाबाई आपल्या दोन मुलींसह उघडी पडली.' –स्वप ६५. **०पाडणें, उघड्यावर आणणें**–निंदस, उपहासास पात्र करणें; एखाद्यास चवाठ्यावर आणणें; गुप्त गोष्ट फोडणें, जाहीर करणें; बोभाटा करणें. **उघड्या-डोळ्यांनीं**–जाणून बुजून; कळून सवरून. **म्ह०** १ उघड्या डोळ्यांनीं करावें आणि डोळे मिटून भरावें. २ उघड्या डोळ्यांनीं प्राण जात नाहीं=भलतीच गोष्ट आपल्या देखत घडत असतां तिचा प्रतिकार

केल्यावांचून आपणास राहवत नाहीं. ०**नागडा-धोत-बंब-बाग(घ)डा-वाग(घ)ड-सांट**-वि. १ वस्त्रहीन; नग्न; अंगावर मुळींच कांहीं नसलेला २ आडोसा नसलेली (जागा). ३ आच्छादनरहित; न झांकलेला ( पदार्थ, अन्न ) ०**बोडका**-वि. १ अंगांत व डोक्याला कांहीं न घातलेला. २ निराश्रित; निराधार. ३ कुटुंब, काळजी, धंदा नसलेला; घरदार नसलेला; ना घर ना दार असा. ०**बाळसंतोष**-पु फटिंग; सडा. ०**माथा**-पु १ धाक, लाज नाहीं असा मनुष्य, निःशंक, निर्भय, निर्भीड माणूस ( चांगल्या व वाईट अर्थी). 'आम्ही पिटीचे भिक्षुक, आम्हास प्रतिग्रह घेण्याविषयीं उघडा माथा आहे.' २(ल.) दोषविमोचन, निरसन, उजळमाथा-तोंड असणें; निरपराधित्व; आरोपनिराकरण. ( होणें ) ( ३ बोल, निंदा, दोष, टपका यापासून अलिप्तता, मुक्तता. (असणें) ' कसबिणीनें शिदळकी केली तर तिला कोण विचारतो, मूळचाच तिचा उघडा माथा.' ०**माथ्यानें**-क्रिवि. न कचरतां; न लाजतां; धीटपणानें ०**हिशोब**-पु. सरळ, स्वच्छ हिशेब, लवकर समजणारा हिशेब; पाहिल्याबरोबर डोळ्यांत भरणारा, पटणारा जमाखर्च.

**उघडी**— स्त्री. ( कों. ) फांजास लावलेलें दार. बाधाच्या दाराकरितां जे उघडझांपीचे दरवाजे ठेवतात ते; (आगरी) पाणी घेण्यासोडण्यासाठीं केलेला चुन्याचा किंवा लांकडी दरवाजा. ' त्याची उघडी मोठी असल्यामुळें शेतीनें पाणी लवकर आटतें.' ( इं. ) फ्लडगेट, स्लूस. [ उघडणें ]

**उघडीक-प**—स्त्री. १ प्रसिद्धि; जाहीर माहिती; परिस्फुटता. ' आपलीं शास्त्रें लोकास ठाऊक व्हावीं, कारण तेणेंकरून आपली उघडीक होते.' –नि १०१६ २ उघाड, पाऊस थांबणें; उघडावा; स्वच्छ हवा ' पावसानें उघडीप दिली.' [ उघडणें ]

**उघडीमराठी-मऱ्हाटी**—स्त्री. सरळ, मोकळ्या मनानें केलेलें भाषण; प्रामाणिक व्यवहार; सरळ वागणूक; नोखी; स्पष्टपणा; स्पष्टवक्तेपणा. [ उघडी+मराठी ]

**उघडी मांडी करणें-टाकणें**—क्रि. ( मांडी उघडी ठेवणें हें शिष्टाचारास सोडून आहे यावरून ल.) निर्लज्जपणाचें आचरण करणें, बेशरमपणानें वागणें; अश्लील प्रकार करणें; अनुचित, असभ्य आचरण करणें.

**उघडें परब्रह्म**—न. अगदीं स्पष्ट, उघडउघड दिसणारी गोष्ट, बाब, वस्तु. ( अशा उघडपणाबद्दल जेव्हां आश्चर्य वाटतें त्यावेळीं हा शब्द वापरतात ).

**उघड्यावर**—क्रिवि. १ मोकळ्या जागीं; उघड्या जागेंत, आंगणांत, चवाठ्यावर; राबत्याच्या जागीं. २ जाहीरपणें; प्रसिद्धपणें.

**उघराणी**—( बडोदें ) उगराणी पहा. ' उघराण्या वगैरे करून रकम वसूल करविण्याची योग्य ती तजवीज करतील.' –स्वारी नियम ३८. [ सं. उद्+ग्रहण; गु. उघराणी ]

**उघल**—स्त्री. ( कों. ) पहिली नांगरट; उखळ. ' जमीन उघल घ्यावयाचा नागर सुमार २॥ येकूण.' –मसाप २.१८०. [ उखळ ]

**उघळ**—स्त्री. १ उगळ; जात्यांत दाणे दळून झाल्यावर दळलें न गेल्यामुळें खुंट्याच्या मुळाशीं राहिलेलें धान्य, घांस. २ नवीन जात्यामध्यें प्रथम दळलेलें मूठभर धान्य. [सं. उद्+ग्रह् प्रा. उग्गाल]

**उघळणें**—उक्रि. १ जात्यांत राहिलेला घांस, उघळ काढणें. २ नवीन जात्यांत मूठभर धान्य दळणें. [ सं उद्+ग्रह् ]

**उघळणें**—उक्रि. उगाळणें; अतिशय बारीक पूड करणें. उगळणें पहा.

**उघाडणें**—सक्रि. उघडणें. ' कोणी मे निःपर्वसा । उघाडली वसंताची दिशा ।' –शिशु ८३६ [ सं उद्+घट् ]

**उघाड-डी**—स्त्री १ पर्जन्यकालांत कांहीं काळ पर्जन्य पडून थोडा वेळ तो थांबला आहे अशी स्थिति. उघडीक. २ उघडी जागा. 'पगारीसारखें उथळ भांडें घेऊन त्यांत चुन्याचें पाणी घालून उघाडीवर ठेवावें.' –मराठी ६ वें पुस्तक १६६. ३ परिस्फुटता; प्रगटपणा. ' मुलीला . कांहीं खोड होती आणि ती मग उघाडीस आली ' –मोर २०. [ उघड ]

**उघारणी, उघ्राणी**—(कों ) (बडोदें) उगराणी पहा. 'जीं पत्रें येत नसतील त्याजविषयीं उघ्राणी करावी.' –राजमहाल कारकून नियम ३.

**उघारणें**—उगारणें पहा.

**उंच**—वि. ( कुण. ) उच. १ भुईपासून किंवा उभें राहण्याच्या स्थानापासून आकाशांत पुष्कळ अंतरावर असणारा, पोंचणारा; उन्नत, उत्तुंग, उच्च. ' चंद्रमंडळापेक्षां सूर्यमंडळ उंच आहे.' २ श्रेष्ठ ( गुण, पदवी, किंमत यामध्यें ), वरिष्ठ पदवीचा, योग्यतेचा; ( चतुरस्रता, थोरपण, वगैरेसंबंधानें ); सन्मान्य. ' चातुर्यवीण उंच पदवी ।'- दा १४ ६ ७ उंचा, उंची पहा ३ (संगीत) वर चढणारा (तान, स्वर,) ऊर्ध्वगामी; तीव्र, वरपर्यंत गेलेला. ४ फारच उभट चढणीचा. ' असें झालेंया, कैलासावानी उच पहाडाच्या डोक्यावर पुरुस बसल्याती व्हयना !' –बाय २.२ ५ (राजा) खोल (विहीर, खांच, चर वगैरे ) ६ फार मौल्यवान्; किंमतवान. ' कष्ट करितां मत पिकें। उंच वस्त तत्काळ विकें ।' –दा १२.७.२५. [ सं. उच्च. हीब्रु उच्दन=टेकडी; फ्रें जि. चुच. ] ०**कपाळ्या**-वि. नशीबवान. ०**टाचा करून वागणें**-अमंगल, अपवित्र पदार्थावर पाऊल न पडावें म्हणून चवड्यावर चालणें. ( ल. ) गर्वानें वागणें; तोऱ्यांत असणें. ०**दरवाजा**-पु पुढील मोठा दरवाजा. ' उठल्या अबाई उंच दरवाजा लाविला ।' –ऐपो ६८. ०**दर्पण**-न. सूर्यकांत ' उंच दर्पणीं अग्नी निघतो ।' –दा १६.५.१९. ०**नाक**-प्रतिष्ठा; मान्यता; प्रौढी. ' उंच नाकें श्वशुरागारीं । वागे न ऐसें करावें ॥'–जै १७.६५. ०**नाक करून**-क्रिवि. १ प्रतिष्ठेनें, मान्यतेनें. २ निर्लज्जपणानें; बेशरमपणानें. ०**नीच**-क्रिवि.

१ खाली वर असे, खडबडीत; उंचसखल; उत्तमाधम. २ लहान-थोर; गरीबश्रीमंत. ' उंच नीच कांहीं नेणे भगवंत । ' –तुगा ३६९१. ०पट– न. चढण असलेला रस्ता; चढणीवरील जागा. –वि. किंचित् वर; थोडें उंचावर. म्ह०सात ताड उंच=अतिशय उंच.

**उंच**—क्रिवि. वर; हवेंत; उंचावर. [ सं. उच्च ]

**उचक**—वि. ( बडोदें ) ठोक; उक्ती; ठगविक; उचलून दिलेली (रक्कम). ' जमादारास दरमहा योग्य ती उचक रक्कम बांधून देण्याचें करावें. ' –चिटणीसाची माहिती २७.

**उचकटणें**—उक्रि. १ जोरानें बाहेर काढणें; उपटून काढणें; ओढणें; उसकटणें ( खिळा, आकण इ० ). २ नखानें वगैरे उकरणें; कुरतडणें; ओरबडणें. ३ बरी झालेली जखम पुन्हां उघडी करणें; जखमेची खपली काढणें ४ माखी बसलेली ( जमीन, केस, वस्त्राच्या चुण्या, तृणसमुदाय ) उखळणें, विस्कटणें, अस्ताव्यस्त करणें; जमीन, छप्पर उसकटणें. ५ (ल.) मिटलेला व्यवहार पुन्हां उपस्थित करणें; विसरलेली गोष्ट पुन्हां उकरून काढणें [ सं. उच्चाटन; म. उचकणें; किंवा उ+चिकटणें ]

**उचकटाउचकट**—स्त्री. घाईघाईनें ओढणें; ओरबडणें; उलगडणें, विसकटणें.

**उचकणें**—उक्रि. १ उपटणें, चोरणें; उचलेगिरी करणें; फसवून घेणें. ' स्त्री सुत बंधु पैका उचकी । ' –अमृत ११२. उचकटणें पहा. [ उचकटणें ] २ उचलणें ' नाहीं म्हणोनि उचकीन करें फुलाला ' –आक २५. [ सं. उच्च+कृ=उंच करणें ]

**उचकणें**—अक्रि. बुडविण्याच्या उद्देशानें दुसऱ्याजवळून कर्ज अथवा उधार माल घेणें; वाईट उद्देशानें उधारी करणें.

**उचकणें**—सक्रि. १ उपटून काढणें; समूळ वर काढणें. २ (ल.) उच्चाटण करणें; हांकून, फेंकून देणें [सं उत्खनन; उचखणें–उचकणें]

**उचकणें-नें**—न. (व) १ दाखला; उदाहरण. ' दुसऱ्याचें उचकणें मला कां देतोस ? ' २ टोमणा, छद्मी भाषण; हिणविणें. ( क्रि० देणें ). ' मला काय त्याचें उचकन देतां ! '

**उचकळ्याबुचकळ्या**—क्रिवि. १ बुडत्या माणसाच्या पाण्यांतल्या गटंगळ्या. (क्रि. देणें). –स्त्रीअव (ल.) उपजीविकेसाठीं धडपड; नशिबाचा बरावाईट फेरा. ( क्रि० देणें ) [ बुचकळ्या द्वि ]

**उचका**—स्त्री. द्रव्यादिक उपटण्याचा व्यापार, फसवेगिरी; खिसेकातरूपणा; दुकानचोरपणा; उचापत; उधारी, उमना, उधार माल. ( क्रि० घेणें; काढणें; करणें ). उचका या शब्दानें नेहमीं लबाडी ध्वनित होते. [ उचकणें ]

**उचका**—पु. १ काळजी, ध्यास, वेध यामुळें होणारा भास. स्वप्न. ( क्रि० येणें; लागणें; पडणें ) २ एखाद्या गोष्टीचें औत्सुक्य, कुतूहल; मनांत पक्कें बसलेलें भय किंवा धाक; चिंता; घोर, धोसरा. ( क्रि. धरणें; लागणें; बसणें. ) [ वचक ]

**उचकाउचक**—स्त्री. १ घाईनें, उतावीळपणानें ओढणें, हिसकणें. २ फसवून द्रव्यादिक उपटणें; उपटाउपट; लपवालपव; उचका पहा. ( क्रि. करणें; काढणें ).

**उचकाना**—वि. उंच कान असलेला. ' उचकाना फोंगडु. ' –भाए. ९.

**उचकी**—स्त्री. कंठामध्यें सशब्द असा आचका बसणें; गुचकी; आचकी; उंडकी; हिक्का. ( क्रि० येणें. ) ' उचकी उदानलिंगापासून येतसे जाणा । ' [ ध्व. उच्च् ? ] ०लागणें–(आजारी मनुष्यास) अत्यवस्थ होणें; शेवटल्या स्थितींत येणें; मरणोन्मुख होणें. 'उचकी लागली उसित गेला । पोट उसळलें उलाट आला । ' –दा ३.६.३३.

**उचक्या**—वि. १ उचल्या; चोर; भामटा; खिसेकापू; उपट्या; दुकानचोर. ०म्ह. बाजार भरला नाहीं तोंच उचक्यांनीं कमरा बांधिल्या. [ उचलणें; हि. उचक्का ] २ आपलें बळ, शक्ति, ऐपत न पाहतां हवेतसे, पाहिजे त्या अटीवर पैसे काढणारा; माल उधार खरेदी करणारा; भरमसाट कंत्राटें वगैरे घेणारा. [ उचकणें ]

**उंचखाल**—क्रिवि. उंचसखल; वरखालीं; खांचखळग्यामध्यें; खाचखळग्याची. –वि. विषम; नतोन्नत; खालींवर असणारी (जमीन.) [ उंच+खालीं ]

**उचंगणें**—अक्रि. ( कों. )धजावानें वाढणें; उफाड्यानें वाढणें; फोंफावणें; जोरानें वाढणें; लवकर वाढणें; पुष्ट होणें ( मूल, रोगी, जनावर. ) [ सं. उच्च+अंग ]

**उचट**—स्त्री. उचाट पहा.

**उंचट**—वि. १ उंच; चढावाची (जमीन), उभट, चढणीचा. २ किंचित उंच; वाढलेला. [ सं. उच्च+वत् ]

**उचटणें**—उक्रि. चिकटलेला, जोडलेला पदार्थ वर उचलून काढणें (तव्यावरील भाकरी, खिळे मारलेलें झाकण ), उचकटणें पहा. ' पत्र उचटिलें प्रयत्नें । ग्वाही करायाकारणें ॥ ' –तुगा ४१०४. [ सं. उच्चाटन ]

**उचटणें**—उचाटणें पहा.

**उचटणें**—न. उलथणें; कलथा; उचटण्याचें साधन. [ सं. उच्चाटन ]

**उचंडळणें**—उक्रि. हिसळणें; सांडणें; पातळ प्रवाही पदार्थ हलण्यानें ढवळून बाहेर पडणें, सांडणें. [ सं. उच्च+आंदोलन ]

**उचंबळ**—स्त्री. १ कांठोकांठ भरून येणें; नदी, तळीं इत्यादि कांठोकांठ भरून येण्याची स्थिति; भांड्याबाहेर सांडेइतकी भर, वाढ, फुग. ' काय पाण्याची उचंबळ चालली हो. ' २ ( गो.) तारांबळ. ' माझी उचंबळ झाली.' ०खाणें–उठून चळवळ करणें; पुनः-पुन्हां उठून गडबड करणें; एखादें काम अस्थिर वृत्तीनें चालू ठेवणें; विशेषतः पराभूत प्रतिपक्षानें पुन्हां वर डोकें काढणें या अर्थी योजतात. याच्या विरुद्ध पड खाणें. [ सं. उच्च+वलन ? ]

**उचंबळणें, उचमळणें, उचमणें**—अक्रि. १ वर येणें; भरून वाहण्याच्या स्थितीस येणें ( नद्या वगैरे ); डळमळणें; हेलकावणें. ' धडधडीत अंबर । उचंबळत सागर ॥ ' –ज्ञा. ११२९. (मामा.) वाढणें; माजणें. ' आतां रिता कुंभ समुद्रीं रिगे । तो उचंबळत भरोनि निगे ॥ ' –ज्ञा १७ १९. काम्य उचंबळे विषयाचे चाडे । तेंचि पडे निषिद्धीं । –एभा १०५०. २ आनंद वगैरे विकार मनांत न मावतां बाहेर पडणें. ' म्हणऊनि मीही तैसेंचि म्हणें । उचंबळला सांता । ' –ज्ञा ७.११७. ' येरी आनंदें उचंबळत। ' –उषा ९०४. ३ जोर करणें; उसळून वर येणें. ( पित्त ); पित्तानें मळमळणें; ओकारी वाटणें. [ सं. उच्च+वलन ? ]

**उचंबळा**—पु. १ उचंबळ; भरती; उकळी (हर्ष, आनंद यांची). २ ( ल. ) हर्ष; आनंद. [ उंचंबळणें ]

**उचमपचम**—न. १ विनाकारण दुसऱ्याच्या भानगडींत पडणें; उठाठेव; उपद्व्याप; उचापत. ( क्रि० करणें; उरकणें; पाहणें. ) २ रिकामे दोष काढणें; कुटाळी; कुचेष्टा. ३ खोट्या सबबी; टाळा टाळ; उडवाउडव. –क्रिवि. उठाठेव, उपद्व्याप करून; रिकामपणें; कुचेष्टेनें; टाळाटाळीनें; आढेवढे घेऊन. [ ध्व. ]

**उचल**—स्त्री. १ चाल; हल्ला; घाला. ( क्रि० करणें ). २ पुन्हां वर डोकें काढणें; पुन्हां जोरावणें, बळावणें ( आजार, शत्रु, गोंधळ इ. ). (क्रि० खाणें.) ३ उत्तेजन देणें; प्रवृत्त करणें; प्रोत्साहन देणें; मागें लागणें. ( देणें ) ४ पुन्हां उभें राहणें; जोडणें; स्थापना करणें; (कर्जबाजारी किंवा नादार इसम) स्थिरस्थावर होणें. ( घेणें ) ५ ( संघटित किंवा जोराचा प्रयत्न करून ) एखाद्याला वर उचलणें, आणणें. ६ ( वांटपामध्यें ) एखाद्याच्या हिश्शाला दिलेल्या ( विहीर किंवा एखादा हक्क ) वस्तूबद्दल मोबदला म्हणून दिलेला विशिष्ट जमिनीचा तुकडा. ७ आपल्या सावकारा – पेढी–कडून किंवा कोणाकडून वेळोवेळीं काढलेल्या, उचललेल्या रकमा. ( क्रि. उचलणें; फेडणें. ) ८ अशा रकमा उसन्या घेणें; उधारी. ( क्रि० करणें. ) ९ पैशाबद्दल तगादा लावणें, करणें, छळणें, नड लावणें. १० जागृति; चळवळ; उठावणी. ' सर्व प्रांतांत एकदम उचल झाली. ' –टिळकचरित्र ३.६.३. [सं. उत्+चल] **०चावडा–रा**–वि. उच्छृंखल; अविचारी; धंद्यांत मन नसलेला; लहरी; हुक्कीबाज: अस्थिर; चंचल; तऱ्हेवाईक; छांदिष्ट. **०चावडेपणा**–पुं. छांदिष्टपणा; लहरीपणा; चंचलबुद्धि. **०जागता**–( अर्वाचीन काव्य )–वि. ताजे-तवानें होण्या–करण्यासाठीं तयार; हुषारी आणणारा. ' उभीं झोंपर्ती झाडें, त्यांचा उचलजागता चाळा । ' –कृष्णाकाठीं कुंडल ( गोविंदाग्रज ). **०टप्पू**–वि. १ ( वाईट अर्थी ) उडाणटप्पू; भटकणारा; कोठेंहि स्थिर नसणारा. २ ( चांगल्या अर्थी ) वाटसरू; उपऱ्या; कायम वस्ती न करणारा; वस्तीकऱ्या; खुंटावरचा कावळा. **०पाखल**–क्रिवि. वरखालीं; ढवळाढवळ.

**उचलणी**—स्त्री. उठाव; उचल; वर करणें; उचलणें. [सं. उत्+चलन ]

**उचलणें**—अ.क्रि. १ वर येणें; वर येण्याचे प्रकार–( अ ) पित्त, पुरळ, फोड, गळवें वगैरे शरीरावर उठणें, उत्पन्न होणें. 'गळूं कालच उचललें. ' ( आ ) पाण्यावर लाटा, बुडबुडे उत्पन्न होणें. ' जैशा उचलती लहरीवरी लहरी ' –दा ११.९.१७. (इ) जमिनीवर वारुळें, भोमे, उंचवटे तयार होणें. (ई) सारवलेल्या जागेवर खरपुड्या, पोपडे येणें; 'वरचेवर सारवल्यानें जमीन लवकर उचलत नाहीं.' (उ) आकाशांत ढग येणें. ' तेथें प्रळये मेघ उचलले । कठिण घोषें गर्जिन्नले । '–दा १३.४.१४. २ वाढणें; लठ्ठ होणें; मोठें होणें. 'हा उकिरडा भारी लवकर उचलला ? ' ३ उठावणी करणें. ' म्हणे पांडवसैन्य उचललें । '–ज्ञा १.८८. ४ उंच होणें; वाढणें; अंकुर फुटून वर येणें. ' दोन दिवस पाऊस लागतांच झाडें उचललीं. ' ६ उचलून येणें; पोटांत अस्वस्थता वाटणें; ढवळणें; पित्त वर येणें; ओकारी येणें; मळमळणें. ' कालचे उपोषणामुळें क्षणोक्षणीं उचलतें. ' **उचलून जाणें–येणें**–वादाविषयीं, युद्धसंबंधीं आह्वान देणें; वाद उत्पन्न करणें, ओढून आणणें, सुरुवात करणें; चढाई करणें. ' जे झुंझावया उचलोनि आले असती. '–गीताचंद्रिका १.२२. **उचलून जाणें**–लग्नास, विवाहास वरपक्षाच्या ठिकाणीं वधूपक्षानें इष्टमित्र आणि सामान यासह जाणें. **उचलून बोलणें–गोष्ट सांगणें**–१ बढाई, बाता, झोकणें, मारणें. २ ताठ्यानें उठून बोलणें. ३ आपला दर्जा न ओळखतां बोलणें. [ सं. उच्चलन; सिं. उछिलणु ]

**उचलणें**—स.क्रि. १ वर करणें–धरणें; उठावणें. अंगीकारणें; स्वीकारणें; पत्करणें ( काम, भाग, भूमिका, प्रात ). २ हातीं घेणें; 'यंदां पैशाचें अळमटळम दिसतें आहे, नवें घर बांधावयाचें उचलूं नका ' ' लहानपणापासुन यानें संसार उचलला. ' ' पुढें मूर्तिपूजा हळुहळु आर्यांनींहि उचलली असें दिसतें.'–मसाप २.२.११६. ३ उत्तेजन देणें; उभा करणें; मनांत भरविणें; चेतविणें; चेव आणणें; इरेस पेटविणें (वाद, मूल, इ. विषयीं) 'त्याचे मनांत भाऊबंदांशीं आजच कजिया सांगावा असें नव्हतें परंतु लोकांनीं त्यास उचलला. ' ४ लांबविणें; चोरणें. ५ उचल करणें; रक्कम घेणें. **उचलून आपटणें**–वर उचलून खालीं टाकणें; मोठ्या जोरानें आपटणें; आदळणें. **उचलून देणें–१** ( तुळशी, बेलपत्रे वगैरे वस्तू हातांत घेऊन ) शपथ घेणें; कोणाच्या नांवानें ) संकल्प करणें. २ स्वसंतोषानें उक्ती रकम कोणेकास देणें; ३ वेगळें काढून देणें. ' तूं आमच्यांत जेवायला आलास तर कमें तरी भागवितां येईल. तुला बोर्डिंगांत रहावयासाठीं पांच रुपये उचलून देणें जड जाईल, वाटल्यास जेवणास ये. ' **उचलून धरणें–१** सतावून सोडणें; धरणें घेऊन बसणें; खणपटीस बसणें; तगादा लावणें; ओढून धरणें ( भिक्षेकरी वगैरेनीं. ) २ भारी अटी लादणें; जबर किंमत, व्याज मागणें ( सावकार वगैरेनीं ). ३ एखाद्याचा विशिष्ट

पक्ष स्वीकारणें; जबाबदारी पत्करणें; अभिमान बाळगणें; समर्थन करणें; आधार देणें. **म्ह०** उचलली जीभ लावली टाळयाला =विचार न करितां मनास येईल तें बोलणें; ताळतंत्र सोडून बोलणें.

**उचलतां-त्या पाई**—क्रिवि. अति त्वरेनें. 'तैसियां उचलतां पायीं धावती।' -शिशु ६८२. 'जावया निघाला त्वलाही। तंव शकुन जाहले दोही बाही। म्हणोनि आला उचलत्यापाई। द्वार केसी॥' -कथा ४.१६.२२. [उचलणें+पाय]

**उचलनी**—स्त्री. विकास; उत्थान. 'करी कमलांची उचलनी' -दाव १७९. [उचलणें]

**उचलपांगडी-बांगडी**—स्त्री. १ हातपाय धरून उचलणें; बलात्कारानें नेणें (लहान मुलांना शाळेंत नेण्यासाठीं प्रयोग). २ बलात्कारानें घालवून देणें; हकालपट्टी करणें; उच्चाटण. 'मुधोजीची उचलबांगडी होण्याचा वेळ आला होता.' -विवि ८.६ १११. [उचल+पांग-डी=कोळयाचें जाळें (हें मोठें असल्यास दोघे, चौघे उचलतात.)]

**उचलपुच्ची**—वि. एक शिवी. ज्याची वृहती उचललेली आहे असा. 'येसुचे छंद कशी उचलपुच्चाला दुशी.' -पला ८०. ब

**उचलमावंदें**—न. (व) उच्चाट; हकालपट्टी. 'तेथून लवकरच त्याचें उचलमावंदें झालें.' [उचल+मावंदें]

**उचलला**—वि. १ उचललेला; वर आलेला; निघालेला; सोडून चाललेला. 'उचललेया प्राणासरिसीं। इंद्रियेंही निगती जैसीं।' -ज्ञा १२.१०१. २ मर्जीनुरूप, इच्छेप्रमाणें मंजूर केलेला; नेमून दिलेला; ठराविक 'उचलला पगार, वेतन, शेर.' **०संसार**-पु. तुटपुंज्या प्राप्तीवर चाललेला संसार, कामधंदा, व्यापार. **०हात**-पु. स्वेच्छेनें द्यावयासाठीं पुढें केलेला हात; स्वसंतोषानें देणें. 'आईबाप मला जें उचलल्या हातानें देतील तें मी घेत असतों.' **उचललेलें काम**-न स्वखुषीनें पतकरलेलें काम; झेपेलसें पाहून घेतलेलें काम.

**उचलसांचल**—स्त्री. उचलाउचल पहा.

**उचला**—पु. (कों.) दुर्गा देवी किंवा इतर ग्रामदेवतेच्या देवळांत देवाजवळ एक दगड ठेविलेला असतो तो. कांहीं गोष्टींविषयीं देवाला प्रश्न करून तो उचलला असतां केव्हां जड येतो, केव्हां हलका येतो; त्यावरून त्या प्रश्नाचें उत्तर समजतें; कौलाचा दगड.

**उचलाउचल**—स्त्री. १ प्रापंचिक बिऱ्हाड वगैरेंचें स्थलांतर. २ अस्ताव्यस्त फेंकाफेंक; घाईनें जिनसा शोधणें, उलगडणें वगैरे; कोणी कांहीं उचलण्याचा व्यापार.

**उचलाऊ**—वि. (लुप्त.) उचलण्यास शक्य; उचलण्यालायक; उचलावासा वाटणारा. [उचलणें]

**उचलाठेवर**—स्त्री. (कों.) उचलणें व ठेवणें; पुन्हां पुन्हां उचलणें; उचलाउचल. [उचलणें+ठेवरणें=ठेवणें]

**उचलाव**—पु. चाल; उठाव; हल्ला; घाला. उचल अर्थ १ पहा. -शिदि ३४५. [उचलणें]

**उचलासांचल**—उचलाउचल पहा.

**उचलेगिरी**—स्त्री. भामटेगिरी; एखादी हातीं लागेल ती लहानसहान वस्तु हळूच पळवून नेण्याची, चोरण्याची क्रिया. 'सुधारणेचा जो नवा बाजार भरणार त्यांत उचलेगिरी करून कांहीं हातीं लागतें कां पहावें' -केले १.१४०. [उचल+फा. गारी]

**उंचलो**—वि. (गो.) वरचा. [सं. उच्च]

**उचल्या**—पु. १ भामटा; खिसेकापू; चोरांचा एक प्रकार; किरकोळ चोरी करणारा; पुण्याकडे यांना भामटे म्हणतात. 'मैंद उचले खाणोरी। सुवर्णपंथी भुरेकरी।' -दा ३.७.४९. **म्ह०** 'बाजार भरला नाहीं तोंच उचल्यांनीं कमरा बांधल्या. - वि. थोडा काळ एके ठिकाणीं राहणारा; उपरी; उचलटप्पू पहा. [उचलणें]

**उंचवट**—वि. १ किंचित उंच. २ थोडा चढ असलेला; उंचावर असलेला; याच्या उलट बसकट. [सं. उच्च+वर्ती]

**उंचवटा-ळा**—पु. उंच भाग; टेकाड; उंचाड; टेंब. २ अंगावरील, एखाद्या वस्तूवरील उंच भाग; टेंगूळ. ३ सपाट पृष्ठभागावरचा थोडा उंच भाग; ओटा. 'तो उंचवटा देखिला। नितल नीट.' -ऋ ७२.

**उंचवणें**—अक्रि. उंच असणें.

**उंचशिरा**—वि. ज्याचें शिर उंच आहे असा; उंच बांधणीचा; चांगला उंच. 'चौथा मजला उंचशिरा करी बहार आकासीं।' -प्रला ९५. [उंच+शिर]

**उंचश्रवा**—पु. उच्चैःश्रवा; इंद्राचा घोडा. 'उंचश्रवा न सवरेची.' -उषा १६७९. [सं. उच्चैःश्रवस्]

**उंचसखल**—वि. उंच व खालीं; उंचवट व बदखल; चढ उतार असलेली; खडबडीत; विषम (स्थल) [उंच+सखल]

**उंचा**—वि. १ उच्च प्रकारचा; महत्त्वाचा; अधिक योग्यतेचा; नामी; गुणानें श्रेष्ठ असा. 'नीचिये कुळींचा उंचा वंद्य होय।' -तुगा २४२०. २ अधिक मौल्यवान; महाग. उंच अर्थ ६ पहा. [सं. उच्च]

**उचाट**—पु. १ कंटाळा; उद्वेग; नाखुषी; तिटकारा. (क्रि० घेणें; खाणें). २ ध्यास; नाद; उत्कंठा; घाई; अधीरपणा; अत्यौत्सुक्य; एखादी गोष्ट करण्याचें कामीं भर. (क्रि० भरणें; खाणें). ३ खासगी लिलावानें विक्री. [सं. उच्चाटन; हिं. उचाट]

**उचाटणें**—सक्रि. तिरस्कार, वीट येणें; कंटाळा येणें; तिटकारा येणें; मन उडणें. [सं. उच्चाटन]

**उचाटा**—पु. १ (नाट्य.) मुखवटे तयार करण्याकरितां केलेला ठसा, आकृति; पौराणिक नाटकांतील गणपती आदिकरून मुखवटयांसाठीं मातीची आकृति प्रथम करून तिच्यावर कागदाचे थर

चिकटवून जी आकृति काढून घेतात त्या आकृतीस उचाटा म्हणतात. जसें—गणपतीचा, नारसिंहाचा उचाटा. २ (मुद्रण) ज्यांतून ठसे (टाईप) गाळले जातात तो सांचा. (इं.) मेट्रिस. [सं. उच्चट्]

**उंचाड**—न. १ उंचवटयाची जागा; लहान टेकडी; चढणीची जागा; टेंब; टेकाड. –वि. २ उंच; उन्नत; तुंग; भव्य. उंचवट पहा. [सं. उच्च]

**उचापत**—स्त्री. १ माल उधार विकत घेणें; उधारी; उसणवट. 'वाण्याची उचापत देऊं कशानें मी आतां।' –पला ८०. म्ह० उचापतीचें पोतें, सवा हात रितें. २ उधार माल; पतीवर आणलेला माल. 'उमिणें उचापत कां देतील.' –दावि ३०१. ३ कोणाकडून वेळोवेळीं काढलेली रक्कम; उचल. अर्थ ७–८ पहा. ४ (सामा.) कर्ज. 'झाली शुद्ध उचापत प्रभुवरें केली बिदागी दहा।' –राला १४. ५ उठाठेव; नसती उलाढाल; भानगड; विकत भांडण. [सं. उद्+आपत्] ०खाऊ–वि. उधारीवर उपजीविका करणारा. ०खाणें–१ चांगली गोष्ट घडून येईल–पुढें कांहीं-तरी मिळेल–या आशेवर चैन करणें. २ दुसऱ्याचें विकत भांडण घेणें; भांडण ओढून घेणें; विकत श्राद्ध घेणें; लष्करच्या भाकरी भाजणें. ०विचापत–स्त्री. उचापत द्वि. पहा. **उचापतीचा रोजगार–व्यवहार**–पु. उधारीचा उसनवटीचा, केवळ पतीवर व्यवहार. याच्या उलट रोकडीचा व्यवहार. [हिं. उचापट]

**उचापती–त्या**—वि. १ उठाठेवी करणारा. २ उधार घेणारा व देणारा. [उचापत]

**उंचापुरा**—वि. सुदृढ; भव्य; पूर्ण वाढलेला. 'हें स्थित्यंतर युद्धकलेंत अलीकडे झाल्यामुळें... उंचापुरा जवान आणि पिळदार पोरहि सारखेंच' –नि ९७१. [सं. उच्च+पूर्ण]

**उंचाफेर**—पु घोडयाची एक प्रकारची चाल. –अश्वप १९८. [उंच+फेर]

**उचारापाचार**—पु. दृष्ट लागून येणारें, नवीन किंवा उलटणारें दुखणें. (क्रि० करणें, होणें). [पाचारा=पाचावा; पांचवा द्वि.]

**उचारापाचार**—पु. दुसऱ्याच्या खाजगी गोष्टी लोकांत सांगणें; बकबकणें; मुखरस पाघळणें. (क्रि० करणें). [सं. उच्चार द्वि.]

**उचारापाचार**—पु. (चुकीनें) उधारपाधारबद्दल वापरतात.

**उचाल, उचाल जाणें**—उच्छाल, उच्छाल जाणें पहा.

**उंचावणी**—स्त्री. १ उठावणी. 'करोनि शब्दांची उंचावणी। मग लेंचु खंडिला तिसा नाणी।' –ऋपु. २.४५.३३. २ (ल.) गौरव; मोठेपणा. [सं. उच्चय; प्रा. उच्चाव]

**उंचावणें**—अक्रि. १ उंच होणें; वाढणें. 'एथ उंचावे तेणें नाम। नैमित्तिक होय।' –ज्ञा १८.११४. २ वक्षस्थल उन्नत होणें. ३ उंच जाणें, उडणें; भरारी मारणें. ४ (ल.) सुस्थिति प्राप्त होणें; उत्कर्ष होणें. –सक्रि. १ चढविणें; वर उचलणें; उठविणें; उंची वाढवणें; वर करणें. 'शेष धावला तत्क्षणा। उंचावूनि फणा।' –कृष्णाचा पाळणा १०. २ मोठेपणा आणणें. 'आम्हां मानवांतें उंचावीती मातें।' –टिळक कविता १३५.

**उचित**—वि. १ देशकाल, लोक, शास्त्र, रीति इत्यादिकांना अनुसरून केलेलें; योग्य, लायक, जुळणारें, साजणारें; बरोबर; चांगलें. 'प्रमाण न म्हणों जरी उचित मानिसी नीचतें।' –केका ३. २ सवयीचें; अभ्यासांतलें. –न. १ योग्यपणा; योग्यता. 'मिळा म्हणे जागा आपुल्या उचिता।' –निगा २३३. 'देवाचें जें मनोगत। तेंचि आपुलें उचित।' –दा ४.८.२२. २ (व.) पारितोषिक; बक्षीस; देणगी. 'भाटानें उचितीं वारितु। घोडेयांचा स्कंदु थापटीतु।' –शिशु ५२१. 'द्रुपदें गौरविले उचितीं।' –मुआदि ४५.९६. –वशाप ५०.२८३. [सं. वच्] ०ज्ञ–वि. उचित, अनुचित ज्यास समजतें तो; व्यवहारज्ञ; शहाणा; चतुर; माहितगार **उचितास येणें**–योग्यतेनुरूप उचित वाटणें; पसंत पडणें; योग्य दिसणें; बरोबर वाटणें.

**उचिष्ट**—उच्छिष्ट पहा. 'बहुतांचें उचिष्ट अंगीकारी' –दा २.१.६०. [सं. उच्छिष्ट]

**उंची**—स्त्री. १ पदार्थाच्या खालच्या भागापासुन वरच्या भागापर्यंतच्या व्याप्तीचें प्रमाण, माप; तळापासून शेंड्यापर्यंतचें प्रमाण. २ (राजा) (विहीर वगैरेची) खोली. –वि अधिक चांगला; सरस; श्रेष्ठ; जास्त किंमतीचा. उंचा पहा. 'महाराष्ट्रांत ही एकच उंची संस्था होती.' –केले १.२९८ [सं. उच्च; सिं. ऊंचो]

**उंची**—क्रिअ. (राजा) वर; उंचीवर; शेंड्यावर; कळसावर; उपरि. 'पर्जन्यकाळीं मीठ चुलीउंची ठेवावें म्हणजे पाघळत नाहीं.' [सं. उच्च]

**उंची देणें**—क्रि. (व.) हरभऱ्याच्या झाडावर चढविणें. हुरळावयास लावणें; चढविणें; गर्वानें फुगविणें; भर देणें.

**उंचीदौड**—स्त्री. घोडयाची एक चाल. –अश्वप १८८.

**उंचीव**—स्त्री. उंची; उंचपणा. 'उंचिवे जैसा प्रचंड ताळ. –मुसभा ८.३८. [उंच]

**उंचून**—क्रिअ. वरून; उंचावरून; शेंडयावरून; डोक्यावरून. (क्रि० वाढणें; टाकणें). [उंच]

**उचेट**—स्त्री. कोंदणांतून खडा काढल्यानंतर उचकटून काढलेलें सोनें, रुपें इ० [सं. उच्चाटन; म. उचटणें]

**उंचेला**—वि. उंच; उंच असलेला; उन्नत; उत्तुंग; उंचसा; (गो.) उचोलो. [सं. उच्च; म. उंच]

**उचोटा**—उंचवटा पहा.

**उच्च**—न. १ केंद्रस्थ सूर्यापासून अति दूर असणारा ग्रहकक्षेतील बिंदु; सूर्योच्च. २ ज्या राशीमध्यें विशिष्ट ग्रह बलवान् असतो ती रास; जसें–सूर्य मेष राशींत, चंद्र वृषभ राशींत, बुध कन्या राशींत, शुक्र तूळ राशींत असल्यास त्यास उच्च मानतात. –वि. उंच; भव्य; श्रेष्ठ, उच्च प्रदेशावरील; उच्च जातीय; उच्चासनस्थित इ० 'उच्चा तेआं खर्जुरी पोफळी।' –दाव १३५. [सं.] ०**नीच भाव**–पु. एक मोठा व एक लहान अशी भावना; द्विधा, द्वैतभाव. ०**पदस्थ**–वि. मोठ्या अधिकाऱ्याच्या, सन्मानाच्या जागीं असलेला. ०**शिक्षण**–न. विश्वविद्यालयीन (युनिव्हर्सिटीचें) शिक्षण; कॉलेजांतील शिक्षण. ०**स्वर**–(विरु.) चढा आवाज; मोठा, स्पष्ट आवाज; तीव्र स्वर; वरचा सूर; तार सप्तकांतील आवाज.

**उच्च दिवाण**—वि. (गो.) खुळा, मूर्ख; दीड शहाणा. [का. हुच्चा=खुळा+फा. दिवाण]

**उच्चलन, उच्चालन**—न. १ उंच करणें, धरणें; उचलणें. २ उच्चाटन; हकालपट्टी. [सं. उत्+चल]

**उच्चाट**—पु.आतुरता, उत्कंठा उचाट अर्थ २ पहा. 'माझिया हा मनें घेतला उच्चाट। पहावें वैकुंठ पंढरी हे॥' –ब ३४६.

**उच्चाट**—पु. उचल्या; भामटा. [सं. उच्चाटन]

**उच्चाटण-न**—न. १ मंत्राच्या साहाय्यानें मनुष्यास स्वतःचें घरदार, नोकरी, उद्योग यांविषयीं तिटकारा उत्पन्न करून त्यास तें सोडावयास लावणें; जादूटोणा करून वेडापिसा करणें. २ जादूटोणा; मंत्रप्रयोग. ३ हकालपट्टी; उचलबांगडी, उखडणें; घालवून देणें; उलथून पाडणें; दूर करणे. [सं. उच्चाटन]

**उच्चाटणें**—उच्चाटण करणें.

**उच्चातिउच्च**—वि. श्रेष्ठांत श्रेष्ठ. 'तुमच्या मतें तुमचीं अनन्योपभोग्य सुधारणेचीं उच्चातिउच्च जीं तत्त्वें आहेत.' –टि. ४.७९. [सं. उच्च+अतिउच्च]

**उच्चार-ण**—पु.न. वार्णापासून वर्णात्मक शब्दाची होणारी स्पष्टता किंवा त्यास अनुकूल असा व्यापार; बोलण्याची क्रिया, पद्धति; बोलणें; बोलून दाखविणें; भाषा; बोल. [सं. उत्+चर्]

**उच्चारणीय**—वि. सांगण्याजोगा; बोलून दाखविण्याजोगा. [सं.]

**उच्चारणें**—उक्रि. उच्चार करणें; तोंडांतून काढणें; बोलणें; बोलून दाखविणें; स्पष्ट सांगणें. [सं. उत्+चर्; उच्चारण]

**उच्चारित**—वि. उच्चारलेलें, बोललेलें; सांगितलेलें; उद्गारलेलें. [सं.]

**उच्चार्य**—वि. उच्चारणीय, बोलण्यालायक; सांगण्याजोगें. [सं.] ०**माण**–वि. उच्चार होत असलेला.

**उच्चालक**—पु. (यंत्र.) तरफ; जड पदार्थ उचलण्याकरितां योजलेला लांब दांडा. (इं.) लिव्हर. [सं. उत्+चल्]

**उच्चावच**—वि. लहानमोठा; उच्चनीच. 'ये लोकीं उच्चावचें जाण। देवासि समान निजभावें।' –एभा २७.३४०. 'सर्वत्र उच्चावच भेद आहे।' –सारुह ४.१३. [सं. उच्च+अवच]

**उच्चावणें**—अक्रि. मोठा होणें. उंचावणें पहा. 'तपस्तेजें बहु तोचि उच्चावला.' –उचिय ४. [सं. उच्च; प्रा. उच्चाव]

**उच्ची**—स्त्री. (ना.) एखाद्यास वर चढवून त्याची केलेली फजिती. ०**पट्टी**–स्त्री. फजिती, उच्ची. **उच्चीस येणें**–(स्तुति केल्यामुळें) चढून जाणें; बनणें. [का हुच्चु=मूर्खपणा]

**उच्चैर्घोष**—पु. मोठ्यानें जयघोष; आकांडतांडव; उदोउदो. 'स्त्री सुधारणा व स्त्रीशिक्षण यांच्या महातत्त्वांचा उच्चैर्घोष करणारांनी ही गोष्ट अवश्य ध्यानांत ठेविली पाहिजे.' –टि ४.८१. [सं. उच्चै+घोष]

**उच्चैःश्रवा**—पु. मोठ्यानें ऐकूं येणारा क्षीरसमुद्रांतून निघालेला इंद्राचा घोडा (चौदा रत्नांपैकीं एक) 'तुरंगजाना प्रसिद्ध आंत उच्चैःश्रवा मी।' –ज्ञा १०.२३७ [सं.]

**उच्छलन**—न. १ उच्चलन पहा २ उसळी [सं. उच्चल]

**उच्छव**—उत्सव पहा

**उच्छलिंध्र**—न. भूमिछत्र अळंब पहा. 'उच्छलिंध्र आणि पूर्णचंद्र। वत्सपदके समुद्र।' –ऋ ८१ [सं उच्छलींध्र]

**उच्छाई**—वि. उत्साही पहा 'मागता सत्कारानिया मन उच्छाई।' –होला ४०.

**उच्छाद**—पु. १ उपद्रव, त्रास, पीडा, सतावणूक, गांजणूक; पुरेपुरेसें करणें. (क्रि० देणें). २ लुटालूट, जुलूम (चोर, दरोडेखोरांचा); खोड्या (मुलांच्या.) (क्रि० आणणें; करणें; मांडणें). ३ उपद्रव झालेली स्थिति; त्रस्तता. [सं उत्सादन] ०**काढणें**–त्रास सोसणें. 'या मुलांचा उच्छाद मी काढू तरी किती!' ०**येणें**–त्रासणें; कंटाळणें; पीडीत होणें 'या भिगामस्तीनें मला उच्छाद आला आहे!'

**उच्छाप**—पु. शापाची निवृत्ति; शापावर तोड, उपाय, इलाज; याकरितां असणारा वर. [सं उत्+शाप]

**उच्छाल**—पु. वाढ, चढ, बढती; उत्कर्ष. ०**जाणें**–१ सतापणें; एखाद्यावर रागावून उठणें २ उडी मारणें (घोडा वगैरेंनीं.) [उत्+चल्]

**उच्छा(त्सा)व**—पु. उत्सव पहा. 'मंगलोत्साव वाग्देवते। तां वदावें रसाल कथे। श्रोतया वक्तयाचे माथे। आनंदें डोलवी।' –वेसीस्व. १.६.

**उच्छास्त्र**—वि शास्त्राविरुद्ध; शास्त्र मोडून (भाषण, वर्तन). [सं. उत्+शास्त्र]

**उच्छिन्न**—वि. पूर्णपणें नाश पावलेलें; नष्ट झालेलें. [सं उद्+छिद्]

**उच्छिष्ट**—वि. १ अवशेष राहिलेलें; उरलेलें (पदार्थ); उष्टें. 'पडिलिये ठायीं उच्छिष्ट मेवावें.' –तुगा ६३२. २ (ल.) उपभुक्त; वापरलेलें (वस्त्र, पुष्प, स्त्री, इ०). ३ उष्टें; शिळें; नवीन नसणारें; उसनें घेतलेलें. –न. उष्टीं पात्रें; उष्टें; उच्छिष्टान्न. 'उच्छिष्टें काढी धर्माघरीं। ब्राह्मणाची भीड थोरी।' –एरुस्व २.२६. [सं. उत्+शिष्ट] ०कल्पना–स्त्री. दुसऱ्यानें अगोदर व्यक्त केलेली कल्पना; शिळा, नावीन्य नसलेला विचार. ०चांडाळी–स्त्री. एक क्षुद्र देवता. हिला प्रसन्न करण्याकरितां दोन जेवणांच्या मधील कालांत भाकरीचा तुकडा दाढेंत ठेवण्याचा एक विधि. 'कर्णपिशाच भगिनी। उच्छिष्टचांडाळी रानसटवी जखणी। वेताळ मुंज्या काळरजनी। भजिजे जनीं अतिप्रीती।' –ह १३.६८. ०भाषण–श्लोक–वाक्य–न.पु. पूर्वी दुसऱ्यानें म्हटलेलें कवन अगर भाषण; वाङ्मयचौर्य.

**उच्छिष्टणें**—उक्रि. उष्टें करणें, अर्धवट–कांहीं काळ–भोगून टाकून देणें; जुनें–शिळें करून टाकणें. 'येरू म्हणे गा उच्छिष्टलें। होमद्रव्य नेणती॥'

**उच्छृंखल**—वि १ ताबा, दाब नसलेला; उतावळा; अविचारी; अविवेकी; अनियमित; गैरशिस्त 'हें उच्छृंखल बोलणें कायसें।' –ज्ञा ६.१६२. २ शास्त्र, राजा, वडील इत्यादिकांस न मानतां वागणारा; उद्दाम; स्वच्छंद; स्वैर; स्वेच्छाचारी. 'राहटे उच्छृंखलु। तयापरी॥' –ज्ञा १८.६६९. [सं. उत्+शृंखला=सांखळी]

**उच्छेद**—न पु १ समूळ नाश; नायनाट; विध्वंस; खंड. २ त्रासदायक कृत्य (शैथिल्यानें उच्छाद बद्दल). 'उच्छेद तो असे हा गे आरंभला। रोकडें विठ्ठला परचक्र' –तुगा ६४७. [सं. उत्+छिद्=तोडणें] ०आणणें–मांडणें–त्रास देणें. सामाशब्द–धर्मोच्छेद; वंशोच्छेद; भृत्युच्छेद; वनोच्छेद; कुलोच्छेद; गृहोच्छेद. ०क–वि. नाहींसें करणारा; नायनाट करणारा; त्रास देणारा; बुडविणारा; निर्दलन करणारा.

**उच्छेदणें**—उक्रि. नाश करणें; नाहींसे करणें; उध्वस्त करणें; फडशा, सप्पा, नायनाट करणें.

**उच्छेदित**—वि. उच्छेद केलेला, नाश केलेला; उध्वस्त केलेला. [सं.]

**उच्छ्वास**—पु. १ नाकांतून आंत घेतलेली हवा पुन्हा बाहेर सोडणें; बाहेर सोडलेला श्वास; (विशेषतः) जोरानें श्वास टाकणें; सुस्कारा. २ हवा जाण्याकरितां ठेविलेलें भोंक; वायुमार्ग; श्वासरंध्र ३ पाण्याचा नहर: नळ; उश्वास. ४ (विरू.) उस्वास. उचावरून आणलेल्या पाण्याची उंची कायम रहावी व पाणी दूर अंतरावर नेतां यावें व आंतील दूषित हवा बाहेर जावी म्हणून बांधलेला हौद. 'नाना फडणिसांनीं बांधलेले पुष्कळ उछ्वास आहेत.' –अस्तंभा ३. [सं.]

**उच्छ्वासन**—न. श्वास सोडणें; श्वासोच्छ्वास करण्याचा व्यापार. उच्छ्वास अर्थ १ पहा. [सं.]

**उछक**—वि. स्वैर. 'उछक आणि सहिष्ण। तोचि आत्मा।' –दा १३.१.१७. उच्छृंखल पहा.

**उंछवृत्ति**—स्त्री. १ शेत कापून नेल्यावर राहिलेले दाणे टिपून त्यावर निर्वाह करणें. रस्ता, बाजार इ. ठिकाणीं पडलेले धान्याचे कण वेंचून त्यांवर निर्वाह करणें. 'ऐक त्याचें जीविकावर्तन। शिल कां उंछवृत्ती जाण।' –एभा १७.४१४. –पु. अशा प्रकारें निर्वाह करणारा उंछवृत्तीनें राहणारा तपस्वी. [सं.]

**उछह**—पु. उत्साह पहा. 'समर्थे रामनौमी उछह केले।' –सप्र ४.९.

**उछाडपछाड**—उखाडपछाड पहा.

**उछाव–ह**—पु. उत्साह पहा. 'वेणीस्वामी रघुनंदन। ताटिका मारिती उछाह।' –वेसीस्व ११९.

**उछिष्ट**—उच्छिष्ट पहा. 'पुढें न शिवावें म्हणोनि उछिष्टा॥' –दावि २०.

**उछेद**—पु. उच्छेद पहा. 'ब्रह्मवृत्तीचा उछेद। जीवमात्रास देणें खेद॥' –दा २.६.१९.

**उछेदणें**—उच्छेदणें पहा. 'मत्सरें यासी मिथ्या म्हणती। तरी अवघेचि ग्रंथ उछेदती। नाना ग्रंथांच्या समती। भगवद्वाक्यें॥' –दा १.१.१७. 'देवां भक्तांस उछेदी॥' –दा ३.३.७.

**उजखुरा–खोरा**—वि. उजव्या हातानें काम करणारा; याच्या उलट डावखोरा. [सं. ऋजु; प्रा. उज्जु+फा. खुर्दन्; उजवा+खोर]

**उजंग**—पु. सुस्थिति; सुखाचा काळ. 'देशपांड्यांच्या घराला केव्हां उजंग पडेल तो पडो.' [सं. ऋजु+अंग; उजु+अंग]

**उजगरा–गारा–गिरा**—पु. १ (प्र.) उजागरा. जागरण; निजावयास उशीर. 'आझूंई उजगरा किती। कराल तुम्हीं॥' –शिशु २२२. 'थोडे तुज घरी होती उजगरे। देउळासी कां रे मरसी जातां॥ -तुगा २९९३. २ (ल.) दुःख; श्रम; त्रास; कंटाळा. 'आपुला घेवोनिया चारा॥ मग पेटती महामारा। तेणें होतसे उजगरा। ऋषीश्वरासी।' –कथा ८.१४.१२५. सामान्यतः उजागरा पहा. ३ जागृति, आठवण. (क्रि० करणें; देणें.) [सं. उत्+जागृ, उज्जागरक; प्रा. उज्जगरय]

**उजगारी**—स्त्री. उत्कर्ष; प्रसिद्धि; लौकिक; भरभराट; वाढ. उजागरी पहा. 'तितक्या उजगारीस ती (आमची भाषा) कधीं तरी पोंचेल कीं नाहीं याचा संशय आहे.' –नि २०१. [सं. उत्+जागृ]

**उजड, उजडणी–णें–तां**—उजेड पहा.

**उजदार**—न. पुढलें दार; पुढचा दरवाजा. 'निरविल तें मग निजात्म स्वसुखें येशिल उजदारा' –देप ६५. [सं. ऋजु+द्वार=उजु+दार–उजदार]

**उजदार**—वि. (गो.) प्रकाशमान. 'उजदार दिसत अशें कर' [सं. उद्योत; प्रा. उज्जोअ+दार प्रत्यय]

**उजम**—पु. थोरवी; श्रेष्ठता. 'हे आपले सर्काराच्या गोष्टी उजमाच्या सांगतात.' –दिमरा १.१७. [अर. इज़्म किंवा उज़्म= श्रेष्ठता, वैभव]

**उजर-रा**—पु. (व) तक्रार; हरकत; आक्षेप; बचाव 'पुढें तुम्हीं जिवंत असला तरी तुमचा कोणताच उजर ऐकला जाणार नाहीं.' 'त्यांची स्थावर जंगम इस्टेट इन्साफावांचून, त्यांचा उजरा ऐक ल्यावांचून, महाराजांच्या हुकमानें सरकारांत घेतली' –विक्षिप्त ३.१०२. [अर. उज़्र् =सबब]

**उजर**—पु. उत्कर्ष. [सं. ऊर्ज्]

**उजरणें**—उक्रि. १ चकाकित करणें; स्पष्ट करणें; उठावदार करणें; स्वच्छ करणें; ठळक करणें (रेषा, आकृति, खूण छाप). २ पुन्हां उच्चारून पक्कें करणें; उजळणी करणें; दृढ करणें; (पुन:पुन: उच्चार, प्रयोग इ० योगें अभ्यास, आज्ञा, शोध). [सं. उज्ज्वलन; म. उजळणें]

**उजरणें**—उक्रि. १ दुरुस्त, डागडुजी करणें. २ मारलेले खिळे नीट करणें; सरळ बसविणें, करणें; पोचे आलेलें भांडें नीट करणें; गोलाकार घडणें (लोखंडी काम). 'मी भक्तिवश न चुकलों त्या कुब्जेच्याहि वपुसि उजराया।' –मोशांति ७ ४७. [सं ऋजु+कृ]

**उजरणें**—अक्रि १ उत्कर्ष होणें. २ शक्ति परत येणें, सुधारणें; मूळच्या स्थितीवर परत येणें; हुषारी, तजेला येणें, टवटवीत होणें (प्रकृति सुधारून). ३ मंद बुद्धीच्या मनुष्याची प्रगति होणें; बुद्धीचा विकास होणें; त्याला जास्त करूं लागणें. 'सांग हित सुज्ञ गुरु तूं आहेशि समर्थ याशि उजराया।' –मोवन १ ५२. [सं. ऊर्ज्]

**उजरा**—पु. १ प्रगट मार्ग; रीत; 'अनादि सिद्ध उजरा।' –ज्ञा १६.२७१. २ प्रसिद्धि; उजगरा पहा. [सं. उत्+जागृ]

**उजराम-ऱ्हामत**—अज्राम-ऱ्हामत पहा.

**उजरावणें**—उक्रि. (गो.) स्वच्छ करणें (मासळी); उजरणें पहा. [सं. उज्ज्वलन; ऋजु+कृ; उजु+कृ]

**उजरिया**—स्पष्टीकरण; विवेचन; उपपत्ति. 'तंव उजरिया केले दैवाचिआ ??ते परिसा पां।' –ऋ १०. 'सर्व सिद्धांताचिया उजरिया। सांडूनियां निदसुरिया।' –अमृ ५.३९. उजरी अर्थ २ पहा. [सं. उज्ज्वलन]

**उजरी**—स्त्री. तेज; प्रकाश; प्रभा. 'प्रभेची जैसी उजरी। ते सोहंवृत्ति अवधारीं।' –ज्ञा १४.३९१. २ स्पष्टपणा; स्वच्छता; विवरण. 'पगी प्रमेयाची उजरी।'–ज्ञा १८.५५. ३ उत्कर्ष; उदय; उजळा; 'तुका म्हणे कई भाग्याची उजरी। होईल पंढरी देखावया।' –तुगा ५५८; 'असो याचि प्रकारें स्त्रियांचे शरिरीं। अनुक्रमें होय वृद्धीची उजरी।'–स्वानु ३.२.९. ४ व्यवस्थितपणा. 'तैसी आहारनिद्रेची उजरी।'–ज्ञा १३.७६७. –वि. १ स्पष्ट; उघड. 'जालया कामा नाहीं चोरी। तें कळतें होय उजरी।' –ज्ञा १८.४३. [सं. उज्ज्वलन]

**उजरी**—वि. सरळ. 'परि ते भजती उजरी नव्हे। विषम पडे।' –ज्ञा ९ ३४५. [सं. ऋजु]

**उजरी**—स्त्री. सहाय्य; सामर्थ्य; आश्रय. 'वल्लभाचिया उंजरिया। आपणया पति कुळिया। जोडोनि तोषिती जैसिया। अहंवपणें' –ज्ञा १६.३७७. [सं. ऊर्ज्=शक्ति; पोषण]

**उजवट**—वि. उजळ; गोरा. 'नवऱ्यापरीस नवरी उजवट, सोन्याचे तुला गोट साळूबाई.' [सं. उज्ज्वल]

**उजवट-ड, उजवाड**—पु. (गो.) उजेड; प्रकाश. 'करतेल्याच्या तोंडाक उजवाड पडलो.' =करणाऱ्याच्या तोंडाचा प्रकाश पडला. [सं. उज्ज्वल]

**उजवण-णी-णूक**—स्त्री. ऊर्जितदशा (भूमि, शस्त्र, मनुष्य, इ० कांस). [सं. ऊर्ज्]

**उजवण**—स्त्री १ समाप्ति, शेवट, अखेर; बोळवण. 'जेथें कृष्णकीर्ति कीर्तन। तेथें कर्माकर्माची उजवण। होय संसाराची बोळवण। जन्ममरणसमवेत।' –एभा ३०.४०. २ साफल्य. 'आजि आयुष्या उजवण जाहली।' –ज्ञा १०.१८७. ३ लग्न, मुंज इत्यादि संस्कार अवश्य ते धार्मिक विधि; (विशेषत) विवाह 'पुत्रांस नोवऱ्या आल्या। आतां उजवणा केल्या। पाहिजेत कीं।' –दा ३.४.७. [सं. उद्यापन; प्रा. उज्जा (ज्ज) वण]

**उजवणें**—अक्रि. १ विहित क्रमाप्रमाणें समाप्त होणें, पारपडणें; यथासांग तडीस जाणें (नेम, विधि, धर्मकृत्य). सफल होणें; सुपरिणामी होणें. 'मग म्हणे गा प्रज्ञाकांता। उजवली आजि वक्तृत्वता।' –ज्ञा १४ ६३. २ स्वतःचा विवाह इत्यादि संस्कार होणें, 'नुजवेचि करूंहणें बोलें। आंगा आठुवर पण आलें।'–शिशु २०८. [सं. उद्यापन; प्रा. उज्जावण=उजवणें]

**उजवणें**—अक्रि. १ आपत्ति, रोग इत्यादींतून निभावून जाणें, पार पडणें. २ चांगला निघणें, निवळणें [सं ऊर्ज्]

**उजवरा**—पु. स्पष्टार्थ. उजरी पहा. 'तये नामाचा उजवरा। धुंडूनि भक्षी चराचरा। म्हणोनिया गा नरेंद्रा। ढुंढानामा।' –कथा ६.१९.१३.

**उजवा-वी-वें**—वि. १ दक्षिणचा, उजवीकडचा, डावा याच्या उलट; दक्षिण. २ सरस 'मुलापेक्षां, म्हणे मुलगी उजवी.' ३ सरळ. [सं. ऋजु] **०हात**–पु ज्यावर अवलंबून आहे असा, पूर्ण विश्वासांतला मनुष्य; अव्वल मदतनीस; निकट सहकारी 'इतकें झाल्यावर सोकरजी ऑलबॉश साहेबांचा अगदीं उजवा हात बनला.' –भयंकर दिव्य. **उजवी गुढी देणें**–संमति देणें; कबूल करणें; परवानगी देणें. गुढी पहा. **०घालणें**–उजवीकडे राहील अशा तऱ्हेनें भोंवती फिरणें; प्रदक्षिणा करणें. 'विनयें पुसोनि उजवें घालुनि तें त्या सुरापगातनया।' –मोशांति ७.८१. 'उजवा घालितां अवनि देश.' –मोस्त्री ६.३७, 'देवाला उजवें घालून येतें.' 'गाईला

उजवी घाल.' ०बाजू–स्त्री. १ राजसभेंत उजव्या बाजूस बसलेली मंडळी; मोठे मानकरी लोक २ विश्वासुक, अतिशय उपयुक्त असा राजेलोकांचा उजवा हात असलेला माणूस. **उजवी डावी देणें**–होय–नाहीं स्पष्ट म्हणणें; होकार किंवा नकार देणें. **उजवी देणें**–१ उजव्या बाजूकडे जाऊं देणें. २ मूर्तीच्या अंगाला लावलेले तांदूळ, फुलें वगैरेंपैकीं उजव्या बाजूकडील खालीं पडणें; कौल देणें. ३ संमति देणें; होकार देणें. ०जाणें–उजवीकडून जाणें.

**उजवाडणें**—अक्रि. (गो.) सूर्योदय होणें. 'उजवाडलें आतां गोरांक पसरीक सोड.' [उज्ज्वलन]

**उजवात**—स्त्री. (गो.) उदबत्ती. 'आज उजवात देवासमोर लाव.' [ऊद+वात]

**उजवारणें**—क्रि (राजा) रोगांतून बरें होणें. उजवणें पहा. [सं. ऊर्जन]

**उजविणें**—सक्रि. १ समाप्त करणें, उद्यापन करणें; पार पाडणें; पुरे करणें. संपविणें. 'अविनय‍र्भचप्रतिज्ञा उजवुनि गुरुभक्तिचा रस त्यजुनि।' –मोकर्ण १.१७ 'जें जें व्रत धरावें। त्यातें उजवावें तत्त्वतां।' –गुच ३२.३६. २ सुपरिणामी करणें. 'धन्य इहीं उजविला धनुर्वेद।' –मोकर्ण १०.१२. ३ विवाहादि संस्कार करणें. उजवूं किती होतील पोरें।' –तुगा २९.४९. 'दिवसेंदिवस खर्चे 'वाढला। यावा होता तो खुंटोनि गेला। कन्या उपवरी जाहल्या त्याला। उजवावया द्रव्य नाहीं॥' –दा ३.४.३. **उजवून घेणें**–लग्न लावून घेणें 'कन्या नृपाची उजवून घ्यावी.' –सारुह ७.९१. **दोहो अंगीं उजविणें**–लग्नामध्यें दोन्हीं पक्षाकडील खर्च करून लग्नकार्य पार पाडणें [सं. उद्यापन; प्रा. उज्जावण]

**उजविणें**—सक्रि. १ व्यवस्थितपणें करणें; उत्कर्ष करणें; प्रगति करणें. 'ती आपला संसार उजवीत नाहीं हें तर ठरलें.' –निचं ९. ५६. २ सजविणें; विभूषित करणें. 'चित्रें काढून चौक उजविले.' –ऐपो २११. [सं. ऊर्ज्]

**उजळ**—वि. १ चकचकीत; सतेज; जिल्हई दिलेली (धातु); स्वच्छ; पांढरा; निर्मळ. २ गोरा, सुंदर, सतेज (चेहरा). ३ फळ पिकतांना रंग बदलून जी सतेजता येते तशा प्रकारचें (पेरू, केळें इ० फळ). ४ शुद्ध वर्तनाचे; राबत्यांत येण्याजोगे. 'उजळ लोकांपैकीं निवडण्याचें धोरण असावें' –जव्हेरखानानियम ९. [सं. उज्ज्वल; प्रा. उज्जल; गु. उजळु, सि. उजल; हिं. उजल] ०टिक्या–वि. फासोळीवर पांढरे ठिपके असणारा (घोडा). ०ठक–पु. १ संभावित भामटा; राजरोस भामटेगिरी करणारा. २ बाहेरून भपकेदार परंतु कवडीमोल वस्तु, आंतून सरळपणा नाहीं असा माणूस. ०तोंड–माथा होणें–अपवाद, आरोपापासून मुक्त होणें; दोषमुक्त होणें; कालिमा जाणें. ०माथ्यानें हिंडणें–राजरोसपणें वावरणें, वागणें; न लाजतां वागणें.

**उजळणी, उजळणूक**—स्त्री. १ चकचकीत करणें; स्वच्छपणा करणें; उजळा, जिल्हई देणें; पाणी देणें. २ आवृत्ति; धूळाक्षरांचें लेखन व पाठांतर. ३ (गणित) पाढे, सवाकी, दिडकी, अडीचकी, औटकी, शेर, मण, टांक, आणे वगैरे हिशेबाचा भाग; हा भाग तयार करणें. ४ (ल.) खूप शिव्या देणें. (क्रि० करणें). [सं. उज्ज्वलन; प्रा. उज्जलण; म. उजळण–णी]

**उजळणें**—सक्रि १ चकचकीत करणें; जिल्हई देणें; घांसणें; निर्मळ, स्वच्छ करणें. २ दिवे लावणें; मशाल पेटविणें; प्रकाश करणें; पेटविणें; पेट देणें. 'जैसा मालवलिया दिवा। प्रभेसि जाय पांडवा। मग उजळिजे तथ तेधवा। तैसाचि फांके॥' –ज्ञा १५. ३६९. ३ प्रकाशित करणें. 'दंत तेजें उजळोनी दिशा। हांसोनि म्हणे।'–मुआदि २२.८८. ४ स्पष्ट करणें; सुलभ करणें. 'विरक्तें परमार्थ उजळावा.' –दा २.९.१२ ५ उजळणी, आवृत्ति करणें. 'पाठ उदंडचि असावें। सर्वकाळ उजळीत जावें।' –दा १८.३.१९. –अक्रि. १ गोरें होणें; सतेज होणें; सुंदर होणें. 'क्रमेंच तीचीं उजळेच अंगें।' –सारुह २.५३ 'उजळेना ना काळवंडेना।' –दा १३. २.२२. २ पाडास आलेले आंबे इ० सुंदर रंगयुक्त होणें, उजळ होणें. 'कापुरवेलीची चोखडी। उजळिली परीवडी।' –ऋ ८४. ३ (उष्णादि विकारानें लाल झालेला डोळा, अंधारी रात्र) निवळणें. ४ प्रकाशित होणें 'जैसें त्रैलोक्य दिसे उजळलें।' –ज्ञा १.३९. 'उजळल्या दाही दिशा.' –तुगा ६७८ [सं. उज्ज्वलन; प्रा. उज्जळण; सिं. ओजारणु]

**उजळपाजळ**—वि. स्वच्छ सतेज, चकचकीत; लखलखीत; तेजदार; लखपख (वस्त्र. पात्र इ) [उजळ द्वि.]

**उजळा**—पु. १ तकाकी; चकाकी; लकाकी (घांसून, पुसून येणारी). २ जिल्हई; मुलामा (सोन्याचांदीचा). (क्रि० देणें). 'तैसीं चंपककुसुमें उजळा दिधलें तसेंचि गे स्वर्ण' –कमं ९२. ३ जिल्हई देण्याचा पदार्थ, उ० वाळू, तुरटी, सोरा, इ० ४ (सोनारी) सोरमीठ, नवसागर, मोरचूत, पोटॅशियम सायनाईड यांचें मिश्रण (हें मिश्रण डाग लावलेल्या जिनसास तो डाग सोन्यासारखा पिवळा दिसावा म्हणून उजळा देण्यासाठीं तयार करतात). –वि. चकचकीत; शुद्ध पांढरा; उजळ पहा. [सं उज्ज्वल; प्रा. उज्जल; सि. उज्लाई]

**उजळाई**—स्त्री. जिल्हई देण्याची अगर घांसण्याची क्रिया; किंवा तिची मजुरी.

**उजागर–रा**—क्रिवि उघडपणें, सर्व समाजासमोर; जगासमोर; अगदीं प्रसिद्धपणें. –वि १ निर्भय; धीट. २ (व.) (उप.) संभावित; एखादें काम करून न केलें असे दाखविणारा. 'चोरी करून रामा उजागरच दिसतो.' –पु. १ जाग्रण; जागेपणा; जागृतावस्था. (क्रि० पडणें; होणें; घडणें). २ उजळमाथा; निर्भयता; धीटपणा;

शूरपणा; धिटाई; धडाडी. 'तें पुस्तक माझेंच मग त्यापासून मागून घ्यायचा मला उजागरा नाहीं काय?' ३ आठवण. ४ सावधपणा; सावधानता. [ सं. उत+जागृ; उज्जागर; गु. उज्जागरो ]

**उजागरी, उजागिरी**—स्त्री. १ निर्भयता; मोकळीक; उघडीक; उघडपणें एखादी गोष्ट करण्यास मोकळीक; उघड व्यवहार. 'तो तुमचा दंबेल होऊन तुम्हास पाहील तेव्हां त्याला मेल्याचा पाड चढेल आणि तुम्हाला उजागरी होईल' –बाळ २.१८९. [ सं. ऊर्ज् ] २ निर्लज्जपणा. धीटपणा; धृष्टता ( तृतीया विभक्तींत प्रयोग ). 'नित्य पतिदेखतां, भोगितां उजागरीनें मजा।' –प्रला २२५. ३ प्रसिद्धि; षट्कर्णी होणें. ४ दुर्लौकिक; बोभाटा. [ सं. उज्जागर ]

**उजागरीस आणणें**—क्रि. परिस्फुटता करणें; उघडकीस आणणें; प्रसिद्धीस आणणें. [ उजागर ]

**उजागरीस येणें**—क्रि. उघड होणें; उघडकीस येणें.

**उजागीर**—वि. १ निर्लज्ज; बेशरम; जनलज्जा नसलेला. २ धीट; निर्भय. 'ती पोरगी फारच उजागीर आहे.' ३ ज्यास विवक्षित कर्म प्रसिद्धपणें करण्यास मोकळीक झाली आहे असा; उजळमाथ्याचा. ४ उघड; जाहीर. [ सं. उत +जागृ ]

**उजाड**—वि. निर्जन; ओसाड; वस्तीरहित; निर्मनुष्य; उध्वस्त; वैराण ( गांव, मुलूख इ० ). 'व्यापाराच्या उत्कर्षामुळें कित्येक शहरांत लोकसंख्या अतिशय वाढली होती, तर उलट कित्येक गांवांतून वस्ती अजीबात उठल्यासारखी होऊन ते गांव उजाड झाले होते' –पार्लमेंट ३४. [ सं उत+ज्वल् ]

**उजाडणें**—उजेडणें पहा.

**उजाडतां**—उजेडतां पहा.

**उजाडी**—स्त्री. ओसाडपणा; उध्वस्तता; निर्जनस्थिति; उजाडपणा. [ उजाड ]

**उजान**—क्रिवि. ( व. ) पुन्हां; आणखी.

**उजाला**—पु. ( हि. ) चकचकाट, प्रकाश, दिवा. 'चवतर्फी लाविले गलासे जिकडे तिकडे उजाले।' –पला २७. [ सं. उज्ज्वल ]

**उजाळ-ळू-ळें**—पुन. १ तेज; प्रकाश; उजेड. 'उजाळु चंद्रादित्यमंडळा॥' –ज्ञा ११.२१२ 'बालसूर्याचेनि उजाळें। तैसी कवळें टाचांचीं॥' –एरुस्व १.३१ 'स्वामी पैल येक उजाळे पर्वतातळीं वाटलें।' –सप्र १५.२१. २ पांढरेपणा; स्वच्छपणा; उजळपणा. ३ शुद्धता, कीर्ति, नांवलौकिक. 'माझिया कुळाचा उजाळू॥' –ज्ञा १६.३५८. –वि. पांढरें; स्वच्छ. उजळ पहा. उजाळ द्युति मार्दव।' –अमृ ५.३. [ सं. उज्ज्वल ]

**उजिडणें**—अक्रि. वेगळें होणें. 'जीवु प्रकृती पासोनि उजिडे। जेणें भवबंध बिघडे' –दाव ३३८. [ सं. उज्झ्=टाकून देणें ]

**उजिती**—स्त्री. आगटी. 'प्रळयाग्नीची उजिती। आंबुखलीं जैसीं' –ज्ञा ११.३४२. [ सं. उद्+द्युत=पेटणें; प्रकाशणें; प्रा. उज्जुअ ]

**उजितें**—न. ज्वलन; पेट; पेटण्याची क्रिया. 'तै विझोनि जाय उजितें। अग्नीचें जेव्हां।' –ज्ञा ८.२१३. [ सं. उद्योत ]

**उजियड-येड**—पु. उजेड पहा. 'पडिलेआ भवतमी निबिडें। जिया प्रतिभवी उजियेडें।'–ऋ २. 'परि श्रीनिवृत्तिदीपउजियेडें। देखेन मी॥' –ज्ञा ६.३२. 'तेणें उजियड पाहता गा।' –दावि ४९९. [ उजेड पहा ]

**उजियेरी**—स्त्री. सादृश्य. 'जरि पाहतां उजियेरी न जोडे। ते व्हेळि मांडिएली।' –ऋ ३९. [ सं. ऋजु ]

**उजिरा**—पु. प्रकाश; तेज; उदय. उजरा पहा. [ सं. उत्+ज्वल्; ऊर्ज् ]

**उजिवड-डु-डें**—पुन. प्रकाश; उजेड पहा. 'दिवा जो उजिवडु। तो घराचाचि सुरवाडु।' -अमृ १०.४. 'ऐसेनि येणे निवाडें। जयाच्या जीवीं उजिवडे।' –ज्ञा १३.१०८२.

**उजिवडणें**—अक्रि. १ उजाडणें; प्रकाशमान होणें. २ ( ल. ) भासणें. 'तैसें लटिकें येणें रूढे। जड येणें उजिवडे।'–अमृ २.३५. 'जयाच्या जीवीं उजिवडे।' –ज्ञा १३.१०८२. [ उजाडणें ]

**उजिवण**—स्त्री. साफल्य; सार्थक; उजवण पहा. [ सं. उद्यापन; प्रा. उज्जावण ]

**उजीयडा**—पु. उजियड, उजेड पहा. 'आपणा वसतिला उजीयडा॥' –विवि ८.३.५९.

**उजीर**—वि. सरळ. उजू पहा. [ सं. ऋजु ] ०**पण**–न. सरलत्व; सरळपणा.

**उजु-जू**—वि. १ सरळ; वांकडें नव्हे असें; समसूत्रानुवर्ती ( रेषा, मार्ग इ. ). 'तो उजु हातिएरूं। धरो नेणे॥' –शिशु ८९५. २ नीट; योग्य; अनुकूल; सीधा ( स्वभावाचा ). 'किंवा जैसें तें चातक। मेघां उजु करितां घोक।' –स्वादि १.२.८२. ३ सरळ; चांगलें; सन्मार्गवर्ति. 'ऋषीश्वरामि पडलें सांकडें। कीं उजू करितां जाहलें वांकडें। –कथा ६.५.६९. 'स्वैरिणीचें पाऊल उजू म्हणून चुकूनहि पडायचेंच नाहीं.' –नि ७८९. ४ बरोबर; प्रमाणशीर; सरळ येणारें; योग्य; यथान्याय. 'उजु हिशेबाचे जे पैसे ते आम्ही देऊं.' –कोरकि २८०. ५ छक्केपंजे, ध्वन्यर्थ, वक्रोक्ति वगैरे नसलेलें; सहज; सोपें; सुबोध; सहज समजण्यासारखें ( भाषण, वाक्य, कविता इ० ). ६ प्रामाणिक; न्याय्य; निःपक्षपाती. [ सं. ऋजु; प्रा. उज्जु; जिप्सी उजो ] ०**करणें**–बदवून कामाला योग्य करणें; पेटविणें ( बैल. ) –शअ. समोर; कडे. 'तंवं तो धारासिपे तिरवटें। डोळेआं उजूं॥' –शिशु ७११. 'मग आवेशें पसरी मुख। ऊर्ध्वा

उजु ॥ ' –ज्ञा ६.२२८. ' उभा राहिला जानकी उजू । ' –कृमुरा १०.१२. ' वीर पाहाती आकाश उजु । तों येतां देखिला तेजःपुंजु । जो ब्रह्मयाचा आत्मजु । नामें विख्यात नारद ॥ ' –जै ५१. १५. –क्रिवि. १ सरळपणें; बरोबर; नीट रीतीनें. २ योग्य बाजूस, दिशेस, मार्गास. ' रथियाउजू पार्थ वीर । भिमें लक्षिले गजभार ॥ '

**उजुं–जूं, उजु–जू–क**—क्रिवि. ( कुण. ) अजून; पुन्हां; आणखी; माकल्यान. उजान पहा ' रामा येतो म्हणाला पण उजुक आला नाहीं. ' [ हिं. अजो; म. अजून ]

**उजुकार**—पु. सरळ रीत, मार्ग; सीधा मार्ग; सरळपणा. ' एकु षटचक्राचेनि उजुकारें. ' –दाव १५१. [ सं. ऋजु+कृ ]

**उजुवाट**—स्त्री. सरळ, लांब रस्ता; उजुकार. ' घाटु टेंकुळिआं तेंचि दशन। उजुवाट तेंचि रसना ॥ ' –दाव ९७. [ सं. ऋजु+वर्ति ]

**उजुवाडु**—पु. उजेड; प्रकाश. ' सरैल उपरा प्रतिरात्री दिनु। सकळै दिशा उजुवाडु होउनु। ' –ख्रिपु. २.४४.१९४. [ सं. उज्ज्वल ]

**उजू**—स्त्री. उजूर या अर्थी चुकीनें वापरतात. ' कुळाची उजू न करतां रुपये देईन. '

**उजू**—न. ( नमाजापूर्वीचें ) हस्तपादप्रक्षालन. [ अर. वुजूह= चेहेरे, वझ्=चेहरा याचें अव. ] **०तवाजू**–स्त्री. नमाज; प्रार्थना. ' तों अब्दुल अली दुराणी जुमा मशिदीस येऊन आपला स्वधर्म उजू–तवाजू करीत होता. ' –भाब.२७.५२. [ अर. वुझू+तवाझुअ= नम्रता ] **०नमाज**–पु. प्रार्थना. ' याजबद्दल पांच वख्त उजूनमाज करून इलाही नजीक रावसाहेबांचे हकामध्यें दुवा याद करीत आहों. ' –रा १.६३. [ अर. वुझू+नमाझ्=प्रार्थना ]

**उजू, उजूबुजू**—स्त्री. आदर; मान; मर्यादा; सन्मान. ( क्रि० ठेवणें; राहणें; उडणें ). [ अर. वुझू ]

**उजूर**—पु. अरुता, आक्षेप पहा. १ सबब; सबब सांगण्याचा हक्क. ' देव मजूर देव मजूर । नाहीं उजूर सेवेपुढें ॥ ' –तुगा ३७००. ' बायकोला नवऱ्यापुढें उजूर नाहीं. ' २ तक्रार; आक्षेप. ' उजूर असेल तरी हुजूर एणें. ' –रा १५.१५९. ' नाहि उजूर आपल्याविशीं रे जिवलगा । ' –प्रला १२८. ३ अडथळा; विलंब; आक्षेप अर्थ ४ पहा. ' सेवकास आज्ञा होईल त्या आज्ञेस उजूर नाहीं. ' –रा १०.२२६. ४ हक्क; अधिकार; वाजवी काम. ५ खोळंबून रहाणें; विचार करणें; वर पाहणें. अरुता अर्थ २ पहा. ' महिना भरल्यावर माझा उजूर न धरितां तुम्ही गहाण विकून ऐवज घ्यावा. ' ' कुळाचा उजूर न धरितां मी खुदनिसबत फडशा करून देईन. ' [ अर. उझ्र्=बहाणा ]

**उजूरुजु**— क्रि.वि. ( गो. ) रुजवात करून; वजावून ' त्येकां पैशे उजुरुजु करून दिले मूं. ' [ अर. रुजू=परत पाहणें द्वि. उजू ]

**उजूहातीं**—क्रिवि. सरळपणानें; भानगड न करतां; ऐन जिनसीं. [ उजू+हात ]

**उजेड**—पु. १ प्रकाश. ' दाही दिशा उजेड । ' –मुआदि १९. १९४. २ प्रकाश देणारी, पाडणारी वस्तु; दिवा. ' अंधार पडला कांहीं उजेड संगें घ्या. ' [ सं. उज्ज्वल किंवा उद्योत; प्रा. उज्जोअ; अथवा सं. उदयित–उजइड–उजेड. –भाअ १८३२. ] **०पाडणें–लावणें–करणें**–१ ( उप. ) अपकीर्तिरूप कृत्यें करणें. ' म्हणती भावानें उजेड केला । कीर्तिध्वज उभारिला । ' –नव १८.३९. २ शतकृत्य करणें. ' आम्ही तर हात टेकले! आतां तुम्ही काय उजेड पाडतां पाहूं. ' कांहीं समानार्थी वाक्प्रचार –मशाल पाजळणें, लावणें; टेंभा पाजळणें; नगाऱ्यावर टिपरू टाकणें, वाजविणें; दिवसां मशाल लावणें; वेचाळीस पिढ्या अथवा कुळें उद्धरणें; वडिलांचें नांव गाजविणें. **०पडणें–होणें**–१ प्रकाश पडणें. २ ( उप. ) अपकीर्ति होणें; छीः थूः होणें.

**उजेडणी**—स्त्री. ( कों. ) चूड; ताड, माड वगैरेंच्या सावळ्या एकत्र करून सईलशा बांधून उजेडासाठीं पेटवितात ती; टेंभा. [ उजेड ]

**उजेडणें, उजाडणें**—अक्रि. प्रभात होणें; सूर्योदय होणें. २ कार्यारंभ होणें. ३ अनुकूल काळ प्राप्त होणें; वेळ येणें; सुयोग येणें. ४ स्पष्ट होणें. ' म्हणोनि हें उजेडे । ' –दा ६.६.२२. [ सं. उद्योतन; प्रा, उज्जोअण; उज्ज्वलन ]

**उजेडतां–क्षणीं, उजाडतां–क्षणीं**—क्रिवि. अगदीं पहाटे; दिसूं लागतांच.

**उजेडता काळ**—पु. १ उजाडावयाची वेळ; संधिप्रकाशाचा समय. २ ( ल. ) भावी भाग्याची प्रभात; चांगले दिवस येण्याचा समय. [ उजेड ]

**उजेडाचा माणूस**—( उप. ) चलाख, पराक्रमी माणूस हा शब्दशः अर्थ; परंतु ध्वनि उलट होतो. [ उजेड ]

**उजेरणें**—उ.क्रि. ( राजा ) १ साफ करणें; गाळ, घाण वगैरे काढणें ( पाटांतील ) २ एखाद्याचा विद्येंत प्रवेश करून देणें; शिक्षित करणें. ३ ( सामा. ) उजरणें पहा. [ उजळणें ]

**उजो**—पु. ( गो. कु. ) विस्तव; आग. [ सं. उद्योत; प्रा. उज्जोअ ]

**उज्ज, उज्जन**—पु. ( शाप. ) वातावरणांतील एक वायु; हा अतिशय हलका व त्वरित पेट घेणारा आहे. हा वायु पाण्यांतील मुख्य घटक आहे. (इं.) हायड्रोजन [सं.] **०गंधकिद**–पु. एक वायु. याची फार दुर्गंधि सुटते. धातूच्या गंधकिदावर अम्ल ओतलें म्हणजे हा उत्पन्न होतो. ( इं. ) हायड्रोजनसल्फाइड. **०प्राणिद**–( इं. ) हायड्रोऑक्साइड; हायड्रोनाइड. **उज्जित**–( इं. ) हायड्रेट. **उज्जिद**–हायड्राइड.

**उज्जनचलनी**—न. उज्जैन येथें चालणारें; उज्जयिनी येथील शिंदेशाई नाणें. –पया ४६९ [ उज्जैन+चलन ]

**उज्जीवन**—न. १ जागृति; प्रगटता; प्रगट होणें. ' जें उज्जीवन जहालें । ज्ञानाग्नीचें । ' –ज्ञा ४.१३३. २ चेतना; उत्तेजन. ' तैसें

रायभोग समृद्धि। उज्जीवन नोहें जीवबुद्धि।' –ज्ञा २.६८. ३ भोगसाधन. –हंको. [ सं. उत्+जीव्–जीवन ]

**उज्झड**—वि. उद्धट; दांडगेश्वर; उर्मट. [ सं. उत्+झट्; उद्धत; हिं. उज्झड=गांवढळ ]

**उज्झित**—वि. टाकलेलें; सोडलेलें; त्यक्त. [ सं. उज्झ्=सोडणें ]

**उज्वड**—पु. ( कों. ) उजवाड पहा.

**उज्वल**—वि. १ सतेज; चकचकीत; प्रकाशमान. २ स्वच्छ; शुद्ध; पवित्र; उजळ पहा. [ सं. उत्+ ज्वल् ]

**उज्वलन**—न. १ जळण्याची, प्रकाशित होण्याची क्रिया; पेटविणें. २ तजेला, जिल्हई देण्याची, स्वच्छ करण्याची क्रिया; चकचकीत करणें. [ सं. ]

**उज्वलित**—वि. १ पेटविलेला. २ प्रकाशित केलेला; जिल्हई दिलेला. ३ प्रकाशमान; तेजःपुंज. [ सं. ]

**उज्वाड्ट्यार**—क्रि.वि. ( गो. ) पहांटस. [ उजेड ]

**उज्वाड**—पु. ( गो. ) उजेड; प्रकाश. 'उज्वाडाक हडप' =प्रकाशांत आणणें; प्रसिद्ध करणें. [ उजेड ]

**उझहलज**—स्त्री. ( चंद्रपुरी ) बाहेरील दरवाजाला लागून आंतील दोन बाजूस असलेली बैठक; देवडी. [ उज्झ्+लग ? ]

**उट**—स्त्री. हुटहुट; कटकट. –शर ( तुगा. ई. ७९. ) [ध्व]

**उट**—स्त्री. चाकाला प्रतिबंध करण्यासाठीं लावलेली उटी; ऊट; टेंकू; दगड. [ उटणें ]

**उट**—पु. ऊत पहा ०**उतरणें**–रंग जिरविणें; नक्षा उतरणें.

**उंट**—पु. ( कुण. ) उट. १ ( सैन्यादिसंबंधीं ) ओझें वहाणें इत्यादि उपयोगी एक पशु. अरबस्तानासारख्या वाळवंटाच्या प्रदेशांत उंट असतात व तेथें त्यांच्याशिवाय दुसरें कोणतेंहि जनावर वाहतुकीला उपयोगी नसतें. २ बुद्धिबळाच्या खेळांतील एक मोहरें. याची गति सर्व बाजूंनीं तिरपी असते व तिची मर्यादा पगाच्या अखेरपर्यंत असते. [ सं. उष्ट्र; अवेस्ता उश्त्र; तुल फा. शुतुर; प्रा. उट्ट ] **उंटावरचा-शहाणा**-मूर्खपणाची मसलत देणारा. ( रांजणांत रेडकाचें डोकें अडकलें असतां एका उंटावर बसून जाणाऱ्यानें प्रथम आंत येण्याकरितां घराची भिंत पाडण्यास सांगून नंतर रेडकाची मान कापून मग रांजण फोडावा अशी सल्ला दिली या गोष्टीवरून ). 'तिसरे एक उंटावरील असें विचारतात' –टि ४४१. **उंटावरून शेळ्या हांकणें**–अतिशय आळस किंवा हलगर्जीपणा करणें. **उंटावर बसून दक्षिण दिशेस जाणें**–एक अपशकुन; दुश्चिन्ह. 'घेऊनि उष्ट्रयानीं बैसुनि दक्षिण दिशेसि जाताहे।' –मोउद्योग १०.१७१. **उंटाचे बोथे**–न शिकविलेले उंटाचे बच्चे.

**उटंक**—वि. उतरणीची; उंचवटयाची; खडकाळ ( जमीन ) 'स्थिर होय सखोल भूमिके। थेंबु न राहे उटंके। जाय निरसोनि।' विपू. १.८२. [ सं. उत्+टंक=उतरण, उत्+स्था; प्रा. उंठ ]

**उटकटारी, उंटकटारी**—स्त्री. एक वनस्पति; उताटी; कांटेचुबुक; हिची पानें कोपरे कातरल्यासारखीं असुन पृष्ठभागीं सफेत रंगाचे कांटे असतात. डांग्या खोकल्यावर याची मुळी लहान मुलांच्या गळ्यांत बांधतात. सर्प, विंचू यांच्या विषावर हिचें मूळ उगाळून लेप देतात. मुळास ब्रह्मदंडी म्हणतात. ही उंटास प्रिय असते. [ सं. उत्कट; गु. उटकटो; हि. उटकटाव ]

**उटकणें**—उक्रि. उच्चाटन होणें; वेगळें पाडणें, होणें; दूर करणें. 'सर्वारंभा उटकलें।' –ज्ञा १४.३६६. [ सं. उत्+टंक्=बांधणें; उत्+टंक्=खरडणें; म. ऊठ करणें ? ]

**उटकण**—न. १ दूर होणें. २ अवर्षण. –शर.

**उटकर-ळ**—स्त्री. उठकळ पहा. –वि. हलणारा; डळमळणारा; सैल; खिळखिळीत झालेला (दगड). [ सं. उत्थ+कृ; प्रा. उठ्ठक्क; म. उठकर ]

**उटकळी**—स्त्री. ( राजा. ) तोंड येणें; तोंडांत खरे, पुटकळ्या येणें.

**उटक्कर**—वि. उर्मट; मग्रूर; उद्धट. ( क्रि० येणें. ) [ सं. उट्=मारणें, पाडणें ]

**उटंगणी**—स्त्री. एक वनस्पति. –मुंव्या ११२ [ ? ]

**उटंगर-ळ**—न. १ उंचवटा; लहान टेकडी; टेंब. २ शरीरावर असलेलें आवाळू; गलंड; टेंगूळ. ३ एखादी जड वस्तु लोटून नेतांना खालीं जो दगड लावितात तो. –वि. १ वर खालीं झालेला; उंचसखल; उच्चनीच; खडबडीत; डळमळीत. २ उटंगळें असणारा ( प्राणी, जमीन ). [ सं. उत् + स्था +गल्; प्रा. उट्ठगल ] –क्रिवि. उंचसखलपणानें.

**उटज**—न. पर्णकुटी; झोंपडी; पर्णशाळा. [ सं. उट=गवत, पानें+जन्–उटेभ्यो जायते इति ]

**उटणें**—न. १ अंगास लावण्यासाठीं केलेला अंगजा इ. सुगंधी पदार्थ; उटी. 'उटणें लावूनि घातलें स्नान.'–कमं ५७. 'कां सुर्याचिया आंगा उटणें। लागत असे॥' –ज्ञा १०.१०. २ उटी; उटणें अंगाला लावणें, माखणें; मर्दन. [ सं. उद्वर्तन; का. ऊटणे= अंगाला तेल, लेप लावणें ]

**उटणें**—उक्रि. १ माखणें; चोपडणें; लावणें; चर्चिणें. 'श्रीमहादेवो कापुरें उटिला॥' –ज्ञा ११.२२२. 'हळदी भीनली हेमकळा। तेणें उटिलें मुखकमळा।' –एरुस्व ७.३४. 'भीमकी सुकुमार गोमटी। कृष्णा इसीं हळुचि उटीं।' –एरुस्व १६.८७. २ ( राख, माती इ.नीं भांडें वगैरे ) घांसुन साफ करणें. 'हां हो उटोनिया आरिसा।' –ज्ञा ११.१५७. 'कापुरासी काय लावुनी उटावें। काय ओवाळावें दीपकासी॥' –तुगा ४४२३. 'अन् भांडीं उटाया गेलों होतों.' –सागो प्र. १. १. ३ धुणें. 'वृद्ध परंपरा ऐसी आहे। वरचरण उटी

वोहमाये । ' -एरुस्व १४.८९. ' मग तें मंगळरूप पाऊलें । ते सुमेघेनें उटिलें ॥ ' वेसीस्व ९.२९. ' क्षणभंगुर जाउनी दुःख मायीक लोटलें । वदन उटिलें । रोमांच आंगीं उठले ॥ ' -पला ४५. [ सं. उद्वर्तन; हिं. उवटन; गु. उटणु; सिं. उवटणु; का. उटणी-णें ]

**उटन**—न. ( खा. ) घांसण्याची क्रिया. [ उटणें ]

**उटंबर-रा**—उटंगर पहा.

**उंटमान्या**—वि. उंटासारखी ज्याची मान आहे असा; विशोभित; उंटाड. [ उंट+मान ]

**उंटवान**—पु. ( हिं. ) उंट हाकणारा; सारवान. [ म. उंट+सं. वत् प्रत्यय ]

**उटा**—पु. चाकाची गति खुंटविण्यासाठीं चाकाखालीं ठेवलेला दगड; अटकण. ( क्रि. देणें ). ऊट पहा.

**उटाउटीं**—क्रिवि. ( प्र. ) उठाउठीं; तत्काल. ' गौरजानु पयोधरकटी । अवलोकितां उटाउटीं ॥ धैर्य पळालें वारा वाटीं । नाहींच झाला विचारु । ' -मुआदि १५.१४३. [ सं. उत+स्था द्वि. ]

**उंटाड**—वि. विशोभितपणें उंच; उंटासारखा उंच. [ सं. उष्ट्राढ्य=उंटाड ]

**उटाणटेंगळा**—उटंगळ पहा. [ सं. उत्थान; प्रा. उट्ठाण; म. उटाण+टेंगूळ ]

**उटारेटा-ठा-टी-ठी**—पु.स्त्री. ( प्र. ) उठारेटा. १ उठाठेव; ढवळाढवळ; उपद्व्याप; नसता उद्योग, भानगडी; लुडबूड. २ ( लहान मुलांची ) चुळबूळ; चळवळ; वळवळ; नाचरेपणा. ३ उडवाउडव; चिवड. ( अन्नाची-भूक नसतां केलेली ). ४ थापेबाजी; गप्पा. ( क्रि. करणें ). [ उटणें+रेटणें ]

**उटारेंटी-टां-टीं**—क्रि.वि. १ नसत्या उठाठेवींत; आळसांत; टिवल्याबावल्या करण्यांत ( कालाचा अपव्यय करणें ). ०म्ह-दिवस गेला उटारेंटी मग दिव्यांत कापुस रेटी ( किंवा बोटानें काडवाती लोटी ). २ चिवडीत, उडवीत. ( जेवणें ).

**उटारेटीस येणें**—उटारेंटा करणें. [ उटणें+रेंटणें ]

**उटाळणी**—स्त्री. १ उठावणी; प्रोत्साहन; उत्तेजन; प्रवर्तन; भरीं घालणें; चेव आणणें. २ उटाळण्याची क्रिया. [ उटाळणें ]

**उटाळणें**—उक्रि. १ ( व. ) स्पष्ट उच्चारला जाणें; लिहिलेलें अक्षर स्पष्ट उमगलें जाणें. ' श्वास लागल्यामुळें त्याचें बोलणें उटाळत नाहीं. ' २ अर्थ, हेतु, भाव स्पष्ट होणें, करणें; ३ उठविणें; उत्पन्न करणें; उच्चारणें. ' इला कसें नाम तुझें उटाळे ॥ ' -सारुह १.२८. -दयाळ ९३. [ सं. उत्+ताळूं ]

**उटाळणें**—उक्रि. उलथणें; हलविणें; उटाळा लावून ढकलणें. [ सं. उत्+तल ]

**उटाळा-ळी**—पु.स्त्री. १ तरफ; जड पदार्थ उचलून फेंकण्यासाठीं त्याखालीं पहार वगैरे घालतात ती. ( क्रि. देणें ). २ अशी उचलण्याची, तरफेची क्रिया. (क्रि. करणें). ३ ढकलणें; जोर लावणें; धक्का देणें ( पुढें ढकलण्यासाठीं ); खांदा देणें. ( क्रि. देणें ). [ सं. उत्+तल्=स्थापन करणें ]

**उटाळा**—पु. १ स्पष्टोच्चार ( वागिंद्रियापासून होणारा अक्षरांचा). २ स्पष्टीकरण; विशदीकरण; फोड; किल्ली (लिहिलेलें, गूढ श्लोक, इ० कांची). ' माझे या स्मरणाचे उटाळे वांचूनि आन नाहीं. ' -भाए ६८३. ३ चेतणा देणें; प्रवृत्त करणें. [ सं. उत् +तल् ]

**उटाळा**—पु. ( व. ) उथळें; इमारतीच्या खांबास बुडांत दिलेला दगड. ( इं. ) बेस स्टोन. [ उत+तल ]

**उटाळें**—न. चाकाची गति बंद करण्याकरितां, तें चळूं-ढळूं नये म्हणून त्याखालीं ठेवलेला दगड, अट.

**उटिंगळ**—( कों ) उटगर पहा.

**उटिंबर-रा**—नपु टेंगूळ, गांठ. उटंगर पहा.

**उटी**—स्त्री. उटणें पहा. १ सुवासिक द्रव्यापासून तयार केलेला पदार्थ ( चंदनादिक ). ( क्रि० करणें ). २ उटण्याचा लेप. (क्रि० लावणें). ' तो जैसा काळलोहें इवरिला । नातरि प्रलैआंधकार उटी ओळघला । ' -शिशु ९९९ ' उटी चंदनाची शरीरा दुपारी । ' -कमं १०२. ' आंगीं शेंदुराची उटी । ' -गणपतीची भूपाळी ३. [ सं.उद्वर्तन-उद्वर्ति-उवट्टि-ऊटी-उटी. -भाअ १८३२. का. उटणी ]

**उटी**—स्त्री. (कु.) उडवी; एक स्तंभ पुरून त्याचे भोंवतालीं तृण वगैरे वरपर्यंत येईल अशी रचना गवताची गंजी. [ सं. उट=गवत ]

**उटी**—स्त्री. चाकाची गति बंद करण्यासाठीं जो दगड लावतात ती. उटा, ऊट पहा.

**उटी**—स्त्री. तेज, माहात्म्य. ( क्रि० उतरणें ). ' सर्वेचि इंद्रपणाची उटी उतरे । ' -ज्ञा ९.३२८. ' तीर्थांची उतरली उटी । ' -एभा ११.७४५. ' उतरल्या तीर्थांचियां उटी । ' -एभा १.३०८. ऊत पहा. ०उतरणें-महत्पदापासुन भ्रष्ट होणें.

**उटीजणें, उटिजणें**—सक्रि. १ उटणें; उटी लावणें; माखणें. ' कापुराचेनि पराग उटीजती । मोतियांचेनि रसें न्हाणीजेती । ' -शिशु २८१. २ घांसून स्वच्छ करणें ' न घडितांचि आरिसा । उटिजे काई ॥ ' -अमृ ७.६२. [ उटणें ]

**उंटीण**—स्त्री. उंटाची मादी; सांड. [ उंट; हिं. उटान ]

**उटींव**—वि. खरवडून काढलेलें; घांसलेलें. [ उटणें ]

**उटें**—न. ( विरू. ) उट्टें पहा. वाईट कर्माचें प्रायश्चित्त; सूडाचें कृत्य; पारिपत्य. ' बहुत लोकांस तुवां पीडिलें । त्याचें उटें आज निघालें । ' -ह ९.८१. ' पाहिजे तर ह्याचें उटें त्यानें दुसरें वेळीं घ्यावें. ' -बाळ २.१८५.

**उटेंरेटें**—न. उठाठेव, उपद्याप. उटारेटा पहा. ' आतां सांडिलें टेंरेटें । ' -शिशु १३६.

**उट्टें**—न. मोबदला; वचपा; भरपाई; तोडीस तोड; सूड; खरड-पट्टी. 'पण आज येऊं दे तरी, म्हणजे त्याचं सगळं उट्टं काढतें.' —तोबं. अं. २.प्र. १. [सं. आ+भृत; प्रा. आउट्ट; किंवा सं. आकुट्ट; प्रा. आउट्ट=हिंसा] **०काढणें–उगवणें–घेणें**–जशास तसें करणें. 'आठ्वुन सगुण तिळतिळ काढीन उट्टें तें।' —प्रला १५७.

**उठकट–र**—स्त्री. हकालपट्टी. उठकळ पहा.

**उठकळ–ळा**—स्त्री. १ उठण्यास होणारें कारण; उठण्याची निकड, गरज. (क्रि० आणणें; लावणें; येणें). २ उठण्याची बुद्धि; हुटुटी; सुरसुरी (मनांतून किंवा बाहेरच्या कांहीं कारणानें येणें). (क्रि० लागणें; येणें). ३ हकालपट्टी; पराभव. ४ स्थलांतर; बारा-वाटा होणें (गांव, कुटुंब इ० कांचें) **०येणें**–दुसरीकडे जाण्याचा हुकूम होणें, भाग पडणें. 'हा सुभेदार आला, त्या सुभेदारास उठकळ आली.' [उठणें+कळ]

**उठकळें–लें**—न. हकालपट्टी; पराभव. 'उठकळें करूनि दैत्यासी।'—भाए ४१. 'मारौनि गजरथांची दळें। वीरांचें उठकळें केलें।' —शिशु १०६१.

**उठंगार, उटंगार**— पु. (गो.) महापूर.

**उठणें**—अक्रि. १ उभें राहाणें. बसणें याच्या उलट. २ (ल.) वर येणें; आकाशांत वर जाणें (धूर, धुराळा). ३ जागें होणें; शुद्धी वर येणें (झोपेंतून, मूर्च्छेंतून). ४ बरखास्त होणें, संपणें (सभा, बैठक वगैरे). 'चार वाजले म्हणजे कचेरी उठते!' ५ (सैन्य वगैरे) चालू होणें; बाहेर पडणें; सज्ज होणें; हल्ला करणें. 'भट दशसहस्र उठले जे आज्ञाकर सुयोधनाचे हो!' —मोभीष्म ६.६१. ६ उडून जाणें (एखाद्यावरील मन, प्रेम); उद्विग्न होणें; त्रासणें; कंटाळणें. ७ बंड करणें (एखाद्या विरुद्ध); सामना देण्यास तयार होणें. 'दुर्जन ज्याचें अन्न खातो त्याजवरच उठतो.' ८ स्पष्ट दिसणें; उमटणें. (ठसा, रंग, छाप वगैरे). 'उत्तम गुण तत्काळ उठे।' —दा १९.६.२०. ९ वर येणें; दिसावयास लागणें; बाहेर पडणें; उद्भवणें (पुरळ, सांथ, संकट, बातमी वगैरे). १० दुखावयास लागणें; (डोकें, कपाळ, मस्तक; शीर, त्याचप्रमाणें दाढ, दांत, कान, हात, पाय, या संबंधींही क्वचित उपयोग करतात). 'निघाल्या देवी आणि गोवर। उठलें कपाळ लागला ज्वर।' —दा ३.२.२६. ११ ताजेतवानें होणें; फुलणें; टवटवीत होणें; आनंदित होणें; (मनुष्य, प्राणी, वनस्पती वगैरे); खुलून दिसणें (रंग वगैरे.). १२ आकसानें आळ घेणें; कुभांड रचणें (मनुष्यावर; घराण्यावर वगैरे). १३ खुणा पडणें; उठून दिसावयास लागणें (वण, वळ, चाबकाचा मार, दांताचा चावा). १४ करवणें; उरकणें; पार पडणें (काम वगैरे). 'माझ्याच्यानें पहिल्यासारखें कामही उठत नाहीं.' —विवि ८.८.१५३. १५ वस्ती वगैरे उठून जाणें; ओसाड पडणें. १६ उत्पन्न होणें. 'उठती घन-पटळें। नाना वर्णें।' —ज्ञा ८.३०. 'शब्द पडसाद उठला। म्हणे कोण रे बोलिला।' १७ (व.) खर्च होणें; खलास होणें; संपन जाणें. 'इतके तांदूळ आजच्या आज उठतील.' **म्ह०** उठणे-वाल्याचें उठतें कोठीवाल्याचें पोट दुखतें. ' १८ पूर येणें. 'जसें महाप्रळयीं जळ। उठलिया भरे ब्रह्मगोळ।' —विउ ११.८६. १९ वाढणें. 'चार शिंपणी लागोपाठ सांपडतांच पहिल्यापेक्षां चार बोटें भाजी उठली.' २० प्रवृत्त होणें (वाईट करण्यास). 'मी इतकें बोलतांच तो जीव घ्यावयास उठला.' २१ क्षोभ होणें (पित्ता-दिकांचा). २२ नवीनच गोष्ट प्रसिद्ध होणें; प्रचारांत येणें. 'बारा-वर्षांचे मागलें देणेंघेणें कोणी देऊं नये, मागूं नये असें हें अलीकडे नवेंच उठलें.' २३ एखाद्यानें लौकिकानुरूप मर्यादा मोडून वर्तन करणें. २४ उभें होणें; तयार होणें (इमारत वगैरे.) 'तें राजवाडा उठे.' —विक ११. २५ वाटणें; मनांत येणें. 'ओंवी घ्यावी ऐसें उठे।' —दा२.६.१५. [सं. उत्+स्था; प्रा. उट्ठ; सिं. उथणु; जिप्सी गीगन उश्ती; जिप्सी ग्रीच उठी] **उठून जाणें**–१ परवानगीशिवाय निघून जाणें; पळून जाणें; रागानें चालतें होणें 'त्याची थट्टा सुरू होताच तो मंडळींतून उठून गेला.' **माणसांतून उठून जाणें**–१ रीतभात सोडणें; अनीतीच्या मार्गाला लागणें. २ परपुरुषावरोबर निघून जाणें (स्त्रियांच्या बाबतींत). 'खरेच कां रूपमाया सेनापती उठून गेल्या.' —बाय ८.३. **उठून दिसणें**–स्पष्टपणें नजरेस येणें. **नित्य उठून, रोज उठून**-क्रिवि. दररोज नेमानें; नित्य; रोजच्यारोज. **उठला ठाव देववत नाहीं**–उठून जेवावयाचें पानहि मांडतां येत नाहीं (इतक्या निर्बलतेचें द्योतक).

**उठतबसत**—क्रिवि. खुरडत; थोडें चालत व थोडी विश्रांति घेत; थांबून थांबून; धीरे धीरे (काम करणें, जाणें). (अति अश-क्ततेचें द्योतक) **उठतांबसतां–पडल्यां, उठल्याबसल्या–सुटल्या**–क्रिवि. क्षणोक्षणीं, हरघडी; सदासर्वदा; जेव्हां पहावें तेव्हां; एकसारखें; अहोरात्र. 'अहो येतां जातां उठत बसतां कार्य करितां।' 'उठतां बसतां जर असें मुलाला मारूं लागलां तर तो कोडगा होईल.' 'उठल्यासुटल्या चहा पिण्याची संवय फार अपा-यकारक बरें!' **उठतांबसतां उपवास–निराहार–नवरात्र**–नवरात्रांतील घटस्थापनेच्या दिवशीं व शेवटच्या दिवशीं उपास करण्याची पद्धत. **म्ह०** उठतां लाथ बसतां बुक्की=सदासर्वदां माराचा धाक किंवा मार. 'तुला उठतां बसतां असें पाहिजे; एऱ्हवीं तूं ताळ्यावर येणार नाहीस!' [उठणें+बसणें]

**उठपळ**—स्त्री. १ एकसारखें पळून जाणें (असंतोषी नोकर किंवा सून वगैरेंनीं). (क्रि० लावणें). २ त्रासदायक, जुलमी वागणूक, गांज-णूक, (पळून जावयास लावण्याइतकी); हाल करणें; छळ करणें. (क्रि० लावणें). ३ अस्थिरता; असंबद्ध वागणूक; चंचलता; उतावळी. (क्रि० करणें; लावणें; मांडणें). ४ जावयास निघणें. (क्रि० करणें.) —क्रिवि. एकसारखा; पुन्हांपुन्हां; अविश्रांत; उतावीळपणानें. 'हा पोर उठ-पळ खेळायला जातो.' [उठणें+पळणें]

**उठपाय**—क्रिवि. एकसारखें पुनःपुन्हां; ऊठपाय पहा. [ ऊठ+पाय ]

**उठबशी-सी, उठ बैस**—स्त्री. १ उठण्याबसण्याची मेहनत; पुनःपुन्हां उठणें व बसणें. २ खळबळ; चळवळ (अस्थिरता द्योतक). ३ नसता खटाटोप, उठाठेव. म्ह० कोणाच्या म्हशी कोणाला उठाबशी. ४ बैठका ( व्यायामाचा एक प्रकार ). [ उठणें+बसणें ] **उठबस करणें**-( कों. ) आदरातिथ्य करणें.

**उठवण-णूक, उठवळ**—स्त्री. बसलें असतां स्वतः उठवत नाहीं,दुसऱ्यानें उठवावयास लागावें अशी अवस्था (गुरें, घोडे इ० ची) उठून उभें राहण्याची सुद्धां शक्ति नसणें. 'उठवणें ताठा करक'–दा ३.६.४७. 'आतां सर्वथा उठवण्या ।'–एभा ११.१२०९.(क्रि० घेणें ) २ (ल.) आपत्ति; दारिद्र्य; दैन्य; दुर्बल दशा. **०मोडणें**–१ शक्ति परत येणें. २ दारिद्र्य, निराशा यांपासून सुटका होणें; **उठवणीस येणें**-( कों. ) १ अतिशय अशक्त होणें; मरावयास टेकणें; उठवण घेणें; दुसऱ्यांनीं उठवावें लागणें; (सामा.) अतिशय दमणें; थकणें. 'वैरणचारा महाग याजकरितां घोडीं व उंटें उठवणीस येऊन, अस्थिचर्म जाहालीं.'–भाव ५६. [ उठविणें ]

**उठवण**—स्त्री. (गो.) कुणबी लोकांतील देवकृत्य. देवक उठविणें [ उठविणें ]

**उठवण(णे)कर-करी-करू**—वि.उठवणीस आलेला (मनुष्य, बैल ); बिछान्याला खिळलेला ( रोगानें, वार्धक्यानें ). 'मागचे वर्षापासून तो उठवणेकरी बनला आहे.'

**उठवळ**—वि. १ आळशी; कामचुकार (उठवणकऱ्याप्रमाणें वागणारा). म्ह० उठवळ सासू थोंट जावई. २ चळवळ्या; उच्छृंखल. ३ बेफिकीर. 'उठवळ संसार करून कसें चालेल?' [उठविणें]

**उठवळ**—स्त्री. (उटकळ या अर्थी चुकीनें) हकालपट्टी; उच्चाटन; अवनति. **०येणें-लागणें**-उच्चाटनाची वेळ. 'फीमेल ट्रेनिंग कॉलेजला उठवळ आली आहे.'–केले १.५१.

**उठविणें, उठवणें**—उक्रि. उठणें प्रयोजक. १ उचलणें; वर करणें; उच्च स्थितीला नेणें; उंच करणें; उभें करणें. २ जागृत करणें;जागें करणें; उठावयास लावणें. म्ह० निजलेल्याला कोणी उठवील, जागल्याला कोण उठवील? ३ चेतना देणें; प्रवृत्त करणें; क्षोभविणें; उठावणी करणें. ४ दुखावयास लावणें (डोकें). ५ (कंडी) पिकविणें; जाहीर करणें (बातमी, गोष्ट). ६ उत्पन्न करणें; काढणें. 'जे उठवी शब्दांकुर । वंदे वैखरी अपार ।'–दा १.३.२. 'विचार न करतां वांधा उठवून ... अडथळा आणूं नये.'–स्वारीनियम (बडोदें) ४७. ७ पार पाडणें; बजावणें. 'सूचना होतील त्याप्रमाणें नोकरी उठविण्याची आहे.'–स्वारीनियम ( बडोदें ). २४. ८ चोरणें; लांबविणें. 'चोरट्यांनीं स्वयंपाकाचीं दोन भांडीं उठविलीं.'–विवि ८.११.२०८. ९ रकम कर्ज काढणें; उचल करणें; खर्च करणें. [सं. उत्थापन; प्रा. उट्ठवण] **घरांतून उठविणें**–नादीं लावून पळविणें 'ह्या स्वतंत्र बायका केव्हां कोणच्या म्हाताऱ्याला घरांतून उठवतील कांहीं नेम नाहीं.–बाय २.१. **जन्मांतून उठविणें**–आयुष्याचें मातेरें करणें (जार कर्मामुळें). 'माझ्या पोरीला अशी जन्मांतनं उठवलीन्.'–निचं १२५.

**उठळ**—वि. (व.) निरुपयोगी; आळशी. उठवळ पहा.

**उठाउं**—पु. जागृति; उत्साह; उठाव. 'बोध करितांही उठाउं नेघे ।'–दावि २४. [ उठणें ]

**उठाउठी**—क्रिवि. ताबडतोब; त्वरेनें; लवकर; तत्काळ; लागलीच; झटकर; त्वरित; एकदम; जलदीनें. 'आतां उठाउठी । असकेयां ब्रह्मगोळकां देइनु मोटी ।'–शिशु ९२१. 'वृश्चिक देखतां उठाउठी । पादरक्षा आटविजे ।'–मुआदि ३४.८५. '(मी) दीऊं नेणें जडीबुटी। चमत्कार उठाउठी।'–तुगा १८१६. 'वय चालिलें कीं उठाउठी।'–दावि १५७. 'कितिं उठाउठी भयभीत मरण पावले।'–ऐपो ३६७. [ उठणें द्वि. ]

**उठागीर**—वि. १ ( निंदा व्यंजक ) प्रवासी; मुशाफर; उपऱ्या; तात्पुरती वस्ती करणारा. २ उचल्या. [ उठविणें+गीर प्रत्यय ]

**उठाठव-ठेव**—स्त्री. १ रिकामी लुडबुड, खटपट; पंचाईत; दुसऱ्याच्या कामांत ढवळाढवळ ( क्रि० करणें ). 'पंचभूतिक उठाठेवी । न चले तेथें ।'–दा १.४.३०. म्ह० विधवेला ( बोडकीला ) कुंकवाची उठाठेव कशाला पाहिजे. २ बरदास्त; सरबराई; व्यवस्था. 'घायाळ समशेर बहाद्दर कुंभेरीस आला, तिथें सुरजमल्ल जाट याणें त्याची बहुत उठाठेव करून घोडी व पालखी देऊन वाटेस लाविला.–भाव १६२. ३ कामाची दगदग; खटाटोप; खटपट. ४ इकडच्या तिकडच्या कुचाळक्या करणें; भलतें सलतें उठविणें. [ उठविणें+ठेवणें ]

**उठाण-णें**—न. १ उठवणी; उसळी; उमेद; तीव्र प्रवृत्ति. 'कीं ते समर्थी मनाचें उठाण ।'–यथादी १०.२५८; ११.८८७. २ उन्नतता; उठावदारपणा ( स्तनांचा ). 'उठेत वक्षोरुह हे उठाणें ।'–सारुह २.५६. ३ सूचक लक्षण; चिन्ह. 'तों देवकीस वरिती विरश्रीउठाणें ।' –कृष्णजन्म ( देवनाथ ) २३. [ सं. उत्थान; प्रा. उट्ठाण; हि. उठाना ]

**उठाणूं**—न. गळूं; वेंड ( शरीरावर उठणारें ). [ उठाण ]

**उठा ( ठो ) पायीं**— ऊठपाय पहा.

**उठाबशी**—उठबशी पहा.

**उठारेठा-रेठ-ठी**—उटारेटा पहा.

**उठाव**—पु. १ वर आलेला भाग. २ शरीराची ठेवण, स्वरूप. 'आणा धरोनि मृग हा, कैसा दिसतो मनोरम उठावें ।'–मोवन ११.१९. ३ उचल; सरसावणें. 'किंवा अमृत क्षीरसागरीं । येती लहरींवरी लहरी ॥ तैसी द्रौपदी राजकुमरी । उठाव करी दुसरेनें ॥'–ह ३४.२८. ४ खर्च. ५ ( शिल्प ) उठावाची नक्षी; उचलून

दिसणारें काम; वर दिसणारी, कोरलेली आकृति. (इं.) रिलीफ. उ० उठावाचा नकाशा. ६ पदांमध्यें बदललेल्या चालीवरून पुन्हा मूळच्या चालीवर व ध्रुवपदावर येणें (वणी येथील गोविंदकवीच्या पदांतून असे उठाव आढळतात). –स्तोत्रमाला २६८. [उठावणी]

**उठावणी**—स्त्री. उठविणें पहा. १ उत्तेजन; प्रोत्साहन. २ जोरानें पुढें सरसावणें; उचल करणें. ३ बंडखोरी; डोकें वर काढणें; हल्ला करणें; स्वारी करणें. 'इंग्रज लोक जितक्या वेळां उठावणी करतील तितक्या वेळां त्यांना चोपून काढायचें.' –इंप १४४. ४ उद्युक्त होणें; पुढें होणें. ५ जागृति. ६ (कों.) शिफारस; प्रशंसा. ७ उभारणी सजावट. 'अशा धर्तीवर मेनका पात्राची उठावणी खुबीदार ... झाली असती' –नाकु ४७. ८ तळ हलविणें; निघण्याची तयारी करणें; कूच करणें. ९ उठविणें; दारिद्र्य, संकटें यांतून वर काढणें. १० उचलणें (ओझें वगैरे). ११ जैन किंवा वैष्णवांमध्यें मृताच्या तिसऱ्या दिवशीं करण्याचा विधि. [सं. उत्थापन; प्रा. उट्ठावण; हि. उठावना]

**उठावणें**—अक्रि. १ पुढें होणें; उद्युक्त होणें; तयार होणें; सरसावणें; एखाद्या उद्योगासाठीं आवेशानें लागणें; मनापासून कामास लागणें. 'पत्रिका वाचितांचि गोपाळा । पुढें भीमकी देखे डोळां । बाह्या पसरूनि उतावेळा । आलिंगना उठावला ॥' –एरुस्व ४.६२. २ हल्ला करणें; छापा घालणें; स्वारी करणें; युद्धार्थ चालून जाण्याकरितां उठणें. 'काळरात्रीचीं कटकें । उठावलीं जैसीं ॥' –ज्ञा ११.१९९. 'गदा पडताळोनिया करें । उठवला संमुख ।' –मुसभा १०.१५५. 'देहसमंधावरी लोटला । संकल्पावरी उठावला ॥' –दा ५.९.४२. 'मृगेंद्रावरि जंबुक । अपार जैसे उठावले ।' [सं. उत्थापन; प्रा. उट्ठावण]

**उठावणें**—सक्रि. (गो.) नक्कल, तालीक करणें; उतरून घेणें.

**उठावदार**—वि. डोळ्यांत भरणारा; चांगला उठाव असलेला; आकर्षक, ठळक. **०चित्र**—न. पृष्ठभागाच्या वर आलेलें चित्र; उठावाचें चित्र. [उठाव+दार प्रत्यय]

**उठावा**—पु. उठाव, उठावणी पहा. १ निघून जाण्याकरितां उठणें; तळ हलविणें; कूच करणें; बाहेर पडणें. 'आतां उठावा करी ताता । नातरी त्यजीन मी जीविता ।' –कथा १.५.११२. २ शत्रूविरुद्ध उठणें; हल्ला; चढाई. 'दीधला वीरभद्रें उठावा' –उषा ११५२. ३ (अज्ञात स्थितींतून, दुखण्यांतून) बाहेर येणें. ४ बहार, उत्कर्ष. 'फुन वसंताचा उठावा । तो आनंदेंचि दिसे ॥' –शिशु २५९. ५ विस्तार; वाढ. 'तैसें जेथूनि हा आघवा । संसारतरूचा उठावा ॥' –ज्ञा १५. २०२. ६ प्रोत्साहन; उत्तेजन. 'उल्हासु वीरांचिया चित्तां । उठावा दीधला मागुता ॥' –एभा ९.१३२. ७ आवेश; वेग. 'ऐसा दृढ वैराग्यउठावा । तेणें विहिताग्नि बोळवावा ॥' –एभा १८.६५. [सं. उत्+स्थापय्; प्रा. उट्ठाव]

**उठाळणी**—स्त्री. उत्तेजन; उठावणी पहा. 'चाळीस हजार घोडा मर्द दिली उठाळणी ।' –ऐपो ८५. [उठविणें]

**उठाळून बोलणें**—क्रि. (माण.) मोठ्यानें बोलणें. [उठविणें]

**उठिंगण**—न. (कों.) आधार. 'सोन्याचें ताट झालें तरी त्यास कुडाचें उठिंगण पाहिजे.'. [उठणें]

**उठित**—वि. (व.) मशागत केलेली, लागवडीस आणलेली; वहित (जमीन.) [सं. वह्-ऊढ; किंवा उत्थित]

**उठी**—स्त्री. उठावयास लावण्याची निकड; उठण्याची, निघून जाण्याची निकड. 'तुझें स्वरूप पाहतां दृष्टी । भयातें उठी उठावे.' –नव १४.७२. [उठणें]

**उठीनिलियां**—क्रिवि उठलें असतां; उठल्यानें. 'एकीं प्रेमें उत्कंठितां । पहाविया उठीनिलियां असामिता ।' –शिशु ६००. [उठणें]

**उठूठ**—स्त्री. कामाची सक्ति, निकड, तगादा, लकडा. (क्रि० लावणें; मांडणें; करणें) [उठ! उठ! किंवा उठ द्वि.]

**उठोळ**—वि. (व.) आळशी; उठवळ पहा. 'ती फार उठोळ मावशी आहे, तिच्याच्यानें तें काम होणें शक्य नाहीं.'

**उंड**—पु. पोटांत उठणारा वायूचा गोळा; नळाश्रित वायु. 'त्याच्या पोटांत उंड धरला आहे.' [का. उंडे=गोळा; प्रा. उंडी=गोलाकार वस्तु, पिंड]

**उंड**—स्त्री. उंडीण वृक्ष. याच्या फळांतील बियांचें तेल काढतात.

**उडकी**—स्त्री. (गो.) लहान उडी. [उडी]

**उडकी, उंडकी**—स्त्री. (कों.) उचकी. (क्रि० येणें) 'डोळे झांकले जिव्हा आड पडली । नेदी हुंकारा बोलखी मोडली ॥ उडकी हृदयांतु प्रवेसली । प्राणु सांडी वेळोवेळां ॥' –ख्रिपु २.२४. ८४.

**उंडकी लागणें**—क्रि. गोळी मध्य येणें; (शेती) पाभरीचें बेर (भोंक) माती लागून बंद होणें आणि त्यामुळें खालीं धान्य न पडणें. –मसाप २५५.

**उडंग-गु**—पु त्राम. [का. उंडिग=फटिंग]

**उडगण**—स्त्री. गोगलगाय. 'उडगण चढों जाय भिन्तीं ! तृणें लोटिनां पडे पुढती ॥' –मुविराट ५.३०.

**उडगण**—पुन. नक्षत्रें. [सं. उडु गण]

**उडगणें**—उक्रि. (कर्ना.) झाडणें; केर काढणें. [का. उडगु=झाडणें]

**उंडगणें**—अक्रि. उनाडणें. 'आस्ट्रेलियांत पुष्कळदां पुरुष घरांत चुल्हिकाराधन करीत असून, बायका रस्त्यांतून बाजाररहाट करीत उंडगत आहेत असा चमत्कार दृष्टीस पडतो.' –महाराष्ट्र २६.६.१९३०. [का. उंडिग=फटिंग]

**उंडगळ, उंडगा, उडगा**—वि. निरुद्योगी; कामचुकार; उडाणटप्पू; भटक्या ( मुलगा ) [ का. उंडिग ]

**उंडगा, उंडगादगड**—पु. १ ओबडधोबड, खडबडीत धोंडा; ठोकळा; ओंडा. २ दांडगा, उद्धट मुलगा. [ का. उंडिग ]

**उंडगेमासे**—पु अव. ज्यांस पिलें झालीं नाहींत असे मासे. –मरळ माशांची पैदास ( बडोदें ) ७.

**उंडण–णी**—स्त्री १ फिडी; आळी. 'उंडणी लंघू न शके भिंतीसी ।'–एभा ५.९३.

**उंडण–णी**—स्त्री. उंडी; उंडीचें झाड. हें कोंकणांत होतें. याची पानें सुरंगीच्या पानांसारखीं मोठीं, गुळगुळीत, स्वच्छ असून पत्रावळी करतां येण्यासारखीं असतात. फूल पांढरें, सुवासिक असतें. फळें सुपारी एवढीं असून बियांचें तेल जाळावयाच्या उपयोगी पडतें. त्यास उंडेल म्हणतात. हें खरूजेवर औषधी आहे. –वगु १. ६०. [ सं. पुन्नाग. ]

**उडणटप्पू**—उडाणटप्पू पहा.

**उडणें**—अक्रि १ भरारी मारणें; आकाशमार्गे गमन, संचार करणें ( पक्षी वगैरेंनीं ). २ आघात प्रत्याघातादि कारणानें स्थान सोडणें; मूळ स्थानापासून अन्यत्र जाणें, वर बाजूस उडी मारणें. 'चेंडू जसा वेगानें आपटाल तसा वर उडेल.' 'तोंडावर वस्त्र धरून बोल, नाहीं तर दुसऱ्याचे अंगावर थुंका उडतो.' ३ उल्लंघन करणें; ओलांडून जाणें; वरून उडी मारून जाणें. 'आडमार्गे उडोनि भिंती.' –मुविराट ४.२४. ४ उंचावरून खालीं उडी मारणें. ५ झडप, झेंप घालणें, तुटून पडणें; रागानें, आवेशानें चालून जाणें. ६ नाहींसें होणें; निघून जाणें; संपणें. 'ते रात्री येतां सूर्यापुढें । स्वकार्येसी सगळी उडे ।'–एभा २०.२८१. 'मनीं निश्चयो सर्व खेदें उडाला ।' –राम ६२. ७ एकदम अदृश्य होणें; दिसेनासें होणें. 'दिवस बुडाला, मजूर उडाला.' ८ कोमेजणें, निस्तेज होणें; रंग विटणें; अस्पष्ट होणें; फिक्का होणें. 'या चित्राचे रंग उडाले आहेत.' ९ खपणें; खलास होणें; खर्च होणें ( द्रव्य, जिन्नस ); 'त्याचा सर्व पैसा चैनबाजींत उडाला.' '( कोशाच्या ) दरवर्षी लाखों प्रती उडत असल्यामुळें ते ( ठसे ) झिजून जातात.' –नि ६७७. खुंटणें; (धैर्य, धीर) सुटणें; (पाणी वगैरे) आटणें. १० मन विटणें; तिटकारा येणें; प्रेम नाहींसे होणे. 'तिचा आज जीवच उडून गेला होता.'–अस्तंभा १८८. ११ दुभतें जनावर दूध देत नाहींसें होणें, कोरडें पडणें; भाकड होणें. 'हल्लीं आमची गाय उडाली आहे.' १२ बंदुक, तोफ पेटणें; गोळी सुटणें; स्फोट होणें; फुटणें. १३ युद्ध, भांडण वगैरे जुंपणें. १४ मजा, गंमत, दुष्काळ, अरिष्ट, भांडणतंटा, अव्यवस्था वगैरे उत्पन्न होणें, सुरू होणें, वाढणें, माजणें. 'चालिले उडत गर्जेत'–दावि २६८. १५ बळावर, आशेवर काम करणें; अवलंबून कार्य करणें ( द्रव्य, सत्ता, वचन वगैरेवर ). 'कशाच्या बळावर उडतोस?' १६ संभोगार्थ उडी मारणें–चढणें ( पशु वगैरेंच्या बाबतींत–नर पशूनीं माद्यांवर ) १७ ( ल. ) गर्व करणें; मद येणें; ताठा चढणें. 'ज्यांच्या बळें उडसि ते तिकडेचि मनेंहि तुजकडे देहें ।'–मोउद्योग ४.१०९. १८ ( ल. ) वर मान करणें; भरभराटणें. 'सत्कीर्ति न दे उडों नवसुधेतें ।'–मोमंभा २.४०. १९ भरधांव पळणें ( घोडा वगैरे ); वेगानें जाणें. २० एखाद्याची चाकरी, रोजगार सुटणें. २१ दोष, विरोध वगैरे दूर होणें, मावळणें; आरोप नाहींसा होणें; ( शास्त्रादि विषयांवरील ). २२ निसटून जाणें; पळून जाणें. 'पुढें धरितां मागे पैंचला । मागे धरितां पुढें उडाला । ऐसा सांपडतचि गेला । ठाइंठाइं ॥'–दा १७-४.३. २३ ( शाप. ) वाफ होऊन जाणें; बाष्पीभवन होणें. ( इं. ) व्हेपराइझ, इव्हॅपोरेट. [ सं. उद्+डी, उड्डान; फ्रेंचजिप्सी उरी ] **उडून चरणें**–(लु.) ऐषआरामांत, थाटामाटांत राहणें; राजदरबारीं मानसन्मानानें राहणें. **उडत जाणें**–( ल. ) खिजगणतींत नसणें; महत्व न देणें; न मानणें. 'नाहीं सांगितलेंस तर उडत गेलास !'

**उडंत**—स्त्री. वानरांची लढाई. –शर.

**उडतउडत**—क्रिवि. १ उड्या मारीत; नाचत–बागडत; एकाच क्रमानें; वेगानें नाहीं अशा प्रकारें ( जाणें, येणें ). २ अनिश्चितपणें; अनिर्धारकपणें; संदिग्धपणें; अस्पष्टपणें ( सांगणें, बोलणें, ऐकणें ). 'हें काम त्यास होणार नाहीं अशी बातमी मी उडतउडत ऐकली.' ३ कर्णोपकर्णीं ( एकाकडून दुसऱ्याला अशी बातमी इ० येणें ). ४ संक्षेपानें; सारांशरूपानें; अधून मधून. 'सगळी कथा सांगावी तर वेळ लागेल उडतउडत सांगतों.' 'तिनें उडत उडत जबाब दिला' –विवि ८.३.८२.

**उडतक**—न. घोड्याच्या अंगावरील गाशाखालील वस्त्र.

**उडतघुमा**—वि. (भोंवऱ्याच्या खेळांत) दूर उडून तेथें फिरत राहील अशा तऱ्हेनें टाकलेला; उडून घुमतो असा टाकलेला ( भोंवरा ) [ उडणें+घुमणें ]

**उडतपगडे**—न. सोंगट्याच्या खेळांतील एक डाव. ( क्रि० करणें ) [ उडत+पगडा ]

**उडतबातमी**—स्त्री. बाजारबातमी; गप्प; भुमका; सहज समजलेलें पण संशयित वर्तमान; कर्णोपकर्णीं ऐकलेली वार्ता.

**उडतरुमाल**—पु. १ मर्दुमकी करणाऱ्या महार वगैरे हलक्या जातीच्या लोकांसाठीं योजिलेला किताब. २ लढाई थांबविण्याची खूण. [ उडणें+रुमाल ]

**उडतहत्यार**—तोफांची मारगिरी; गोलंदाजी. –रा ३.२९३.

**उडतापील**—पु. उफाड्यानें वाढणारें मूल; थोराड मुलगा; धडाडीचा, पुढें नांवारूपास चढेल अशीं चिन्हें दाखविणारा तरुण; हुषार, चलाख मुलगा. [ उडत+पील=पिल्लूं, छावा ]

**उडतीपाटी**—स्त्री. बलुत्यांपैकीं एक हक्क; धान्य उफणतांना महार जें जागलें घेतात तो हक्क; धान्य उफणायला जी पाटी घेतात तिला उडती पाटी म्हणतात, अर्थात् धान्य उफणणाऱ्या महारास त्या पाटीभर धान्य देतात त्यास उडती पाटी म्हणतात. –गांगा १००.

**उडती वार्ता**—स्त्री. उडतबातमी पहा. 'उडती वार्ता हे निजकथा।' –दावि २८७.

**उडतें ऊन**—न सूर्योष्ण; सकाळचें ऊन. [सं. उदयत्–उड-अत–उडत. –भाअ १८३४]

**उडतें पाखरूं**—न. १ उडणारा पक्षी. २ (ल.) चंचल, अस्थिर माणूस; हंगामी. **म्ह०** उडतें पांखरूं पोटभरू. –के ८.१.२९. वाक्प्रचार–उडत्या पांखराचीं पिसें (शेटें) मोजणारा–मेज करणारा=(ल.) फार चलाख, हुषार मनुष्य; पाताळयंत्री मनुष्य; नुसत्या तर्कानें एखादी गोष्ट अचुक ओळखणारा. (गो.) 'उडत्या पाखराची शेटां मोजप.'

**उडंत्री**—स्त्री. (कर्ना.) बैली; सुताचा ताणा मागावर चढविण्यापूर्वी पाजणी (उकी) करण्याकरितां लागणारे लाकडी घोडे. [का. हुडु=जोडणें+यंत्र]

**उडद्**—स्त्री. (गु.) उडीद पहा. [का. उद्दू=उडीद]

**उडदण–दाण**—न. उडदाची मळणी झाडल्यावर राहिलेला भुसा, भुसकठ. **०णी**–वि. उडदाच्या रंगाचें, काळसर. उडदानी लुगडें; उडदानी रंग.

**उडदळ**—स्त्री. उडीद पेरण्यास योग्य अशी जमीन; जेथें उडीद पेरला आहे अशी जमीन. [उडीद+सं. आल=व्याप. का. आळ=व्याप्ति, भूमि]

**उडदाबेगम–ण**—न.स्त्री. (बुद्धिबळ खेळ). मोंगली संप्रदायी बुद्धिबळांतील एक मोहरें; यांत घोड्याच्या ऐवजीं उडदाबेगम हें मोहरें असून त्याची गति ३॥ घरें असते. या उडदाबेगणीच्या खेळांत पटावर १०० घरें असतात. [तुर्की. उर्दू=सैन्य+बेगम=राणी; उडदाबेगम=हत्यारबंद, लढाऊ बेगम; बेगणी=अमीराची स्त्री]

**उडदाबेगमी–बेगी**—स्त्री. (हिं.) हत्यारबंद स्त्री; उडदाबेगणी. [तुर्की. उर्दू=सैन्य, तळ, लष्कर, बाजार+बेगम=स्त्री, तरुणी, राणी, बेगणी]

**उडदांमुहूर्त**—पु. लग्न, मुंज वगैरे समारंभांत आरंभीं सुवासिनी उडीद दळण्याचा जो समारंभ करतात तो; उडीद भरडण्याचा मुहूर्त, काळ. [उडीद+मुहूर्त]

**उडदावळ**—स्त्री. १ उडीद पेरलेली जमीन; उडदाचें शेत; उडदळ पहा. २ उडदी रंगाचें लुगडें. (काळ्या अंगावर पांढऱ्या चौकटी असणारें); [उडीद+सं. आल]

**उडदी**—वि. उडिदाच्या रंगाचें. **०लुगडें**–न. पांढऱ्या चौकटी असलेलें काळें लुगडें.

**उडदू**—स्त्री. ऊर्दू भाषा. ऊर्दू पहा.

**उडदे**—पु.अव. (व.) उडदाच्या दाण्यासारखे कीटक. [उडीद]

**उडद्यामुरूम**—पु. उडदासारखा बारीक, काळा मुरूम.

**उडप**—न. (गो.) वाघाला मारण्याकरितां एखादें मेलेलें किंवा त्यानें मारलेलें जनावर ठेवून त्याभोंवतीं केलेलें काटयांचें कुंपण. [सं. उटज; प्रा. उदय–व ?]

**उडपाल**—न. १ मोठ्या तंबूशेजारीं जो स्नान, स्वयंपाक वगैरे करण्याकरितां लहान तंबू ठोकतात तो. [आड+पाल=लहान तंबू]

**उडपाल्ल**—न. कांबळयाच्या खोळीवर (पर्जन्यनिवारणार्थ) जें दुसरें वस्त्र घेतात तें. [सं. ऊर्ध्व+पल्लव; प्रा. उड्ढ+पाल]

**उडया–यें**—पु. न. (व. कु.) उडवा–वी–वें पहा.

**उंडरणें**—अक्रि. (व.) माजणें; सैताडणें; उन्माद येणें. 'गोप्या आतांशा फार उंडरला आहे.' [का. उंडिग]

**उंडल**—स्त्री. उंड; उंडीणीचें झाड व तिचें फळ. उंडण पहा.

**उडलटप्पू**—वि. निरुद्योगी. उडाणटप्पू पहा.

**उडली, उंडी, उलडी**—स्त्री. (नाविक) होडी उलटूं नये म्हणून तोल सांभाळण्यासाठीं तिच्या बाहेरील बाजूस दोन वांकडीं लाकडें जोडून त्यांच्या शेवटाला जोडलेलें एक आडवें लांकूड. हें नेहमीं पाण्यांत असतें. [उलटणें]

**उंडलीण**—स्त्री. उंडीण.

**उंडलेल**—न. उंडीच्या बियांचें तेल; उंडेल. [उंडल+तेल]

**उडवणी**—स्त्री. १ पसरणें; फेंकून देणें; उधळणें. २ अवहेलना करणें; अव्हेर करणें; हेटाळणी. ३ निरास. 'ये विषयीं उडवणी पंचकांत। बोलिलेती दासानीं अभंग षट्क ते।' –दावि ३१२. [उडविणें]

**उडवणें–विणें**—उक्रि. १ उडणें याचें प्रयोजक; उडणें पहा. २ दूर फेंकणें; अस्ताव्यस्त करणें; विस्कळित करणें; चारी दिशांस उधळून लावणें; पळवून लावणें. 'मुकुट शिरींचा उडविला।' –मोदोहारामायण ६९. ३ उधळपट्टी करणें; बेसुमार खर्च करणें. 'आपल्या नादीं लागून हवा तेवढा पैसा उडवील असें तिला वाटलें.' –विवि १०.५–७.१२३. ४ टाळणें; अव्हेरणें; सोडणें; टाकून देणें. ५ हेटाळणें; अव्हेर करणें; झिडकारणें. ६ चोरणें; लांबविणें; नाहींसें करणें. 'हातवह्या फिर्यादीनें उडविल्या.' –विक्षिप्त ३.९५. ७ मारणें; आघात करणें; 'निर्गुणास जन्म कल्पिला। अथवा निर्गुण उडविला॥' –दा ९.३.२६. 'शत्रूवर नेम धरून सोजीर उडवितां येतील.' –इंप १५०. चाबूक उडविणें, चाबकाचे फटके मारणें. 'भटजीचे अंगावर चाबूक उडविले.' –इंप ८६. ८ चोरून नेणें; पळवून नेणें; 'तिला उडवून नेण्याचा

प्रयत्न करणें ही गोष्ट श्लाघ्य आहे.' –विवि १०.५–७.१२३. ९ आटोपणें; जलद काम करणें; त्वरित संपविणें. 'लॅटिन भाषांतर विद्यार्थ्यांस दिलें असतां तें जॉन्सननें कसें उडवून दिलें याविषयीं मागें सांगितलेंच आहे.' –नि ६५६. १० फजीत करणें. 'नका आमची जास्त उडवूं' –चंद्रग्रहण. ४०. ११ काढून, हांकून लावणें. 'आपण स्वतः टोळीचा नायक होऊन तुम्हास उडवून देणार नाहीं.' –कोरकि २७८. [सं. उद्+डी–डायय्–उड्डायन; प्रा. उड्डवण]

**उडवलाउडवला, उडविलाउडविला**—वि. (कों.) दूर दूर; इकडेतिकडे; मधूनमधून; विरल; तुरळकतुरळक. 'आंबे बहुतकरून आभाळानें गळाले, आतां कोठें उडवले उडवले आहेत.' [उडविणें द्वि]

**उंडवळ**—वि. (कों) कामचुकार. उंडगळ पहा.

**उडवा–वी–वें**—पु.स्त्री.न. १ ढीग; रास; गंजी (पिकांची, गोवऱ्यांची). 'नाना निधानचि निदेवा। होये कोळसयाचा उडवा॥' –ज्ञा १८.७२५. २ (व.) (गोंवऱ्या वगैरेंची) रास ठेवण्यासाठीं केलेलें कूड. 'उडव्यांत कुणबी गोंवऱ्या ठेवितात.' ३ कोणत्याहि धान्याच्या वाळलेल्या ताटांचा (झोडपणीसाठीं) रचलेला ढीग; बुचाड. [सं. कूट; प्रा. उड; का. उड्डी=ढीग]

**उडवाउडव–वी**—स्त्री. १ टाळाटाळी; कोलवाकोलव. २ हेटाळणी; अवमान. ३ उधळपट्टी; अव्यवस्थित खर्च. ४ अस्ताव्यस्त करणें (रचून ठेवलेला जिन्नस); अस्ताव्यस्तपणा; अव्यवस्था; विस्कळीत रीतीनें केलेली फेकाफेकी. ५ निरास करणें; लागू होऊं न देणें (दोष इ.). [उडविणें द्वि]

**उडवाणी**—स्त्री. (प्रा.) तिरस्कारानें वागविणें; अवहेलना करणें; अनादर करणें (एखाद्या माणसाचा किंवा त्याच्या भाषणाचा). (क्रि. करणें). [उडविणें]

**उडव्या**—वि. १ उधळपट्टी करणारा; खर्चिक; अतिव्ययी. २ चुकारपणा करणारा; टाळाटाळ करणारा. [उडविणें]

**उंडळ**—स्त्री. उंडी एक झाड.

**उंडा**—पु. १ भिजविलेल्या पिठाचा गोळा. (भाकरी, पोळी करण्यासाठीं तयार केलेला). २ उडीद आणि तांदूळ यांच्या पिठाचे गोळे करून शिजवून एक खाद्य पदार्थ तयार करतात तो. ' 'खाजी करंजी, घ्याजी दाजी, आग्रह करिती, साखरमांडा, उंडा भर पुरणाचा धोंडा।' –अमृत ७३. 'आमच्या आया तुमच्या आया। खातील काय दूध उंडे.' –भोंगा ३ गोळा. 'तोचि दधी भाताचा उंडा वामकरी।' –दाव ३८५. ४ (कर्ना.) लाडू; गुंडाळें (उंडी=लाडू). ५ आळवाच्या पानाच्या वड्या करण्याकरतां पानांस पीठ लावून तीं गुंडाळून त्यांचे किंवा कळण्याचे वरवंट्याच्या आकाराचे गोळे करतात ते. नंतर ते शिजवून, कापून, तळून वडया करतात. [प्रा. उंडी=गोळा, पिंड; का. उंडे=गोळा; ता. ते. तु. वगैरे सर्व भाषांतूनहि हा शब्द आढळतो. गो. उंडो]

**उडाउडी**—क्रिवि. चढाओढीनें; ताबडतोब; उड्या पडून; चुरशीनें. 'हीं वांगीं उडाउडी विकलीं.' [उडी द्वि.]

**उडाऊ**—वि. अतिशय खर्चिक; उधळ्या. उडव्या पहा. [उडविणें]

**उडाऊछप्पी**–टप्पू—वि. टाळाटाळी करणारा; चुकारतट्टू. [उडविणें+छपणें; उडाण टप्पूप्रमाणें कांहीं तरी प्रयोग.]

**उडाण**—पु शेताचा, जमिनीचा एकीकडचा विलग असलेला तुकडा. [उडणें]

**उडाण**—स्त्री. (ना.) उडी; धांव. [सं. उड्डान; प्रा. उड्डण] ०**खटोलें**–न. विमान.

**उडाणटप्पू**—वि. १ एकाच ठिकाणीं, कामांत फार वेळ न टिकणारा; भटक्या; अस्थिर; चंचल वृत्तीचा. २ खुशालचंद; रिकामा; गांवगुंड. ३ तात्पुरतें; चालचलाऊ; हंगामी (उद्योग, नोकरी.) [उडणें+टप्पू; तुल० उनाड पहा.]

**उडाणवीर**—पु. (कों.) कोणत्याहि अवघड कामांत भय, शंका न धरतां उडी घालण्याचा ज्याचा स्वभाव तो. [उडणें+वीर]

**उडाफ़ू**—वि. १ तात्पुरतें; हंगामी; क्षणिक (काम, स्थिति). २ अस्थिर; चंचल मनाचा, वृत्तीचा; बेभरंवशाचा (माणूस).

**उंडारणी**—स्त्री. १ माज; मस्ती; गर्व; ताठा; ऐट; अभिमान; खुमखुमी. २ स्वैर वर्तन. ३ उनाडकी; उणगणें; खेळणें. [उंडारणें]

**उंडारणें**—अक्रि. १ माजणें; मस्तीला येणें; उद्धट होणें. २ स्वैर वर्तन करणें. 'छिनाल छबकडया उंडारतात.' –इंप ६२. ३ उनाडकी करणें; उडाणटप्पू बनणें. [का. उंडिग]

**उडावणी**—उडवणी पहा.

**उडावू**—वि. अति खर्चिक; उडव्या. उडाऊ पहा.

**उडाळ**—वि. १ अस्थिर; चंचल. २ (राजा.) लक्ष्य उडालेला, मनांतून, लोभांतून गेलेला; मन विटलेला; पराङ्मुख. 'द्रव्य मिळविण्याची आस्था लागतांच याचें मन विद्येवरून उडाळ झालें.' [उडणें]

**उडिद**—उडीद पहा.

**उडिया, उरिया**—पु ओरिसा प्रांतांत राहणारा. –स्त्री. ओरिसांतील प्रमुख भाषा. [सं. ओड्र; प्रा. उड्डिअ; हि. उडिसा]

**उडी**—स्त्री. १ एका जाग्यावरून उडून दुसऱ्या जागीं वेगानें पडणें, जाणें; झेंप; उडणें; उड्डाण (क्रि० घालणें; मारणें; टाकणें). २ (ल.) संकल्प; इच्छेची मर्यादा. 'त्या घोड्याचे हजार रुपये घ्यावे अशी त्याची उडी आहे.' ३ (ल.) आटोका; आवांका; पल्ला; कार्यक्षमता; आकांक्षा; उमेद. ४ (राजा.) दुसऱ्याचा बैल कामाकरितां आणल्याबद्दल धान्याच्या किंवा पैशाच्या रूपानें द्यावयाचें मूल्य; भाड्यानें जनावरें आणून शेती करणें. [सं. उत्+डी प्रा. उड्डी] **उड्या पडणें**–झडून, तुटून पडणें (मला पाहिजे,

मी करतों म्हणून ); गर्दी होणें; जोराची चढाओढ लागणें; चुरस लागणें (एखाद्या गोष्टीबद्दल). 'उंच वस्त तात्काळ विके। जाणत्या लोकांच्या कौतुकें। उडया पडती।' –दा १२.७.२५ 'त्या रोजगाराविषयीं उडया पडतात.' **उड्या मारणें**–१ गर्व वाहणें; ऐट करणें; फुशारकी मारणें; बढाई मारणें; उद्दामपणें वागणें. २ उनाडक्या करणें. ३ चैन करणें. ४ विवक्षित मर्यादा ओलांडून, उल्लंघून जाणें. ५ गाळणें (मुद्याचा भाग, नाटकांतील भाग, ग्रंथांतील विशिष्ट भाग). (**बळावर, जिवावर**) **उड्या मारणें**–दुसऱ्याच्या आश्रयावर, आधारावर अवलंबून मोठमोठ्या गोष्टी करणें; गर्व वाहणें; मोठमोठ्या कार्यास हात घालणें. 'आजपर्यंत आम्ही तुमचे बळावर उडया मारीत होतों, परंतु तुम्ही हातचे मोडलेत.'

**उंडी**—स्त्री. (कों.) उंडीण झाड व त्याचे फळ. उंडण पहा

**उंडी**—स्त्री. उंडा याचें लघुत्ववाचक. उंडा पहा. १ गोळा; घांस. 'जैसी घापे लोणियाची उंडी।' –ज्ञा ११ ४५७. २ भाताची मूद; पिंड; घास. 'ना तरी भस्माग्निच्या तोंडी। न पुरे भाताची उंडी।' –ज्ञाप्र ७०३. ३ बळी; नैवेद्य. 'नवसियां देती उंडी। बाळकांची।' –ज्ञा १७.९७. ४ खीर करावयासाठीं तांदूळ इत्यादिकांच्या पिठाच्या गोळया करतात त्या प्रत्येक ५ आमिष; पिठाची गोळी. 'उंडीस देखोनि मासा भुलला। गिळितां कंठी गळ टोचला।' –भवि २.१६०. [प्रा. उंडी=पिंड; का. उंडे=गोळा, ते. उंड; ता. उरुंड्ड उरुन्ड्ड; उंडा याचें अल्पत्वदर्शक नाम] **उंडी, उंड्या उकळणें**–भिक्षा मागणें; आगंतुकी करणें (दुसऱ्यावर अवलंबून असणाऱ्याबद्दल वापरतात). **०बकाल**–वि. (राजा) भोजनभाऊ [उंडी+बकलणें=खाणें]

**उंडीण**—उंडण पहा.

**उडीद**—पु. एक द्विदल धान्य. याचें झुडुप अथवा वेल हात दीडहात उंच वाढतें; उडदाचा रंग काळा असून डाळ पांढरी, पौष्टिक, शीतळ असते. 'उडदांमाजी काळे गोरें। काय निवडावे निवडणारें।' –व्यं १४. [प्रा. हिं. उडिद; का. उद्दु; गु. अडद; सं. माष]

**उडु**—न. नक्षत्र. [सं.] **गण**–पु. तारकापुंज. **०पति–राज**–पु. चंद्र. 'तंव उडुराज उदेला गगनीं' –रास १.१००.

**उडुप**—पु. १ चंद्र. २ नौका. [सं. उडु+प=पति]

**उंडूगाडा**—पु. (व.) भरींव चाकाचा गाडा.

**उंडेकार**—वि. (गो.) पाव करणारा, विकणारा; रोटीवाला. [का. उंडे=गोळा उंडो=पाव+सं. कृ–कार]

**उंडेल**—न. (कों.) उंडिणीच्या फळांतील बियांचें तेल. याचा जळण्याकडे व गुरांच्या अंगावर माशा बसूं नयेत म्हणून उपयोग करितात. [उंड+तेल]

**उड्डाण**—न. उडी पहा. 'एकेचि उड्डाणें सातांहि सागरा। प्रदक्षिणा करी जो।' –ज्ञा १०. २५०. [सं. उड्डान]

**उड्डियान**—न. हृदयस्थान; अनाहतचक्र. [सं.] **०बंध**–पु. योगांतील एक बंध; योगांत मूल, उड्डियान व जालंदर असे तीन बंधाचे प्रकार आहेत.

**उड्या**—वि. १ उडी मारणारा. २ धमक असलेला; हुषार; चलाख. **म्ह०** उडया पुरवेल पण पडया पुरवत नाहीं.

**उढा**—पु. बांबूची एक जात. हा जाड असून लोंढा येथील जंगलांत होतो.

**उण–खु–खूण**—स्त्री. १ हेतु, मनोगत; कामना. 'नायट्यांभेण। न मोडिजे नागांची आण। तैसी पाळी उणखुण। स्त्रियेची जो॥' –ज्ञा १३.८००. २ वर्म; रहस्य. 'म्हणोनि एक एकाचीन। जाणती उणखूण येरयेरां।' –निगा १७७. ३ प्रत्यय; अनुभव. 'तें शोधितसत्वाचें लक्षण। हें मी जाणें उणखूण।' –एभा ११.७२५. ४ ओळखण्याचें लक्षण; चिन्ह; खाणाखूणा. 'एकधां विभागे अंतःकरण। त्याची उणखूण निज लक्षण।' 'ऐकोनियां उणखुणेसी। चरफडी जैसी विव्हळ।' –एभा २३.९७३. [उणें+खूण]

**उणवट**—वि. अल्प मोलाचें. [सं. ऊन+वत्; म. उणें+वट]

**उणवाई**—स्त्री. (कों.) उणेपणा; कमतरता; न्यूनता; कमीपणा; तोटा; टंचाई. [सं. ऊन; म. उणें+वाई प्रत्यय]

**उणा**—वि. १ कमी; अपुरा; नेहमीपेक्षां कमी; विवक्षित परिमाणापेक्षां कमी. 'काय उणें कां करितोसि चोरी।' –तुगा ११९. 'गुणा न म्हणतां उणा अधिक आदरें सेविती' –केका २३. २ अपुरा; अपूर्ण; सदोष (कार्य, सामग्री); अपुरी असलेली (गोष्ट). 'शेताचा सरंजाम जमविला खरा, परंतु उणा आहे; कांकीं आंत बैल उणे आहेत म्हणून.' ३ हलका; कमी योग्यतेचा, प्रतीचा. 'म्हणौनि आसुरी उणी संपदा नव्हे।' –ज्ञा १६.२५६. 'वैश्य जातीपेक्षां शूद्र जाति उणी.' ४ मानहानिकारक; अयोग्य; एखाद्याचें व्यंगदर्शक (शब्द, भाषण, इ०). 'बोले शब्द उणा विदेह पिसुणामध्यें तदा त्या गुणा॥' –आसी ५.१. ५ नपुंसक. 'वडील बाईल म्हणे उण्या। धाकटी बाईल म्हणे सुन्या॥' –नामदेवनाटक १९. ६ गैरहजर; अविद्यमान; कमती. [सं. ऊन] **०अप्रा**–वि. अपुरा; विवक्षित मापाहून कमी (कापड). उणा पहा. [उणा+अपुरा] **०दुणा**–वि. १ अपमानकारक; कमी अधिक; तिरस्कारदर्शक; मर्मभेदक (शब्द, भाषण, बोलणें). 'कोणाला उणेंदुणें बोलणें बोलूं नये' २ सरासरी. उणापुरा पहा. [सं. ऊन+द्विगुण] **०पुरा**–वि. कमी-अधिक; जवळजवळ; अजमासें, सुमारें; सरासरी. 'मला पुण्यास आल्याला उणापुरा एक महिना झाला.' [सं. ऊन+पूर्ण]

**उणाक–ख**—वि. हलक्या प्रतीचें; कमी किंमतीचें; (हलकें, विटणारें वस्त्र, माल वगैरे). 'त्याप्रमाणें उणाख आणि मध्यम

शालजोड्या पाहून पाठवून देणें ' -पेद १८.७२. -न. हलकें वस्त्र. 'बाजी नारायण पुरंदरे यांना उणाखीं मिळालीं होतीं.' -भात्रै १०.३.१२७. [ उणा+आंख ]

**उणांग**—वि. (गो.) कमी; हलका; हलक्या दर्जाचा. [सं. ऊन+अंग ]

**उणाव**—पु. कमीपणा; कमताई. उणवाई पहा.

**उणावणें**—अक्रि. १ कमी होणें; न्यूनता येणें; पूर्व स्थिती-पेक्षां उणा होणें (पर्जन्य, रोग इ.) 'ज्येष्ठ अंधत्वें उणाविला॥' -मुआदि २५.८६. २ तीव्रता कमी होणें (दुःखाची); शिथिल होणें. ३ उतरणें; खालावणें; अवनति होणें; क्षीण होणें. [सं. ऊन; प्रा. ऊण ]

**उणावळ**—स्त्री. कमीपणा; तूट.

**उणीव**—स्त्री. १ कमीपणा; न्यूनता; उणेपणा. 'परि उणिवेचा सोस नाहीं तयास।' २ दोष; व्यंग. [सं. ऊन. सिं. ऊणी ]

**उणें**—न. १ कमीपणा; न्यूनता; दोष; व्यंग; अपूर्णता; वैगुण्य. 'दैत्यीं देवां आणिलें उणें॥' -ज्ञा ९.४५०. 'तया पांडवांचें उणें। कीजेचि ना पुराणें। विश्वंवेंर्ये।' -ज्ञा १५.२५. 'जें यादवां येईल उणें।' -उषा ७८५. 'म्हणे स्वकृतिच्या उणें किमपि एकवर्णी न हो॥' -केका ६१. -शअ. वांचून; शिवाय; वीण. 'जीव घेतलिया उणें चालों नेणसी साजणें॥' -अमृ २.३९. 'तैसें आवडतें हिं करणें। न निफजे सीणलेयां हिं उणें।' -राज्ञा १८.९४०. -वि. उणा पहा. [सं. ऊन; प्रा. ऊण. ] ०**आणणें**-दोष लावणें; कमीपणा आणणें; लाजविणें. 'वरि झळकति दिव्य कळस। उणें आणति उडुगणास।' ०**घेणें**-आपल्या कमीपणाबद्दल मनास लावून घेणें; दुःख पावणें; स्वतःला कमी समजणें. ०**पाहणें-काढणें**-दोष पाहणें; व्यंग काढणें; नांवें ठेवणें. ०**उत्तर-भाषण**-न. अपमानकारक, तिरस्कार-व्यंजक, मानभंग करणारें उत्तर. 'तें गुडघ्याएवढें पोर, पण चुलत्याला उणीं उत्तरें करतें! हा काय त्यांच्या घरचा मोळा तरी!' ०**म्ह**-(व.) उणें असे मनी खसे नकट असे नाक परवसे=ज्याच्यांत कांहीं उणें असतें त्यास दुसरें कोणी बोलत असल्यास, तें मलाच तर उद्देशून बोलत नाहींत ना? असें वाटतें. ०**दुणें-रें**-वि. अपमानकारक; निंदाव्यंजक; कमीअधिक; पाणउतारा करणारें (भाषण); घालूनपाडून बोललेलें; उणादुणा पहा. 'भाऊसाहेब काकासाहेबांना उणेंदुरें बोलत असलेले पाहून नमुताईना जरा राग आला.' -हाच कां धर्म ३३. ०**पणा**-पु. कमीपणा. ०**पाणें-पाताळ**-न. दोष. 'एकमेकांची उणींपाणीं काढण्यांतच जर आपला असा वेळ जायचा तर उद्यां रणांगणावर काय होणार.' -डावर्जिकला. 'त्याचें कशाला उणेंपाताळें काढतेस?' -नामदेव नाटक ७६. ०**पुरें**-वि उणापुरा पहा. १ कमीअधिक; सुमारें; सरासरी; अंदाजें; जवळजवळ. 'आपल्या भेटीला उणेंपुरें वर्षे होत आलें.' २ पूर्णअपूर्ण. 'किती अनुवाद, उण्यापुऱ्या नकला ...आढळून येतात हें लक्षांत येईल' -गीर ५.

**उत**—अव. अथवा. 'अर्जुन म्हणे उभा रे सिंहत्व त्यजुनियां न कुतरा हो। उत राहो, क्षण पाहों, जा यमभट हो! तळीं न उतरा हो॥' -मोवन ९.४३. [सं. उत=वा ]

**उतटणें**—अक्रि. १ तडकणें; उकलणें; उलणें; उसवणें; ताणून फाटणें; फुटणें; तटतटणें (ताणल्यानें, आंतून जोर झाल्यानें बंद, इ०). 'मग शिवणी जैशी उतटे॥' -ज्ञा ६.२६६. 'तयेच्या चोळीचे सकळ जवदाणे उतटती।' -सारुह ८.१६५. 'नादें उतटलें आकाश।' -वेसीस्व २.२४. २ घट्ट होणें; दाटणें; अतिशय ताण बसून तुटणें. 'हे चोळी गेली उतटौनि। तैचि जाणिलें मियां॥' -शिशु २२५. -सक्रि. उकलणें; फाडणें; ताणून तोडणें इ. [सं. उत्+तन् ]

**उतटणें**—अक्रि. उचंबळणें; भरून येणें. 'कीं हें सुखाचीं तारुवें लोटलीं। आक्षे आनंदें उतटलीं।' -दा १.७.३१ 'ऐकोनि उतटला समर्था प्रेम।' -दावि ३०२. [सं. उत+तट=वर येणें ]

**उतणणें**—उक्रि. गवत काढून टाकणें; तृण झांप इत्यादिकांनीं आच्छादिलेल्या गृहावरील तृण किंवा झांप काढून टाकणें. [सं. उत्+तृण; प्रा. उत्तण ]

**उतणणें**—अक्रि. गर्वानें फुगून जाणें; ताणणें. [सं. उत्+तन्=लांब करणें ]

**उतणें**—अक्रि. १ उकळून वर येणें (दूध, कढी वगैरे). 'जैसें उतलें आगीं पडे। तें नलगेचि होमा।' -ज्ञा १८.१९३. २ पू वगैरे येणें (डोळ्यांतून). ३ ओठादि अंगावर पुटकळ्या, फोड येणें (तापामुळें, वस्तरा लागून). ४ बिब्बा वगैरे लागल्यामुळें चिडणें; फुगून वर येणें. 'कोणे सवतीनें भरला भिलावा उतला।' -निर्गुणाचा पाळणा १२. ५ खतखतणें; खदखद होणें (आगीवांचून शिजल्याप्रमाणें). (कांहीं चूर्णावर लिंबाचा रस घातला असतां होतें तसें). फेंस येणें. ६ भरून वाहणें. 'कोपावेशें झालें कल्पांतींचें समुद्रसें उततें॥' -मोमीष्म ९.२६. ७ (ल.) गर्वानें फुगून जाणें. 'किंबहुना ऐसैसें। उतणें जें संपत्तिमिसें।' -ज्ञा १६.२२९. 'खळा! न मदें उतरे।' -मोरा २६. ८ उसळणें; उचंबळून वर येणें. 'तातला तेलीं सागर। उतताती।' 'कल्पांतींचे जसे जलधि उतते।' -मोवन १०.३९. ९ माजणें; फुगणें; जोरानें वाढणें-(पीक, गवत, भाजी वगैरे). १० अतिशय समृद्ध होणें; कल्पनेबाहेर बहर येणें (धान्य, फळें वगैरेस). [सं. उत्+तन्; म. ऊत; तुल० का. उदु=फुगणें ] **उतूं-जाणें-चालणें**-१ खर्च होणें; नुकसान होणें; तोटा होणें; अडणें. 'माझें काय त्यावांचून उतूं जात आहे.' **उतूं येणें**-ऊत येणें; उतास येणें; वर येणें (दूध इ०); फेंस येणें; (ल.) रहस्य असणें; आटोकाट, अतिशय प्रेम असणें.

**उततणें**—अक्रि. उचंबळणें; उतणें अर्थ ८ पहा. [ उत्+तन् ]

**उतती**—स्त्री. खारीक. 'बादामें आकरोटें खिसमिस। उतत्या आणवील्या सवंगा ॥' –सारुह ३.४८. [ का. उत्तुत्ते=खारीक ]

**उतप**—वि. (प्र.) उताप. उघडें; ज्यावर चांगलें ऊन येत आहे असें; छायारहित. [ सं. उत्+तप्; उत्तप्त; प्रा. उत्तप्प ]

**उतफाळणें, उतफळणें**—क्रि. फाडून टाकणें; फाडून तुकडे तुकडे करणें; चिंध्या करणें; वाभाडे काढणें. [ सं. उत्स्फालन ]

**उतमाच–ज–त**—पुस्त्री. (ना.व.) १ उच्छाद; उपद्रव; उच्छृंखळपणा. २ माजोरीपणा; गर्व. 'एवढी उतमात करूं नकोस.' [ ऊत+मात ]

**उतरंग**—न. (कों.) दरवाजाच्या चौकटीचें वरील लाकूड. [ सं. उत्तर+अंग; प्रा. उत्तरंग ]

**उतरचढ**—वि. वारंवार चढण किंवा उतरण असलेलें; उंचसखल; खालवर. –स्त्री. चढण्याउतरण्याची क्रिया. [उतरणें+चढणें]

**उतरट**—वि. उतार असलेला; उतरता. [ सं. उत्+तृ–तर् ]

**उतरड, उतरंड**—स्त्री. निवडुंगावर वाढणारा एक तऱ्हेचा वेल. ह्याच्या रसानें अगर चूर्णानें चामड्यावरील केंस निघून जातात. [का. उत्तरणी]

**उतरड, उतरंड, उतरण**—स्त्री. १ खालीं मोठें व वर लहान अशा रीतीनें एकावर एक भांडीं, घट ठेवून केलेली रचना. 'मनोरथांच्या उतरंडी। उतरीरची।' –ज्ञा १३.११४. 'नाचती गोकुळींचीं मंदिरें। नाचत उतरंडी देव्हारे।' –ह ५.८०. २ घोड्याचें एक वाईट लक्षण ( कपाळावर एकावर एक असे तीन उलटे भोंवरे असणें ). **उतरंडीचा वाघ**–घरांत शौर्य दाखविणारा भेकड मनुष्य. **उतरंडी उतरणें**–दुसऱ्याच्या कामांत ढवळाढवळ करणें. **म्ह०** उतरंडीला नसेना दाणा पण दादला असावा पाटील राणा. [ सं. उत्+तृ–तर्; उतर+हंडी ]

**उतरड**—स्त्री. १ ढाळ; उतार. २ उंसाच्या चरकांतील नराचा आंस ज्यांत फिरतो तो आडवा दांडा; अडवट. [ सं. उत्+तृ ]

**उतरण**—स्त्री. १ उतार असलेली जमीन; उतरड; ढाळ. **म्ह०** चढणीस घोडा उतरणीस रेडा. २ उतार; उतरता रस्ता. ३ ( उत्तरायणांतील ) उत्तरेकडून वाहणारा वारा. ४ वय–संपत्ति वगैरेस लागलेली ओहोटी; कमी होत जाणें; अवनति; हीन स्थिति. ५ ( यंत्र ) क्षितिजपातळीशीं कलती अशी पातळी; तिर्यक् धरातल. (इं.) इन्क्लाईंड प्लेन. ६ पिकविण्याकरितां झाडावरून उतरलेले आंबे. –न. ज्या ठिकाणीं नदींतून पायानें चालत जातां येतें अशी जागा; उतार. [ सं. उत्+तृ–उत्तरण ]

**उतरणें**—सक्रि. जमिनीवर ठेवणें; वरचा पदार्थ खालीं आणणें, ठेवणें. २ मुक्कामावर ओझें वगैरे ठेवणें; खालीं, रिकामें करणें; माल काढून ठेवणें ( गाडींतून, गलबतांतून ). ३ खालीं आणणें; खालीं येण्यास मदत करणें. ४ उंची कमी करणें; ठेंगणें करणें. ५ पलीकडे नेणें; पार करणें ( नदींतून वगैरे ). ६ उतरून घेणें; पाहून काढणें; नक्कल करणें; चित्र काढणें; छबी काढणें; प्रतिमा काढणें; 'चितूनें गणूच्या पाटीवरील उदाहरण उतरलें.' नमुन्याबरहुकूम करणें; कृति, हावभाव वगैरेंची नक्कल करणें. 'कोंकण्याची नक्कल हा हुबेहूब उतरतो.' ७ धारा, भाव, मागणी वगैरे कमी करणें; अल्प प्रमाण करणें; 'नवा राजा झाला त्याणें शेतास पीक नाहीं असें पाहून धारे उतरले' ८ अपकर्ष करणें; दर्जा, हुद्दा योग्यता कमी करणें; गर्व नाहींसा करणें ( ताशेरा, इ० द्वारां ). ९ तीव्रता कमी करणें, शांत करणें ( विष, मादक पदार्थ वगैरेंची ). १० नारळ, मीठ, मोहऱ्या वगैरे पदार्थ अंगावरून ओवाळून टाकणें. 'ज्यासी हृदयीं ध्याती पद्मजधूर्जटी। त्यावरोनि यशोदा उतरी दृष्टी।' –ह १३.१६१. 'येसूबाईनें कालसद्रूवरून एक कोंबडें उतरलें.' ११नाक, कान, जीभ वगैरे अवयव कापून टाकणें; 'या खड्गें हें शिर उतरीं हा देह पडूं दे रणीं।' –विक २९. १२ ( नदी, समुद्र इ० ) पार जाणें; पलीकडे जाणें. 'बहु दुस्तर विपदंबुराशि उतराया।' –मोकर्ण ७.२३. १३ अंगावरून काढणें (कपडे, दागिने. वगैरे) १४ ( उतरतें छपर, पडवी, सोपा वगैरे ) तयार करणें; बांधून सिद्ध करणें. १५ काढून टाकणें ( घराचा वरील भाग. इ० ). 'म्युनिसिपॅलिटीनें रामरावांचें घर पार उतरलें.' १६ कापून टाकणें, साफ करणें ( दाढी, मिशा वगैरे ) १७ ( पत्त्यांच्या खेळांत ) पान टाकणें. 'तुम्ही एक्का उतरा.' १८ झाडांवरून फळें वगैरे काढणें. 'आम्हीं आमच्या आंब्यावरील आंबे आज उतरले.' १९ वरून खालीं येणें ( घाट, जिना वगैरे ) [ सं. उत्+तृ ]

**उतरणें**—अक्रि. १ ( जिना, घाट, पर्वत वगैरेवरून ) खालीं येणें. 'उतरलें उदक पर्वत वळघे।' –ज्ञा १०.६९. 'पुण्याचा रस्ता वाई नजीक सोनजाईच्या डोंगरावरून खालीं उतरत होता.' –विवि १०.१०.२१७. २ हिशेब, माप, भविष्य इत्यादि बरोबर जमणें, पटणें; ताळा पडणें; मूळाबरहुकूम नक्कल तयार होणें. 'आतां ग्रंथकारांच्या म्हणण्याप्रमाणें भाषांतर उतरलें आहे.' –विवि ८.८.८४. ३ मुक्काम करणें; थांबणें; वाहनांतून खालीं येणें. 'बिहारीलाल गाडींतून उतरले.' 'आपलें सर्व खटलें बाहेरच्या देवळांत उतरा आणि तुम्ही सडे किल्ल्यांत या.' ४ धैर्य, राग, भीति, ज्वर, दर, भाव इत्यादि कमी होणें. ५ कोमेजणें, निर्जीव होणें; निकृष्टावस्थेप्रत जाणें; म्लान होणें; सुकणें ( चेहरा ). 'करितां अधर्म सयः स्वपितृसुहृज्जन मुखप्रभा उतरे।' –मोआदि ९.५७. 'उतरलें पाहोनि सच्छिष्यवक्त्र।' –दावि २६०. 'गंधर्वाकडून दुर्योधनास धर्मराजापुढें उभें केलें तेव्हां त्याचें तोंड उतरलें होतें.' ७ वयातीत होणें; प्रकृति खालावणें; वस्त्र जीर्ण होणें; शरीर, फुलें, मासे, मांस, मोत्यें वगैरेंचा तजेला नाहींसा होणें. ८ फळ वगैरे अविकणें, अधिक पिकणें. ९ अढी वगैरे बरोबर पिकून

**उदकाकडे**—क्रिवि. ( अप. रूपें ) उदकडे–उदकाडे–उत्काडे. ( गो. ) बर्हिदिशेकडे; परसाकडे; शौचास ( पाणी पाहून त्या ठिकाणीं शौचास बसतात म्हणून प्रयोग ). [ उदक+कडे ]

**उदकाडी**—स्त्री. उदबत्ती; अगरबत्ती. [ ऊद+काडी ]

**उदकुंभ**—पु. पाणी भरलेला घट; पाण्याचा घडा, कळशी ( धार्मिक विधींत उपयोग ). ' आली घरासि युवती उदकुंभ ठेवी ' –आकृ १०. [ सं. उद+कुंभ ] **०दान–श्राद्ध**–न. मृताच्या अकराव्या दिवसापासून एक संवत्सरपर्यंत (अब्दपूरित श्राद्धापर्यंत) मृतास उद्देशून दररोज करावयाचें श्राद्ध. यांत ब्राह्मणास उदकुंभाचें दान करितात. हें श्राद्ध रोज करणें शक्य नसल्यास एकच दिवस श्राद्ध करून दररोज नुसतें उदकदान व आमान्न ( किंवा धान्य ) दान करतात; अथवा वर्षाचें धान्य एकदमच देतात. [ सं. ]

**उदगयन**—न. सूर्याचें उत्तरदिशेकडे जाणें. उत्तरायण पहा. ' उदगयन होय तोंवरि मीं शरतल्पीं असाचि राहेन ' –मोभीष्म ११.१२८. [ सं. उदक्+अयन ]

**उदगा, उदगामादगा**—वि. रागीट; मग्रूर; माजोरी. [ उतणें+मातणें; किंवा मातगा द्वि. ]

**उदगिर**—१ निजाम इलाख्यांतील एक गांव. २ लुगड्यांची एक पेठ; तेथील लुगडीं. ' अक्कलकोट सोलापुर उदगिर बारिक येती त्या घनवेली । ' –अमृत ४९.

**उदगिरि**—स्त्री. एक क्षुद्र देवता. ' उदगिरि देवी म्हणे स्वामीसी। देवा तूं उदयगिरिवरि पावलासी। आमुचा पूजामान चालवी जनासी। तुझ्या भजनासी विश्व लाऊं ॥ ' –सप्र ५.२३. [ उदयगिरि ]

**उदग्गोल**—पु. क्रांतिवृत्ताचा उत्तरेकडील अर्धा भाग. [ सं. उदक्+गोल ]

**उदंड**—वि.क्रिवि. पुष्कळ; अनेक; असंख्य; फार (संख्या, परिमाणवाचक ). ' तयाच्या ठायीं उदंड। अज्ञान असे वितंड । ' –ज्ञा १३.६९१. ' विस्तीर्ण मस्तकीं उदंड। सिंधूर चर्चिला । ' –दा १.२.१०.' कैवल्याच्या तुम्हां घरीं। रासी हरी उदंडा । ' –तुगा १४११. ' लोकानीं त्याला उदंड सांगितलें...'–बाळ २.८७. [ सं. उद्+दंड, उदंड ]

**उदणां घालप**—क्रि. ( गो. ) केळीं वगैरे फळें पिकविण्याकरितां मडक्यांत ठेवून तोंडावर दुसरें लहान मडकें घालून लिंपून व ४।५ दिवस विस्तवाची आंच देऊन पिकत घालणें. [ उद्+दहन? दे. उद्दाण=चुला, स्वयंपाकाची शेगडी ]

**उदंत**—पु. १ इत्थंभूत वार्ता; साद्यन्त वृत्तांत, हकीकत. ' आईकिजे सर्व उदंत कानीं । ' –सारुह ६.८. सांग तदा त्या सकळा उदंता । ' –वीरेश्वरकृत सोमवारचरित्र ३७. २ शुद्ध अंतःकरणाचा मनुष्य. ३ उद्योग करून पोट भरणारा माणूस. [सं. उद्+अंत, उदंत ]

**उदधि**—पु. समुद्र; सागर. ' जैसा गंगेसी उदधि। निरंतर । ' –ज्ञा २.२४१. सामाशब्द–कालोदधि; महोदधि; क्षीरोदधि इ०. [ सं. उद+धि ]

**उदनी**—स्त्री. ( कों. ) उडवीमध्यें पाणी जाऊं नये म्हणून ती वर निमूळती करीत नेतात आणि गवत किंवा पेंढा यांनीं ती शिवतात असा केलेला उडवीचा निमुळता भाग. ' पाऊस पडण्याची भीति असल्यामुळें उडवीला उदनी चांगली घेतली पाहिजे.' [ सं. उद्+नी ]

**उदप**—पु. पाण्यांतील जीवजंतु; पाण्यांत वास करणारा प्राणी. ' मग उदपासि म्हणे उदधी। तुम्ही सीत कोरावें स्वबुद्धि ॥ ' –कथा २.१४.११६. [ सं. उद+प ]

**उदफाळणें**—उक्रि. फाडून तुकडे करणें; चिरून, फाडून टाकणें; धुव्वा उडविणें. [ सं. उत्स्फालन ]

**उदफूल**—न. उदाचें फूल; उदाची लाही; लोह उदास लोखंडी तव्यावर आंच देऊन त्याची पंचपात्रांत धरलेली वाफ. ही वाफ तुंब्याच्या फलासारखी व शुभ्र असते. –वगु १.७४. [ अर. ऊद= लाकूड+फूल ]

**उदबत्ती**—स्त्री. उदकाडी; अगरबत्ती; ऊद; धूप व इतर कांहीं सुगंधी पदार्थ वाटून त्यांचा लेप एका काडीस देतात, ही पेटविली म्हणजे सुगंधी धूर हवेंत पसरतो. [ उद्+वर्ती=वात; ऊद+बत्ती ]

**उदंबर**—पु. उंबर; औदुंबर. ' वाढितां उदंबरें सरिसें। पुरिकांसी ॥ ' –ऋ ८२. [ सं. उदुंबर=उंबर ]

**उदमस्त–मात**—वि. ( कों. गो. ) उन्मत्त; बेफिकीर; गर्विष्ठ; अवहेलना करणारा; माजोरी. [ सं. उन्मत्त ]

**उदमी**—पु. १ उदीम करणारा; व्यापारी; क्रयविक्रय करणारा; दुकानदार. २ उद्यमी; उद्योगी; पुढारी. 'ब्राह्मणांनींच उदमी व्हावें असें आम्हीं म्हणत नाहीं. ' –टि ४.२२८. [ सं. उद्यम ] **०चाल**–स्त्री. १ व्यापारी पद्धति. २ व्यापारी लोकांची राहाणी, चालीरीती वगैरे.

**उदंमुक**—वि. ( गो. ) उन्मत्त.

**उदमेख**—पु. ( कों. ) उद्योगीपणा; आवड; हौस; तत्परता; उत्सुकता; आतुरता. ( क्रि. करणें ). [ सं. उन्मिष्=डोळे उघडणें; उन्मेष=जागृतता ] **–खी**–वि. उत्सुक; आतुर; आवड असलेला वगैरे. **–खून**–क्रिवि. १ मुद्दाम; निक्षून; आवर्जून. २ मनाचा पूर्ण निश्चय करून; स्वतःच्या आवडीनें; पूर्ण कल्पना येऊन; सहज किंवा यदृच्छेनें याच्या उलट

**उदम्ल**—न. ( शाप. ) ज्या अम्लांत प्राणवायु नसतो तें अम्ल. ( इं० ) हायड्रॅसिड. [ उद+अम्ल ]

**उदय**—पु. १ उगवणें; क्षितिजावर येणें; दिसणें ( सूर्य, तारे, इ० ) ' अस्तास जाई उदयास येई ॥ ' ' पूर्व दिशे उदयाला भानू

आला उदयाचळा।' –पला २२. २ दृश्य होणें; दिसूं लागणें (शुक्र, बुध, इत्यादि ग्रह सूर्यापासून दूर झाल्यामुळें). ३ उत्पन्न होणें; प्रादुर्भाव; उद्गम; उद्भव; वर येणें; फुटणें (फुलें, अंकूर, विकार वगैरे जसें–पुष्पोदय; कामोदय; क्रोधोदय इ०). ४ उठणें; बाहेर येणें; फुटणें (केंस, घाम, इत्यादि शरीरावर जसें–घर्मोदय). ५ उत्कर्ष; भरभराट; महत्पद प्राप्त होणें; वर डोकें काढणें. 'सांदीपनीनें आपल्या शिष्याचे भावी गुण व उदय जाणून त्यास ठेवून घेतलें.' [सं. उद्+इ=जाणें] **उदयास येणें**–प्रसिद्धीला येणें; अभ्युदय होणें.

**उदयगिरि, उदयाचल-ळ**–पु. ज्या पर्वताच्या आडून सूर्य–चंद्राचा उदय झालेला दिसतो तो (काल्पनिक) पर्वत; ज्या भागांतून उदय होतो तो भाग, प्रदेश. 'कां उदयाचळकुळीं। झळकतां अंशुमाळी॥' –ज्ञा १८.१५३१. 'उठि लौकर वनमाळी उदयाचळीं मित्र आला।' –होला १६. [सं. उदय+गिरि, अचल= पर्वत]

**उदयलग्न**–न. (ज्यो.) उदय पावत असलेला राशि, राशीचा उदय; लग्न पहा. [सं.]

**उदयीक**–क्रिवि. उद्यां. [सं. उदय]

**उदर**–न. १ पोट, कोठा; जठर. 'उकार उदर विशाल।' –ज्ञा १.१९. २ पोटफुगी; विकारानें फुगलेलें पोट; पोटांतील एक रोग. उ० जलोदर; वातोदर; सर्पोदर, वगैरे. ३ (कृषि.) (पाण्याचें अजीर्ण) कांदे, बटाटे इत्यादि भूमिगत पिकास पाणी फार झालें तर सूज येते व तो भाग कुजतो त्यास म्हणतात. –कृपि. १८८. ४ गर्भाशय; कूस; कुक्षि. 'अगा वसुदेवाचिये तपप्राप्तीं। श्रीकृष्ण देवकीउदरा येती।' –एरुस्व १ १०. 'धन्य धन्य ते कौसल्या सती। उदरासि आला त्रैलोक्यपति।' –संवि १८.५. [सं. उदर; गि. जलंधरु] **–राची खांच**–स्त्री. पोट. 'आपुली खांच उदराची.' –संग्रामगीतें १३३. **–रीं येणें**–(एखादा ग्रह जन्मराशीस येणें); यथेच्छ खाण्यापिण्यास, उपभोग घेण्यास मिळण्याजोगी दशा येणें (निंदाबोधक). **उदरीं शनी, शनैश्वर येणें**–(ज्यो.) शनी जन्मराशीस येणें. म्हणजे चांगली दशा प्राप्त होणें; ऐश्वर्य मिळणें. **०तलधमनी**–स्त्री. (शारीर.) पोटाजवळची धमनी. **०तलपाद**–(प्राणि.) गोगलगाय इत्यादि पोटानें सरपटणारे प्राणी. [इं. गॅस्टरोपोडा; ग्री. गॅस्टर=पोट; तुल० सं. जठर]. **०दरी**–स्त्री. पोट; पोटाची खांच. **०निर्वाह-पूर्ति-पोषण-प्रवृत्ति-वृत्ति**–पुस्त्रीन १ चरितार्थ; उपजीविका; पोषण; उदरंभरण; क्षुधाशांति. 'भिक्षा मागुनी क्षेत्राभीतरीं। उदरनिर्वाह करितसे॥' –नव १३.६०. 'उदर प्रवृत्तिकारणें। मोळ्या आणून विकीतसे॥' –संवि २१.१४. २ उपजीविकेचें, चरितार्थाचें साधन; जीवन; पोटापाण्याची सोय. ३ पोट भरणें; केवळ जगणें; जीव जगविणें; पोट चालविणें (सामा. निंदाव्यंजक). **०पिशाच्च**–पु. अतिशय खादाड; अधाशी; खाबू.

**उदरंभर-री**–वि. १ पोटभरू; पोटार्थी; खादाड. 'पीतां मरंद उदरंभर भ्रमराचें।' –नल ३८. 'गोसावी लोक ईश्वरप्राप्तीचे नुसतें सोंग आणतात, पण उदरंभर मात्र असतात.' २ स्वार्थसाधु; आपमतलबी. 'बरेच प्रोफेसर... उदरंभरी लोक आहेत' –टि २.५१४. ३ पोट भरण्याखेरीज कांहीं न करणारा; स्वतःच्या निर्वाहाखेरीज अन्यत्र न पहाणारा (देश–समाजसेवा इ० इतर कांहीं न करणाऱ्यास म्हणतात). **०भरण**–न. अन्न खाणें; जेवणें; भोजन. उदरनिर्वाह पहा. 'उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म।'

**उदर**–(नाविक) उत्तर दिशा; ध्रुव–दिशा. [सं. उत्तर]

**उदर**–न. (नृत्य) पोटानें केलेले निरनिराळे अभिनय. नृत्यामध्यें उदराच्या चार प्रकारच्या अवस्था होतात–क्षाम; खल्ल; पूर्ण व सम. [सं.]

**उदरणें**–क्रि. ओकणें. 'दुदाची बालकें मारिती। तीं रक्तासवें दुद उदरती।' –ख्रिपु २.१३.३०. [सं. उद्–गॄ]

**उंदरनळी**–स्त्री. (माण.) मेढ्याच्या वरच्या बाजूस असणाऱ्या नळ्यांपैकीं प्रत्येक. [उंदीर+नळी]

**उदराडकान**–स्त्री. (गो.) वनस्पतिविशेष. उंदीरकानी पहा.

**उदरसूत्र**–न. (गणित) (वर्तुळाचा) व्यास; वर्तुळाच्या मध्यबिंदूंतून जाणारी परिघमर्यादित रेषा. [सं.]

**उदरी**–वि. १ ज्यास उदररोग झाला आहे असा; पोट फुगलेला. २ अतिशय लठ्ठ; दोंदील; पोट पुढें आलेला. ३ उदराचा; उदर–पोटासंबंधींचा. [सं.]

**उंदरी**–स्त्री. ज्यांत डोक्यावरील केंस गळून पडतात असा रोग; चाई; कातरी. मनुष्येतर प्राण्यासहि हा रोग होतो (लोंकर गळून पडते); मूळच्या केंसांचा भाग उंदरानें चावल्या–कुरतडल्याप्रमाणें दिसतो म्हणून हें नांव पडलें. [उंदीर]

**उंदरी**–स्त्री. एक परोपजीवी वनस्पति.

**उदर्क**–पु. पुढें होणारी गोष्ट; भवितव्य; भविष्य. सामाशब्द– उदर्क–कार्य–वचन–सुखदुःख इ०. [उद्+अर्क=सूर्य] **०काळ**–पु भविष्यकाळ. **०फल**–न. परिणाम; पर्यवसान; निष्पत्ति; शेवट. **०चिंतन**–न पुढें होणाऱ्या गोष्टीबद्दलचा विचार.

**उदर्गत**–स्त्री. (गो.) उपाय; इलाज. [सं. उद्धार+गति]

**उंदऱ्या**–स्त्री.अव १ विशाखा नक्षत्र. २ त्यांत पडणारा पाऊस. विशाखा नक्षत्राजवळ सूर्य असतां पडणाऱ्या पावसामुळें उंदीर साप, वगैरे विषारी प्राणी व वनस्पती उत्पन्न होतात अशी समजूत आहे. 'उंदऱ्या लागल्या–पडल्या.' 'यंदा उंदऱ्या कोरड्या गेल्या.' **०मांजऱ्या**–स्त्री.अव. १ विशाखा व अनुराधा हीं दोन नक्षत्रें. २ त्यांत पडणारा पाऊस; विशाखा नक्षत्रामुळें जे विनाशक प्राणी, वनस्पती उत्पन्न होतात ते अनुराधा नक्षत्रानें नाहींसे होतात म्हणून एकाला उंदऱ्या व दुसऱ्याला मांजऱ्या म्हणतात. [उंदीर+मांजर]

**उदव**—उद्गा. उदो पहा. १ देवीचे भक्त भिक्षेस निघाले म्हणजे देवीपुढें ' ऊउ ! तुझा जय होवो ' अशा अर्थाचा हा शब्द उच्चारतात. [ सं. उदय, उदयोस्तु; तुल० का. उदु=पहा या अर्थी उद्गार ( देवीला नैवेद्य दाखवितांना म्हणतात ) ] २ उजेड याअर्थी निंदाव्यंजक उद्गार. ' मोठा उदव ( उजेड ) ! ' ०**करणें-लावणें**-( उप. ) उजेड पाडणें; पराक्रम करणें; महत्कृत्य करणें.

**उदवणें**—अक्रि. ( उप. ) उदव करणें पहा.

**उदवणें-विणें**—उक्रि. उदाच्या धुरानें सुगंधित करणें; ऊद जाळणें; उदाचा वास लावणें, धुरी देणें ( केस, ताईत, पाणी वगैरेस ). ' उंच लुगडीं नेसायाची, घमंड मोठी न्हायाची, केस पसरून उदवायाची । ' –प्रला २१७. ' चंदनी चोखण्या करिती विहिणीशी उदवीती । ' –वसा ५३. [ अर ऊद ]

**उद्वात**—स्त्री. ( गो. ) उदबत्ती पहा. [ ऊद+वर्ति ]

**उदश्रु**—वि. रडणारा; रडका. [ सं. उद्+अश्रु ]

**उदा**—वि. ( ना. ) निळसर; उदी रंगाचा. उदी पहा.

**उदाण**—स्त्री. ( कों. ) उधाण पहा.

**उदाणू-नू**—वि. ( नंदभाषा ) तीन; व्यापारी भाषेंतील सांकेतिक संख्यावाचक शब्द. ' मुलुवदनें जया कारण । उदानु नेत्र देदीप्यमान । '–भवि १८.८९. ' मुलु उदानु अंगुलु ऐसी । नंदभाषा सांगितली त्यासी । ' –भवि ४२.४५.

**उदात्त**—वि. उच्च; श्रेष्ठ; मोठा; दाता; उदार; स्पष्ट, व्यक्त (स्वर); तीव्र, तीक्ष्ण (आघात); उंच, मोठा कर्कश (आवाज) [ सं. ]

**उदान**—पु. १ पंचप्राणवायूंपैकीं एक वायु. हा कंठांतून मस्तकांत चढतो. ' कंठीं उदान गुदीं अपान । ' –दा १७.८.१२. 'उर्ध्वमुखें कंठाकडे फुगारा । जो धरी पोटांत वारा । त्या प्राणाचिया प्रकारा । उदान नामें जाणावें ॥ ' –यथादि १७.१००२. २ मृत्युसमयींचा श्वास, धाप; ऊर्ध्व. ०**लागणें**-फार खाल्ल्यामुळें, रोगामुळें श्वासोच्छ्वास मोकळेपणानें करतां न येणें; दम लागणें; श्वास कोंडणें. [ सं. उद्=वर+अन्= श्वास घेणें ]

**उदानका**—पु. ( नंदभाषा; कर. ) पैसा. 'पांगळ्याला आवारु ( दोन ) उदानके दिले. ' उदाणू पहा. [ उदान=तीन+रुका=पै-पैसा ]

**उदार**—वि. १ मोठ्या मनाचा; कनवाळु; थोर मनाचा; धर्मात्मा. २ मोकळा; धीट; प्रशस्त; उघडया मनाचा; संकोचित, कुद्या, कृपण, कंजूष, अरुंद याच्या उलट (माणूस, भाषण, स्वभाव, होडी, जागा, गाडी, खोली वगैरे). ३ सढळ; दाता; खर्चिक; दानशील; चिक्कू, कृपण याच्या उलट. ' उदार तोच श्रीमंत कृपण तोच दरिद्री. ' **म्ह**० आईजीच्या जिवावर बाईजी उदार. ०**कर्ण**-वि. १ कर्णासारखा उदार; दानशूर; मोठा दाता. २ ( उप. ) कृपण व कंजुष (मनुष्य). ०**धोरण**-न. खुल्या दिलाचें, प्रतिपक्षावर अधिक विश्वास ठेवण्याचें, मोठया मनाचें धोरण. ' लॉर्ड कर्झन यांच्या कारकीर्दीचें धोरण रिपन साहेबांच्या उदार धोरणाच्या अगदीं उलट झालें आहे. ' –टि ३.४०. ०**पक्ष**-पु. ( राज. ) व्यापक विचारांच्या लोकांचें ( लिबरल ) मंडळ, पक्ष; प्रागतिक पक्ष; हुजूर ( कॉन्झर्व्हेटिव्ह ) पक्षाच्या उलट. ०**मतवादी**-वि. सुधारणाप्रिय लोक; प्रागतिक; ( इं. ) लिबरल. ' सर्व प्रकारची चौकशी करण्याकरितां लॉर्ड डरहॅम या उदारमतवादी मुत्सद्द्याची रवानगी करण्यांत आली. ' –वस्व ६४. ०**लक्षण**-वि. १ उठावदार; रुबाबदार; मर्दानी ( चेहरा, लक्षणें ). २ भाग्यशाली; मोठेपणाचीं (लक्षणें,चिन्हें). ०**शिक्षण**-न. उदारपणाचें शिक्षण; ज्यामुळें मनाचा विशेष विकास होतो व बुद्धि व्यापक होते असें शिक्षण.

**उदारांग**—वि. ( उप. ) प्रशस्त शरीराचा; तुंदिलतनु; लठ्ठ; भव्य शरीराचा. [ उदार+अंग ]

**उदाराचें पोतें**—न. दुसऱ्याची मालमत्ता चैनीनें व सढळ हातानें खर्च करणारा मनुष्य; हलवायाच्या घरावर तुळसीपत्र ठेवणारा.

**उदारीव**—न. उदारपणा. –तुगा २२७४ ( –शर )

**उदावर्त** —पु. एक आंतडयाचा रोग; पोटांतील आंतडयांमध्यें निरोध झाल्यामुळें होण्याऱ्या वेदना, रोग ( वाईट प्रकारचें अन्न सेवन केल्यामुळें हा रोग होतो. ). [ सं. ]

**उदावादा**—पु. पूर्णत्व; प्रकटपणा. ' पै ग्रासुनि आपली मर्यादा । एक करीत नदीनदां । उठी कल्पांतीं उदावादा । एकार्णवाचा ॥ '–ज्ञा १५.५३२. ' तैशा चहूंभुजीं उदावादा सगुण देखोनि गोविंदा ' –एभा ११.१४७५. –क्रिवि. सढळपणें; उघडउघड. ' म्हणोनि इंद्रियें तेचि संपदा । वेचितांही उदावादा । ' –ज्ञा १३.३०५. [ सं. उदयवादित्व ? ]

**उदास**—वि. १ दुःखी; खिन्न; निरुत्साही; कष्टी. ' झाला कंठस्फोट आळवितां । उदास आतां न करावें । ' –तुगा ७०९. २ बेपर्वा; निष्काळजी; बेफिकीर; तटस्थ. ' तरि जो या देहावरी । उदासु ऐसिया परी । ' –ज्ञा १३.५९३. ' कां अदृष्ट जालिया उदासु । ' –ज्ञा १८.४९६. ३ निस्पृह; उपेक्षाबुद्धि; निरपेक्ष. ४ विरक्त; निःसंग; निर्विकार. ' केवळ पापीहि प्रस्तावले । उदासपंथ देखोनिया । ' -सप्र १२.१४. ५ व्यर्थ; फुकट. ' तुका म्हणे माझी पुरवावी आस । विनंति उदास करूं नये । ' –तुगा८२८. ६ ओसाड; निस्तेज; निरानंद; भयप्रद; ( भयाण जागा, गांव, घर ). –पु. एक गोसाव्यांचा पंथ. उदासी पहा. [ सं. उद्+आस्=बसणें. ०**वचन**-न. खिन्न मनानें केलेलें भाषण. ' उदासवचनें ऐकोनि सत्वरी । अश्रुपात नेत्रीं वाहती ॥ ' ०**स्थिति**-स्त्री. निष्काळजीपणाची वृत्ति; बेफिकिरी; खिन्नता.

**उदासणें**—अक्रि. उदास, खिन्न होणें. ' खेडीं पाडीं भलताच लुटितो कुणब्याचा जीव उदासला. ' -अफला ६८.

**उदासन**—न. उदासीनता; बेपर्वाई. ' जेतुके कष्ट मज भोगले। जे इजिप्तांतु साहिले ॥ तेया होउनि अदिक जाहाले। उदासन तुझें ॥ ' -ख्रिपु १.१४.११२.

**उदासनी**—स्त्री. उदासपणा. ' चटपटी लागली उदासनी मना ॥ ' -दावि २३६.

**उदासी**—वि. निराश; खिन्न; निष्काळजी; बेफिकीर. उदास पहा. ' तप करिती अरण्यवासी । त्यासी करितोसी उदासी ॥ ' -गुच २.१३६. -पु. १ एक गोसाव्यांचा पंथ; या पंथांतील गोसावी, वैरागी. २ शीखांचा एक प्रमुख पंथ. नानकपुत्र असेंहि यास नांव आहे. याचे चार भेद आहेत- बाबाहसन, फूल, गोंदा व अल्मस्त. सर्वांची एक सभा असून तीस बडा आखाडा असें नांव आहे. हे लोक ब्रह्मचर्य पाळतात. [ उदास ]

**उदासीन**—वि. १ विरक्त; वीतरागी. ' उदासीन जो तापसी ब्रह्मच्यारी ॥ ' -राम ५०. २ खिन्न; दुःखी. ३ निष्काळजी; बेपर्वा. तंव नोहावें यागादिकीं । उदासीन ॥ ' -ज्ञा १८.१५२. ४ तटस्थ; ज्यास कोणी शत्रु किंवा मित्रहि नाहीं असा; मध्यवर्ती; मध्यस्थ. ' तये देहबुद्धीचें लक्षण । सुहृददुर्हृद उदासीन । त्रिविध त्रिगुण करी मन । देहाभिमान उपजवी ॥ ' -एरुस्व १३.५१. [ सं. ]

**उदासीनता**—स्त्री. वैराग्य; विरक्ति. ' उदासीनता तत्त्वता सार आहे. ॥ ' -राम ५७.

**उदाहरण**—१ दाखला; दृष्टांत. ' अक्षरें तिसऱ्या पादीं । उदाहरण शेवटीं । ' -वृत्तदर्पण ११. २ नमुना; कित्ता. ३ ( गणित ) सोडविण्याचा प्रश्न; (सामा.) प्रश्न. [ सं. उद्+आ+हृ ]

**उदाहृत**—वि. उदाहरण, दृष्टांत देऊन सिध्द केलेलें. समजावलेलें, सांगितलेलें. [ सं. ]

**उदाळणें**—अक्रि. उसळणें; उडणें; वर येणें. उधळणें पहा. ' जैसी खळाळीचिया उदका । सरसीं उदाळे चंद्रिका । ' -ज्ञा १५. ४९८. [ सं. उद् + दल् ]

**उदित**—वि. १ उदय पावलेला; वर आलेला ( ग्रह, तारा इ० ). ' नाना उदितें दिवाकरें । ' -ज्ञा १७.१७८. २ फुगलेला; मोठा झालेला. ३ ( नशीब ) उघडलेला; उत्कर्ष पावलेला; अनुकूल ( दैव, भाग्य ) ' कोण्या काळें होईल नेणों भाग्य उदित वो । ' -तुगा ११७. ४ ( मनोविकार ) उत्पन्न झालेला; उठलेला; प्रबल झालेला. ' परि साचोकारें उदितें । प्रेमभावें । ' -ज्ञा १०.११५. ५ कृत्य करावयास निघालेला; सज्ज; उद्युक्त; तयार; तत्पर. ' युद्धा येईल विराटदळ । म्हणोनि योद्धे उदित सकळ । ' -मुविराट ६.४४. ६ कथित; सांगितलें; बोललेलें ( भाषण ); ' घालविलें मज रायें मानुनिया मदुदितें हितें अहितें । ' -मोवन १.२०. [ सं. उद्+इ ] ०**कार्य**-न. आकस्मिक उद्भवलेलें, अंगावर पडलेलें कार्य. ०**काळ**-पु. भाग्याचा काळ; उत्कर्ष; भरभराट.

**उदिदिन**—न. ( शाप. ) एक रासायनिक द्रव्य. ( इं. ) बेंझिडाईन. यापासून रंग काढतात.

**उदिन**—न. ( शाप. ) ( इं. ) बेंझिन. उज्ज ( हायड्रोजन ) व कर्ब ( कॉर्बन ) यांचा संयुक्त पदार्थ.

**उदिपणें**—अक्रि. उगवणें; उदयास येणें; निघणें; उत्पन्न होणें. ' सूर्यापासूनि प्रभा उदिपे । ते प्रभाचि सूर्य केवि म्हणिपे । ' -स्वादि १४.१.५. [ सं. उद्+दीप् ]

**उदिमदार**—पु उदमी; व्यापारी. ' तों सन्निधीं येऊनि उदिमदार । ' -दावि ४२९. [ सं. उद्यम+ फा. दार् ]

**उदिमी**—पु व्यापारी; उदमी पहा. ' वेदशास्त्रसंपन्न झाला । त्यावरि पोट भरूं लागला । तरी तो उदिमी थोर झाला । ' -एभा ११.५४८. [ सं. उद्यम ]

**उदिया**—क्रिवि. उद्यां. ' आज उदिया राहूनि येथें ' -दावि ३८५.

**उंदिरकानी-किनी**—उंदीरकानी पहा.

**उंदिरी, उंद्री**—उंदरी पहा.

**उदी**—वि. उदाच्या रंगाचा; पिंगट; तपकिरी. ' तेथील खडक चमत्कारीक उदी रंगाचा असे. ' -पाव्ह ४१. -स्त्री. १ उदाची राख; पिराजवळ जाळलेल्या उदाची राख प्रसाद म्हणून घेतात. ' वानुनि प्रताप श्रद्धाउदी देऊं । ' -दावि ३५३. २ उदाच्या राखेची शपथ ( मुसलमान लोक घेतात ). ३ उदी रंगाचें वस्त्र. [ अर. ऊद; म. ऊद. ]

**उदीची**—स्त्री. उत्तरदिशा. ' उदीची प्रतीची तथा मुख्य प्राची । दिसे दक्षिणेमाजि विश्रांति ज्याची । ' [ सं. ]

**उदीचीन, उदीच्य**—वि. उत्तरेकडील [ सं. ]

**उदीत**—वि. उद्युक्त; उदित पहा. ' मैत्री करून कौरवांसी । विद्याभ्यासीं उदीत् । ' -मुआदि ३०.१४९. [ उदित ]

**उदीम**—पु. १ कामधंदा; व्यापार; व्यवहार; उद्योग. ' तुम्हि कांहिं उदीम न करा. ' -पंच १.३५. **म्ह**० उदीम करितां सोळाबारा शेत करतां डोईवर भारा=व्यापारांत तोटयाला तयार असलें पाहिजे, पण शेतकीच जर केली तर डोक्यावरचा भारा खालीं उतरणार नाहीं ( त्याला तयार असा ). २ ( व्यापक ) शेतीचें उत्पन्न, पीक; बागाईत; मळा. ३ (व.) उपद्व्याप; भानगड. ४ (सामा.) व्यवहार; काम; योजना. ' मग रामासि म्हणे नारद । हा उदीम जाहला फलद । जंबुद्वीपाचा तुटला कंद । भूपाळांचा । ' -कथा २.१४.३७. [ सं. उद्यम ] ०**करणें**-१ व्यापार, उद्योगधंदा करणें. २ ( ल. ) व्यापारांत खोट येणें, नुकसान येणें; व्यापारांत फसणें. ०**पट्टी**-स्त्री. व्यापारावरील सरकारी कर. ०**धंदा-व्यवसाय-व्यापार-पादीम**-पु. ( सामा. ) धंदा; व्यवहार; व्यापार. ' उदीमधंद्याचें शिक्षण ' =व्यापार-उद्योगधंद्याचें शिक्षण.

**उदीमी**--पु. व्यापारी. ' हें टाकूनि उदिम्या तोंडावरी । ' –दावि २६२. –वि. व्यापारधंद्यासंबंधीं (जिन्नस, माल, व्यवहार इ० ) [ उदीम ]

**उंदीर**--पु. चोहोंकडे आढळणारा व सर्व पिकांनां त्रास देणारा एक लहान प्राणी; आखु; मूषक. प्राचीन भारतीय ग्रंथकारांनीं उल्लेखिलेल्या उंदराच्या जाती–लालन; पुत्रक; कृष्ण; हंसिर; चुछुंदर; अलस; कषायदंत; कलिंग, अजित; कपिल; कोकिल इ० घरगुती, रानटी व पिकाच्या हंगामाच्या वेळीं उत्पन्न होणारे असे उंदराचे तीन प्रकार आधुनिक प्राणिशास्त्रज्ञांनीं केलेले आहेत. **म्ह०** १ उंदरास मांजर साक्ष=शत्रूची मदत घेणें धोक्याचें असतें, तेव्हां अशी साक्ष घेणें व्यर्थ आहे. २ डोंगर खणून–पोखरून–उंदीर काढणें=मोठे प्रयास करून फार थोडी कार्यनिष्पत्ति होणें; अचाट परिश्रमाचें अल्प फळ. ३ उंदीर गेला मस्कतास पण सावकार नाहीं झाला =मोठ्या ठिकाणीं गेला म्हणून क्षुद्र माणूस काय मोठा बनतो? **०कानी**–स्त्री. लहान वेल. हिचीं फुलें गुलाबी रंगाचीं असून पानें उंदराच्या कानासारखीं असतात. ही फार उष्ण असून चीक पाचक आहे. सर्पदंशावर व पुरुषत्व येण्यास फारच गुणकारी. उंदराच्या विषावर ह्या वनस्पतीचा रस पोटांत घेतात. [सं. आखु–मूषाकर्णी; गु. उंदरकानी; बं. इंदुरकाणी] **०खाद**–स्त्री. १ उंदराचा शेतास उपद्रव. ' कीडखाद टोळखाद व उंदीरखाद आसमानी सुलतानी जाहाली असता व स्वारीमुळे नुकसानी जाहाली असतां चौकसी करून मजुरा घ्यावयाची चाल आहे ' –हकिकत तर्फ नातें तालुके रायगड. ( मसाप २.१८३. ) २ एक सरकारी कर. हा सरकारी कोठारांतील धान्य उंदीर खात तेवढें नुकसान भरून काढण्याकरितां म्हणून बसवीत. **०खुरी–नखी–गेळ**–स्त्री.न. १ जनावरांच्या खुरांच्या वर पाठीमागें जो पुढें आलेला मांसल भाग असतो तो. २ ( कांहीं ठिकाणीं ) खुरांचीं दोन गेळें. **०धाड**–स्त्री. उंदरांचा उपद्रव; उंदिरखाद. **०बिब्बी**–कर्नाटकांत गणेशचतुर्थीच्या दुसऱ्या दिवशीं येणारा शूद्रांचा सण. या दिवशीं लेंड्या ( गोड कडबोळीं ) तळून नैवेद्य दाखवितात व तो दुसऱ्या दिवशीं पहांटे शेताच्या सीमेवर नेऊन ठेवतात. उंदरांनीं शेताची नासाडी करूं नये म्हणून हा सण पाळतात. **०वासा**–पु. घरांतील भिंतीच्या वरील भाग आंतील बाजूस उतरता असल्यास छप्पर व वासा यांमध्यें उंदरास फिरावयास जागा राहाते म्हणून तेथें असणाऱ्या वाशास हा शब्द लावितात. ही जागा बहुधा उंदरांचा त्रास वांचविण्यासाठीं चुन्यानें भरून काढितात. **०सांध**–स्त्री. उंदीरवाशामुळें उंदरांना वावरण्यास असलेली मोकळी जागा.

**उदीसर**—वि. उदी, तपकिरी रंगाचें. [अर. ऊद+सं. सदृश्य]

**उदुंबर**—पु. औदुंबर; उंबर; एक वृक्ष. [सं.] **०मशक**–पु अव. उंबरातील किडे. –वि. या किड्यांप्रमाणें गर्दी असलेलें; थवे असलेलें; बुजबुजलेलें; भरलेलें.

**उदें**—न. ( राजा. ) पाण्यांतील एक जनावर. ऊद पहा.

**उदेउदे**—उद्गा. उदोउदो करणें; अतिशय स्तुति करणें; जयजयकार करणें. उदो व उदव पहा. ' उदेउदे शब्द आरोळी हो करि कृपा । '–भजनी बोधपर पदसंग्रह ३९. [ सं. उदय; म. उदो ]

**उदेग**—पु. उद्वेग पहा. ' राजिक देविक उदेग चिंता । अन्न वस्त्र देहममता ॥ ' –दा ११.३.५. ' तया सांगता थोर उदेग जीवा । ' –राक १.१८. [ सं. उद्वेग अप. ]

**उदेजणें**—अक्रि. १ उदय पावणें; उगवणें. ' जसा अनेक डोळियां दिनेश हो उदेजुनी । प्रकाशनी पदार्थ ही अपार रश्मिच्या गणीं । '–हस्तामलक ९. ( शिवरामकृत ) २ उत्पन्न होणें. ' अरिष्टें उदयिजेती काळें । ' –मुआदि २६.९८. [ सं. उद्+इ–उदय ]

**उदेणें**—अक्रि. ( काव्य ) १ उगवणें; उदय पावणें. ' जो उदेला गांवेंसीं खाये । दोहींतें यया ॥ ' –ज्ञा १५.४७३. २ उत्पन्न होणें; बाहेर निघणें. ' अहा हो हें पाहा, अमृत मथितां तें विष महा, उदेलें । ' ' हाणीतसे फडफडां ध्वनि हो उदेला । ' –नल ९०. ३ नशीब फळफळणें; उत्कर्ष पावणें. ' अघटितघटणेनें देव किंवा उदेलें । ' –सारुह २.११२. [ सं. उद्+इ ]

**उदेती**—स्त्री. ( गो ) उगवती; पूर्व दिशा. [ उदित ]

**उदेयांचा**—क्रिवि. १ उजाडतांचा; सकाळचा. **०विधि**–पु. प्रातर्विधी. ' उदेयांचा विधी सारोनी । ' –शिशु २३०. [ उदय ]

**उदेल**—न. उदाचें तेल, अर्क. [ ऊद+एल=तेल ]

**उदेव–वो**—पु. ( गो. ) उदय पहा. ' सुर्य उदेवो करी तेथौनि । ' –ख्रिपु. १.१.८५.

**उदेवणें**—अक्रि. ( गो. ) उदय पावणें; उगवणें पहा. [ उदय]

**उदेसलिफ**—पु. भुईकोहळा. –मुंव्या ११३. [ अर. ]

**उदैं**—क्रिवि. उद्यां. ' उदै करील अयोध्याप्रवेशु । ' –कृमुरा ७३.९०. [ उदय ]

**उदैजणें**—अक्रि. उगवणें; उदय पावणें; उदेजणें पहा. ' उदैजणें केतूचें जैसें । ' –ज्ञा १६.३१९. ' कां विजूचें उदैजणें । तोचि अस्तु । ' –अमृ ४.९. [ सं. उद्+इ–अय–उदय ]

**उदैणें**—अक्रि. १ उदेणें; उगवणें. ' तंव उदैला दिनकरू । ' –दाव ३१६. २ उत्पन्न होणें. ' कांई सांघांळ उदैलें । तें जाणवेना ॥ ' –शिशु ११५. [ उदेणें ]

**उदो**—पु. १ उदय. ' तंव उदो जाला दीनकरू । ' –उषा २८.१२. २ प्रादुर्भाव; उत्पत्ति. ३ विजय; उदयोस्तु, जागी हो ! असा शब्द; आनंदाची आरोळी. उदव, उदे उदे पहा. ' प्रपंचगोंधळाचेनि हरिखें । उदो म्हणोनी नाचती ॥ ' –एरुस्व ११.६०. ' नाहीं जाळीत भणदीं । उदो म्हणोनि आनंदी । ' –तुगा १८१६. **०उदो करणें**–टिमकी वाजविणें; खुशामत करणें; मोठेपणा देणें; स्तुति करणें. [ सं. उदय; का. उदु=जागी हो याअर्थी नैवेद्याच्या वेळची हांक ]

**उदो**—पु. नाश. 'सुकृताचा उदो केला। गोंधळ घाला इंद्रियें ॥'–तुगा ४०९. गोंधळ घालावयाच्या वेळीं दिवटी पाजळून तेल वगैरे जाळतात व उदो उदो म्हणतात या क्रियेस उद्देशून पेट विणें, जाळणें, नाश करणें असा अर्थ झाला असावा. [ उदय ]

**उद्गत**—वि. १ उगवलेला; उत्पन्न झालेला; निघालेला; उद्भूत. २ वर गेलेला, चढलेला. [ सं. उद्+गम्=जाणें ]

**उद्गदणें**—क्रि. खवळणें; उसळणें; आवाज करणें. [ सं. उद्+गद्=आवाज करणें ]

**उद्गम**—पु. उगम; मूळ; प्रारंभ; प्रादुर्भाव; जन्म; झरा. (लक्षणेनें व शब्दशः–नदी, चाल, भांडण, रूढी, भाषा इ. चा ) २ वर जाणें, चढणें, उडणें. [ सं. उद+गम्=जाणें ]

**उद्गाता**—पु. यज्ञांतील सामगान करणारा ऋत्विज. 'उद्गाता कौत्समुनी पिंगळ अध्वर्यु त्या मखी होता।'–मोआदि ७४.[सं. उद्+गै=गाणें ]

**उद्गामी**—वि. वर जाणारा, चढणारा, निघणारा. –स्त्री. अनुमानशक्तीचा एक भेद; दुसरा भेद अवगामी –अध्यापन १. [सं.]

**उद्गार**—पु. १ उच्चार; बोलणें; तोंडांतून निघालेला ध्वनि, शब्द. 'साधूचे जे उद्गार त्यांची शकुनगांठ बांधावी'. २ विकार प्रदर्शन उ० क्रोधोद्गार; आनंदोद्गार; आश्चर्योद्गार वगैरे; अहाहा ! वाहवा इ. तोंडांतून निघणारे विकाराचे ध्वनी. ३ तोंडांतून असंकल्पित असा निघालेला ध्वनि, उच्चार; सहज, चुकून तोंडावाटे निघालेला विशिष्ट गोष्टींचा ज्ञापक शब्द. ४ ढेंकर; ओकारी; वमन. [सं. उत्+गॄ ]

**उद्गारणें**—अक्रि. १ उच्चारणें; बोलणें. २ आवेशानें, जोरानें बोलणें,. क्रोधानें बोलणें, शब्द करणें; विकारवश होऊन उद्गार काढणें. [ उद्गार ]

**उद्गारवाची**—वि. मनांतील निरनिराळे भाव व्यक्त करण्याकरितां उच्चारलेलीं अव्ययें; केवलप्रयोगी अव्ययें. उ० अहाहा ! अबब ! अरेरे ! वगैरे. [ सं. उद्गार+वच्=बोलणें ]

**उद्गीरण**—न. वमन; ओक; ओकारी. [ सं. उद्+गॄ ]

**उद्गीर्ण**—वि. ओकलेलें; तोंडांतून बाहेर पडलेलें. [सं. उत+गॄ ]

**उद्घाटण-न**—न. १ उघडणें; खोलणें; उलगडणें; ( कपाट, झांकण, तसबीर, इ०). २ फोडणें; उघडकीस आणणें; प्रसिद्ध करणें. उ० मर्मोद्घाटन; गुह्योद्घाटन इ०. ३ स्पष्ट करणें; विवरण करणें; चर्चा करणें. [ सं. उद्+घट् ]

**उद्घाटित**—वि. १ उघडलेला; उघड केलेला; उलगडून दाखविलेला; उद्घाटण केलेला. २ स्पष्ट केलेला; विवेचिलेला. [सं.]

**उद्घृष्टता**—स्त्री. (संगीत) नीरस उद्घोष करणें. [सं. उद्+घृष्ट]

**उद्घोष**—पु. घोकणें; पुनःपुनः म्हणणें ( स्मरणांत राहाण्याकरितां, पाठ करण्याकरतां ). २ (ल.) तीच तीच गोष्ट पुनःपुन्हा सांगणें; एकाच विषयावर एकसारखें बोलत राहणें. ३ लोकवार्ता; वदंता; लोकोक्ति; बातमी. ४ दवंडी; जाहीर करणें; गर्जना. ५ घोष; धोसरा; उत्कंठा. [ सं. उत्+घुष्–घोष ]

**उद्दाम**—वि. १ धीट; धारिष्टवान; दांडगा; साहसी. २ गर्विष्ठ; उन्मत्त; मस्त; बेफाम. ३ जोराचा; मजबूत; टवटवीत; जोमदार (अंकुर, कलिका, पुष्प वगैरे). ४ मोठा; ठसठशीत; ठळक ( दागिना, रत्न वगैरे ). ५ अतिशय गहिरा; तजेलेदार; चकचकीत (रंग.) ६ उग्र; तीव्र (वास). ७ मोठा; पहाडी; भरदार; गंभीर; सुस्वर (आवाज, ध्वनि). [ सं. उद्+दम् ] ०**पणा**–पु. दांडगेपणा; उन्मत्तपणा. 'पण आमच्या मतें तें निर्भिड आहे. असें म्हणण्यापेक्षां तें उद्दामपणाचें आहे...असें म्हणणें अधिक योग्य...होईल.' –टि. ३.३५४.

**उद्दित**—वि. उदित; उल्हसित; शोभिवंत. 'हरखें निर्भर उद्दित। सुप्रसन्नवदनु।'–दा १.२.९. [सं. उदित]

**उद्दिष्ट**—वि. १ योजलेलें; संकल्पिलेलें; मनांत ठरविलेलें; विचार करून ठाम बनविलेलें; अभिप्रेत. २ विवक्षित; निर्दिष्ट; उल्लेखित; दिग्दर्शित; वर्णन केलेलें. [सं. उत्+दिश् ]

**उद्दिष्ट**—न. ( संगीत ) इच्छित स्वरांच्या प्रस्तारांतील अमुक स्वरूपाच्या स्वररचनेचा प्रकार कितवा हें सांगणें. [सं. उत्+दिश् ]

**उद्दीपक**—वि. १ पेटविणारें; चेतना देणारें; प्रवर्तक; प्रोत्साहन देणारें; जागृत करणारें; मनोवृत्ति उचंबळविणारें; स्फुरण देणारें; २ (वैद्यक) उत्तेजक (द्रव्य, औषध इ०). 'रक्तचंदनादिक पदार्थ कामोद्दीपक आहेत.' ( इं. ) स्टिम्युलेटिव्ह [ सं. उत्+दीप् ]

**उद्दीपणें**—अक्रि. चेतना होणें; प्रवर्तन होणें; प्रकाशणें. 'कां जागृती जंव जंव उद्दीपे।'–ज्ञा १८.११०४. [ सं. उद्दीपन ]

**उद्दीपन**—न. १ प्रज्ज्वलन; चेतविणें; पेटविणें. २ प्रकाशन; प्रकाश; उजेड. ३ (ल.) प्रवर्तन करणें; जागृत करणें ( क्रोध, लोभ इ० विकार ) 'या चूर्णानें क्षुधेचें उद्दीपन होतें.' ४ (ल.) ज्यामुळें चेतना, जागृति होते असा उत्तेजक पदार्थ; उ० क्रोधोद्दीपन; कामोद्दीपन; हर्षोद्दीपन इ० ०**विभाव**–पु.(साहित्य) साहित्यशास्त्रांतील शृंगाररसाचा एक विभाव विशेष. –शर

**उद्देश**—पु १ प्रयोजन; हेतु; इच्छा; मनांतील कार्य; अभिप्राय; आशय; मतलब. 'ऐसा योगयुक्तीचा उद्देशु।'–ज्ञा ५.१६१. 'तो उद्देशु तूं नेणसीचि।'–ज्ञा ३.३४. २ दिग्दर्शन; वर्णन; प्रकटीकरण. 'उद्देशें एक दोनि। जायिजती बोलोनी।'–ज्ञा १.१०४. ३ सारांश. 'म्हणोनि मागां भाव जैसे। आपुले सांगितले तुवां उद्देशें।'–ज्ञा१०.१८८. [सं. उद्+दिश्] ०**कारण**–न.(न्याय) हेतु; प्रयोजन; न्यायशास्त्रांतील कारणांतील एक प्रकार. (इं.) फायनल कॉझ. 'प्रक्षालन हें (साबणाचें) उद्देशकारण होय.'–न्यायप ५८.

**उद्देशणें**–उक्रि. १ मनांत योजणें; विचार करून ठरविणें; संकल्प करणें. २ नांव घेऊन किंवा उल्लेख करून उच्चारणें, बोलणें. ३ प्रयोजन, हेतु असणें; बेत असणें, ठरविणें. [ सं. उद्देश ]

**उद्देश्य**—न. १ संकल्पित कार्य, बेत, मनांतील हेतु. २ ज्या विषयीं संकल्प करावयाचा तें ३ (व्या.) वाक्याचा एक भाग; वाक्यांत ज्या अर्थाला उद्देशून विधान केलेलें असतें किंवा ज्या विषयीं वक्ता बोलतो तें; वाक्याचा दुसरा भाग विधेय होय. [सं.] **०वाचक**–पु. (व्या.) कर्तृबोधक, उद्देश्य, हेतु दाखविणारा (शब्द) **०विधेयभाव**–पु. कर्तृपद आणि क्रियापद उद्देश्य आणि विधेय यांमधील संबंध. **०विस्तार**–पु. कर्तृपदाचीं विशेषणें किंवा तत्संबद्ध शब्द वगैरे. 'उद्देशविस्तार व विधेयविस्तार हे पाठ मुलांनां फार मनोरंजक वाटतात.' –अध्यापन ९७. [सं.]

**उद्धट**—वि. १ उर्मट; दांडगा; उद्दाम; असभ्य; बेपर्वा; अविनयशील. 'पहिलेच श्रीमदें उद्धट। त्यावरी मांडिलें कपट।'–एभा १.३४६. २ उद्धट; पाणीदार; बलवान. 'अतिरथि उद्धटवीर। पाठीसीं चालती कृष्णकुमर।' –ह ३३.११८. [सं. उध्दत, उद्+हन्–हत]

**उद्धटाई**–स्त्री. धिटाईची, बेपर्वाईची वागणूक; दांडगेपणा; बेपर्वाई; मग्रूरी. [उद्धट]

**उद्धट्टित (अंगहार)**—पु. (नृत्य) उजवा हात आधीं उद्वेष्टित करून मग अपविद्ध करणें, मग उजवा पाय निकुट्टित करून हीच सर्व क्रिया डाव्या हातानें व पायानें करणें, मग उरोमंडल हात करून नितंब, करिहस्त व कटिच्छिन्न हीं करणें क्रमानें करणें. [सं.]

**उद्धट्टित (करण)**—न. (नृत्य) पाय उद्धट्टित करून तळहात एकाशीं एक जुळवून नंतर डावा हात डाव्या नितंबावर व उजवा हात उजव्या नितंबावर ठेवणें.

**उद्धट्टित (पाद)**—पु. (नृत्य) चवड्यावर उभें राहून टांच वर उचलून पुन्हा टांच जमीनीवर टेकणें. [सं.]

**उद्धड**—न. मस्तकविरहित धड. –शिदि ३४८. [सं. उद्+म. धड] **०करणें**–ठार करणें.

**उद्धत**—वि. १ मस्त; गर्विष्ठ; उर्मट; उद्धट; 'उद्धत त्या जाती। द्रव्यें रंगल्या उद्धती।'–तुगा ३११८. 'नव्हेचि न विचारिले बुधजनांसि म्यां उद्धतें।'–केका ५९. २ साहसी; धीट. 'हे संग्रामीं अति उद्धत।–ज्ञा १.१९४. –न. उपमर्द. 'सख्याचें उद्धत। सखा साहे निवांत।'–ज्ञा ११.५७४. [सं. उद्+हन्–हत]

**उद्धरगत**—उद्धारगत पहा.

**उद्धरण–णी**—नस्त्री. १ बाहेर काढणें; वर काढणें (खालीं पडलेला पदार्थ). २ उपटून, निखळून काढणें (वृक्ष इ०). ३ अग्निहोत्र्यानें कुंडांत पुरून ठेवलेला अग्नि बाहेर काढणें; सकाळ-संध्याकाळ कुंडांतील अग्नि प्रज्ज्वलित करणें. ४ सुटका करणें; बचाव करणें; अधोगतीपासून सोडविणें; संरक्षण करणें. ५ शापापासून बचाव करणें; (उःशाप देऊन) उद्धार करणें; पुनः योग्यतेस चढविणें; मुक्ति देणें. ६ देऊळ वगैरेंची दुरुस्ती करणें. ७ चालू करणें; पुनरुज्जीवित करणें; पुनरुध्दार करणें (वृत्ति, धर्म, हक्क, मालमत्ता इ० चा). [सं. उद्+हृ]

**उद्धरणें**—उक्रि. १ सोडविणें; सुटका करणें; वर काढणें; मुक्त करणें. 'भक्त उद्धरावेआं अपार।'–दाव ४. 'उन्नतगजेंद्रउद्धरण। गर्भसंरक्षण परीक्षितीचें।' –एभा २.३०५. २ वैभवाच्या स्थितीस नेणें; स्वर्गादि उत्कृष्ट लोकीं पोहोचणें; मुक्त करणें. 'राम उद्धरुनि गौतमजाया।' 'भगीरथानें आपल्या भस्मीभूत पीतरांना स्वर्गीय गंगा पाताळांत आणून उद्धरिलें.' ३ (विपरीत लक्षणा) शिव्या देणें (वडील माणसांना). (एखाद्याचे) **पितर उद्धरणें**–वाडवडिलांना, पितरांना शिव्या देणें. [सं. उद्+हृ; उद्धरण]

**उद्धराम्ल**—न. (शाप.) एक प्रकारचें अम्ल–घटक उज्ज व हर. (इं.) हायड्रोक्लोरिक ॲसिड.

**उद्धर्ता, उद्धारक**—वि. सुटका करणारा; मुक्त करणारा. [सं.]

**उद्धव**—पु. उत्साह; आनंद. 'निजतत्त्व कथुनि ब्रह्मादि सुरांसि विपुल उद्धव दे।' –वि. माहा ३.३९. [सं. उद्+हु]

**उद्धवणें**—क्रि. प्रज्ज्वलित करणें. 'अनुतापु वैश्वानरा। उद्धवतु इंद्रिए जोहरा। आंतु कवण वांचे।' –ऋ ५६. [सं. उद्+धू]

**उद्धळण**—न. फांसणें; चोपडणें; उडवणें; उधळणें. 'भस्म उद्धळण लक्ष्मीचा भोग। शंकर श्रीरंग उभयरूपीं॥'–तुगा २०५०. [सं. उद्+धूल्]

**उद्धाट**—पु. १ घर्षण. २ (ल.) घोष. 'ते कलिमळांचीं मळगटें। नामोध्दाटें नासती॥' –एभा ४.२५३. [सं. उद्+हन्–हत]

**उद्धात**—वि. फांकलेला; पसरलेला. 'उध्दातया रंगाचा हीरा ते मानकुलाचि।' –भाए ६४५. [सं. उद्+हा=सोडणें]

**उद्धार**—पु. उध्दरण पहा. १ वर, बाहेर काढणें. २ मुक्ति; मोक्ष; सुटका; सोडवणूक; हीन जातींतून वर आणणें; गर्भवास चुकविणें. ३ पुनरुज्जीवन; पुनर्जन्म; (इं.) रेनासन्स; उध्दारकालीन=रेनासन्स काळांतील (युरोपांतील १५ वें शतक). ४ आलापन (राग, रागिणी वगैरे). 'रागोध्दार करितां प्रत्यक्ष। दीप लागले लक्षानुलक्ष।'–शनि २२८. ५ वेंचा; अवतरण (एखाद्या ग्रंथातील). [सं. उद्+हृ किंवा धृ] **०करणें**–(उप)शिव्या देणें; पितर उध्दरणें.

**उद्धारक**—वि. १ वर काढणारा; उध्दार करणारा; उध्दर्ता. २ (सामाजिक) जुन्या मताचा; दुर्धारक; सुधारक या संज्ञेविरुध्द. [सं.]

**उद्धारगत**—स्त्री. उध्दार. १ चांगली स्थिति प्राप्त होणें. २ मुक्ति मिळणें; सुटका होणें. [सं. उध्दार+गति]

**उद्धारण–णें**—उध्दरण, उद्धरणें पहा.

**उद्धूलन**—न. १ उधळणें; इतस्ततः फेंकणें; पसरणें; (माती, राख, भस्म, गुलाल, बुक्का इ०). २ (ल.) उधळपट्टी करणें; बेसुमार खर्चणें. [सं. उद्+धूल्]

**उद्धृत**—वि. १ सुटका केलेला; मुक्त केलेला; रक्षिलेला; वर चढविलेला; उत्कर्ष केलेला; उध्दरण पहा. २ अवतरून, उतरून घेतलेलें ( वाक्य वगैरे ). [ सं. ]

**उद्बंध-न**—न. टांगून ठेवणें; लोंबकळत ठेवणें. [ सं. उद्+बंध् ]

**उद्बीज**—वि. एकदम उत्पन्न झालेलें, आलेलें ( टोळ, टोळधाड, मुंग्यांचा थवा, ढेंकूण वगैरे ). —न. एकदम येणारा, दिसूं लागणारा घोळका; पुंज ( मुंग्या, ढेंकूण इ० चा ). [सं. उद्भिज्ज]

**उद्बुध्द**—वि. १ माहिती करून दिलेला; जाणीव असलेला; ज्ञान झालेला. २ जागृत; उज्जीवित; चेतना दिलेला; उत्तेजित. ३ ताकीद दिलेला; पूर्वसूचित, आठवण, समजावणी मिळालेला. [सं. ]

**उद्बोध-न**—पु न. १ शिकवण; शिक्षण; समजावणी. २ सूचना; ताकीद. ३ जागृति; निजून उठणें; चेतना. ' निखळ उद्बोधाचेंचि आपणपें घडे ॥ '—ज्ञा ९.९६. ' आषाढ मासीं शयन, भाद्रपदमासीं अंगपरिवर्तन, कार्तिकीं उद्बोधन। ( असें विष्णु करतो ). ' ४ (विशेषतः उद्बोध). ज्ञान; माहिती; समज; जाणीव. [ सं. उद्+बुध् ]

**उद्बोधक**—वि. १ सूचक; द्योतक; गमक; ज्ञापक. उ० शरण आल्याचें–दातीं धरलेलें तृण; अनर्थाचें–उल्कापात वगैरे; राजत्वाचें छत्र, ध्वज वगैरे; ताप आल्याचें– अंग ऊन होणें वगैरे; मृत्यु जवळ आल्याचें– वृद्धत्व अशक्तता इ० हीं त्या त्या स्थितीचीं उद्बोधक लक्षणें होत. २ उत्तेजक; मादक; दाहक. उ० –अम्ल (जिभेचें), सौंदर्य (इच्छेचें, कामाचें ). यावरून ( सामा. ) प्रवर्तक; उद्दीपक; उत्तेजक; चैतन्यदायक. [ सं. उद्+बुध् = जाणणें ]

**उद्भट**—वि. १ शूर; धाडसी; बलवान्; धारिष्टवान; धैर्याचा. ' राजकुमर वीर उद्भट। –मुआदि ३१.२९. २ प्रचंड; अफाट; मोठा; विस्तृत. ' आंसडोनि बळउद्भटें। मधें उधडिला तडतडाटें। ' –मुसभा ७.५५. ३ श्रेष्ठ; उत्कृष्ट; थोर; प्रख्यात. ' जे स्वगुणीं उद्भट। घेऊनि सत्व चोखट ॥ ' –ज्ञा १४.२१८. ४ कठिण; कठोर; खडतर. ' पुराणीं उपदेश साधन उद्भट। आम्हां सोपी वाट वैकुंठींची ॥ ' –तुगा १११९. ५ उन्मत्त; उद्धट पहा. [ सं. उद्+भट ]

**उद्भव**—पु. १ उत्पत्ति; प्रादुर्भाव; प्रारंभ; जन्म. 'भुवनोद्भवारंभस्तंभ। भवध्वंस ॥ ' –ज्ञा १८.५. २ प्रकट होणें; बाहेर पडणें. ३ उत्पत्ति; हेतु. [ सं. उद् +भू ]

**उद्भवणें**—अक्रि. १ उत्पन्न होणें; प्रारंभ होणें; निर्माण होणें; जन्म पावणें. २ प्रकट होणे. ( क्वचित् सकर्मक प्रयोग ) [ सं. उद्+भू ]

**उद्भावन**—न. १ विचार; बोलणें; सांगणें २ उत्पत्ति; जन्म; उत्पादन. ३ प्रकट करणें; उपस्थित करणें; प्रदर्शन. ४ अनवधान; असावधान; अनास्था. [ सं. उद्+भू–भाव–भावन ]

**उद्भावणें–विणें**—क्रि. १ उत्पन्न करणें; अस्तित्वांत आणणें; जन्माला घालणें. २ प्रकट करणें; उघड करणें. [ उद्+भू–भव–भाव, उद्भावन ]

**उद्भिज–ज्ज–द्**—न. वृक्ष, वनस्पति इ० सृष्टि. ' जैसी मही हे उद्भिज। ' –ज्ञा ६.४४. –वि. जमीनींत उगवणारे; जमीनींतून वर येणारे; अंकुर फुटणारे; बाहेर पडणारे ( वृक्ष, वनस्पति, इ० ) [ सं. उद्+भिद् ] ०**कटिबंध**–पु. पृथ्वीच्या ज्या भागांत वनस्पती वाढतात तो प्रदेश. ०**कोटि**–स्त्री. वनस्पतिवर्ग; प्राणिवर्गाच्या उलट. ' सेंद्रियरसायनशास्त्रांत उद्भिज्ज व प्राणिज या सेंद्रियकोटींतील यच्चयावत् पदार्थांचा समावेश होतो. ' –सेंपू प्रस्तावना १.

**उद्भूत**—वि. १ उत्पन्न झालेला; जन्मलेला. २ प्रगट झालेला; निघालेला; बाहेर पडलेला; आविर्भूत. [ सं. उद्+भू–भूत ] ०**उष्णता**–स्त्री. आपल्या त्वचेस समजणारी उष्णता. –भूवर्णन ३१.

**उद्भेद**—पु. १ फुटून बाहेर पडण्याची क्रिया ( जमिनींतून अंकुर येतात त्याप्रमाणें ). ' पर्जन्य पडला म्हणजे भूमींतील बीजें भूमीचा उद्भेद करून बाहेर येतात. ' २ विकसन; उमलणें; फुलणें; दृश्य होणें. [ सं. उद्+भिद् ]

**उद्भ्रांत**—वि. मनस्ताप पावलेला; विव्हळ; बावरलेला; गोंधळलेला; गडबडलेला. [ सं. उद्+भ्रम् ]

**उद्मत**—( लुप्त ) उन्मत्त पहा. [ सं. उन्मत्त अप. ]

**उद्यत**—वि १ तयार; तत्पर; उत्सुक; उद्युक्त; सिद्ध. ' जे जाहले असती उद्यत झुंजावया। ' –ज्ञा १.२१९. २ उगवलेला; वर आलेला ( सूर्य वगैरे ) [ सं. उद्+यम्–यत ] ०**दंड–बाहु**–वि. हात वर केलेला; हात उगारलेला; कडक; शिस्तीचा; कठोर ( राजा, न्यायाधीश ). [ सं. ]

**उद्यम**—पु. उद्योग; उद्योगधंदा; व्यापार. उदीम पहा. ' जैसें भाग्याचिये भडसें। उद्यमाचेनि मिसें। ' –ज्ञा ६.३५४. [ सं. उद्+यम्=प्रयत्न करणे ] ०**शील**–वि. उद्योगी; मेहनती; परिश्रम करणारा; कष्टाळु; उत्साही. [ सं. ]

**उद्यमी**—वि. उद्योगी; नेहमीं कामांत असलेला, मेहनती; कष्टाळु. [ सं. ]

**उद्यां**—क्रिवि. उदयीक, दुसऱ्या दिवशीं. [ सं. उद्+द्; उदयें–उदयां–उद्यां–राजवाडे–ग्रंथमाला ] ०**कडे**–क्रिवि. उद्यां; उद्यांपर्यंत. ' म्हातारेबुवा, बादशहाचा एक सरदार आपल्या लष्करासह आज–उद्यांकडे ह्या बाजूनें जाणार असल्याची सेनापतीसाहेबांना खबर लागली आहे. ' –स्वप १९०. –**चा आदितवार**–कधीं न येणारा दिवस=एखादी गोष्ट करावयाचें मनांत नसलें म्हणजे उद्यांच्या आदितवारीं करूं असें उत्तर द्यावयाचें.

**उद्यान**—न. बाग; बगीचा; उपवन. ' नातरि उद्यानिचेआ फळां। च्यूत द्राक्षादि रसाळा। ' –ऋ ५८. ' कीं अभिनव उद्यान। विवेकतरूचें ' –ज्ञा १.२८. [ सं. उद्+या = जाणें ] ०**भोजन**–न. वनभोजन. ( इं. ) पिक्निक्. 'तथापि चार सहा महिन्यांतून एखादें

वेळेस तरी त्यांना शिष्टसंप्रदायाप्रमाणें उद्यानभोजन, खाना, चहा-पार्टी वगैरे द्यावी लागत असेच. ' –नपुक २६.

**उद्यापन**—न. १ एखादें आरंभिलेलें व्रत संपल्यावर त्या व्रताची समाप्ति करणें; त्यासंबंधीं विधि, कर्म २ धर्मशाळा, सरोवर, अश्वत्थ इत्यादिकांचा उपयोग करावयाच्या पूर्वी करावयाचा विधि. ३ ( ल. ) गाशा गुंडाळणें; कार्यसमाप्ति; हानि; आपत्ति; अरिष्ट; संकट; कार्यनाश. [ सं. उद्+या=जाणें–यापन ]

**उद्यापित**—वि. योग्य विधीनें विसर्जन केलेला; विधिपूर्वक उपयोगांत आणलेला ( तळें, धर्मशाळा वगैरे ) [ सं. ]

**उद्युक्त**—वि. १ तयार; सिद्ध; सज्ज. २ गढलेला; गुंतलेला. [ सं. उद्+युज्=जोडणें ]

**उद्युत्कार**—वि. उदय, प्रकाश करणारा. उद्योतकर पहा. [ सं. उद् + द्युत् = प्रकाशणें ]

**उद्येल**—( कुण. ) उदेल पहा.

**उद्योग**—पु. १ काम, धंदा; नोकरी; रोजगार. २ कार्य; व्यवसाय. ३ खटपट; प्रयत्न; मेहनत; श्रम. [ सं. उद्+युज्=जोडणें–योग ] ०**चालविणें–करणें**–काम हातीं घेणें; कामधंदा चालविणें, सुरू करणें. ०**वेळ–वेळा**–पुस्त्री. दिनमानाचे आठ भाग धरून पाडलेला एक भाग. हा ३॥ घटिकांचा असतो. **म्ह०** १ उद्योगाचे घरीं ऋद्धिसिद्धि पाणी भरी=उद्योगी मनुष्यांस धनप्राप्ति वगैरे होते. २ ( कों. ) ये उद्योगा आणि बैस माझ्या खांद्यावर=रिकामा उद्योग उकरून काढणें.

**उद्योगी**—वि. १ नेहमीं कामांत गुंतलेला, गर्क असलेला. २ मेहनती; कष्टाळु. ३ ज्याला कामधंदा आहे असा. आळशी याच्या उलट. ४ ( उप. ) उपद्यापी; नसतें लचांड उपस्थित करणारा. ' उद्योगी बाळ '

**उद्योतकर–कार–कारु**—वि.पु. उदयकर्ता; प्रकाशक; दीपक. ' वडिला अव्यक्ताचिया वंशा । उद्योतकारु सूर्य जैसा ॥ ' –अमृ ६.३. [ सं. उद्योत+कृ ]

**उद्र**—पु. ऊद; पाणमांजर; जलनकुल. [ सं. ]

**उद्रस**—वि. बेचव; नीरस; शुष्क; शिळें; वाळलेलें. [ सं. उद्+रस ]

**उद्राण**—न. मुक्ति. उद्धरण पहा. ' पोवाडा गात्याला उद्राण । ऐकत्याला घडो पुण्य ! ' –ऐपो ६३. [ उद्धरण अप. ]

**उद्रिक्त**—वि. अतिशय समृद्ध असलेलें; रगड, वाजवीपेक्षां जास्त; गडगंज. [ सं. उद्+रिच्=अधिक असणें ]

**उद्रेक**—पु. १ वृद्धि; अतिशयपणा; वैपुल्य; अतिरेक. २ वेग; वेदना; यातना; कळ, मुरडा (पोटांतील विकारामुळें मलमूत्रविसर्जना पूर्वी होणारा ). ३ आकस्मिक प्रेरणा; लहर; उमाळा ( पोटांतून येणें या बरोबर प्रयोग ). [ सं. उद्+रिच् ]

**उद्वर्तन**—न. अप. रूप-उद्ववर्चन. १ सुगंधि द्रव्यें लावून स्वच्छ करणें; उटणें लावणें ( देवमूर्ति, शरीर इ०स ); प्रक्षालन. उ० करोद्वर्तन. ' निर्मळा आंगोद्वर्तनें । कळाकौशल्यें रसाएनें ॥ ' –ऋ ७५. ' कितिएक गोपस्त्रिया । विलेपन करित होतिया । उद्वर्तनादि क्रिया । संपादितां । ' –रास १.२१४. २ कामावरून हांकून देणें; उच्चाटण. [ सं. उद्+वृत् ]

**उद्वर्तन ( ऊरु )**—न. ( नृत्य ) नृत्यांत सूचीपाद करून मांडी वर उचलणें. [ सं. ]

**उद्वर्तनफलक**—पु. तार किंवा सूत ओढण्याची पट्टी, जंत्री.

**उद्वस, उद्वसु–सें, उद्वस्त**—वि. १ ओस; शून्य; उजाड; निर्जन; ओसाड; उध्वस्त; रिकामा. ' ययापरी उद्वस समस्त । पांढरी पडली । '–गीता २.२२७१. ' नाना उद्वसें जे वनें । '–दा ८.५.८. ' वसुंधरा उद्वस आजि झाली । ' –सारुह ३.२५ २ ( राजा. ) अस्ताव्यस्त; अव्यवस्थित; घोटाळ्याचा; गोंधळ झालेला ( व्यवहार, काम). ३ व्यर्थ; फुकट. ' नातरी पाहावया दिवसु । वातीचा कीजे सोमु । तेव्हढाही उद्वसु । उद्यमु पडे ॥ ' –अमृ ६.२९. ' शेषसभा नेत्रीं देखिली । त्यापुढें सुरधामें उद्वस वाटलीं । ' –ज ३९.९०. [ सं. उद्+वस्–व्यस्त ]

**उद्वस्कंध**—पु. सप्तस्कंधांतील सूर्यमंडळापासून चंद्रमंडळापर्यंत ज्याची मर्यादा असा तिसरा स्कंध. –हंको. [ सं. ]

**उद्वार्चन–उद्वार्जन**—उद्वर्तन पहा.

**उद्वासन**—न. १ मूर्तीत स्थापित केलेल्या देवतेचें विसर्जन; उत्थापन. २ काढून टाकणें ( अधिकारापासून ); उच्चाटण. [ सं. उद्+वस् प्रयोजक ]

**उद्वाह**—पु. विवाह; लग्न. [ सं. उद्+वह्=नेणें ]

**उद्वाहित**—वि. विवाहित. [ सं. ]

**उद्वाहित( कटि )**—स्त्री. (नृत्य) नृत्यामध्यें दोन्ही पायांच्या चवड्यावर उभें राहिल्यानें वर उचललेली कंबरेची स्थिति; लठ्ठ माणसाचें चालणें दाखविणें व नाचण्याचा भाव दाखविणें, अशा वेळीं हा अभिनय करतात. [ सं. ]

**उद्वाहित( जंघा )**—स्त्री. ( नृत्य ) नृत्याच्या वेळीं सूचीपाद केला म्हणजे जंघा वर उचलली जाते ती स्थिति.

**उद्वाहित( वक्षःस्थल )**—न. ( नृत्य ) नृत्यामध्यें दोन्ही पायांचे चवड्यावर उभें राहिलें असतां सर्व शरीराचा भार उचलून धरावा लागतो तेव्हां साहजिकच वक्षःस्थलहि उचललें जातें ती स्थिति; जांभई देणें, विव्वोकाचा भाव वगैरेंच्या वेळीं हा अभिनय करतात. [ सं, ]

**उद्विग्न**—वि. उदास; खिन्न; अस्वस्थ; दुःख–संकट–भयग्रस्त; काळजीनें व्याप्त; चिंताक्रांत; विषण्ण; व्यग्र; त्रस्त; उद्वेग पावलेला. [ सं. उद्+विज्=भय पावणें ]

**उद्वृत्त**—वि. धर्मबाह्य, अशास्त्र वर्तन करणारा; बहकलेला; उच्छृंखल; चैनी; अविचारी; स्वैरवर्तनाचा; निसवलेला; अवगलेला. [ सं. उद्+वृत्त ]

**उद्वृत्त, उद्वृत्तशंकु**—उन्मंडलशंकु पहा.

**उद्वृत्त ( आकाशचारी )**—न. ( नृत्य ) पाय अंचित करून दुसऱ्या पायांत अडकवून घेऊन मग मांडीला टांच लागेल अशा प्रकारें दुसऱ्या मांडीला त्या पायानें विळखा घालणें, अशा स्थितींत शरीर वर उचलून वरच्यावर गिरकी मारणें व तो पाय खालीं टेकणें ( म्हणजे दुसरा पाय गिरकी घेतांना फिरेल ).

**उद्वृत्त ( करण )**—न. ( नृत्य ) हातांपायांसकट सर्व शरीर पुढें फेंकून उडी मारतां मारतां वरच्यावर सर्व शरीरास गिरकी देणें. [ सं. ]

**उद्वृत्त ( संयुत हस्त )**—न. ( नृत्य ) हात हंसपक्ष करून कनिष्ठिकेपासून आंतील बाजूनें आरंभ करून एकमेकांस वेढा घालणें.

**उद्वृत्तक ( अंगहार )**—पु. ( नृत्य ) उजवा पाय नूपुर करणें व हात मकराख्य करून दोन्ही बाजूंस लोंबत सोडणें, नंतर दोन हातांनीं विक्षिप्तकरण करून तें सूचीहस्त करणें व त्रिक फिरविणें. शेवटीं लताहात करून कटिच्छिन्नकरण करणें.

**उद्वेग**—पु. उद्विग्नपणा; खेद; अस्वस्थता; खिन्नता; कंटाळा; काळजी, भीति, दुःख यापासून त्रास. ' जयासी उद्वेगु नाहीं चित्तीं । ' –ज्ञा २.२९४. ' विसरु कामाचा तुका म्हणे झाला । उद्वेग राहिला । जावें यावें ॥ '–तुगा ७५. [सं. उद्+विज्=दुःखी होणें]

**उद्वेगणें**—अक्रि. उद्विग्न होणें; खिन्न होणें; अस्वस्थ होणें. ' येरी म्हणे नुद्वेगीजे । आश्चर्यो कांहीं दिसताहे । ' –मुआदि ९. ७५. ' मज हांसतील ते संत । जिहीं देखिलेति मूर्तिमंत । म्हणोनि उद्वेगलें चित्त । अहाच भक्त ऐसा दिसे ॥ ' –तुगा ७१६. [ सं. उद्+विज् ]

**उद्वेप**—पु. उपद्याप. ' देहींचा सोडोनि खटाटोप । शिवें धरिला दारुण कोप । केला मल्लयुद्ध उद्वेप । जाज्वल्यमान । '–कथा ७.८.५.

**उद्वेष्टित(अंगुलि)**—स्त्री.(नृत्य) एका हातानें दुसऱ्या हाताच्या तर्जनीपासुन आरंभ करून त्या हाताच्या बाहेरील बाजूनें तर्जनीच्या तळहाताकडील बाजूपर्यंत हात आणणें. [ सं. ]

**उद्वेष्टित(बाहु)**—पु. ( नृत्य ) बाहूचें मनगट वाटोळें फिरविणें म्हणजे सर्व बाहु फिरला जातो अशी स्थिति.

**उदस्तंभाम्ल**—न. ( शाप. ) ( इं. ) हायड्रोब्रोमिक ॲसिड.

**उधई**—स्त्री. पांढरी मुंगी; वाळवी. या मुंग्या जमिनींत वारुळें तयार करून किंवा भिंती तुळयांवर घरें करून राहतात. ' उधयानीं खादलें शरीर । वरुते उगवले तरुवर । तेव्हां अस्थिमय प्राण साचार यास्तव न मरे सर्वथा । ' –संवि १०.११६. [ सं. उद्=वर+इ= जाणें; सिं. उडोही; गु. उधाई ]

**उधट, उधंट**—वि. उद्धट पहा. ' उधटेआं देवां जगझंपू । ' –शिशु १५४. ' ज्या सासुरां वर्तति गे उधंटा । ' –सारुह ७.१२८. [ सं. उद्धत ]

**उधड–डा**—वि. उक्ता; बिन हिशोबी; अंदाजानें. ' जमादारास लागवड खर्चाबद्दल दरमहा १ रुपयाप्रमाणें उधड देण्यांत यावा. ' ( बडोदें ) पहिलवान कुस्ती नियम ८.

**उधड**—पु. ( व. ) ठेका; मक्ता. **०घेणें**-मक्त्यानें घेणें. **०माप**-न. अंदाजी वजन, माप, हिशेब; उक्तें माप. [सं. उद्+धृत; प्रा. उध्दड ? ]

**उधडणें**—उक्रि. १ उसवणें; उकलणें; फोडणें. २ ( साल, कांट वगैरे ) फाडणें; चिंधड्या, चिरफळ्या करणें. ' मधें उधडिला तडतडाटें । ' –मुसभा ७.५५. ३ (ल.) धुडकावणें; हांकलणें; उच्चाटन करणें. ' उधडिला सिंह कोल्ह्यांनीं । ' –संग्रामगीतें ८१. ४ (व.) ( चांभारी ) मेलेल्या जनावराचें कातडें काढणें. ' महारांनीं तें जनावर उधडलें. ' [ सं. उद्+धृ–प्रा. उध्दडन; म. उ+धड; हिं. उधडना; म. उद्धरण=उधडणें ]

**उधणी, उधवणी**—स्त्री. गवाक्ष; द्वार; धारें; धुराडें. [ सं. उद्+धू ]

**उधम**—न. ( माळवी ) गडबड; कल्ला; दंगा. [ हिं. ऊधम ]

**उधमणें**—अक्रि. उकळी येणें; बुडबुडे येणें. [ सं. उद्+ध्मा ]

**उधर**—क्रिवि. ( खा. ) सरसकट; उघड. –भात्रै ७.१.४.

**उधरण**—न. भेट; आहेर. ' उधरण रंगीं आणि द्राक्ष फळें बहुता प्रकारें । रामापुढें ठेविताती सकळिक पक्वान्नें सारें । '–ब ६२९. [ सं. उद्+हृ; उध्दरण ]

**उधरण**—उक्रि. १ ओकणें; ओकारी येणें. ' मला उधरतें. ' २ उध्दार करणें. ' जना उधरी नाथ लोकत्रयाचा । ' –राम २५. [ सं. उद्+हृ–उध्दरण ]

**उधरागति**—स्त्री. उद्धारगति; मोक्ष; मुक्ति. ' नरदेही येऊन सकळ । उधरागती पावले केवळ । येथें संशयाचें मूळ । खंडोन गेलें ॥ ' –दा १.१०.२०. **०जाणें**-मोक्षाप्रत जाणें; मुक्त होणें. [ सं. उद्+धृ–उध्दार+गति ]

**उधर्ता**—वि. उध्दरता; उध्दारकर्ता. ' भूतें भूत धर्ताचि धर्ता उधर्ता । ' –राक १.१. [ सं. उद्धृ ]

**उधवटां**—वि. कठिण; उधट पहा. ' देव्हूडियां । वेणिआं उकलैलियां । उधवटां गांठीं सूटलियां ॥ '-शिशु ७१६. [ सं. उध्दत; म. उधट ]

**उधवणी**—उधणी पहा. ' उधवणीचें जेवीं तोंड । उगळी धुंवाचे उभड । '–ज्ञा १६.२९३.

**उधवणें-विणें**—उक्रि. १ उसळणें; वर येणें, जाणें, होणें, करणें. ' नेदिजेचि संसृती । माथां उध । '–ज्ञा १४.४९. ' नातरी

वडवानलु सांडुकला । प्रलयवातें पोखला । सागर शोषूनि उधवला । अंबरासी ॥ ' –ज्ञा १.९०. –एभा ५.३०६. २ वाढणें. ' मग तो न सांवरे जैसा उधवला । ' –ज्ञा ३.२०४. ३ उद्भवणें. ' तैसिया सर्वांगीं उधवती अणिया । रोमांचिया । ' –ज्ञा ६. २६४. ४ वर जाणें; उठणें; पसरणें. ' सांगे भुवनत्रया काजळी । जे गगनामाजि उधवली । ' –ज्ञा ४.१७६. ५ उभें करणें; उचलून ठेवणें ( जातण, पाटी इ० ); नीट ठेवणें. [ सं. उद्+धू–धव ]

**उधवणें**—उद्वणें पहा.

**उधळ**—स्त्री. अवास्तव खर्च; बेसुमार खर्च; उधळपट्टी. [ सं. उद्+धूल ] ०**खोर–पट्टया–पांड्या–माणक्या–माधळ्या–वाढ्या**–वि. अति खर्च करणारा; उधळ्या; बेसुमार, बेदाद, शक्तीबाहेर, निष्कारण खर्च करणारा. ०**ठक**–पु. (चुकीनें) उजळठक पहा. ०**पट्टी**–स्त्री.१ मनस्वी खर्च; फाजील, निष्कारण व्यय. २ (चुकीनें) खरडपट्टी पहा. ( क्रि० काढणें). ०**भवानी–मावशी**–स्त्री. खर्चिक स्त्री; उधळी. ०**माणकी–माधळ**–स्त्री. उधळ; उधळपट्टी. **म्ह**० उधळमाधळ घाल गोंधळ.

**उधळण–णी**—नस्त्री. उधळणें, वर फेंकणें, टाकणें; उडविणें. ' जटाधारी लीळा उधळण चिताभस्म शयनीं । ' –दावि २२४. ' विभूतीचें उधळण शितिकंठ नीला । ' –शंकराची आरती. [ सं. उद्+धूलन ]

**उधळणें**—सक्रि. १ वर फेंकणें; उडवणें; पसरणें ( धूळ, गुलाल, राख वगैरे ). २ वारवणें; वारा घालणें. ३ ( ल. ) पळवून लावणें; दाणादाण करणें; दशदिशां करणें; हांकून लावणें; पिटाळून देणें ( सैन्य, गर्दी वगैरे ). ४ अतिशय खर्च करणें; उधळपट्टी करणें. ' हा काय पैसा उधळतोस ! ' ५ ( सामा. ) नाहींसें होणें, जाणें. ' अहो या लोहाचा जिनस परिसेसीं जरि मिळे । तयाच्या संसर्गें अखिल मग लोहत्व उधळे । ' –सारुह ५.६२. –अक्रि. १ दशदिशां पळणें ( सैन्य, समाज वगैरे ). ' शिकारीला गेलेलें स्त्रीसैन्य उधळलेलें दिसतें. ' –बाय ४.२. २ अनावर होणें; बुजून पळणें ( भ्यालेला घोडा, बैल वगैरे ). ' घोडा मोकळा सुटला कीं सारखा उधळतो. ' ३ उनाडणें; भटकणें; फिरणें ( मूल वगैरेनें ). ' हा दिवसभर गांवांत उधळतो व रात्रीं घरीं येतो. ' ४ आवेशानें एखादी क्रिया करणें ( मारणें, शिव्या देणें वगैरे ). ५ जोरानें बाहेर पडणें; बळावणें ( एखादा रोग ). ६ बुडणें; अजिबात नाश होणें ( पीक वगैरे ). ७ पळून जाणें; नाहींसें होणें ( एखादें कूळ, भाडेकरी वगैरे ). [ सं. उद्+धूल्; उध्दूलन ] **उधळा घालणें**–१ उड्या मारणें; हैदोस घालणें; दांडगाई मांडणें. २ पळवून लावणें, (मंत्रानें, जादूनें वगैरे ).

**उधळवाफ**—स्त्री. १ ओल कमी झाल्यामुळें पेरण्यास अयोग्य अशी जमीनीची स्थिति; किंचित कोरडेपणा. २ पेरणीचा हंगाम गेल्यानंतरचा काळ; ऐनवाफ, घातवाफ याच्या उलट. [उधळणें+वाफ]

**उधळा**—पु. उधळण पहा. ' कनककमळांचा कचोळा । कीजे परागाचा उधळा ॥ ' –शिशु ७८१.

**उधळा–ळ्या**—वि. पुष्कळ खर्च करणारा; उडव्या पहा. ' धर्म करी त्याला उधळा म्हणती । न केल्या बोलती पोटपोशा ॥ ' **म्ह**० ( व. ) उधळ्याचा भाऊ दिधडा.

**उधाइणें**—न. प्रकट होणें. उधवणें पहा. ' म्हणोनि आळविला तंव वोखटा । उधाइला हा ॥ ' –ज्ञा ११.४५२. [ सं. उद्+धू ]

**उधांग**—न. ( व. ) उसंत; अवकाश. ' जरा उधांग पडूं दे. '

**उधाण–न**—न. १ अमावास्या–पौर्णिमेला येणारी मोठी भरती; पूर्ण भरती; समा. ' भरलें रतिसागरीं विषय उधान । करूं कुठवर करीं अपिधान ॥ –प्रला १३९. २ ( सामा. ) भर; ऊत. ' बादशहाचा हा गळेकापू प्रकार पाहून माझ्या देहांतल्या एकूणएक धमन्यांतील रक्त सारखें उधाण पावत आहे. ' –स्वप ७६. ३ पशूंच्या ठिकाणीं दिसून येणारें कामोद्दीपन. ४ तारुण्याचा भर. ५ भरभराट; उत्कर्ष वगैरे. [ सं. उत्थान; प्रा. उट्ठाण; सिं. उधणु ]

**उधानाचें पाणी**–न. पौर्णिमा–अमावस्येस येणारी मोटी भरती.

**उधाणें**—क्रि. बहरणें; प्रफुल्ल होणें, विकसणें; बहर येणें. ' जेथ पद्में प्रेमा मोददती । आनंदमकरंदे उधाती ॥ ' –ज्ञाप्र ४१२. [उधाण]

**उधानणें**—अक्रि. १ तारुण्याच्या भरांत येणें. २ भरती येणें. [ उधान ]

**उधानु**—वि. ( नंदभाषा ) तीन. उदानु पहा. ' उधानु काटीवरी चोपड्ची आस । नवरा राजस मिरवतसे ॥ –तुगा ४४५९. [ नंदभाषा ]

**उधार**—पु. १ पतीवर किंवा खात्यावर आणणें; आणलेला जिन्नस. ' मज उधार न घालावा संनिधानाचा । ' –भाए १४५. २ ऋण; कर्ज; पतीवर आणलेल्या मालाबद्दलचें येणें–देणें. ' याचा धरी नियत इंदु उधार साचा. ' –सारुह ८.१३१. ३ बिन व्याजीं कर्ज; उसनी आणलेली रक्कम, वस्तु. –वि. अवकाशाचा; वायद्याचा; विलंबाचा. ' तारीन म्हणतां उधारू । बोलीं दिसताहे उशिरू ॥ ' –एभा २३.९२८. ' संमार म्हणजे सर्वेच स्वार । नाहीं मरणास उधार ॥ ' –दा ३.९.१. –क्रिवि. पतीवर; जबाबदारीवर ( देणें, घेणें, आणणें, नेणें वगैरे ). [ सं. उद्+आ+हृ; किंवा उद्+धृ ] **म्ह**० १ उधाराचें पोतें सव्वा हात रितें. २ उधार आणि अंधार. ( उधारीनें घेण्यांत मनुष्य फसतो याअर्थी ). ३ ( व. ) उधाऱ्याचा पुधार खाटल्याखालीं अंधार ( कोणी औदार्याच्या मोठमोठ्या बाता मारीत असल्यास त्याला म्हणतात. ) ०**पट**–पु. पतीवर माल घेतलेल्या गिऱ्हाइकांची नोंद; उधारीची यादी. ०**पाधार**–पु. पतीवर माल आणि कर्ज देणें, घेणें; उधारीचा व्यवहार. [ उधार द्वि. ] ०**बोलणें**–न. वर वर बोलणें. ' कांहीं कल्पिसी संदेहो । उधार बोलणें कृत्रिम स्नेहो ॥ ' –मुरंशु १२९.

**उधारा**—वि. उताणा; तोंड वर केलेला.

**उधारा**—( गो. ) उतारा.

**उधारी**—स्त्री. कांहीं मुदतीनें पैसे देऊं करून माल नेणें; उधार व्यवहार; उधार; उचल; उचापत; ऋण. [ उधार ]

**उधावणें**—उक्रि. उद्भवणें; वाढणें; जोर येणें. उधवणें पहा. 'अधिकांचि विरहोज्वरूं। उधावतु दिसे॥ –शिशु ८३२. [ सं. उद्+धू–धाव् ]

**उधाळा**—पु. १ डोळ्यांत कांहीं उधळून गेलें असतां होणारी स्थिति; उधळणें; धुंदी. 'मज कैसा पडला मोहाचा उधाळा॥' –भाए ३८८. २ भुकटी; रक्षा; भस्म. 'घाली रूपाचा उधाळा।' –भाए ३६२. [ सं. उद्धूलि ]

**उधाळी**—स्त्री. उडी. ( क्रि० मारणें ).

**उधी**—स्त्री. निर्णय. –ख्र.

**उधृता**—स्त्री. वर धरलेली; एक लगामाचा प्रकार. –अश्वप १८५. [ उद्+धृता, अप ]

**उधेल**—वि. खवले, वण असलेला. **०तोंड**–न. देवीचे वण असलेलें तोंड.

**उधोपानस्य**—पु. कोठीवाला. 'कारकून उधोपानस्या आणोन।' –रामदासी २.३२.

**उध्वस्त**—वि. अस्ताव्यस्त; उधळलेला; इकडेतिकडे करून टाकलेला; नाश केलेला. [ सं. ]

**उनंत**—वि. थोर; मोठा; उन्नत. 'जुंझा लागोनी उनंत।' –उषा ८२७. [ सं. उन्नत ]

**उननी**—न. (व.) आधण आलेलें पाणी. [ सं. उष्ण+वन–वणी ]

**उना–नी**—क्रि. ( खा. ) आला–ली. [ हिं. आना ]

**उनाइनें**—( भिल्ली ) ऐकून. 'तियांव बेनीहीं आखूलों उनाइनें शिपायाल आख्योके ...त्यानें दोघींचें म्हणणें ऐकून शिपायास सांगितलें कीं...'

**उनाड**—वि. १ अनिर्बंध; भटक्या; मोकळा सुटलेला; स्वैर ( मनुष्य, मूल ). २ जंगली; रानटी ( बैल, वनस्पति वगैरे ). ३ ( कों. ) आळा नसलेली; स्वैर; व्यभिचारी ( स्त्री ). –क्रिवि. १ स्वैरतेनें; अनिर्बंधपणें; स्वच्छंदपणें ( भटकणें ). २ आपोआप; न लावतां ( उगवणें ). [ सं. उद्+नट्, नाट्; प्रा. उन्नाडिय=हर्षद्योतक आवाज. उद्नाडि; का. उंडिग=आईबापाविरहित मुलगा ] **०चाळा**–पु. स्वैरवर्तन; खोडकरपणा; व्रात्यपणा; उनाडकी. **०झाड**–न. रानटी, जंगली झाड; तण. **०बाहुला**–वि. भटक्या; उनाडक्या करीत फिरणारा; स्वैर; स्वच्छंदी. **०भाजी**–स्त्री. जंगली माठ. **०मैना**–स्त्री. स्वैरिणी स्त्री.

**उनाडकी**—स्त्री. उनाडचाळा; उडाणटप्पूपणा.

**उनाडणें**—अक्रि. स्वैरपणानें फिरणें; भटक्या मारणें; खोड्या करीत फिरणें; उनाडक्या करीत राहणें. [ उनाड ]

**उनारणें**—अक्रि. ( व. ) भाजलेल्या कणसांतील दाणे चोळून काढणें.

**उनारी**—स्त्री. (व.) पेरण्याच्या वेळीं गव्हाचे किंवा ज्वारीचे दाणे चाड्यांत एका विवक्षित क्रमानें सोडण्याची क्रिया.

**उनिदिया**—वि. जागृत. 'उनींदियाचें पहुडणें। निरोधाचें वेल्हावणें॥' –ज्ञा १२.६४. उन्निद्र पहा. [ सं. उन्निद्र ]

**उनून**—वि. गरम; पुष्कळ ऊन; खूप तापलेलें; उन्हून पहा. [ ऊन+ऊन ] **म्ह०** उनून पाण्यानें घर जळत नाहीं=निंदा, अपशब्द, धाक हीं कितीहि वाईट असलीं तरी त्यामुळें कोणी मरत नाहीं.

**उन्नत**—वि. उंच; उच्च; श्रेष्ठ. [ सं. उद्+नम् ]

**उन्नत( पार्श्व )**—पु. ( नृत्य ) नृत्यामध्यें सूचीपाद करीत असतां जो पार्श्वभाग वर जातो तो.

**उन्नत( मान )**—न. ( नृत्य ) उंचावरील पदार्थ पहात असतां होणारी मानेची स्थिति.

**उन्नत, उन्नतांश**—नपु. ( ज्यो. ) खस्थ पदार्थाचें क्षितिजापासून होणारें जें कोनात्मक अंतर ते. [ सं. ]

**उन्नति–ती**—स्त्री. १ उंची. २ श्रेष्ठपणा; मोठेपणा; अधिकार. ३ उत्साह. 'कां परिसु जालिया हातीं। लोहालागीं सर्वसंपत्ति। वेंचितां ये उन्नती॥' –ज्ञा १८.६००. ४ उदय. 'दिवसाचिये उन्नती। भानु जैसा॥' –ज्ञा १७.१३३. ५ वृद्धि; उत्कर्ष; आधिक्य. 'ते कथेची संगति। भावाची संपत्ति। रसाची उन्नति। म्हणिपेल पुढां' –ज्ञा ४.२१२. 'तेथही दोन गुण खांचती। मग एकधरी उन्नती॥' –ज्ञा १७.५७. ६ ( ज्यो. ) उन्नतांश पहा. ७ उद्धटपणा. [ सं. उद्+नम्–नति ]

**उन्नत्र**—न. उज्ज व नत्र यांचें संयुक्त द्रव्य. ( इं. ) हायड्रोझोन.

**उन्नद्ध**—वि. गर्वानें फुगलेला. 'वक्रदंत जरासंध। शाल्वपौंड्रक उन्नद्ध॥' –एरुस्व ५.३७. [ सं. उद्+नह्–उन्नद्ध ]

**उन्नयन**—न. वर नेणें; उचलणें; दूर नेणें; लांबविणें. [ सं. उद्+नी ]

**उन्नावो, उन्नाह, उन्नाहो**—पु. वृद्धि, वाढ; भरती. 'काय प्रलयांबूचा उन्नाहो। बोधु मानी॥' –ज्ञा १८.४१३. [ सं. उद्+नी–नय; उन्नाह=उंची ]

**उन्निद्रा**—स्त्री. जागृति. [ सं. उद्+निद्रा ] **उन्निद्र**–वि. जागा. 'उन्निद्रेयाचे पहुडणें।' –ज्ञा १२.६४. **उन्निद्रित**–वि. जागृत. 'उन्निद्रितें एकें निद्रितें।' –ज्ञा ११.१२८.

**उन्फा**—पु. रोजचा शिधा; भत्ता; अडेश्री; रोजमुरा. 'तिलक्यांस चार मास मिष्टान्न उन्फे चालविले.' –चित्रगुप्त [ अर. नल्फा–शिधा, भत्ता ]

**उन्मंडल**—न. विवक्षित स्थलींच्या मध्यान्हरेखापाताचे क्षितिजाला त्या स्थलाचें उन्मंडल म्हणतात. –सूर्य १६. [ सं. ] **०शंकु**–पु. सकाळीं सहा वाजतां सूर्याच्या उन्नतांशाची भुजज्या.

**उन्मत्त**—वि. १ गर्विष्ठ; उद्धट; मस्त; माजलेला; दांडगा; रागीट. २ धुंदींत असलेला; निशा चढलेला; झिंगलेला; शुद्धि गेलेला ( मद्य इ०च्या सेवनानें ). [ सं. ] **०द्रव्य**–न. मद्यादि मादक पदार्थ. 'कां उन्मत्तद्रव्य सेविलें। तेणें अनेक भासों लागलें॥' –दा १०.६.१५. **०भैरव**–पु. एक मात्रा, रसायन. **०वायु**–पु. भ्रम; उन्मादवायु; वेड; बडबड; एक वातविकार.

**उन्मत्त( करण )**—न. ( नृत्य ) उजव्या पायाचीं बोटें आकुंचित करून तो टांचेवर उभा करणें, हंसपक्ष हात फिरवून उताणे करून व बाहू पसरून ठेवणें. [ सं. ]

**उन्मन**—वि. १ लीन; परमेश्वरचिंतनांत निमग्न; उन्मनी अवस्थेंत असलेला. 'तुका म्हणे मन उन्मन जों होय। तोंवरि हे सोय विधि पाळीं।' –तुगा २७६८. २ विरक्त. [ सं. उद्+मनस् ]

**उन्मनी**—स्त्री. जागृति, स्वप्न, सुषुप्ति आणि तुरीया याहून पलीकडील जी पांचवी अवस्था ती, ह्या अवस्थेंत वृत्ति मायेच्या उपाधीपासून मुक्त होऊन ब्रह्माच्या ठिकाणीं लीन होते; परमेश्वराच्या ठिकाणीं लय, तंद्री. 'उन्मनी ते निवृत्ति जाण। जेथे विरे जाणपण। विज्ञान तें।' –दा ७.४.५०. 'कल्पनेची लहरी नाहीं। मन निमग्न चैतन्यडोहीं। स्वरूपावांचूनी नाठवे कांहीं। तेचि उन्मनी॥' –निगमसार ८.२६. [ सं. उद्+मनस् ]

**उन्मळण**—न. उपटून पडणें; उन्मूलन. 'अंगवायो सुटला तेणें द्रुमां। मार्गीं उन्मळणें जालीं।' –कृमुरा १४१. [ सं. उद्+मूलन ]

**उन्मळणें**—उक्रि. १ उपटणें; समूळ उच्छेद करणें. 'गळा बांधूनियां उखळासी दावें। उन्मळीं त्या भावें विमळार्जून।' –तुगा २०. २ भडभडून येणें; कळमळणें; मळमळणें. [ सं. उन्मूलन ]

**उन्मळणें**—क्रि. उमलणें; उघडणें; विकासणें; फुलणें. उन्मिळणें पहा. 'तिये उन्मळितां मावळे। नवलावो।' –अमृ ७.१८४.

**उन्मळित**—वि. उघडलेलें; विकासलेलें. 'पाहिलें ताटस्थ उन्मळित लोचन।' –तुगा ११७. [सं. उन्मील्; उद्+मीलित ]

**उन्माद्**—पु. १ गर्व; ताठरपणा; उध्दटपणा; माज. ( विद्या, संपत्ति इ० योगें ). २ धुंदी; बेशुध्दि; कैफ. ( मादक पदार्थामुळें येणारा ) ३ भ्रम; वेड; वातविकार. [सं. उद्+मद्=माजणें] **०वायु**–पु. उन्मत्तवायु पहा.

**उन्मादक**—वि. कैफ आणणारें; गुंगी आणणारें; मादक. [ सं. ]

**उन्मादणें**—क्रि. उसळणें, वर येणें; वाढणें. 'रांधवणी चुलीपुढें। पन्हे उन्मादती खातवडे।' –ज्ञा १३.५६२. २ उन्माद येणें. [ सं. उन्माद ]

**उन्मान**—न. १ वजन करण्याची क्रिया; वजन करणें. २ वजन; भार ( वस्तूचें ); माप. ३ वजन करण्याचें प्रमाण; माप; वजनें ( मण, शेर, तोळा, इ० ) ४ वजन करण्याचें साधन (तराजू, कांटा). [ सं. उद्+मा=मापणें ]

**उन्मिळणें**—अक्रि. विकासणें; उघडणें; फुलणें. उन्मळित पहा. [ सं. उन्मीलन ]

**उन्मीलन**—न. १ उघडणें; उमलणें; विकासणें; फुलणें. 'जेथ उन्मीलन होत आहे। दिठी।' –ज्ञा ११.१४१. २ प्रगट करणें; दाखविणें; व्यक्त करणें; अनाच्छादित करणें. 'जगदुन्मीलनाविरलकेलिप्रिया।' –ज्ञा १८.६. ३ ग्रहण सुटणें. ४ डोळयांची उघडझांप; लिकलिक; लुकलुक. [ सं. उद्+मील्–मीलन=मिटणें ]

**उन्मीलित**—वि. १ उन्मीलन झालें आहे असें; विकासलेलें; फुललेलें (फूल). २ उघडलेले ( डोळे ). ३ सुटलेलें (ग्रहण). [ सं. ]

**उन्मुख**—वि. सज्ज; तत्पर; प्रवृत्त झालेला; तयार झालेला. उ० मरणोन्मुख; विषयोन्मुख. [ सं. उद्+मुख ]

**उन्मूलन**—न. उपटणें; उच्छेद; नाश. [ सं. ]

**उन्मूलित**—वि. उपटलेलें; नाश केलेलें. [ सं. ]

**उन्मूळणें**—सक्रि. मुळासकट उपटून टाकणें. 'जें संसारातें उन्मूळी।' –ज्ञा १३.१७२. 'जसा उन्मुळी चंडवायू वनातें।' –किंकर, शुकरंभासंवाद ३. [ सं. उद्+मूल् ]

**उन्मेख, उन्मेष**—पु. १ डोळयांची उघडझांप; उघडण्याची क्रिया; निमेष (मिटणें) याच्या उलट. २ उघडणें; फुलणें; विकासणें ( डोळे, फूल वगैरे ). ३ बुध्दीचा विकास; ज्ञानप्राप्ति; ज्ञानसंपादन. 'तऱ्ही उन्मेखाचिये पेठे। गुणा अवंकणी भरीन बुध्दीचि साटे।' –ऋ १४. 'मग नवी विरूढी फुटेल। उन्मेषाची।' –ज्ञा २.७९. ४ ज्ञान; बुध्दि; प्रकाश; जागृति. 'जयाचेनि विवेक किरणसंगें। उन्मेखसूर्यकांत फुगगे।' –ज्ञा १६.८. ५ तेज; चमक. ६ प्रकटपणा; उघडपणा. 'जे किरीटी तुज निकें। तें पूसपां उन्मेखें। मनाचेनि॥' –ज्ञा २.२८६. 'अविद्या नाशी उन्मेखु।' –अमृ ६.६०. **उन्मेखें**–क्रिवि. स्पष्टपणें; उघडपणें. 'आतां असोत हीं वाक्यें। सिधु केवीं उपसूं नखें। हें सांगितलें उन्मेखें। तुज प्रती।' –कथा १.१४.८९. उन्मेखून=मुद्दाम; दाढून; बुद्ध्या; जाणून बुजून. [ सं. उन्मेष ]

**उन्मेष(पुट)**—न. (नृत्य) नृत्यामध्यें खालच्या वरच्या पापण्या एकमेकींपासून फार दूर ठेवणें, हा अभिनय राग आला आहे असें दर्शवितो. [ सं. ]

**उन्मेषलता**—स्त्री. ज्ञानवल्ली; ज्ञानरूपी वेल. 'परी हे बोलौ काय गीता। जे हे माझी उन्मेषलता।' –ज्ञा १५.५८२. [ सं. ]

**उन्ह**—न. ( प्र. ) ऊन–न्ह. सूर्यप्रकाश; ऊन पहा. [सं. उष्ण] **म्ह०** उन्हांत गेल्याशिवाय सावलीचें सुख कळत नाहीं. **उन्हांत**

ठेवणें–उन्हांत तापत ठेवणें. **उन्हांतील पाला होणें**–कोमेजणें; म्लान होणें; जीव सुकणें. 'जाहला उन्हांतील पाला।' –संग्रामगीतें ११८. **०उन्हीत**–वि. (गो.) उनून; ऊन; गरम; तापलेल; तप्त. 'गिरिजाबाई नवऱ्यास म्हणाली कीं ताजें उन्हउन्हीत थालीपीट तयार आहे तें देऊं का?' –कोरकि ६७. **उन्हाचा कढ**–पु. सूर्याची प्रखर उष्णता. **उन्हं देणें**–तापूं देणें.

**उन्हणें**—अक्रि. उन्हांत तापणें; ऊन होणें; उन्हत ठेवणें; उन्हं देणें या रूपांतच क्वचित हें क्रियापद आढळतें. [सं. उष्ण; म. ऊन]

**उन्हन, उन्हून**—वि. कढत; वाफ येत असलेला; उनून. 'मेक्सिको येथील लोकांच्या देवता मांसभक्षक असल्यामुळें तेथील लोक उन्हन उन्हन ताजें मांस आणि रक्त त्यांच्या तोंडांत कोंबतात' –आगर ३.१५. [सं. उष्ण]

**उन्हवणी, उन्हाणी**—स्त्री. १ ऊन पाणी. 'कुंथावयाची आवडी ओवा। उन्हवणी रडवी बाळें॥' –तुगा ३२५७. २ सूर्यप्रकाशांत तापविलेलें पाणी. 'मोहरिया वाटुनि उन्हाणियासि दिधलीया तुं मरसिल।' –पंच ३.१८. [सं. उष्ण+वन=पाणी]

**उन्हसाण**—न. (गो.) गरमपणा.

**उन्हळ**—स्त्री. उन्हानें लांकडांत पडलेली भेग. [उन्हाळणें]

**उन्हाटणें**—क्रि. उन्हानें करपणें; सुकून जाणें (फळें वगैरे).

**उन्हातान्हाचा**—क्रिवि. भर दोन प्रहरीं; माध्यान्हीं; ऊन कडक असतां. 'एव्हां उन्हातान्हाचा जाऊं नको, अंमळ झिळोपा पडला म्हणजे जा.' [ऊन्ह द्वि.]

**उन्हाळ-ऊंस-वांगीं**—पु. उन्हाळ्याच्या दिवसांत होणारा ऊंस–वांगीं वगैरे माल.

**उन्हाळणे**—अक्रि. १ उन्हापासून त्रास होणें. २ ऊन लागून तडकणें (लांकूड) ३ उन्हाळे लागणें; उन्हापासून एक विकार होणें. [सं. उष्णकाळ; प्रा. उन्हाल.]

**उन्हाळपावसाळ**—क्रिवि. (राजा.) उन्हाळ्यांत आणि पावसाळ्यांत; बारमाही; सबंध वर्षभर. 'या विहिरीस उन्हाळपावसाळ पाणी एकसारखें असतें.'

**उन्हाळभावई-ळी, उन्हाळभावी**—स्त्री. (व.) वैशाख वद्य अमावास्या. [सं. उष्णकाल+भू–भावी]

**उन्हाळमैत्री**—स्त्री. (व.) उन्हाळ्यापुरेशी, चालत्या काळापुरती मैत्री; हंगामी मित्रत्व.

**उन्हाळसावली**—स्त्री. १ उन्हाळ्यांत राहण्याकरितां बांधलेलें घर; उन्हाळी बंगला; बाराद्वारी. २ (थट्टेनें) छप्पर; झोंपडी ३ उष्णतेपासून बचाव; आसरा.

**उन्हाळा**—पु. १ ज्या दिवसांत ऊन्ह कडक असतें ते दिवस; फाल्गुनापासून ज्येष्ठापर्यंतचे चार महिने. २ ऊष्मा; उकाडा. ३ वारंवार मूत्रविसर्जन करावें अशी भावना.(क्रि०लागणें.उन्हाळे; एक रोग). ४ आईबापावांचून उघडें पडणें; निराश्रितपणा; पोरकेपणा. 'पोराबाळांचा उन्हाळा झाला.' ५ नाहींसें होणें; नाश पावणें; अभाव; करपणें; जळणें; खराब होणें (शेत, बाग, मळा वगैरे). 'प्रीतीचा उन्हाळा राया।' –संग्रामगीतें ८१. ६ (सामा.) बिनपावसाळ्याचे दिवस (आठ महिने.) [सं. उष्णकाळ; प्रा. उन्हाल; सिं. उन्हारो] **०करणें**–नाश करणें; उजाड करणें. 'मी म्हणतें नुसते दागिने नेले असते तरी बरें. पण घराचा उन्हाळा केला.' –नामदेव नाटक ७६.

**उन्हाळी**—स्त्री. १ हवेंतील उष्णता; उन्हाळ्यांतील उष्णता; उकाडा. २ एक मूत्रविकार; उन्हाळे. (क्रि. लागणें, होणें.) 'मुरडा हागवण उन्हाळे। दिशा कोंडतां आंदोळे।' –दा ३.६.३०. ३ एक वनस्पति; रानटी तीळ; हिचीं फुलें लाल व पांढऱ्या रंगाचीं असून शेंगा चपट्या व पानें लहान व लांबट असतात. काढ्याचा सर्पणाकडे उपयोग होतो. शिवाय व्रण, खोकला, विष, दमा, अर्श, ज्वर, वायुनाशक वगैरे गुण यामध्यें आहेत. ४ (कों.) उन्हाळा पहा. **०पावसाळी**–स्त्री. खेळांतील दोन पक्षांपैकीं कोणी डावाला सुरवात करावयाची हें ठरविण्यासाठीं खापरी किंवा पैसा यांस एका बाजूनें थुंकी लावून तो वर फेकतात. त्या खापरीचें किंवा पैशाचें कोरडें अंग ती उन्हाळी व थुंकी लागलेलें अंग ती पावसाळी. त्यापैकीं एकानें कोणतें तरी अंग मागावयाचें व मागितलेलें अंग वर आल्यास त्यानें प्रथम खेळावयाचें असतें. **०भात**–न. वायंगणें भात.

**उन्हाळू**—न. (माळवी) उन्हाळ्यांतील पीक.

**उन्हाळे**—पुअव. उष्णतेचा, लघ्वीचा विकार; उन्हाळी. 'मुरडा हागवण उन्हाळे।' –दा ३.६.३०. [उन्हाळा]

**उन्हाळें, उन्हेरें**—न. उष्ण पाण्याचा झरा. [सं. उष्ण+आलय]

**उन्हून**—उन्हन पहा.

**उन्हेत**—न. (गो.) सूर्याची उष्णता; उन्ह.

**उन्होटी**—स्त्री. उबारा. –शर.

**उप**—अ. एक उपसर्ग–अर्थ: १ अनुगमन. उ० उपदेश, उपालंभ. २ अधिकपणा. उ० उपपरार्ध. ३ हीनपणा; गौणत्व. उ० उपस्त्री, उपपत्नी, उपपुराण. ४ कमी प्रतीचा, तीव्रतेचा, गुणाचा. (इं.) हायपो; हा अम्लांत किंवा त्या रसायनांत (प्राणवायूचा) कमीपणा आहे असें दाखवितो. उ० नत्रस अम्ल (नायट्रस ॲसिड) पेक्षां उपनत्रस अम्ल (हायपोनायट्रस ॲसिड) हें कमी अम्लजन असतें. ५ समीपता; सान्निध्य. उ० उपकंठ, उपनदी, उपांत्य. ६ पहिलेपणा. उ० उपक्रम. ७ दाक्षिण्य; आदर. उ० उपचर्या. ८ साम्य. उ० उपधातु, उपव्याघ्र. ९ शेवट; नाश. उ० उपरति. १० विकार. उ० उपलेप. ११ स्वीकार. उ० उपगम, उपाकर्म. १२ व्यापणें. उ० उपहास. १३ समूहत्व; संमेलन; संकलन. उ०उपार्जन. १४ शक्ति. १५अध्ययन; अध्यापन; उ० उपाध्याय. १६ उद्योग. १७ कडे; वर; खालीं. उ० उपनयन. १८ निरर्थक म्हणूनहि कधीं हा उपसर्ग लागतो. अप या उपसर्गाचे कांहीं अर्थ याचेहि आहेत.

**उपकंठ**—क्रिवि. गळयापर्यंत; आकंठ ( खाणें, वर जीव येणें ). –शअ. जवळ; शेजारीं. ' तरि अस्तुगिरिचिया उपकंठीं । रिगालिया रविबिंबापाठीं ॥ ' –ज्ञा १२.३५. ' उभ्या राहोनि उपकंठीं । तंव धूम्र देखिला दृष्टीं । ' –कथा ३.३.१८. [ सं. उप + कंठ = कांठ ]

**उपकणा**—पु. नावेचा आंतील कणा.

**उपकरण**—न. १ साधन; हत्यार. २ साहित्य; सामग्री; परिवार; घटकावयव; घटकद्रव्य. ' हें यज्ञोपकरण सकळ । ' –ज्ञा ३. १२८. ३ देवांच्या पूजेचीं भांडीं ( घंटा, तबकडी, धूपार्ती इ० ). ' आणि उपकरतीं आपुलीं । उपकरणें आथि जेतुलीं । –ज्ञा १३. ४०६. ४ ( अव. ) पंचांग तयार करतांना केलेलीं निरनिराळीं गणितें, फलें ( तिथिशुद्धि, अब्दप इ० ). ५ राजभूषणें; राजचिन्हें ( छत्र, चामर इ० ). ६ शास्त्रीय प्रयोगसाहित्य. ( इं. ) ॲपेरेटस. [ सं. उप+कृ ] ०**सामग्री**–स्त्री. अनुष्ठानास अगर देवपूजेस लागणारें साहित्य किंवा भांडीं. ' माता निरोपी कैकेयीतें ॥ उपकरणसामग्री लागेल येथें ॥ सिध्द करूनि ते देई ॥ ' –रावि ३.९८.

**उपकरणें**—अक्रि. १ उपकार करणें; उपयोगी पडणें; कामास येणें. ' आपुला अथवा पराव। । ठायीं उपकरसी पांडवा । '–ज्ञा १८. १३५९. २ सेवा करणें. [ सं. उप+कृ ]

**उपकर्ता**—वि. उपकार, कल्याण करणारा; मदत करणारा; उत्कर्ष करणारा; उपयोगी पडणारा; उपकारकर्ता. [ सं. उप+कृ ]

**उपकंस**—पु ( गणित ) लहान कंस; कंसांतील कंस. [ सं. ]

**उपकार**—पु.१मदत; साहाय्य;साहित्य. २ कृपा; दया; आभार; मेहेरबानी. ३ हित; कल्याण; फायदा; बरें. **म्ह**० उपकारानें उपकार फेडावा. [ सं. उप+कृ; उपकार ] ०**ठेवणें**–उपकाराची फेड न करणें. ०**बाळगणें–मानणें–न विसरणें–स्मरणें**–उपकाराबद्दल कृतज्ञ असणें. ' तेल आणुनि यावें घरा । तुमच्या उपकारा न विसरूं । ' **उपकारांनीं बांधणें**–दुसऱ्यास ऋणी करून ठेवणें. **उपकारांनीं मारणें**–१ अतिशय उपकार करणें; न फिटसे उपकार करणें. २ उपकार करून एखाद्यास वश करून घेणें; मिंधा करून ठेवणें. ०**स्तुति**–स्त्री. (अर्वाचीन) उपकार केल्याबद्दल आभार मानणें; कृतज्ञता व्यक्त करणें. ( इं. ) थॅंक्स गिव्हिंग. ०**स्मृति–स्मरण**–स्त्री.न. ( अर्वाचीन ) उपकाराची जाणीव; उपकार स्मरणें.

**उपकारक**—वि. १ साहाय्यकारी; अनुकूल; मदत करणारा; उपकर्ता. २ हितकारक; कल्याणप्रद ( औषध, क्रिया इ० ). [ सं. उप+कृ ]

**उपकारी**—वि. १ दुसऱ्याचा फायदा, बरें करणारा; उपकार करणारा; उपकर्ता; उपकारक; उपकार करण्याचा स्वभाव असलेला; परोपकारी. २ आभारी; कृतज्ञ. ३ साहाय्यक; साहाय्यकारी; हात भार लावणारा. [ उपकार ]

**उपकार्य**—वि. ज्याला मदत करावयाची, ज्यावर उपकार करावयाचा असा. [ सं. उप+कृ ]

**उपकृत**—वि. मदत, उपकार केलेलें; ज्यावर कृपा, दया केली आहे असा; ऋणी; आभारी. [ सं. ]

**उपकेशगच्छ**--पु. जैन धर्मांतील एक संप्रदाय; असे एकंदर गच्छ ( संप्रदाय ) ८४ आहेत. श्रीमालच्या उहडानें ओस नगरी स्थापिली तेव्हांपासून त्या ठिकाणच्या जैन समाजाला उपकेश हें नांव पडलें. ओसवाल जैन या गच्छाचे आहेत. [ सं. ]

**उपक्रम**—पु. १ आरंभ; सुरवात; हातीं घेणें. ' प्रकृतिपरिहार उपक्रमीं ॥ ' –ज्ञा १०.२८. उपक्रमाच्या उलट उपसंहार (शेवट). ' उपक्रमोपसंहारौ '–गीर २१. २ प्रवेश; शिरकाव ( एखाद्या विषयांत ); प्राथमिक अवस्था; सुतोवाच. ३ ओघ; संदर्भ. ' उपक्रमें वदे । तुका वर्मासी तें भेदे ॥ ' –तुगा ३५१५. ४ उद्योग करणें; उपाय करणें; चालविणें. [ सं. उप+क्रम्=जाणें ]

**उपक्रमणें**—उक्रि. उपक्रम, आरंभ करणें; हातीं घेणें. 'ऐसेसां अफाटीं कर्मीं । समारंभु उपक्रमीं ॥ ' –ज्ञा १४.२३८. [ उपक्रम ]

**उपक्रांत**—वि. १ आरंभिलेलें; सुरवात केलेलें; उपक्रमिललें. २ चालू; सुरू. [ सं. ]

**उपखणें**—अक्रि. १ नाश पावणें; क्षय पावणें. ' पै जगीं जीवनासारिखें । वस्तु अंग वरी उपखें ॥ परी जातें जीवित राखे। तणांचेंही ॥ ' –ज्ञा १६.१५६. ' फळनाशे रस फांके । तोही रस उपखे । तृप्तिदानीं ॥ ' –अमृ ५.२२. २ व्यर्थ होणें. ' परि जह्लीही वृष्टि उपखे ॥ ' –ज्ञा ११.९५. ३ खर्चणें. ' आणि आपण जालिये जोडी । उपखों नेदी कवडी ॥ ' –ज्ञा १८ ६५३. [ सं. उप+क्षि–क्षय् ]

**उपखर्च**—पु. किरकोळ, बारीकसारीक, अवांतर खर्च. [ सं. उप+फा. खर्च ]

**उपखा**—स्त्री. १ उपेक्षा; उणीव. ' गृहीं उपखा न पडी । ' –भाए ३५०. २ खंड; खळ ' तव माझिया श्रवणसुखा । मध्येंचि पडेल कीं उपखा ॥ ' –स्वादि १२ २.६८. [ सं. उपेक्षा ]

**उपखा**—पु. १श्रम. ' तेथ चंद्रासि काय किरीटी । उपखा पडे ॥ ' –ज्ञा ९.११५. २ क्षय; नाश; खर्च. ' किंबहुना इया भाखा । द्वैताचा जेथ उपखा ॥ ' –अमृ २.५४. –वि. व्यर्थ; निरर्थक. [सं. उप+क्षि–क्षय्=ऱ्हास होणें ]

**उपखा**—पु सहवास; वस्ती; अधिवास; उपवास. ' पडिला चारि देहाचा उपखा । चुकला परमार्थसुखा ॥ ' –ऋ ८. [ सं. उपक्षि= जवळ राहणें; क्षेति, क्षियति=जवळ राहतो ]

**उपगण**—पु. उपवर्ग; पोटवर्ग; गौण प्रकार; भाग. [उप+गण]

**उपगणें**—क्रि. कंटाळणें; उबगणें पहा.

**उपगत**—वि. लब्ध; प्राप्त; सफल. 'तेथें कष्ट केले बहुत । न होयचि काय उपगत ॥' –गुच ४५–४४. [सं. उप+गम्]

**उपगुरु**—पु. गुरूस मदत करणारा; त्याच्या हाताखालचा; दुय्यम शिक्षक; मालचाव्या. [सं.]

**उपग्रह**—पु. (ज्यो.) १ मोठ्या ग्रहाभोंवतीं फिरणारा लहान ग्रह; दुय्यम ग्रह; चंद्र. २ राहु; केतु. (इं.) सॅटेलाईट.

**उपघात**—पु. दुर्दैवाचा फेरा; संकट; आपत्ति; अपघात. 'तूं सुमुहूर्तावर नीघ म्हणजे घात उपघात सारे वारले.' [सं. उप+हन्–घात]

**उपचडा**—पु. उमाळा; आवेग. 'उपचडे सुटती तिजला बहू।' –सारुह ६.१२८. [उप+चढणें]

**उपचय**—पु १ सांठा; संचय. २ वाढ; वृद्धि. [सं. उप+चि= गोळा करणें; उपचय]

**उपचार**—पु. १ श्रम; उपाय; प्रयत्न. 'मग नानाहेतुप्रकारें। यथोचितें उपचारें।' –ज्ञा ४.७१. २ पूजेंतील प्रकार. उ० षोडशोपचार पहा. 'देवांगणमिरवणियां । आंगोपचार पुरवणियां ।' –ज्ञा १७.२०३. ३ चिकित्सापद्धतींतील प्रकार; सप्तोपचार पहा. ४ वैद्यकीय चिकित्सा; औषधीयोजना; इलाज; उपाय. 'तें उपचारा. वेया रसु पाहे । देतु वैद्यनाथू ।' –ऋ २२. ५ गौरव; आदरसत्कार; आतिथ्य; संभावना; सेवा. 'उपचार करोनि मग राजाला ।' –दावि ३९२. ६ रूढी; रिवाज; चाल. उ० लोकोपचार; शिष्टोपचार. 'मरों टेंकला विप्र पुत्रोपचारें । हरीचें वदे नाम लोकोपचारें ।' –नामसुधा ५९. ७ शब्दाचा वाच्यार्थापासून दूरान्वय; उपमा, रूपक इ० वापरणें; लाक्षणिक भाषण; अलंकारिक भाषण. ८ सामग्री; साधनें; साहित्य. 'कां वसंतीं बरवा आरामु । आरामींही प्रियसंगमु । संगमीं आगमु । उपचारांचा ॥' –ज्ञा १८.३४५. [सं. उप+चर्] ०**बोल**–पु. अव. निरर्थक भाषण; औपचारिक, तोंड देखलें बोलणें; शिष्टाचार म्हणून वरवरचें, मनापासून नसलेलें भाषण. 'उपचारबोल हा कासया वृथा ।' –दावि २८६. ०**भरण**–न. साधनसामग्री. 'हेचि यज्ञोपचारभरण । अज्ञानघृत ।' –ज्ञा ९.२४०. ०**विरुध्द**–क्रिवि. शिष्टाचाराविरुद्ध; रूढीविरुद्ध. –नीतिशास्त्र १४७. ०**होडें**–वि. क्षणिक. –मनको

**उपचारणें**—सक्रि. उपचार करणें. 'तो तुवां उपचारिलों ।' –विपू २.२२.

**उपचारिक नांव**—न. व्यावहारिक नांव; टोपण नांव.

**उपचित**— वि. गोळा केलेलें; जमविलेलें; ढीग घातलेलें; संगृहीत; संकलित. [सं. उप+चि]

**उपज**—पु. १ उत्पन्न; निपज; पैदास; नफा; फायदा; प्राप्ति. २ उत्पत्ति; जन्म; मूळ; उगम. (निपजबरोबर बहुधां प्रयोग). 'त्याचा उपजनिपज सगळा ठाऊक आहे.' ३ (संगीत) आपल्या कल्पनाबळानें नवीनच चमत्कारिक घेतलेली तान. ४ शास्त्रादिव्यवहारांत आपल्या बुद्धीनें शंका, समाधान इत्यादि काढणें; नवीन कल्पना; शोध; संशोधन. [सं. उप+जन्, उपज=वाढलेलें; किंवा सं. उत्+पद् प्रा. उप्पज्ज]

**उपजंघा**—पु. घोड्याच्या पायाचा रोग. –अश्वप २.३८.

**उपजणें**—अक्रि. १ उत्पन्न होणें; जन्मणें; उद्भवणें. 'ऐसा उपजे नित्य सद्भावो । तोहि आपणपांचि ।' –ज्ञा ६.६९. 'पदीं उपजती नदी कशि कशी त्रिलोकीसती ।' –केका ७७. २ पासून निघणें; मिळणें; प्राप्त होणें. 'श्रीरामभजनीं बैसली प्रीत। तेजोमय शरीर दिसत । तेणें इंद्रासि भय उपजलें बहुत । म्हणे पद निश्चित घेईल हा ।' –संवि २१८२. **म्ह०** उपजल्या प्राण्यास मरण हें लागलेलेंच आहे.' [उपज पहा]

**उपजत**—क्रिवि. १ जन्मतः; जन्मापासून; उ० उपजत आंधळा रोगी–मुका–शाहणा लंगडा वगैरे. 'मांजर...याचें भय मुलांमध्यें जसें स्वाभाविक, उपजत असतें.' –नीति २६४. –वि. स्वाभाविक; जातीची; निसर्गतः प्राप्त; उ० उपजत बुद्धि–खोड–स्वभाव. ०**रांगणें**–१ उपजल्यापासूनच रांगणें. २ एखाद्या वस्तूची एकदम भारी किंमत सांगणें. ३ एखाद्या अडचणीला तोंड देण्याची आपली लायकी एकदम हमखास सांगणें. ०**खोड**–स्त्री जन्मल्यापासून असलेला दुर्गुण खोड–व्यंग (शारीरिक, मानसिक). ०**गुण**–पु. स्वाभाविक, अंगचा, जातीचा धर्म; जन्मापासूनचा गुण. ०**बागी**–वि. मूळचाच, जातीचाच घोड्यावर बसण्यांत पटाईत. [उपजत+हिं. बाग=लगाम, बागी=स्वार; सं. वाजी=घोडा] ०**स्वभाव, अंगस्वभाव**–पु. जन्मतः असलेले गुणधर्म–स्वभाव; स्वाभाविक प्रवृत्ति.

**उपजनिपज**—स्त्री. १ जन्म आणि वाढ; उदय आणि प्रगति (व्यक्तीसंबंधीं). २ आरंभ आणि शेवट; उत्पत्ति आणि लय (एखाद्या गोष्टीचा). ३ (संगीत) एक तानेचा प्रकार. [उपज+निपज]

**उपजविणें**—सक्रि. उत्पन्न करणें; जन्म देणें. 'उपजविलां कवणा काजा ।' –उषा ३०. 'वीर्यदानें उपजविता । अन्नदानें प्रतिपाळिता । संकटीं प्राणरक्षिता । तिघे पिते बोलिजेती ।' –मुआदि १५.१५४. [उपज प्रयोजक]

**उपजा**—उबजा पहा.

**उपजाऊ**—वि. सुपीक; पिकाऊ. [उपज]

**उपजाति**—स्त्री. एक वृत्त. हें इंद्रवज्रा व उपेंद्रवज्रा या दोन वृत्तांच्या मिश्रणानें झालेलें आहे. याच्या प्रत्येक चरणांत अकरा अक्षरें असून यति पादांतीं असतो. उ० 'हा बाण गेला वरती मण्याला । धरून पृथ्वीवर आणण्याला ।' [सं. उप+जाति]

**उपजाति**—स्त्री. पोटजाति; उपवर्ग; पोटवर्ग. [सं.]

**उपजापक**—वि. चुगल्या करणारा; मागें निंदा करणारा; लावालावी करणारा. [सं. उप+जल्प्]

**उपजारीस येणें**—भरास येणें. –शिल्प. वि.६८१. (नमको.)

**उपजीवक-जीवी**—वि. १ (एखाद्यावर) उपजीविका करणारा; पोट भरणारा; अवलंबून असणारा. उ०कृष्योपजीवी; विद्योपजीवी. 'आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें । दृष्टादृष्ट विजयें । होआवें जी ।' –ज्ञा १८.१८००. २ निर्वाहाचें साधन असलेलें. 'ते दैवी सुखसंभवी । तेथ दैवां गुणां येकोपजीवी ॥' –ज्ञा १६. ६७. [सं. उप+जीव्]

**उपजीवन, उपजीविका**—नस्त्री. १ निर्वाह; पोषण; उदरनिर्वाह. २ जगण्याचें साधन; पोट भरण्याचा उपाय (अन्न, भक्ष्य). ३ आश्रय; आधार; रक्षण, पालन; धारण (शरीराचें). ४ रक्षणाचें साधन (शक्ति, अन्न इ०) [सं. उप+जीव्]

**उपजीव्य**—न. निर्वाहाचें साधन; आश्रय; पोषक द्रव्य; जीवन; जीवाचा आधार. [सं.] ०**विरोध**–पु १ आश्रयदात्याशीं विरोध; पालनकर्त्याशी वैर. २ उपजीविकेचें साधन सुटणें.

**उपट**—स्त्री. १ अन्नाची रेलचेल; समृद्धि. २ वीट; शिसारी; आकंठतृप्ति. (क्रि० घेणें). ३ पुनरुत्थान; उठाव; वर डोकें काढणें 'उपट खाली पतीच्या दैवानें ॥' –मसाप १ १.२. ४ दोन्ही हातांत धरलेल्या सोटयाचा मार; आघात; हल्ला. (क्रि० खाणें). (क्रि० घालणें) 'तों वजिराचें सामान थोडकें, त्यास यांची उपट सोसेनाशी जाली ॥' –भाव ४९. ५ उसळी, उशी (चेंडूची). [सं. उत्+पत्; प्रा. उप्पड] ०**खाणें**–१ उलटणें (रोग इ०); जोरावणें; उलटून पुन्हां हल्ला करणें (शत्रूनें). २ चेंडू पुन्हां उडणें, उशी घेणें. ०**घेणें-जेवणें**–ओ येइतों खाणें; आधाशीपणें खाणें.

**उपटखुंटा**—पु. उपटजात्याचा खुंटा.

**उपटजातें**—न. कोठेंहि हालवितां-नेतां येण्यासारखें जातें; जमीनींत कायम न पुरलेलें जातें.

**उपटणी**—स्त्री. उपटणें; वेचणें; वर काढणें (शेत, तृण, केश इ०) [उपटणें]

**उपटणें**—सक्रि. १ उपटून काढणें; मूळासकट वर काढणें. 'रंगूनें ती खुंटी सकाळीं उपटली.' २ (एखाद्यापासून द्रव्य वगैरे) कपटानें, युक्तीनें काढणें; लाटणें; लुबाडणें. 'माझी खुशामत करून तुला पैसा उपटणें असेल' –विवि ८.२.४०. ३ हिसकून घेणें; लांबविणें; चोरणें; न कळत घेणें; पळविणें. 'उंटावरील हमिणी या भामटयानें उपटली तर नसेल?' ४ आपटून मारणें. 'जें पांखिरू एकु चांचुवाडा । धरौनि उपटिलें ॥' –शिशु ८६७. [सं. उत्+पत्–पात, उत्पाटन] –अक्रि. १ (खिळा खुंटी झाड वगैरे भिंतींतून) बाहेर येणें; वर येणें. २ प्रगट होणें; उजेडांत येणें; दिसूं लागणें; (अंमल) सुरू होणें. 'अरे बापरे! घातवार, व्यतिपात, संक्रांत, किंक्रांत, मरीआई, बारावा बृहस्पति, साडेसाती सारीं एकदम उपटलीं।' –भावं८९. ३ उत्पन्न होणें; प्रादुर्भाव होणें (एखादी सांथ वगैरेचा); पुनः उद्भवणें (रोग). 'त्याला कालपासून मूळव्याध उपटली आहे' ४ उडणें; आपटून वर येणें. 'आपणचि चेंडु सुटे । मग आपणयां उपटे ॥' –अमृ ९.५७. ५ एखाद्यावर तुटून पडणें, रागावणें. 'रथें रथूं दाटी । गजें गजां उपटी ।' –शिशु ८८१. 'अन्याय केला कोणी आणि मजवर कां उगीच उपटतोस?'. [सं. उत्+पत्]

**उपटसरी-ळी-सुरी-ळी**—स्त्री. (कों.) एक वेल; उपळसरी; अनंतमूळ; श्यामा.

**उपटसुंभ-भा-बा-ब्या**—वि. १ उडाणटप्पू; कामधंदा नसलेला. २ तात्पुरता; उपरि. ३ हक्क नसतां अधिकाराच्या जागेवर आलेला; तोतया. 'नुकतेच परलोकवासी झालेले सातारचे जंगली महाराज यांना सरकार ५०० रुपये माहेवारी पेन्शन देत होते. तेव्हां तर ते उपटसुंभ नव्हते ना?' –केसरी. ४ (उप.) अविवाहित; ब्रह्मचारी. [उपट+सुंभ=शंभु अप.]

**उपटसूळ**—वि. १ आकस्मिक; क्रम सोडून असा. 'मध्येंच उपटसुळासारखें कांहीं निर्माण झालेलें नाहीं.' –गीर १६८. २ विघातक; मध्येंच लुडबुड करणारा, भांडखोर; उडाणटप्पू. ढवळाढवळ करणारा. ३ उपटसुंभ; अलबत्यागलबत्या. 'मरतेवेळीं एखाद्या उपटसुळास विनाकारण आपली दौलतहि त्यास देतां येणार नाहीं.' –टि ४.२७. ०**खांद्यावर घेणें**–मूर्खपणानें भानगडी, त्रास, लचांडें पाठीमागें लावून घेणें; नसतें झेंगट मागें लावून घेणें. **म्ह**० उपटसूळ (की) घे खांद्यावर=नसतें लचांड मागें लावून घेणें. [उपटणें+सूळ]

**उपटा, उपाटा**—पु १ उचल; दुसऱ्यास फसवून पैसे उपटणें; लबाडीनें कर्ज उभारणें; ठकबाजी करून पैसा काढणें. (क्रि० मारणें). २ लुबाडणें; लांबविणें; उचलेगिरी करणें; पळविणें. (क्रि० देणें). [उपट]

**उपटाउपट-टी**—स्त्री. १ युक्तीनें, जबरीनें अथवा फसवेगिरीनें द्रव्यादि काढणें; उपटण्याचा व्यापार. [उपट द्वि.]

**उपटी**—स्त्री. प्रहार; घाव. 'कोपें इंद्रु आला हातुपीटीं । तो खांडेयाचा उपटीं ।' –शिशु ४५२. [उपटणें]

**उपटींव**—वि. उपटून काढलेलें (तोडून किंवा कापून न काढतां काढलेलें पीक, केस वगैरे). उन्मळून पडलेलें; उपटलेलें (झाड).

**उपटून खांद्यावर घेणें**—उपटसूळ पहा.

**उपटट**—क्रिवि. (गों.) कांठापर्यंत भरलेला.

**उपटया**—वि. फसव्या; खिसेकापू; उचल्या; भामटा; अट्टल सोदा. [उपटणें]

**उपडणें**—सक्रि. उपटणें पहा. १ उपटणें. 'आरेरे टाकौनि घोडा । भणती याचिआं जटे उपडा ।' –शिशु १४१. 'रोंवोनि उपडितां दाभणा ।' –मुआदि १३.१६. २ आपटून मारणें. 'मग उपडिला खडकीं । हंसु जैसा ।' –ज्ञा १८.७९८ –अक्रि. बाहेर,

वर येणें; उन्मळून पडणें; मुळासकट उपटून पडणें. ' उत्तम अधर्मी संचरती । ऐसे वर्णावर्ण मिसळती । तेथ समूळ उपडती । जातिधर्म ।' –ज्ञा १.२५०. [ सं. उत्+पत्; प्रा. उप्पड ]

**उपडथवी**—स्त्री. भोंवरा; लाटा एकमेकांवर उलथून पडणें; खळबळ. ' कीं बुडतां भवार्णवीं । वरि एतां उपडथवी । तेवींचि काकुळती दावी । कृपावंतापुढें ॥' –ऋ १०१. ' संसाराचे या डोहांत उपडथवी असे ... ... ।' –भा १०४. [ सं. उत्+पत्+स्था; उपडणें+ठाव ]

**उपडहंडी-हांडी**—स्त्री. १ ( ना. ) पाणी गार करण्याकरितां फडकें बांधून उलटें टांगलेलें भांडें. २ उकडहंडी पहा. [ उपडी+हंडी ]

**उपडा-डी**—वि. तोंड खालीं केलेला; पालथा; अधोमुख; उताणा याच्या उलट; (गो. कु.) उपडी. म्ह० उपड्या घागरीवर पाणी व बहिऱ्याजवळ कहाणी (व्यर्थ). [ सं. उत्पाटित–उप्पाडिअ; प्रा. उप्पाड=उपड=उपडा. ]

**उपडा तांब्या**—पु. पालथा तांब्या; स्त्री रजस्वला, विटाळशी असल्याचें द्योतक.

**उपडी मांडी**—स्त्री. लिहिण्याकरितां मांडी दुमडून घातलेली बैठक.

**उपडु**—न. जागरण. –शर.

**उपंढर**—वि. १ पांढरा; फिका. ' तौहि उपंढरु ऐसा । मज वाटतुसे ॥' –ऋ ८६. २ उघडें. ' झांकिलें तरि उपंढर पडे । दुर्गंधी सुटे जिकडेतिकडे ॥' –दा १५.९.३९. –पु. १ दंभ; ढोंग. ' ना ते आनुरागेवीण । उपंढर श्रीचरणध्यान ।' –ज्ञाप्र ४११. २ दंभस्फोट; ढोंगाची उघडकी. ' लोकांपासीं भावार्थ कैचा । आपण जगवावा तयाचा । सेवट उपंढर कोणाचा । पडोंचि नये ॥' –दा १९.८.२३. [ सं. उद् + पंडुर = पांढरा ]

**उपणणी**—स्त्री. धान्यांतील भुसा, टरफलें काढण्याकरितां धान्य वारवणें; वाऱ्यानें उडविणें; वरून खालीं ओतणें. [ सं. उद्+पवन ]

**उपणणें**—उक्रि. १ टरफल, धाण वगैरे काढण्यासाठीं धान्य वारवणें (सुपानें पाखडणें, उभळणें; झडपणें किंवा फटकणें नव्हे ). ' कीं भूस बीज एकवट । उपणितां राहे घनवट ॥' –ज्ञा २.१३०. ' भूस उपणुनि केलें काय । हारपले दोन्ही ठाय ॥' –तुगा २९२४. ' आज सर्व धान्य उपणलें पाहिजे. ' २ क्षुद्र, तुच्छ लेखणें; कस्पटाप्रमाणें मानणें. ३ विवरण; फोड करून सांगणें. ' हे कथा उपणितां तुज नारे । जाण कीं अखमसेतुजनारे ॥ ' –वामनविराट ६.८५. [ सं. उत्+पू–पवन; प्रा. उप्पणण=वरून वारा देणें; सिं. उपिणणु; गु. उपिणवुं ]

**उपणणें**—अक्रि. उत्पन्न होणें. ' निगालेआं चैतन्यनाथां । अंतौरां उपणलीं अवस्था ।' –शिशु ७४३. [सं. उत्पन्न; प्रा. उप्पण्ण]

**उपणवटी-पाटी-वाटी**—स्त्री. उथळ बुरडी, पाटी ( धान्य उपणण्याकरितां घेतात ती ). [ उपणणें+पाटी ]

**उपणा**—पु. १ वातविकारानें हातापायांस विकृति झाली असतां शेकण्याकरतां वाफवलेला निरगुडी वगैरे वनस्पतींचा पाला; नारळाचा कीस वगैरेचा पेंड. ( क्रि० शिजवणें; करणें; लावणें; बांधणें). २ बरोबर न शिजलेला भात (हेटाळणीकरितां वापरतात). ' भाताचा उपणा वाढला.' [ सं. उत्+पू; प्रा. उप्पण; किंवा सं. उत्+पर्ण; प्रा. उप्पण्ण ? ]

**उपणी, उंपणी**—स्त्री. पेरणी. [ सं. वप् ]

**उपणें, उंपणें**—उक्रि. पेरणें; पेरणी करणें. [ सं. वपन ]

**उपणें**—न. वारवलेलें, उपणलेलें धान्य. [ उपणणें ]

**उपतप्त**—वि. तापलेला; तापविलेला. [ सं. उप+तप् ]

**उपतरणें**—( प्र. ) उबतरणें पहा.

**उपताप**—पु त्रास; दगदग; काळजी; जिकीर. [सं. उप+ताप]

**उपतिष्ठणें**—अक्रि. १ मनांत बिंबणें; परिणामकारक होणें; वजन पडणें ( उपदेशाचें ); संस्कार होणें. २ उपस्थित होणें; समोर येणें; हजर असणें; प्रकट होणें. ' इंद्रादि देवता घरीं पुरवती वस्तुजात ॥ उपतिष्ठति न चिंततां ऋद्धिसिद्ध ॥ ' ३ उभें राहणें (पापइ०). प्राप्त, साध्य होणें; फलास येणें; सत्कृत्याचें अथवा दुष्कृत्याचें फल प्राप्त होणें. ' तुका म्हणे साधन सुलभ गोमटें । परि उपतिष्ठे पूर्वे पुण्यें ॥ ' –तुगा २२७७. [ सं. उप+स्था–तिष्ठ् ]

**उपतिष्ठित**—वि. मनांत भरलेला; बिंबलेला; ठसलेला; रुचलेला; मनावर परिणाम झालेला ( उपदेश, बोलणें, शिक्षा ). [ सं.]

**उपदंश**—पु. गर्मीचा विकार; एक गुह्येंद्रियाचा रोग. [ सं. उप+दश् ] –**शी**–वि. ज्यास उपदंश झाला आहे तो.

**उपदानें**—न.अव. आमान्न; उदकुंभ; वस्त्र; छत्र; उपानह; कमंडलु; यष्टि; लोहदंड; दीप; तांबूल; चंदन; माला; तिल; सिद्धस्थाली; ऊर्णावस्त्र; व्यजन; धेनु हीं उपदानें और्ध्वदेहिक कर्मांत द्यावयाचीं असतात. [ सं. ]

**उपदिशा**—स्त्री. पोटदिशा; मुख्य चार, आठ किंवा दहा दिशा धरून शिवाय राहिलेल्या इतर दिशा; अवांतर दिशा. [ सं. ]

**उपदिष्ट**—वि. १ शिकविलेलें; सांगितलेलें; उपदेशिलेलें ( कर्म, मंत्र इ० ). २ ज्यास उपदेश दिला आहे किंवा शिकविलें आहे तो ( शिष्य इ० ). –न. शिकविलेलें ज्ञान; उपदेश दिलेला मंत्र. [ सं. ]

**उपदेव**—पु. मुख्य देवतांहून ज्या इतर गंधर्व, विद्याधर, अप्सरा इत्याहि देवता त्या; किरकोळ, गौण देवता. [ सं. ]

**उपदेश**—पु. १ शिक्षण; ज्ञान; शिकवण; पाठ; बोध. २ सल्ला; मसलत; युक्ति; सूचना; निर्देश. ३ गुरुमंत्र; मंत्रदान. सामाशब्द– मंत्रोपदेश; हितोपदेश; गुरूपदेश इ०. [ सं. उप+दिश्=दाखविणें ]

**उपदेशक, उपदेष्टा**—वि. उपदेश करणारा; शिकविणारा; मंत्र देणारा, सांगणारा; सल्लामसलत देणारा (शिक्षक, गुरु, मित्र). २ (ख्रि.) प्रीचर या इंग्रजी शब्दाचा पर्याय; ख्रिस्ती धर्माचा उपदेश करणारा; (स्त्री.) उपदेशिका. 'त्यांना दिसून आलें कीं हा परदेशीय उपदेशक जें सांगतो तें आपल्या पवित्र ग्रंथामध्यें सांपडतें.' –ज्ञानोदय ७.५.१९१८; २१.२.१९१८. [स. उप+दिश्]

**उपदेशणें**—उक्रि. १ ज्ञान, मंत्र, शिकविणें, सांगणें. 'मज निजज्ञान सर्वेशा। कृपा करुनि उपदेशी॥' 'जेणें उपदेशिला रघुनाथ। तो बृहद्वासिष्ठ श्रेष्ठ ग्रंथ।' –ह ११००. २ (सामा.) माहिती, ओळख करून देणें; पढविणें. 'केवळ जें वेदांत ज्ञान। रामासि उपदेशिला ब्रह्मानंदन।' ३ सल्लामसलत देणें; सूचना; कानउघडणी करणें. [उपदेश]

**उपदेशी**—वि. १ शिकविलेला; पढविलेला. २ सल्ला दिलेला; हिताहित सांगितलेला. ३ मंत्र सांगितलेला; उपदेश घेतलेला. 'संतसंग करितां म्हणती हा उपदेशी! येरा अभाग्यासी ज्ञान नाहीं॥' –तुगा ३३४९. [उपदेश]

**उपद्रव**—पु. १ पीडा; त्रास; दुःख; जाच; छळ. 'त्रिविध मुख्य आघवे। उपद्रवांचे मेळावे।' –ज्ञा १३.३४३. २ बाधा (पिशाच्चादिक); संचार. 'या औषधानें जेव्हां गुण पडत नाहीं तेव्हां हा अंगरोग नव्हे, कांहीं उपद्रव आहे.' ३ (कायदा) अपकार; नुकसान; घाण; अडथळा (इं.) नुइसन्स. ४ रोग; शारीरदोष. [सं. उप+द्रु]

**उपद्रवी-क**—वि. १ पिशाच्चबाधेसंबंधीं (पीडा, रोग). २ रोगकारक (अन्न); अपथ्य; शरीरांत बिघाड करणारें; न पचणारें. ३ त्रासदायक; पीडाकारक; कंटाळवाणा. ४ अनर्थकारक; भयोत्पादक; संकटें उत्पन्न करणारी (सत्ता, व्यवस्था, राज्यपद्धति, कारभार). ५ (उपद्रवी) ज्याला पिशाच्चबाधा झाली आहे असा.

**उपद्रवी जीव**—पु. उपद्रव देणारा, त्रासदायक प्राणी (ढेकूण, पिसा, वगैरे)

**उपद्रष्टा**—पु. १ यज्ञादि कर्मामध्यें न्यूनाधिक कांहीं कर्म होईल तें पाहून जेथील तेथें यथास्थित करवावें म्हणून एक ऋत्विज असतो तो; यज्ञांत व्यवस्था पाहणारा ऋत्विज. २ (सामा.) व्यवस्थापक; चौकसनीस. [सं. उप+दृश्=पाहणें]

**उपद्रुत**—वि. उपद्रव पावलेला. [सं.]

**उपद्वीप**—न. १ द्वीपकल्प; बेटासारखा भाग २ लहान बेट. ३ सप्तद्वीपांविरहित जीं द्वीपें सांगितलीं आहेत तीं. अष्टोपद्वीप पहा. [सं.]

**उपद्व्याप**—पु. १ अतिशय त्रास, कष्ट; परिश्रमपूर्वक प्रयत्न; खटपट; रक्ताचें पाणी करणें. 'सरकारदरबार, पंचाइती इतका जेव्हां उपद्व्याप केला तेव्हां त्याजकडील रुपये उगविले.' २ पीडा; जिकीर; त्रास; छळ. (क्रि० देणें). ३ व्याप; खटाटोप; पसारा; सिद्धता; तयारी (धंदा, समारंभ, कारभार इ०ची). ४ रिकामा उद्योग; उलाढाल; उचापत. [सं. उप+उद्+व्याप]

**उपद्व्यापी**—वि. १ मेहनती; कष्टाळू; अतिशय काम करणारा; फार खटपटी. २ भ्रात्य; खोडकर; त्रासदायकः उचापत्या; भानगड्या (मूल, माणूस).

**उपधातु**—पु. १ तांबें, सोनें, रुपें इत्यादि मुख्य सात धातूंखेरीज इतर धातु–स्वर्णमाक्षिक; तारमाक्षिक; मोरचूत; कासें; पितळ; शेंदूर; शिलाजित. २ अश्मीभूत, प्रस्तरीभूत पदार्थ; खनिज द्रव्य. ३ शरीरांतील मुख्य धातूशिवाय बाहेर पडणारे सात धातू–दूध, रज, वसा, घाम, दांत, केश, ओजस्. [सं. उप+धातु]

**उपधान**—न. १ अर्पण करणें; देणें; पोंचविणें; नेणें (गुणधर्म स्वभाव इ.) 'साधुसमागम अंतःकरणांत विनयाचें उपधान करितो.' २ (सामा.) उपाधि, सान्निध्य यायोगें एका व्यक्तीचे गुणधर्म दुसऱ्या व्यक्तीस प्राप्त होणें; गुणधर्मांची देवघेव; एखाद्याचे स्वभावगुणधर्म यांची छाया दुसऱ्यावर पडणें; गुणपरावर्तन. [सं. उप=जवळ; धा=ठेवणें]

**उपधानासन**—न. एक पाय लांब करून दुसरा पाय उशीसारखा मानेखालीं घालून निजणें. –संयोग ३४७. [सं. उपधान=उशी+आसन]

**उपधान्य**—न. किरकोळ व कमी महत्वाचें धान्य; गौणधान्य. अठरा उपधान्यें पहा.

**उपधायक**—वि. देणारा; उपधान करणारा; पोंचविणारा. उ० गुणोपधायक; फलोपधायक; हितोपधायक. [सं.]

**उपध्मानीय**—पु. अर्धविसर्गपूर्वक पकार आणि फकार; प आणि फ यापूर्वी येणारा विसर्ग. [सं. उप+ध्मा]

**उपध्वनि**—पु. प्रतिध्वनि; मुख्य आवाजामागून निघणारा बारीक आवाज; प्रतिशब्द; पडसाद. [सं. उप+ध्वनि]

**उपनगर**—न. शहरालगतची वसाहत; शहराच्या आसपासचा भाग. (इं.) सबर्ब. उ० मुंबई उपनगर (व्हिलेपार्लें, अंधेरी इ० भाग). [सं. उप+नगर]

**उपनणें**—अक्रि. उपणणें पहा. १ उपजणें; जन्मास येणें; उत्पन्न होणें. 'तंव कृपा उपनली जगन्नाथा। तें परिएसा पां।'–ऋ ३६. 'तो आतां दमघोषाचां घरीं। उपनलासें।'–शिशु १६३. 'वायांचि धिंवसा उपनला चित्ता।' –ज्ञा १.६७. २ झडप घालणें, पडणें. 'जेयांवरी दृष्टी उपनली। चैतन्यनाथाची।'–शिशु ५८३. [सं. उद्+पद्; उत्पन्न; प्रा. उप्पण]

**उपनणें**—सक्रि. (कृषि.) वारवणें. उपणणें पहा.

**उपनयन**—न (गुरू) जवळ नेणें; व्रतबंध; प्रथम यज्ञोपवीत धारण करण्याचा विधि; मौंजीबंधन; जानवें घालणें; मुंज; त्रैवर्णिकांस

आठव्यावर्षी वेदाधिकारास योग्य करण्यासाठीं हा संस्कार करतात; सोळा संस्कारांपैकीं एक. 'या उपरी उपनयन। गुरुद्वारां गायत्री-ग्रहण।' -एभा १७.२७१. [सं. उप=जवळ+नी=नेणें]

**उपनाम-नांव**—न. कुळाचें नांव; आडनांव; टोपणनाव; गोत्रनाम. [सं.]

**उपनामक**—वि. उपनांवाचा; टोपणनांवाचा; आडनांवाचा. उ० 'वैशंपायनोपनामक; पंडितोपनामक; एतदुपनामक. [सं.]

**उपनांवाचा**—अडनांवाचा पहा.

**उपनाह**—न. १ पोटीस. -योर २.८१. २ मलम; औषध; [सं.]

**उपनिधि**—पु. ठेव; दुसऱ्याजवळ विश्वासानें ठेविलेली वस्तु, संपत्ति; अनामत वस्तु. [सं. उप+निधि]

**उपनिषद्**—न. १ गुरुचरणाजवळ बसून मिळविलेलें ज्ञान; गूढज्ञान. २ वेदांच्या ब्राह्मण ग्रंथांना जोडून असणारा वेदांतपर भाग; वेदसारांश असणारा ग्रंथ; वेदज्ञानकाण्डात्मक भाग. एकंदर १०८ उपनिषदें मानितात. पैकीं पुढील दहा उपनिषदें मुख्य आहेत. -ईश, केन, कठ, प्रश्न, मुंड, मांडुक्य, तित्तिर, ऐतरेय, छांदोग्य व बृहदारण्यक. 'अतिगुह्य ज्ञान परात्पर। जें उपनिषदांचें भांडार।' -एभा १३.७१२. 'कुंडलें जाहलीं कृष्णश्रवणीं। तीं उपनिषदार्थ किरणीं। झळकताती सतेज।' -एरुस्व १.५२. [सं. उप+नि+सद्=जवळ बसणें]

**उपनीत**—वि. व्रतबंध, मुंज झालेला; वेदाधिकारी. [सं.]

**उपनेत्र**—पु. चष्मा; दृष्टिदोष दूर करण्यासाठीं कांच किंवा गार यांचा उपयोग करून हा तयार करतात; चाळिशी; डोळ्याची आरशी. 'जें न देखती नेत्र। तें देखती उपनेत्र।' -यथा ४.३३२. 'होय भला इष्टार्थग्रह उपनेत्रेंचि कीं भला बुबळें।' -मोउद्योग ३.१३. [सं.]

**उपन्यसनीय**—वि. प्रतिपाद्य; पुढें मांडावयाचा; विचार करावयाचा (विषय, मुद्दा वगैरे). [सं. उप+न्यस्]

**उपन्यस्त**—वि. १ पुढें मांडलेला; दाखविलेला; उघड केलेला; प्रतिपाद्य. २ जवळ ठेवलेला. [सं.]

**उपन्यास**—पु. १ वस्तु, मुद्दा व्यवस्थित रीतीनें पुढें ठेवणें, मांडणें; विशद करणें; प्रतिपादन; स्पष्टीकरण; समोरासमोर ठेवणें, मांडणें. २ प्रस्तावना करणें; विषयप्रवेश करणें; आरंभ; सुरुवात; उपक्रम. 'या वादाचा आज येथें उपन्यास करण्याचें कारण इतकेंच कीं ... ...' -टि ४.८३. ३ सान्निध्य; निकटता; जवळ असणें. [सं.]

**उपपति**—पु. यार; जार; धगड; सग्या; राखा; पतीखेरीज दुसरा उपभोक्ता; व्यभिचारिणीशीं संबंध असलेला पुरुष. [सं. उप+पति]

**उपपत्ति**—स्त्री १ पुरावा; कार्यकारणभाव; संबंध; विषयसिद्धता; सिद्धतेचीं प्रमाणें; युक्तिवाद. 'अंगाचिया अनुपपत्ति। आटलिया उपपत्ति।' -अमृ ५.५५. 'हे केली विवंचना। उपपत्तींसीं।' -ज्ञा १८.६२७. २ सिद्धांत; तत्त्वांचें प्रतिपादन; विशदीकरण; मीमांसा; विवेचन; शिस्तवार मांडणी; योग्य समजूत. 'शिस्तवार जी मांडणी करितात तिला उपपत्ति किंवा उपपादन असें म्हणतात.' -गीर २३. ३ सिद्ध करून दाखविलेली गोष्ट; सप्रमाण, सयुक्तिक सिद्धि. 'सुईचे वेजांतून हत्ती पार गेला म्हणतां हें घडेल कसें याची उपपत्ति करून द्या.' ४ (गणित) उदाहरण सोडविण्याच्या रीतीचें स्पष्टीकरण. ५ (भूमिति). प्रमेयसिद्धता. ६ साधनें; सामग्री; साहित्य (निर्वाह, कारभार इ० चें) ७ युक्ति; कल्पना. 'उपपत्ती शार्ङ्गी। दाविता जाहला।' -ज्ञा ११.७०४. 'तेही अर्थीची उपपत्ती। ऐक निश्चिती शुक सांगे।' -एभा २.१२५ (इं.) थिअरी-पकोघे (टीका-कोल्हटकरकृत) ६१. [सं. उप+पद्] ०येणें-पटणें; मान्य होणें प्रतीति; अनुभव. 'मज नये हे उपपत्ति। याचिलागीं।' -ज्ञा २.४९.

**उपपत्नी**—स्त्री. राख; अंगवस्त्र; पत्नीखेरीज दुसरी उपभोग्य स्त्री. [सं उप+पत्नी]

**उपपद**—न. १ गौणपद (सामासिक शब्दांतील). उपपद-समास व उपशब्द पहा. २ कोणत्याहि विद्येमध्यें किंवा कलेमध्यें प्रावीण्यदर्शक संज्ञा. बी. ए. एम्. ए. काव्यतीर्थ, पुराणरत्न इ० ३ पदवी; बिरुद; बहुमानदर्शक किंवा पराक्रम, विशेष कृत्यदर्शक उपनाम, टोपण नांव. विक्रमादित्य; आहवमल्ल; इ० 'विलियम जो विजयी या उपपदानें प्रसिद्ध आहे ...' -नि ५५२. ४ इंग्रजींत नामापाठीमागें लागणारें पद. उ० ए, ॲन, दि. (इं) आर्टिकल. ०तत्पुरुष-पु. १ जेव्हां तत्पुरुषसमासांतील दुसरें पद धातुसाधित असतें तेव्हां त्यास उपपदतत्पुरुष म्हणतात. उ० कुंभकार, ग्रंथकार, गृहस्थ इ० ०धारी-वि. पदवीधर; ग्रॅज्युएट. 'सदरहू कालेजांत चालू असणारा शिक्षणक्रम किंवा त्यांतून तयार झालेले उपपदधारी लोक यांपैकीं कोणीहि अद्याप आपल्या गुणांनीं विशेष लोकमान्य झालेले आमच्या ऐकिवांत नाहीं.' -टि २.२३३. ०समास-पु. शब्दाची द्विरावृत्ति करून किंवा कांहीं एक साहाय्यक शब्द घेऊन जो समास बनवितात तो. उ० दगडधोंडे; भाकरी तुकडा; पुस्तकबिस्तक, उपशब्द पहा.

**उपपद्मक(हस्त)**—पु. (नृत्य) आंगठ्यासह सर्व बोटें पद्मकोशापेक्षां जास्त विरळ व जास्त वांकडीं करणें. [सं.]

**उपपन्न**—वि. १ सिध्द केलेलें; स्पष्ट केलेलें; ज्याची उपपत्ति आहे असें. २ साधनांनीं युक्त; समृध्द; संपन्न; श्रीमंत; सधन. [सं.]

**उपपातक**—न. दुय्यम, तिय्यम प्रतीचें पातक; गोवध, कन्याविक्रय, नास्तिक्य इत्यादि पापें; हीं एकंदर ४९ आहेत. महत्पातक पहा. [सं.]

**उपपात्र**—न. पाणी पिण्याचें लहान भांडें; पंचपात्री; फुल पात्र, पेला इ० [सं.]

**उपपादक**—वि. सांगणारा; दाखविणारा; सिध्द करणारा; उघड करून देणारा; स्पष्ट दर्शविणारा. [सं.]

**उपपादणें**—उक्रि. १ उल्लेखिणें; मांडणें; विवरण करून सांगणें; स्पष्ट करणें; विवेचन करणें; शिकविणें. 'भक्ति ज्ञान विरक्ति। जियें शास्त्रें उपपादति। तिथें बोलावि महति। यथार्थवादें ॥' २ सिध्द करणें; स्थापित करणें. [सं. उप+पद्=जाणें, उपपादन]

**उपपादन**—न. १ मांडणी; उल्लेख; विवेचन; प्रतिपादन; उपपत्ति. 'शिस्तवार जी मांडणी करितात तिला उपपत्ति किंवा उपपादन म्हणतात.' –गीर २३. २ सप्रमाणसिध्दता; स्थापना. [सं.]

**उपपादित**—वि. १ उपपादिलेलें; सांगितलेलें; विवेचन केलेलें; स्पष्टीकरण केलेलें. २ सिद्ध केलेलें. [सं.]

**उपपाद्य**—वि. सांगावयाचा; मांडावयाचा; स्पष्ट करावयाचा; विवेचन करावयाचा (विषय, मुद्दा). [सं.]

**उपपुराण**—न मुख्य अठरा पुराणांशिवाय इतर जीं गौण पुराणें त्यांपैकीं प्रत्येक. लघुकालिका, बृहत्कालिका, पराशर, सिंह, नारद, सनत्कुमार, सौर, दुर्वास, कपिल, मानव, विष्णुधर्मोत्तर, शैवधर्म, माहेश्वर, नंदी, कुमार, औशनस, देवी, वरुण. याहून वेगळयाहि कांहीं याद्या सांपडतात. अठरा उपपुराणें पहा.

**उपपुर**—न. उपनगर; शहराबाहेरची लहान वस्ती. 'भवतिं उपपुरें। गुढया गोपुरें।' –आसु १३. [सं. उप+पुर]

**उपप्राण**—पु. शरीरांतील पंचप्राणांहून भिन्न असे दुय्यम प्रतीचे जे वायू त्यापैकीं प्रत्येक. हे पांच आहेत–नाग, कूर्म, कृकल, धनंजय, देवदत्त. 'प्राणचि जाहले उपप्राण।' –अपरोक्षानुभव ४६. [सं.]

**उपप्लव**—पु. १ हाणामार; लुटालूट; जाळपोळ (शत्रु, लुटारू वगैरेकडून होणारा). २ जुलूम; जबरदस्ती; अन्याय (जुलमी राजा, निर्दय माणूस यांजकडून). ३ (सामा.) पीडा, उपद्रव, त्रास. [सं.]

**उपबर्व्हे**—स्त्री. (प्र.) उपबर्ह; उशी. 'बाहू हे उपबर्व्हे काय करणें ऊंशा अम्हां सद्गुणा ॥' –निमा–सुभद्राचंपु ४.२०. [सं. उपबर्ह=उशी]

**उपबाधक**—वि. पीडाकारक. 'याचि कारणें उपबाधका। होती तुज अनेका ॥' –गुच ३.२०. [सं. उप+बाध्]

**उपबाधा**—स्त्री. पीडा; दुःख.

**उपभुक्त**—वि. १ उपभोग घेतलेलें; वापरलेलें; आस्वाद घेतलेलें. २ अनुभवलेलें; मनांत उमजलेलें; स्वतःस माहीत असलेलें. [सं. उप+भुज्]

**उपभोक्ता**—वि. १ उपभोग घेणारा; वापरणारा; मालकी हक्क गाजविणारा; २ अनुभव घेणारा; स्वतःच्या अनुभवानें जाणणारा. [सं.]

**उपभोग**—पु. १ आस्वाद; विलास; सुख भोगण्याची क्रिया; उपयोग; भोग; भोगवटा. २ अनुभव; स्वतः अनुभवानें मिळविलेलें ज्ञान (सुखदुःखाचें). ३ रतिसुख; संभोग. ४ (अर्थशास्त्र) मालाचा खप, उठाव. 'उत्पादन व उपभोग यांमध्यें मोठी खिड पाडतां कामा नये.' –ज्ञाको (उ.) १९. [सं. उपभुज्]

**उपभोगणें**—उक्रि. १ आस्वाद घेणें; वापरणें; उपयोग करणें; उपभोग घेणें. २ अनुभव घेणें; पडताळून पहाणें; अनुभविणें. ३ रतिसुख घेणें; संग करणें; संभोगणें. [उपभोग]

**उपभोगी**—वि. उपभोग घेतलेलें; आस्वाद घेतलेलें; अनुभवलेलें.

**उपभोग्य**—वि. १ उपभोगावयाचें; वापरावयाचें; उपभोग करावयाचे. २ अनुभव घ्यावयाचे; उपभोगास योग्य असे. [सं.]

**उपम**—न. उपमा पहा. 'तयाचें उपम दिल्हें त्यानें ॥' –रामदासी ८३. [सं. उपमा]

**उपमणें-मिणें**—सक्रि. उपमा देणें; तुलना करणें; सारखेपणा दाखविणें. 'अगा तुझेनि दैवें। कवणासि उपमावें ॥' –विपू ७.१०४. 'तेसें ज्ञान हें उपमिजे। ज्ञानेंसींचि ॥' –ज्ञा ४.१८३. 'त्यासीं उच्चैःश्रव उपमणें ॥' –वेसीस्व ८.११२. –अक्रि. सारखें असणें, दिसणें; जुळणें; बरोबरी करणें. [सं. उप+मा=मोजणें]

**उपमणें–मिणें**—क्रि. उडणें; अंतरिक्षांत वर जाणें. 'तेथें होमधूम्र प्रगटला। तो गगनमार्गेसीं उपमला ॥ जैसा जणउ (जाणो) निघाला। महादेवासी ॥' 'अंतरिक्षीं वीज लवे तैशी गगनीं उपमिलीं ॥' –वसा २४. 'इतकें बोलुनि नारद तत्क्षणीं गगनीं उपमला ॥' –वसा ४३. [सं. उत्+पत्; प्रा उप्पय]

**उपमर्द-न**—पु.न. १ अंग चोळणें, रगडणें, दाबणें. २ तुडविणें; पिळणें; त्रास देणें; पीडा करणें; जुलूम करणें. ३ मानखंडना; अपमान; इज्जत घेणें. ४ (व्यापक.) आडदांड, बेमुर्वत कृत्य; अविचारी आचरण. [सं. उप+मृद्]

**उपमर्दणें**—अक्रि. नाश पावणें. 'तैसा माझेनि प्रसादें। जीवकणु जयाचा उपमर्दे ॥' –ज्ञा १८.१२७२. –सक्रि. १ अंग चेपणें, रगडणें. २ तुडविणें; पिळणें; त्रास देणें; पीडा करणें. ३ अपमान करणें; इज्जत, अब्रू घेणें. [सं. उप+मृद्]

**उपमा**—स्त्री. १ दृष्टांत; उदाहरण; तुलना; दाखला. २ सादृश्य; सारखेपणा, (प्रतिमा, चित्र, मूर्ति, यांतील). ३ उपमान; तुलनेकरितां घेतलेली वस्तु. ४ एक अर्थालंकार–दोन वस्तूंचें साम्य–साधर्म्य जेथें वर्णिलेलें असतें तेथें हा अलंकार होतो. याचे अनेक प्रकार आहेत. हा अलंकार सर्व अलंकारांच्या बुडाशीं आहे.' 'जो धैर्ये धरसा सहस्रकरसा तेजें तमा दूर सा।' –नळ १७. [सं.]

**उपमातणें**—न. उपमा देणें; सदृश्य दाखविणें. 'भणओनि उपमातु कमठ। जगामाजी ॥' –शिशु ३९१. [सं. उप+मा]

**उपमाता**—स्त्री. १ दाई; अंगावर पाजणारी बाई; धात्री. 'सदरील अडचण असल्यास मूल पाजण्यास उपमाता ठेवावी.'

–बालरोग चिकित्सा ४. २ संगोपन करणारी (मातेशिवाय) दुसरी-बाई; ३ सावत्र आई; मानलेली आई; पालनकर्ती. [ सं. ]

**उपमान**—न. १ ज्याशीं तुलना करावयाची तें; दृष्टांत, उदाहरणादाखल घेतलेली वस्तु; तोंडाला चंद्राची उपमा देतात तेथें चंद्र हें उपमान असतें. २ अनुमानाचा एक प्रकार, सादृश्य अनुमान. (इं.) ॲनॉलॉजी. [ सं. ] **०गम्य**–वि. सादृश्यानें प्रतीत होणारी, समजणारी; तुलनेनें समजणारी. **०सिध्द**–वि. सादृश्य दाखवून, तुलना करून सिध्द केलेलें. [ सं. ]

**उपमानोपमेयभाव**—पु. उपमान आणि उपमेय यांचा परस्पर संबंध; दोन तुल्य वस्तूंमधील परस्परसंबंध. [ सं. ]

**उपमित**—वि. उपमा दिलेलें; उदाहरण दिलेलें; तुलना केलेलें; दृष्टांत दिलेलें [ सं. ]

**उपमिति**—स्त्री. १ तुलनेनें, प्राप्त झालेलें ज्ञान; दृष्टांतानें झालेली सिध्दि. २ सारखेपणा; सादृश्य. ३ प्रतिकृति; प्रतिमा; सारखी वस्तु ( चित्र, मूर्ति वगैरेची ). [ सं. ]

**उपमीजणें**—उक्रि. सदृश समजणें; उपमा देणें; तुलना करणें. ‘क्षीरसागराचा पाटु। जमुने जलां होतां गोटु। तरी उपमीजतां दानवशिरसाटु। नारदें आळंगितां ।। ’ –शिशु ६१. [ सं. उप+मा=माजणें ]

**उपमेय**—न. ज्याचें साम्य, तुलना वगैरे दाखवावयाचें तें; उपमानाची उपमा ज्यास द्यावयाची ते. तोंडाची चंद्राशीं तुलना करतांना तोंड हें उपमेय असतें [ सं. ]

**उपयम**—पु. विवाह; लग्न. [ सं. उप+यम् ]

**उपयुक्त**—वि. उपयोगी; कामाचें; वापरण्यालायक; साहाय्यक; सोयीचें; लाभाचें; उपकारक. [ सं. उप+युज् ]

**उपयोग**—पु. १ उपयुक्तता; योजना; साहाय्यकता; फलदायकता; उपकारकता; मदत. २ गरज; जरूरी; प्रयोजन; सापेक्षता. [ उप+युज् ]

**उपयोगणें, उपयोजणें**—उक्रि. उपयोग करणें; वापरणें. ‘तैंच योग्य प्रकारें उपयोगिल्यानें पाटलिपुत्रांतहि त्यास उपयोगी पडलें. ’ –चंद्रगुप्त १८३. [ सं. उप+युज्, उपयोग ]

**उपयोगी**—वि. १ साहाय्यक; उपयुक्त; उपयोग होईल असें. २ जरूरीचें; गरजेचें. [ सं. ]

**उपर**—पु. १ वजन, छाप, श्रेष्ठत्व ठेवणें; वर्चस्व; वरचढपणा. ‘जयाचेनि सावायें। जीव ब्रह्मउपर लाहे ।। ’ –अमृ २.१६. ‘ हा जिकडे जातो तिकडे आपला उपर लोकांवर ठेवितो. २ ( नाविक ) उत्तर दिशा [ सं. उपरि; झेंद उपैरि, उपर; ग्री. हुपर; लॅ. सुपर; जुनें जर्मन ओबर; इं. ओव्हर; हिं. गु. उपर ] –क्रिवि. १ नंतर; मागाहून; तदुत्तर; उपरांत. ‘ त्यजिल गुरुभजन कसें हें आयकिल्याहि उपर माणूस। ’ –मोवन १०.६७. २ कांठापर्यंत. ३ उत्तर दिशेस. –शअ. १ वर; ऊर्ध्व; उंच. **म्ह०** तेरा उपर मेरा. २ आणखी; पलीकडे; अधिक; पेक्षां. ‘ उपरमला भीष्म, विदुर कृष्णहि कथितां अशाहि उपर मला ।। ’ –मोउद्योग ९.६७. ‘ ह्याउपर तुला कांहीं मिळणार नाहीं. ’ ३ नंतर. उ० याउपर; त्याउपर वगैरे. ‘ सरैल उपरा प्रतिरात्रि दिनु। सकळै दिशां उजुवाडु होउनु। ’ –ख्रि २.४४. १९४. **उपरांत असणें** ( सोंगटी )–तिफाशी सोंगटयांच्या खेळांत सोंगटी लागण्यापुरेसें दान पडून वर उरणाऱ्या दानामध्यें मारतां येण्यासारखी दुसऱ्या बाजूची सोंगटी बसलेली असणें. हीं दानें सर्व दसप्यादापासून पुढें येतात.

**उपरकाठी**—स्त्री. अनवाणी चालतांना कांहींएक लहान काठीवर पाय पडला असतां तिचें अग्र तटकर उडोन पायाचे तळास आघात करितें तेणेंकरून विघारासारिखें मोठें दुखणें होतें तें झालें असतां त्या आघातास म्हणतात. [ उपर+काठी ]

**उपरखणी**—स्त्री. घराची माडी, मजला. [ उपर+खण ]

**उपरगुढी**—वर, उंच उभारलेली गुढी. ‘ फडफडिती उपरगुढिआं। फूजितीं वाघवडाइआं ।। ’ –शिशु ५२७. [ उपर+गुढी ]

**उपरचा वारा**—पु. ( नाविक ) उत्तरेकडून येणारा वारा. [ उपर=उत्तर ]

**उपरछक्का**—पु. तिफाशी सोंगटयांच्या खेळांतील एक शब्द. सोंगटी लागावयास पुरेसें दान असून अधिक सहा पडल्यास त्यास म्हणतात. उ० १६, १७, १८. इ०तील सहा. [ उपर+छक्का ]

**उपरछडी**—स्त्री. (विशेषतः पाण्यांत ) उलटी उडी; खालीं डोकें वर पाय करून मारलेली उडी. [ उपर+छडी ]

**उपरटपका-टप्पा-ठपका**—पु दुसऱ्यावर उपकार केले असतां आभाराऐवजीं मिळालेला दोष, निंदा, दूषण वगैरे; अयोग्य, अस्थानीं, दोषारोपण. [ उपर+टपका ]

**उपरटप्पी-टप्प्याचा**—वि.पोकळ;वायफळ;वरवरचें (भाषण, गप्पा, वादविवाद ). [ उपर+टप्पा ]

**उपरडकवळ**—स्त्री. उत्कर्षयुक्त आलिंगन. (टीपग्रंथ) ‘ना तरि घेतांए। उपरडकवळीं। मकरध्वजू ।। ’–शिशु ५९७. [ उपरड=वर+कवळ ]

**उपरंडणें**—उक्रि. पालथें करणें; उपडणें; उपडें करणें. उपरांडणें पहा.

**उपरणा-णें**—पुन. एकेरी पांघरावयाचें, अंगावर घेण्याचें वस्त्र; अंगवस्त्र. [ सं. उपावरण–उपावरणें–उपरणें किंवा उपाभरण–उपाहरण–उपारणं; –भाअ १८३२; हिं. उपरना ] **०झाडून निघणें**–१ मोकळें होणें; एखाद्या गोष्टीपासून संबंध तोडणें. २ रागानें निघून जाणें.

**उपरत**—वि. पराङ्मुख; परावृत्त ( रणापासून, भांडणापासून). ‘ धांवुनि कर्णे म्हणे रे दावुं नये पृष्ठ संगरोपरतें। ’ –मोद्रोण १२.३३. [ सं. उप+रम् ]

**उपरतणें**—क्रि. थांबणें; शांत होणें; स्थिर होणें. 'तया सुखासी दृष्टांत। देतां सरलें वस्तुजात। उपरतलें चित्त। ठाईंचा ठाईं॥' –स्वादि १.२.५६. [सं. उप+रम्]

**उपरतविणें**—क्रि. उफराटें फिरविणें. 'यालागीं त्याग संन्यास। पुसावेयाचें घेउनि मीस॥ उपरतविलें दूस। गीतेचें तें॥' –राज्ञा १८.८२. [सं. उत्+परा+वृत्–वर्त]

**उपरता**—वि.क्रिवि. १ वरचा; वरला; वरील. 'आणीकही शाखा उपरता। जिया सनकादिकनामें विख्याता।' –ज्ञा १५ २०५. २ उलट; उफराटें; विपरीत. 'तें विसरलासि हें उपरतें। संहारूं आदरिलें॥' –ज्ञा ११.३८४. [सं. उपरि+तः]

**उपरति**—स्त्री. १ थांबणें; बंद होणें; शांत होणें; खळ; खंड; उपरम. २ विरक्ति; वैराग्य; विषयापासून निवृत्ति; सुखाविषयीं उदासीनता. 'उपरति होऊनि चित्ता। निरवधि तल्लीनता। निरंतर॥' –ज्ञा २.१७३. [सं. उप+रम्]

**उपरत्न**—न. मुख्य नऊ महारत्नांशिवाय इतर कांहीं रत्नें. उ० तोरमली, स्फटिक कांचमणि, भीष्ममणि, मुक्ता–ज्योतिरस, राजवर्त, राजमय, ब्रह्ममय, जलकांत, हंसगर्भ, विभवकर, सौभाग्यकर, विषहर, श्रीकांत, हंसमाली, कौस्तुभ, चिंतामणि, राजमणि, धूलीमरकत, भुजगेशमणि, खंज, सीमंतमणि, स्पर्शमणि, तित्तिर, शिला, कर्पूराश्मा, शक्तिचूर्णक, नीलकंठ, गरुड, परीस, केदार, स्यमंतकमणि, केयूर इ० २५ मुख्य उपरत्नें व १०० किरकोळ रत्नें आहेत. –रत्नपरीक्षा (खांवेटे कृत). एकंदर ८४ रत्नांपैकीं ९ महारत्नें आणि बाकीचीं ७५ उपरत्नें समजतात. –जव्हेरखाना (बडोदें) १. [सं.]

**उपरदवडा**—पु. १ वाजवीपेक्षां जास्त मागणी; फाजील हांव. २ वरचढपणा; वरचष्मा; वर्चस्व. 'उगिच गाल फुगवून रुसावें, आला दिवस उपरदवडा।' –प्रला १६२. ३ अधिकार; सत्ता; प्रभुत्व. (क्रि० करणें; घेणें; चढवणें, चालविणें; होणें; चढणें; चालणें). ४ वाजवीपेक्षां जास्त मोबदला, मागणी; थोडें देऊन फार काढण्याची प्रवृत्ति. आंवळा देऊन कोहळा काढणें. (क्रि० करणें) ५ एखाद्याचें बरें करूं गेल्यास त्यांत यश न येऊन, यानें माझें वाईट केलें असा दोष (ठपका) येणें. –मनको [उपर+दवडणें] **म्ह**० उपरदवडा खांद्यावर ×××. = वरचढपणा करणारा नेहमीं आपली मिजास चालवितो याअर्थी.

**उपरदुवा, उपरपगडा, उपरपव, उपरपंजा**—पु. तिफाशी सोंगट्यांच्या खेळांत मेलेली सोंगटी लागण्यापुरेशा दानावर उरणारें दान. उ० पवबारांमधील पव किंवा पगडा, दसदोबारामधील दोन किंवा दुवा, पंधरा, सोळा किंवा सतरामधील पंजा म्हणजे पांच, किंवा सहा इत्यादि; दुवा,पगडा, पव, पंजा हीं खेळांतील दोन, एक, एक, पांच हीं दानें आहेत.

**उपरप्यादी**—स्त्री. बुद्धिबळांत एका प्याद्यानें शत्रूच्या राजास शह देऊन लागलीच दुसऱ्या प्याद्यानें प्यादेमात करणें. प्यादी पहा. [उपर+प्यादी]

**उपरबाहेरचा वारा**—पु. (नाविक) वायव्यदिशेकडून येणारा वारा.

**उपरम**—१ थांबणें; बंद होणें; शेवट; विश्रांति; विराम. 'कासया जयो उपरमु।' –गीता १.२३४२. 'अहो ज्या सद्भावें जनन मरणाचा उपरम' २ शांति; विरक्ति; वैराग्य. 'केले होती वृथा श्रम। चित्ता उपरम न होतां॥' –तुगा ३३१६. ३ आनंद; संतोष. 'ऐसा ज्याच्या नामाचा महिमा। वर्णितां देव पावले उपरमा॥' –ह १६.८. 'असो आतां यशोदे माय। गोष्टी याच्या सांगों काय। ऐकतां चित्तां उपरम होय। प्रेम सये नावरे मज॥' –ह ७.२३७. [सं. उप+रम्]

**उपरमणें**—क्रि. १ थांबणें; शांत होणें; बंद होणें; स्थिर होणें. २ रममाण होणें; आनंद पावणें; संतुष्ट होणें; उपक्रीडणें; प्रफुल्लित, ताजातवाना होणें. 'उपरमोनि पाहे सुंदरी। तंव अंगीं आदळला श्रीहरी॥' –एरुस्व ७ ६३. ३ विसांवणें; विरमणें. 'शिव आणि श्रीधर। ह्यांचे भक्तीस उपरमति तत्पर॥'. ४ मरणें; मृत्यु पावणें. [सं. उप+रम्]

**उपरमाडी**—स्त्री. घराचा वरचा मजला, माडी; उपरखण; माडीवरची माडी. 'पहाया वैदर्भी मग उपरमाडीवरि चढे।' –सारुह ७.८४. [उपर+माडी]

**उपरवळ्या-वाळ्या**—क्रिवि. १ वरून; उंच ठिकाणाहून; उंचावरून. 'सफेलीवरून उपरवळ्या खंदकांत उडी टाकली.' २ वर; उंच; डोक्यावर. [उपरि+वलनं] ०**अंबट मागणें**–कारणाशिवाय दुसऱ्याच्या भानगडींत पडणें; खांद्यावर उपटसूळ घेणें; विकत श्राद्ध घेणें.

**उपरवांयां**—क्रिवि. कारणाशिवाय; जरूरीशिवाय. [सं. उपरि+वि+इ.; म. उपर+वायां=व्यर्थ] ०**अंबट घेणें**–कारणाशिवाय भांडणें.

**उपरसाल**—स्त्री. बाहेरची साल, कातडी, चामडी; अंतरसालेच्या विरुद्ध. [सं. उपरि+छाल]

**उपरसाळ**—स्त्री. एक प्रकारचें भात. [सं. उपरि+शालि; प्रा. सालि; म. साळि]

**उपरा**—पु. (राजा.) बहार; मोसम; बहर

**उपराउपरी**—क्रिवि. तांतडीनें; लागलीच; ताबडतोब. 'सिंहनाद केल्या धीरीं। उपराउपरी धांविन्नले।' –एरुस्व ८.२०; 'निष्काम उपर्वे चौफेरीं। तीं जाळिलीं उपराउपरीं॥' –एभा २३.३१९. [सं. उपरि+उपरि]

**उपराग**—पु. ग्रहण. 'चंद्रासि लागति कळा उपराग येतो।' –नळ ५. [सं. उप+रंज्]

**उपराग, उपरागिणी**—पुस्त्री. गौण राग, रागिणी. ' राग उपराग भार्यासहित । सामगान एक करिती । '–राधि ३६.६९. [सं.]

**उपराठणें, उपराठा**—उफराटणें–उफराटा पहा. (गोमांतकी रूपें–उपराटें, उफाटें, उफराटें.) ' उपराठतां गेलीं प्राणें । ' –गीता २.१२६०. ' तो उपराठा गमे । ' –गीता १२.१३७.

**उपरांडणें**—उक्रि. पालथें करणें; सांडणें; पाडणें; उलथून पाडणें ( गाडा, गलबत इ० ). [सं. उपरि+छर्द–छड्ड–छंड–छांड–सांड–रांडणें=ओकणें वगैरे]

**उपरांत, उपरांतिक**—क्रिवि. १ नंतर; मागाहून. ' उपरांत नर्मदाकांठीं, सार्थकासाठीं, मोक्षकार्यार्थी ' –एपो ४१६. ' तो मजकूर वाचल्याच्या उपरांतही त्याची वरील रंगेल वृत्ति जर तशीच कायम राहिली तर या गोष्टीबद्दल त्याची मोठी तारीफ करणें रास्त होईल. ' –नि ६२८. –शअ. शिवाय; आणखी; वर. ' बस्स ! उपरांत नाहीं. अगदीं हरा शिवा ! ' –भा ८. [सं. उपरि. अपरांत–तिक याप्रमाणें प्रयोग; गु. गो. उपरांत; हि. उप्रांत.]

**उपराम**—पु. थांबणें; बंद होणें; विराम; विश्राम. उपरम पहा. [सं.]

**उपराळ**—वि. अधिक; फाजील; वाजवीपेक्षां जास्त. [सं. उपरि+आलु; हि. उप्राल=आणखी, वर]

**उपराळ**—स्त्री. ( क. ) ओहाळाकांठची स्मशानभूमि.

**उपराळणें**—अक्रि. भरून वाहणें ( भांडें, नदी). उ० **उपराळून येणें, भरणें, चालणें**. [सं. उपरि+आलु; हि. उप्राल=वरून]

**उपराळा**—पु. १ दोहों बाजूंस सारखें ओझें करण्याकरितां जनावराच्या पाठीवरील एका बाजूस घातलेलें ( लांकडें इ० चें ) वजन. २ वाजवीपेक्षां अधिक सामग्री, संग्रह (माल, द्रव्य वगैरेचा). राखून ठेवलेला जिन्नस; खर्च भागवून उरलेला माल, द्रव्य, पदार्थ इत्यादि; जरूर लागल्यास उपयोग करतां येईल अशी तरतूद (दारूगोळा, सैन्य इ०). ३ ठराविक वजनापेक्षां अधिक असलेला माल. ४ वर्चस्व; वरचढपणा (वादांत, भांडणांत).५ विकत घेतलेल्या मालावर ठरलेल्या वजनापेक्षां थोडा अधिक मिळणारा माल ( गुळाची ढेप, लांकडाचा गठ्ठा इ०चे तोललेल्या वजनापेक्षां ओझ्यांत अधिक वजन भरतें तें वाणी कांहीं न आकारतां देतात ). ६ जनावराच्या ओझ्यावर टाकलेले किरकोळ जिन्नस (काटक्या इ०); किरकोळ भरती. ७ भरपाई; वजावाट; मोबदला. (क्रि. करणें)'कच्च्या गड्यास कांहीं टोल्यांचा किंवा वयांचा उपराळा द्यावा.' कुबडी चेंडू –( बडोदें ) १७. ( इं. ) हॅंडीकॅप. ८ एखाद्या जिन्नस वजन करतांना दुसऱ्या पारड्यांत घातलेलें वजन, दडपण. ९ ( ल. ) आढापीट; खटाटोप. ' ब्रह्मसूत्राची भार–दोरी गळां । मंत्रोपदेश भिक्षेचा सोहळा । लेहण्यावाचण्याचा उपराळा । पोट भरावयाकारणें ॥ ' –स्वादि ३.३.१०. [चि. उपराळो=प्रत्युपकार] [सं. उपरि+आलुच्; हिं. उप्राल=वर, अधिक]

**उपराळा**—पु १ आरोप; आळ; खोटी सबब. २ कुरापत; आगळिक; निमित्त ( कज्जा, युद्ध इ० स). ' आम्ही केल्या नियमास टळलों नाहीं, परंतु तुमचेकडूनच उपराळा झाला तेव्हां अम्हाला उठणें प्राप्त. ' ३ ( गो. ) तक्रार. ०**घेवप**–नांव ठेवणें. आळ घेणें. [उपर+आळ]

**उपराळा**—पु. साहाय्य; मदत; कुमक. ' आणि स्वामीसही परम असाध्य होऊन त्याचा उपराळा ताम्राकडून होणार । ' –मराआ [सं. उपरि+आलुच्; हि. उप्राला=मदत; चित्पा. उपराळो]

**उपरि**—शअ. उपर, उपरी पहा. १ वरती; वरच्या बाजूस. ' उपरि सकंटक साचे परंतु सांचे जयांत सुरसाचे । ' –नळ ३५. २ वर. ३ यानंतर; यावर; अधिक; याशिवाय; जास्त; पुढील; विशेषतः एतत् किंवा तत् लागून प्रयोग; उ० एतदुपरि; तदुपरि. –वि. उत्तर; पुढील. ' यज्ञवैभव खंडाच्या उपरिभागांत आरंभींचे अध्याय एक ते बारापर्यंत ब्रह्मगीता. ' –गीर ४. [सं.]

**उपरितन**—वि. वरचा [सं.]

**उपरिप्रवाहीचक्र**—न. ( यंत्र ) वरून पाण्याचा लोंढा चाकावर पडून फिरणारें चक्र. (इं.) ओव्हरशॉट व्हील. –ज्ञाको ए १४. [सं.]

**उपरिभाग**—पु. वर आलेला भाग; वरचा भाग, बाजू. [सं.]

**उपरिभूमि**—स्त्री. १ उंचावर असलेली जागा, जमीन ( माडीवरील, डोंगरावरील ). २ वरची खोली; उपरि. [सं.]

**उपरी**—वि. १ गांवांत जमीन, वतन नाहीं असा; मिरासदार नसणारा; तात्पुरता राहणारा; स्वतःची मालकी नाहीं अशा जागीं राहणारा. २ (ल.) उडाणटप्पू; आगापिछा नसलेला. 'एखादा उपरी पोर धरून आणून स्वर्गाचे दरवाजे मोकळे करून घेतल्याचें सुख मानून घ्यावयाचें ' –टि ४.१८. म्ह० उपरे आले आणि धनी झाले. ३ खंडानें, कौलानें जमीन करणारा; खंडकरी; खेडूत; थलकरी याच्या उलट; ४ वरिष्ठ; वरचा. ' चित्यास शिकारीचे सवईसाठीं उपरी अधिकाऱ्याच्या परवानगीनें नेणें. ' –चिमा. ( बडोदें ) २८. –क्रिवि. नंतर; पुढें; वर उपरि पहा. ' उपरी बोले रामललना । ' –राधि २०.१३९. ( पत्रांतून ) आशीर्वाद उपरी; विनंती उपरी, इ० –स्त्री. माडी ' मग ते सप्तखणांची उपरी । तेथें ठेविली राये कुमरी ॥ ' –कथा १.६.३५. –पु. उंचवटा. ' स्वामिपूजेसि ते अवसरीं । स्थळ केलें उपरीवरी । ' –संवि १३.१३८. ( गो. ) [सं. उपरि; भि. ओपिरो; गु. उपरी; हिं. उपर]

**उपरुद्ध**—वि. अडथळा केलेला; प्रतिबंध केलेला; अडविलेला. [सं. उप+रुध्]

**उपरू**—वि उपरी; श्रेष्ठ; 'तो गोडिया घे उपरू ब्रह्मविद्येतें । ' भाए ७९५.

**उपरें**—क्रिवि. आधिक्यानें. ' एन्हवीं दैत्यकुळ साचोकारें । परि इंद्रही सरी न लाहे उपरें । ' –ज्ञा ९.४५२. –न. ( कासार धंदा ) जोडाच्या भांड्याचा वरचा भाग. [ सं. उपरि ]

**उपरोध**—पु. १ प्रतिबंध; अडथळा; अडचण; जुलूम; त्रास. ' हेंही उपरोधें करणें । तरी आतंभय हरणें । '–ज्ञा १३.२८८. 'गांवाजवळ जर तुम्ही सैन्य उतरलें तर ग्रामस्थांस उपरोध होईल. ' २ भीड; संकोच; शंका; चोरी. ' तुका म्हणे अहो रखुमाईच्या वरा । उपरोध कां धरा माझा आतां । ' –तुगा १२४३. ' जें काम पडेल तें मला सांगीत जा, हे थोर यांस कसें सांगावें, असा उपरोध बाळगूं नका. ' ३ आग्रह; हट्ट. ' बाळक स्तनपानीं उपरोधु करी ' –ज्ञा ११.७९. ४ व्याजोक्तीचें, छद्मी भाषण; मर्मी लागेल असें भाषण; टोचून बोलणें; आडून, घालून पाडून बोलणें. ' उपरोधु जी सन्मुख । तुजसीं करूं । ' –ज्ञा ११.५८३.

**उपरोधाचा, उपरोधी-क**—वि. छद्मी; व्याजोक्तीचें; निंदागर्भ; उपरोधपूर्ण; वरमण्यासारखें (भाषण, लेख). ' साळेंत पोर वेळ चुकवून उशीर करून गेला म्हणजे त्यास पंतोजी अहो यावें महाराज, बसावें, अरे कोणी आसन द्यारे, इ. जें करितो तें उपरोधिक. ' –शास्त्रीको.

**उपर्जन-ना**—स्त्री. ( कों. ) जमिनीची, संपत्तीची, मालमत्तेची वाढ; उत्कर्ष; भरभराट. ' पंच विषयवासना । अनुक्रमें वर्ते नाना । तेथें स्थूल देह उपर्जना । कारण होय । ' –सिसं १.१५६. [ सं. उप+अर्जन ]

**उपल**—पु. दगड; उत्पल. ०**प्रक्षेप**—पु. १ दगडमार; धोंडमार. २ ( ल. ) प्रतिपक्षावर मुद्दे अथवा प्रमेयांचा भडिमार करून त्यास गोंधळून टाकणें: कांहीं बऱ्यावाईट युक्त्यांनीं खंडन करणें. ३ आपला पराभव होत असतां प्रतिपक्षावर जोरजोरानें तुटून पडून, असंबद्ध भाषणें करून आपला पराभव लपविण्याचा प्रयत्न करणें. ४ खोटा आरोप करणें; आळ घालणें; अपशब्द बोलणें. [ सं उत्पल= दगड+प्रक्षेप=मारा ]

**उपलग**—वि. उपयोगी. [ सं. उप+लग् ]

**उपलट**—न. ( राजा. ) १ घाई; गडबड. ' आजपर्यंत अशीं लग्नं झालेलीं असतील पण तीं इतक्या उपलटानं झालेलीं नाहींत. ' –झांकली मूठ ६०. २ उपद्व्याप; भानगड.

**उपलब्ध**—वि. सांपडलेले; मिळालेलें; प्राप्त; अर्जित. [ सं. उप+लभ् ]

**उपलब्धि**—स्त्री. १ प्राप्ति; अर्जन; हस्तगत होणें; स्वाधीन होणें. २ ज्ञान; ज्ञातता; गोचरता. ' शब्दाची उपलब्धि श्रोत्रेंद्रियावांचून होत नाहीं. ' ३ अस्तित्व; प्रत्यक्षता. ' रसायनशास्त्राची उपलब्धि त्या देशांत नाहीं. '

**उपलभणें, उपलंभणें**—अक्रि. प्राप्त होणें; मिळणें. ' परी देहाचें मोटकें उभें । आणि चेतना तेथ उपलभे । '–ज्ञा १५.३७३. [ सं. उप+लभ् ]

**उपलभ्य-मान**—वि. १ उपलब्ध असलेलें; प्राप्त होण्यासारखें; जिवंत; हयात; ज्ञात; चालू. २ सांठणारें; लाभणारें; प्राप्त होणारें; फायदा-नफ्यासारखें मिळणारें. [ सं. ]

**उपलवण-णी**—नस्त्री. १ मिष्ट, रुचकर पदार्थ; पक्वान्न. ' नव रसांची उपलवण । '–विपू १.१६. २ विस्तार; वर्णन. ' उमटती जीवेश्वरांच्या श्रेणी । तेथींचीं करावी उपलवणी । स्वानुभवें कीं । '–विपू ३.२. ' म्हणोनि इया वाहणी । केली म्यां उपलवणी । '–ज्ञा १३.८५२. [ उप+लवण ]

**उपलवणें-विणें**—उक्रि. १ प्रसार; विस्तार. ' मौक्तिकां चिआं वेलीं फुललिया । कीं क्षीरसागरां लहरी उपलवलियां । ' –शिशु ५९२. २ विवेचन, विस्तार, व्याख्यान, वर्णन करणें. ' हेचि आनि भांती । प्रमेय उपलवूं पुढती । परी तूं प्रतीती । याचि घे पां । ' –ज्ञा १४.८६. २ फुलणें; उकलणें; फुलविणें; विकास करणें. ' साहित्याचिए सेजें । बोलांचा रंगु उपलविजे । ' –शिशु २४. ' जैसी चंद्रमयाची घडी । उपलविली । ' –ज्ञा ११.२२३. ३ व्यक्त होणें. ' तेथें जाणो कोटी सूर्य घडीं उपलविली चोखडी । तैसी तेजपर वडी । श्यामांग चतुर्भुज । ' –स्वादि १०.३.१३. ४ प्रसन्न होणें. ' तेणें हरिखें आतां उपलवला निरूपील । ' - ज्ञा ६.४८८. [ सं. उत्+प्लु; उप+प्लु; उत्प्लवन किंवा उपप्लवन ]

**उपलक्षण**—न. १ ( साहित्य ) लक्षणा; अंशावरून संपूर्णाचा, व्यक्तीवरून वर्गाचा व वर्गावरून जातीचा निर्देश करणें. उ० सोंगटी खेळूं नये. ' येथें सोंगटी हें उपलक्षण, कांहींच खेळूं नये असा अर्थ; ' तुम्ही माझे घरीं चोरी केली असतां मीं तुम्हांस शिक्षा करावी कीं नाहीं ? ' या ठिकाणीं तुम्ही म्हणजे कोणीहि. २ रूपकात्मक व दृष्टांतपर भाषण; उपमा. ' तें दीपाचें उपलक्षण । निर्वातींचिया । '–ज्ञा ६ ३५८. ३ एका वस्तूचा, त्या वस्तूशीं तात्पुरत्या संबद्ध असलेल्या दुसऱ्या वस्तूवरून निर्देश. उ० ज्यावर कावळा बसला आहे तें रामाचें घर, येथें कावळा हें घराचें उपलक्षण. [ सं. ]

**उपलक्षणें**—उक्रि. मनांत धरून, हेतू-उद्देश धरून बोलणें; रोंख ठेवून बोलणें; अर्थ असणें.

**उपलक्षित**—वि. अप्रत्यक्ष कथित; संकल्पित; रूपकानें किंवा उपलक्षणानें सांगितलेला. [ सं. ]

**उपलक्ष्य**—वि. अनुमेय; संकल्पित; गर्भितार्थ काढण्याजोगें; गृहीत मानण्यासारखें. [ सं. ]

**उपला-ली**—पुस्त्री. ( हिं. ) गोवरी. [ सं. उप+लिप् ]

**उपलाण-णा-णी-णू**—वि. खोगीर, जीन न घातलेला (घोडा). ' कीं जीव नृपाचे वारु उपलाणें । ' - ज्ञा १८.४६४. ' जसा वारु

उपलाणी। वश्य करी अश्वसाहणी।' –एभा २०.२१६. [सं. उत्+पर्याण= घोड्याचा साज, खोगीर; प्रा. उप्पल्लाण ] ०**बसणें**–जिनाखेरीज घोड्यावर बसणें. ' एक उपलाणी बैसले। पायबंद सोडूं विसरले। तेणें गुंतोनि खालीं पडिले। पायबंद वसती पाटीवरी ॥ ' –जे ७६.६०.

**उपलाणी**—वि. १ उपरी; बाहेरचा; थोडा वेळ राहणारा. ' तो मनुष्य आपल्यायेथील नाहीं, उपलाणी आहे. ' २ (व.) बिन आधारी.

**उपलाणें, उपलानें**—न. विनीचें घोडदळ; घोडेस्वार; विनी. हुलसार–स्वार पहा. ' उपलानें निगालें बरवंतु । हाटांमाजि । '–शिशु ५०३;५५१;२६९. ' धाडुनी इंद्रियांचें उपलाणें । विषयांचे घाली घालणें । होठेशी ब्रह्मचर्यातें जिणें । पाचारूनि ॥ ' –ज्ञाप्र ७३७. [ सं. उत्+पर्याण=खोगीर; प्रा. उप्पल्लाण ]

**उपलासें**—वि. (गो.) उपरी; पूर्ण लाभ न मिळणारें.

**उपलिप्त**—वि. लेप केलेला, लावलेला; फांसलेला; माखलेला; सारवलेला; लपेटलेला. [ सं. उप+लिप् ]

**उपलेप-न**—पुन. १ चोळणें; माखणें; लावणें; फांसणें; लेप करणें. २ लेप; गिलावा; गिलाव्याचा पदार्थ; (इं.) प्लॅस्टर. [ सं. ]

**उपवड-ढ**—स्त्री. जागृति. ' नाना उपवढ होतां खेंवो । नुरे स्वप्नसंभ्रमाचा ठावो । ' –ज्ञा १५.२६४. उपवढणें पहा.

**उपवढणें**—अक्रि. जागृत, जागें होणें. ' नोहे हर्षशोकासी कारण । उपवढलिया जाण । जिया परी । ' –ज्ञा १५.२९४. [ सं. उप+ वृध् ?; का. उप्पवडिसु=जागें होणें; उप्पवड=जागें करण्याचें गीत ]

**उपवणें**—अक्रि. (व.) नाहींसा होणें; गुप्त होणें. ' तेथल्या तेथें चाकू उपवला. ' [ सं. उत्+प्लु=उडणें; प्रा. उप्पव ? ]

**उपवन**—न. १ बाग; उद्यान; बगीचा; २ (ल.) रमणीय स्थान; वन याच्या उलट. [ सं. उप+वन ]

**उपवर**—वि. १ लग्नास योग्य वयाची; विवाहास योग्य (मुलगी, मुलगा). ' उपवर परी उपायचि नाहीं । ' –रामदासी २.१३६. २ विवाहाचा सामान्य काल अतिक्रमून विवाह न होतां राहिलेला (मुलगा, मुलगी). ३ ऋतुप्राप्त झालेली. ' पैठणांत पत्नी जाली उपवर. ' –रामदासी २.७४. ४ संभोगक्षम. ' राधिकेचा मानस जाणून उपवर झाला सखा । ' –पला २. [ सं. उप+वृ ]

**उपवस्त्र**—न. १ उत्तरीय; अंगवस्त्र; उपरणें; पांघरावयाचें वस्त्र. २ (ल.) रखेली; राख. [ सं. उप+वस्=आच्छादन करणें ]

**उपवारा**—पु. उकाडा; उबारा. ' रंगमाहालीं होतो उपवारा । कोणी प्रियकर आणवा राजेंद्राचा थारा । ' –पला ४.२६. [उबारा]

**उपवास**—पु. सबंध दिवस (अहोरात्र) भोजन न करणें; उपोषण; लंघन; अन्ननिवृत्ति; भोजनाभाव; निरशन; अर्ध्या दिवसाच्या निरशनालाहि हा शब्द लावितात. उ० सोमवार–शनवारचा उपवास. [ सं. उप+वस् (यज्ञ भूमीजवळ, यज्ञारंभाच्या पूर्वीच्या दिवशीं सायंकाळीं जाऊन व्रतस्थ राहणें हा मूळ अर्थ) ]

**उपवासी**—वि. १ उपास केलेला; उपोषण केलेला. २ भोजन न केलेला; उपाशी राहिलेला. ०**मरणें**–भुकेनें व्याकुळ होणें; भुकेनें आसन्न मरण होणें. ' वाटे जातां घडी घडी । पाहे पोह्यांची गांठोडी। मनांत म्हणे घरीं बाळें रोकडीं । उपवासी मरतील ॥ ' –ह १९.६१.

**उपवासु**—न. सान्निध्य; जवळ राहाणें. ' उपवासु जालेया जागरु । नाहीं तया । ' –ऋ ८८. [ सं. उप+वस् ]

**उपविद्या**—स्त्री. ब्रह्मज्ञानविरहित इतर भौतिक विद्या, ज्ञान; भौतिक शास्त्र; ईश्वर, धर्मशास्त्र या विरहित अभ्यास; व्यावहारिक ज्ञान. [ सं. ]

**उपविष**—न. विषाचा एक गौण प्रकार; रुईचा चीक, त्रिधारी निवडुंगाचा चीक, कळलावी, कण्हेर, गुंज, अफू, धोतरा, या सात उपविषाच्या जाती होत. [ सं. ]

**उपविष्ट**—वि. १ (सामा.) बसलेला; स्थापन झालेला; आलेला; दाखल झालेला. २ जवळ, शेजारीं बसलेला. [ सं. उप+विश् ]

**उपवीत**—न. त्रैवर्णिकानें वापरावयाचें यज्ञोपवीत; जानवें. [ सं. उप+वे=विणणें ]

**उपवृत्त**—न. १ समवृत्ताशीं म्हणजे कोणत्याहि स्थलाचे पूर्व आणि पश्चिम बिंदु व खस्वस्तिक यांमधून जाणारें जें त्रिज्यावृत्त त्याशीं समांतर असें जें लहान वृत्त तें; पूर्वापरवृत्ताशीं समांतर लहान वृत्त, वर्तुळ. २ कोणतेंहि दुय्यम वृत्त, वर्तुळ. [ सं. उप+वृत् ]

**उपवेद**—पु. मुख्य चार वेदांशिवाय इतर वेद; जसे–ऋग्वेदाचा आयुर्वेद (कोणाच्या मतें हा अथर्ववेदाचा उपवेद आहे); यजुर्वेदाचा धनुर्वेद; सामवेदाचा गांधर्ववेद, अथर्ववेदाचा स्थापत्यवेद, शिल्पशास्त्र; गौणवेद. ' आयुर्वेदं धनुर्वेदं गान्धर्वं वेदमात्मनः । स्थापत्यंचासृजद्वेदं क्रमात्पूर्वादिभिर्मुखैः । ' –भागवत ३.१२.३८. [ सं. ]

**उपवेश-न**—पु. १ (सामा.) बसणें; बसलेपणाची स्थिति. २ जवळ बसणें. [ सं. उप+विश् ]

**उपशब्द**—पु. शब्दाचा अर्थ विशद, विस्तृत करण्याकरितां तत्सदृश किंवा त्याच अर्थी जो दुसरा शब्द, प्रतिशब्द जोडतात तो. उ० पोथी–पुस्तक, लाकूड–फांटा; गवत–काडी; दगड–गिगड; भाकरी–बिकरी वगैरे. [ सं. ]

**उपशम-शांति**—पुस्त्री. १ शांति; निग्रह; लय; शेवट. ' जितया मान मोडिली । उपशमाची । '–ज्ञा ३.२५२. २ विराम; थांबणें. ' मागेन उपशम व्याधीचा. ' –गुच २.२१३. ' मायेशीं होय उपशांति । केवळ उरे ज्ञप्ति । ' ३ नाश. ' आपणावर येणाऱ्या संकटांचा उपशम केवळ स्वतंत्रतेनें होत नाहीं... ' –इंमू ३१०. [ सं. उप+शम् ]

**उपशमणें**—अक्रि. नाहींसें होणें. ' जो शरीरभावातें उपशमी । तो अधियज्ञु एथ गा मी । '–ज्ञा ८.३७. 'कठिण काळ तुझा उपशमला । ' –किंकरकृत द्रौपदीवस्त्रहरण २१. [ उप+शम् ]

**उपशमन**—न. १ शांति; उतार; कमी होणें; उपशम. उपशम पहा. ' दावितसे स्फोटकासी । म्हणे उपशमन केवी होय । ' –गुच ५०.५५. २ उतार पाडणारें, शांत करणारें औषध; उतारा: इलाज; तोडगा. ' महादेव तमोगुण । त्या तमासि उपशमन । तुझीये चरणींचें रज जाण ॥ ' –एरुस्व ४.५३. [ सं. ]

**उपशस्त्र**—न. गौण हत्यार; मारण्याचें किरकोळ साधन. ' हे उपाय केवळ उपशस्त्रवत् होत. ' –व्यनि ५६. [ सं. ]

**उपशाखा**—स्त्री. लहान फांदी; फांदीला फुटणारी खांदी. दुय्यम, गौण शाखा. ' बीज जळाची जवळीक लाहे । आणि तेंचि शाखोपशाखीं होये । ' –ज्ञा ९.१०९. २ एखाद्या मुख्य खोडापासून फुटणारा अंकुर, फांदी. [ सं. ]

**उपशांत**—वि. शांत झालेला; थंड झालेला. 'तया स्वांतःकरणजिता । सकळकामोपशांता । ' –ज्ञा ६.८१. [ सं. ]

**उपशांति**—उपशम पहा.

**उपशास्त्र**—न. न्याय–मीमांसादि षट्शास्त्राहून इतर दुय्यम दर्जाचीं गायन, वैद्यक, वगैरे शास्त्रें किंवा त्यांवरील ग्रंथ प्रत्येक. [ सं. ]

**उपशिक्षक**—पु. १ शिक्षकानें आपल्या साहाय्याकरितां, शिक्षणाचें काम करण्याकरितां अगर विद्यार्थ्यांवर नजर ठेवण्याकरतां हाताशीं घेतलेला वरच्या वर्गांतील हुशार विद्यार्थी; उपगुरु; मालचाट्या; ( इं. ) मॉनिटर. २ दुय्यम शिक्षक; मदतशिक्षक. [ सं. ]

**उपश्रुति**—स्त्री. १ परोक्ष किंवा भवितव्य गोष्टीविषयीं प्रश्न पाहाण्याकरितां रात्रीं हीन वर्गाच्या ( चांभार, परीट इ० ) घरा जवळ जाऊन उभें राहिले असतां आंतून साहजिक निघालेला बरावाईट शब्द; असा शब्द आपल्या गोष्टीवर प्रकाश पाडतो अशी मानण्याची पद्धति; पडताळा. २ आपल्या प्रस्तुत गोष्टीसंबंधीं कोणेक अप्रस्तुत व्यक्तिमुखानें सहज निघणारा बरा–वाईट शब्द आपल्याकडे लावून घेणें. 'मी लग्नाचा विचार करीत बसलों होतों तों मरशीलरे, मरशीलरे अशी तिकडून उपश्रुति झाली; तस्मात् यंदां लग्न करूं नये. ' ३ सांगोवांगी, कर्णोपकर्णी आलेली देशांतराची अनिष्ट बातमी (भविष्यकालीन किंवा वर्तमानकालीन वाईट गोष्टीची). ४ जनवार्ता; वदंता; भुमका. [ सं. उप+श्रु=ऐकणें ]

**उपश्लिष्ट**—वि. १ शेजारीं ठेवलेला; जवळ असलेला; संसर्ग असलेला; चिकटलेला; उपश्लेष असलेला. [ सं. उप+श्लिष् ]

**उपश्लेष**— पु. सान्निध्य; जवळ असण्याची स्थिति; जवळपणा. [ सं. ]

**उपष्टंभ**—पु. पाया; आधार; निमित्त; आश्रय. [सं. उप+स्तभ्]

**उपष्टंभक**—पु. आधार, धीर देणारा; आश्रय देणारा; साहाय्य करणारा; सांवरणारा; हात देणारा. [ सं. ]

**उपष्ठाव**—क्रिवि. ( व. ) विनाकारण; विन आधारी. [सं. उप+ स्था ? ]

**उपसण–णी–णें, उपसा, उपसाभर**––क्रिवि. उपसाउपसी वगैरे वर्णव्यत्यासानें उसपण इत्यादि शब्दापासून हे शब्द साधिले आहेत. उसपणें पहा.

**उपसभापति**––पु. सभापतीच्या गैर हजेरींत काम करणारा; उपाध्यक्ष. –सभा ७१. [ सं. उप+सभा+पति ]

**उपसमीप**—क्रिवि. जवळ; सन्निध; शेजारीं. ' चित्त जो उपसमीपचि वाती । राघवीं करील तो उपवासी । ' [ सं. उप+समीप ]

**उपसरण**—न जवळ येणें; शेजारीं येणें; पुढें सरणें. [ सं. उप+सृ ]

**उपसर्ग**—पु. १ ( व्या. ) धातूंच्या मागें लागणारें अव्यय, उपपद. उ० अति; अनु; उप; परा; प्रति, सम् इ०. २ उपद्रव; त्रास; पीडा; विघ्न. ' तेथे दैत्यीं उपसर्ग केला लोकां । रचिली द्वारका तुका म्हणे । ' –तुगा ९९. ३ दुश्चिन्ह; अनिष्टसूचक गोष्ट ( उत्पात, उल्कापात इ० ). [ सं. उप+सृज्=उत्पन्न करणें ]

**उपसर्पण**—न. जवळ येणें, जाणें; सान्निध्य; आगमन. 'धनालागी नीचसेवन । उपसर्पण हीनाचे ॥ ' –एरुस्व १३.३१. [ सं. उप+सृप् ]

**उपसवें**—क्रिवि. जवळ; सन्निध. ' आपण बैसे उपसवें नेटी ॥ ' –नव १६.४०. [ सं. उप+वस् वर्णव्यत्यय ]

**उपसंहरणें**––अक्रि. शांत होणें; लोपणें; नाश पावणें; संपणें. ' तो घोष तरी उपसंहरला ॥ ' –ज्ञा १.१६१. ' जैं उपसंहरूनि कीजेल गोठी । तै मीचि आहे ॥ ' –ज्ञा ७.३०. [ सं. उप+सम्+हृ ]

**उपसंहार**—पु. १ संकोच; एकत्रीकरण; गुंडाळणें; आटपणें; आवरणें. ' प्रपंचाचा उपसंहार होय तेथें आत्यंतिक । ' २ सारांश; शेवट; समाप्ति. ३ ग्रंथाचा अखेरचा भाग; शेवटचे शब्द; सिंहावलोकन. ' ग्रंथाचें तात्पर्य काढणें असल्यास ( एकंदर ) सात गोष्टी साधनभत असून ... पैकीं उपक्रमोपसंहारौ म्हणजे ग्रंथाचा आरंभ आणि शेवट या पहिल्या दोन गोष्टी होत ॥ ' –गीर २१. [ सं. ]

**उपसंहृत**—वि. १ गुंडाळलेला; एकत्र केलेला. २ समाप्त केलेला; शेवट केलेला. [ सं. उप+सम्+हृ ]

**उपसळा**—वि. खोडकर; त्रासदायक; उपद्रव देणारें; वाईट वर्तनाचें ( मूल वगैरे ). [ सं. उप+शल्य ]

**उपसळो**—पु. १ उपसर्ग; त्रास; उपद्रव; उद्वेग ( उंदीर, मांजर, कुत्रा वगैरेपासून होणारा ). २ कटकट; त्रास (मुलें वगैरेंचा); छळवाद; सतावणी; ( क्रि० आणणें; देणें ). [ सं. उप+शल्य ]

**उपसागर**—पु. समुद्राचा जमिनींत शिरलेला मोटा व रुंद भाग; लहान समुद्र. उ० बंगालचा उपसागर. [ सं. उप+सागर ]

**उप(ब)साण**—स्त्री. (कों.) कुबट वास; कुजकी घाण. (क्रि० येणें; पडणें). [का. उब्बे=वाफ, उष्णता]

**उपसातुपसी**—स्त्री. १ वर्दळीवर येऊन आवेशानें म्यानांतून तरवारी बाहेर काढणें; वर्दळीवर येणें. २ रिकामें करणें; बाहेर काढणें. [उपसणें द्वि]

**उपसामग्री-साहित्य**—स्त्रीन. किरकोळ उपकरणें; सामान; साहित्य; सामग्री; द्रव्यें वगैरे. 'करावया बैसला हवन। तेथें उपसामग्री आणून। जगन्माता देत असे॥' स्वयंपाकांतील उपसाहित्य म्हणजे तांदूळ, कणीक सोडून मीठ, मिरची, हिंग इ० साहित्य. [सं.]

**उपसामी**—वि. साधु; विरक्त. 'येरु उपसामीयांचा रावो॥' –उषा १४३५. [सं. उपशमी]

**उपसारा**—पु. १ वाटेल तिकडे संचार; मोकळें, स्वैर वावरणें. 'या घरांत उपसाऱ्याला जागा नाहीं.' २ प्रशस्त जागा; मोकळी जागा. 'ह्या घरांत उपसाऱ्याची जागा नाहीं' [सं. उप+सृ-सर]

**उपसारा**—पु. १ घरांतील किरकोळ सामान; प्रवासाची सामग्री, जिन्नसा. २ किरकोळ कामें; बारीकसारीक कामें; अडकामें. [स. उप+म. पसारा]

**उपसावणें, उपसाहणें**—उक्रि. सोसणें; सहन करणें; पोटांत घालणें; क्षमा करणें. 'परि जाणतां उपसाहावे। बोलांचे पाणिपद निहाळावें॥' –शिशु ३६५. 'आतां म्हणे तयाचें वचन। उपसाहों आम्ही॥' –अमृ ७.२६९. 'ते उपसाहावा जी मुरारी।' –दाव ३८०. 'तैसें मियां सद्गुरूसी काटाळें। श्रीरामचंद्राचें योजिलें बळें। ते उपसाहिजो सद्गुरुदयाळें। कृपा सागरें॥' –स्वादि १०. १.२४. [सं. उप+सह्]

**उपसाहो**—पु. उपसाह; सहन करण्याची क्रिया. –क्रिवि. सहज. –शर.

**उपसूचक**—पु. सभेपुढें आणलेल्या ठरावामध्यें कांहीं फेरफार सुचविणारा; उपसूचना मांडणारा; किरकोळ सूचना करणारा. [सं.]

**उपसूचना**—स्त्री. सभेमध्यें चर्चा चाललेल्या विषयावरील मूळ ठरावांत दुरुस्ती, फेरफार किंवा तो बाजूस ठेवावा इत्यादि प्रकारची मांडलेली कल्पना. [सं. उप+सूच्]

**उपसृतक**—न. (नृत्य) पाय पुढें फेकणें व हातहि पुढें फेकणें व सर्व गात्रें मागच्या बाजूस वांकविणें. [सं.]

**उपसेचन**—न. तोंडीलावणें; तोंडीलावण्याचें साधन; पक्वान्न रुचकर करणारी वस्तु (चटणी, मसाला वगैरे). 'उपसेचन म्हणिजे साधन॥ तें तोंडीं लावितां अन्न गिळे॥' –यथा ११.४१८.[सं. उप+सिच्]

**उपस्कर**—पु. १ एखादें कार्य पूर्ण करण्याकरितां लागणारें साहित्य, वस्तु, पदार्थ; साधन; बाब; अवश्य नसलेली पण उपयोगी अगर शोभा, सौंदर्य वाढविणारी वस्तु. २ तोंडीं लावण्याचा पदार्थ; मसाला; मिसळण; व्यंजन. ३ गृहकृत्यास उपयोगी पडणारी कोणतीहि वस्तु (सूप, केरसुणी, मुसळ इ०). साधन; साहित्य. [सं.]

**उपस्तरण**—न. (याज्ञिक) स्रुच्यांत किंवा हवन करावयाच्या पात्रांत होमद्रव्य घेण्यापूर्वी त्या पात्रांत दर्वीनें तूप घालणें. [सं.]

**उपस्त्री**—स्त्री. रखेली; राख; अंगवस्त्र. [सं.]

**उपस्थ**—पु.न. १ स्त्री किंवा पुरुष यांचें जननेंद्रिय; लिंग; योनि; मैथुनेंद्रिय; पंचकर्मेंद्रियांपैकीं एक. २ रथामध्यें सारथ्यानें बसावयाची जागा; गाडीवान बसण्याची जागा. [सं. उप+स्था] ०**निग्रह**-पु. संभोग, मैथुन न करणें; विषयोपभोगापासून अलिप्तता; ब्रह्मचर्य; विषयनिवृत्ति; असिधाराव्रत.

**उपस्थान**—न. १ उठणें; वर येणें; उद्भवणें; उत्पन्न होणें. २ घडून येणें; घडणें (कर्म, व्यवहार इ०). ३ एक प्रार्थनेचा प्रकार; गूढार्थक मंत्रानें उपासना, प्रार्थना. ४ असे गूढ मंत्र; स्तोत्र. ५ उभें राहून हात जोडून, मंत्र पठण करून देवतांची स्तुति करणें. [सं. उप+स्था]

**उपस्थापन**—न. १ उपस्थित करणें; जवळ आणणें; उभें करणें; घडवून आणणें; उत्पन्न करणें; बनाव बनविणें. २ पूजा; सेवा. [सं. उप+स्था प्रयोजक]

**उपस्थापित**—वि. घडलेलें; झालेलें; स्थापन केलेलें. [सं. उप+स्था प्रयोजक]

**उपस्थित**—वि. १ उद्भवलेला; उत्पन्न झालेला; प्राप्त झालेला; पोंचलेला; घडलेला (प्रसंग, गोष्ट, कर्म इ०). 'आमच्या देशांत हजारों सभा दरवर्षी उपस्थित होतात...'–नि २७५. २ ज्ञात; माहीत असलेला; हयात, ताजा असलेला; मलिन न झालेला; रूढ; चालू (अभ्यास, विधि). ३ प्रत्यक्ष असलेला, आलेला; हजर. –स्त्री. उपस्थिति पहा. [सं. उप+स्था] ०**होणें**–हजर असणें, येणें. (सभा इ० ला)

**उपस्थिति**—स्त्री. १ जवळ असणें; हाताशीं असणें; ताजें असणें; स्मरणांत असणें; तयार असणें; ताजेपणा; नवेपणा; स्मरण (विद्येचें, अभ्यासाचें, शास्त्राचें). 'वाचलेल्या ग्रंथांची उपस्थिति चांगली राहण्यास त्याचा (ग्रंथसंग्रहाचा) किती उपयोग आहे हेंही सर्वांच्या सहज लक्षांत येणार आहे.' –नि ५१५. २ उद्भव; विद्यमानता; अस्तित्व; उपस्थितपणा; हजर असणें; उत्पन्न होणें; चालू असणें (प्रसंग, कार्य वगैरे). 'माझे घरीं लग्नाची उपस्थिति झाली.' ३ मनांत येणें; स्मरण होणें. 'रोग म्हटला म्हणजे वैद्याची उपस्थिति होती.' ] सं. उप+स्था ]

**उपहत**—वि. १ मारलेला; इजा, जखम झालेला; नाश, नष्ट केलेला; उध्वस्त; ताडित. २ निस्तेज; हतवीर्य; पीडित; दुःखी. 'जैसा राजकुमरु पदच्युतु। सर्वथा होय उपहतु।' –ज्ञा १.२७०. [सं. उप+हन्]

**उपहति, उपहंती**—स्त्री. ( काव्य. ) १ निस्तेजता; अपमान; अनादर; मानहानि. 'जैसी भातारेंहीन वनिता । उपहति पावे सर्वथा ।' –ज्ञा २.१९९. २ नाश; खालावलेली, दुःखित स्थिति [ सं. उप+हन् ]

**उपहसित**—वि. ज्याचें हंसें, उपहास, थट्टा, फजिती झाली आहे असा; अपमानित, अनादृत; छीः थूः झालेला. [ सं. उप+हस् ]

**उपहार**—पु. १ ( उपाहार अप. ) फराळाचें सामान; फराळ, भक्ष्य. 'मीचि होईन सुआरु । वोगरीन उपहारु ।' –ज्ञा १३.४२१. 'उपहार कांहीं करावा ।'–गुच ५३ ९२. २ देणगी; नजराणा; बक्षीस भेट; अहेर. 'वस्त्रें अलंकार सुमनें । नाना उपहार बलिदानें ।' –एरुस्व ६. ८८. [ सं. उप+आहार ]

**उपहारणें**—उक्रि. अर्पण करणें; देणें 'तेंचि भस्म ईश्वरासि । उपहारावें तुम्ही हर्षी ।' –गुच ४० ८१. [ स उप+आ+हृ ]

**उपहास**—पु. १ थट्टा; चेष्टा; फजिती; छीः थूः, निंदा; अपमान; निर्भर्त्सना. 'उरोधु वादुबलु । प्राणितापटालु । उपहासु चाळु । वर्मस्पर्शु ।' –ज्ञा १३.२७०. २ उपहास होतो अशी स्थिति; उपहासक्षम अवस्था, योग्यता. [ सं उप+हस् ]

**उपहासक**—वि. उपहास, थट्टा करणारा; नांवें ठेवणारा; निंदा करणारा. [ सं. उप+हस् ]

**उपहासणें**—अक्रि. थट्टा, चेष्टा, निंदा, फजिती, इ० करणें; हंसणें; अनादर, अपमान करणें. [ उपहास ]

**उपहासास्पद**—वि. थट्टेचा विषय झालेला; थट्टेस पात्र. [ सं. उपहास+आस्पद ]

**उपहास्य**—वि. थट्टा करण्यास योग्य, पात्र; चेष्टा करण्यालायक; उपहासास्पद; निंद्य; तिरस्कार्य; त्याज्य. –न. थट्टा ( उपहास अप ). 'उपहास्य केलें समर्थाचें ।' –रामदासी २ ३. [ सं. ]

**उपहास्यता**—स्त्री. १ ( उपहास या अर्थी चुकीनें ) थट्टा; चेष्टा २ ( वास्तविक अर्थ ) उपहासार्हता; निंदास्पदता. [ सं. ]

**उपहित**—वि. १ जवळ असलेलें; जवळ ठेवलेलें ( पदार्थ, भक्ष्य, इ० ). 'जैसें कां उपहिता( अंबोण ) म्हैसी खाय ।' –ज्ञा १७.१५४. २ संसर्गयुक्त; आरोपित. 'तैसें उपाधी उपहित । थोकोनि ठाके जेथ ।' –ज्ञा १५.५११. ३ उपाधियुक्त; उपाधिबद्ध; सामाशब्द–मायोपहित ( चैतन्य ); घटोपहित ( आकाश ) 'आणि कूटस्थु जो अक्षरु । दाविला पुरुष प्रकारु । तेणें उपहिताही आकारु चैतन्या केला ।' –ज्ञा १६.४३. [ सं. उप+धा=ठेवणें ]

**उपहुडणें, उपहौडणें**—अक्रि. झोंपेतून जागें होणें; उठणें 'पाहातेआं पाहारां दधिमंथनीं । गौळनी गार्ती श्रीचक्रपाणी । तो ध्वनि आयकौनि श्रवणीं । देओ उपहौडलें ॥' –दाव ३११. [ उ+पहुडणें ]

**उपळ**—पु पाषाण; दगड. उपल पहा. 'जडा उपळा अवचटे । लागती श्रीचरणेशीं झटे ।' –ज्ञाप्र ४०५. [ सं. उत्पल ]

**उपळ–ळी, उपळण**—स्त्री. १ फार पाऊस पडल्यानें जागोजाग झरे फुटून पाणी बाहेर यावें अशी भूमीस अवस्था होते ती. २ –पु. असे जमिनींतून बाहेर येणारे झरे, प्रत्येक. ३ (ल.) घोणस किंवा फुरसें चावल्यामुळें शरीरांतून रक्त वाहूं लागतें ती अवस्था. ४ ( व्यापक. ) ( स्त्रियांस ) विटाळ अतिशय होण्याची अवस्था; धुपणी. ५ जोरानें उठणें; उत्पन्न होणें; जोर करणें ( दमा, खोकला, ताप, दुखणें, रोग, इ० ) [ सं. उत्+प्लु ]

**उपळ जमीन**—स्त्री. ज्या जमिनींत पावसाचें पाणी अतिशय जिरल्यामुळें जिला पाझर फुटले आहेत अशी जमीन.

**उपळणें**—अक्रि. १ पाणी जिरून सांचल्यामुळें (जमीनींतून) पाझर फुटणें, उपळी होणें. २ शरीराच्या छिद्रांतून किंवा हिरड्यांतून वगैरे रक्त वाहूं लागणें. ३ जमीन भिजून सैल झाल्यामुळें वर उपटून येणें; उफळणें; उपटलें जाणें ( झाड वगैरे ). [ उपळ ]

**उपळवट–टा**—स्त्री. १ पाणी फार जिरल्यामुळें पाझर फुटलेली जमीन; उपळ जमीन; भिजलेली, मुरलेली जमीन. २ ( ल ) ( विशेषतः उपळवट ) चंगळ; गडगंज; समृद्धि. ( क्रि० करणें; येणें; होणें ). –वि. १ उपळ असणारी; ओलाव्याची; मुरलेली ( जमीन ). २ नेहमीं पाझर असलेली ( जमीन ). [ उपळ ]

**उपळवणी**—न. १ जमीनींतून वाहणाऱ्या पाझराचें, उपळीचें पाणी. २ ( ल. ) संपत्ति; मान; सन्मान; सुख इ० ( क्षणिकत्व दर्शविण्यासाठीं ). [ सं. उत्+प्लु. वन=पाणी; उपळ+वणी ]

**उपळसरी, उपरसाळ**—स्त्री. अनंतमूळ पहा. श्यामा; इंडियन सार्सापरेला; दुद्धोळी; उपरसाळ ( चुकीनें ) आस्वली; हिच्या दोन जाती आहेत–एक पांढरी व दुसरी काळी. वेल काळसर तांबूस रंगाचा असून पानें तरवारीच्या आकाराचीं, अर्धबोट रुंद व तीन अंगुळें लांब असतात. ही रक्तशोधक आहे. हिला उपटखुटी; लहान कावळी; शेत कावळी; शेंबवेल अशींहि नांवें आहेत. [ सं. उत्पल= दगड+सृ=सरणें ]

**उपळी**—स्त्री. झरा; पाझर. उपळ पहा. [ सं. उत्+प्लु ]

**उपळी**—वि. पाषाणमय; दगडी. उपळ पहा. 'असो हे सोमकांत उपळी । जेवि द्रविजे चंद्रकळी ।' –ऋ २४. [ सं. उत्पल ]

**उपळी**—स्त्री. ( खा. ) गाडीच्या साटीच्या दोन्हीं बाजूंस समांतर असणाऱ्या सहा पट्ट्यांपैकीं प्रत्येक.

**उपज्ञा**—स्त्री. मूळचें ज्ञान; उपजत बुद्धि; आद्यज्ञान [ सं. उप+ज्ञा ]

**उपाइणें**—उक्रि. १ आरंभ होणें; आरंभणें; उत्पादणें; पातणें; जवळ येणें. 'आतां उत्तमखंड उपाइलें । ग्रंथाचें ऐका ॥' –ज्ञा १०.४०,

२ उपन्न होणें; मिळणें; प्राप्त होणें. 'तेंचि आमुचें देणें उपाइलें।' –ज्ञा १०.१३२. ३ विस्तार करणें, पावणें. 'तेंचि येक वेगळालें। येथ चिन्हीं अळंकारलें ॥ सांगिजेल उपाइलें। भेदेलपणें ॥' –ज्ञा १८.६९५. [ सं. उप+इ=जवळ जाणें ]

**उपाइलें**—वि. १ उत्कृष्ट; आवडतें; 'तेसें आत्मसुख उपाइलें। जयासि आपणपांचि फावलें ॥' –ज्ञा ५.१०८. २ प्रशस्त; मोठें.

**उपाई येणें**—क्रि. १ घोडा वगैरे जनावरानें पुढील पाय उभारून मागील पायांवर उभें राहणें. २ क्रोधावेशानें दुसऱ्यावर चालून जाणें; निकरावर येणें. [ सं. उत्+पद्–पाद; प्रा. उप्पाय ]

**उपाओ**—पु. इलाज; उपचार. उपाय पहा. 'तंव भणे यादवराओ। एठ हाचि उपाओ।' –शिशु ७४१. [ सं. उपाय ]

**उपाकरण, उपाकर्म**—न. १ प्रतिवर्षी यज्ञोपवीत धारण करण्याचा विधि; श्रावणी. २ वेदाध्ययनास आरंभ करतेवेळीं करावयाचें कर्म; वेदाध्ययनास आरंभ. [ सं. उप+आ+कृ ]

**उपाख्यान**—न. लहान कथा; गोष्टींत गोष्ट; लहान गोष्ट. आख्यानांतर्गत उपकथा; दृष्टांतकथा; एखादी मोठी गोष्ट सांगतांना मध्येंच प्रसंगानें सांगावयाची लहान गोष्ट. [सं. उप+आ+ख्या=सांगणें ]

**उपांग**—न. १ गौण अंग; भाग; लहान अवयव; भेद; प्रकार; शाखा; मोठ्या कार्यास साहाय्यभूत करावयाचें लहान कार्य; आनुषंगिक विधि. 'मोहरी पांवे मृदंग। डफडीं सनया उपांग। मिरवत जातसे श्रीरंग। नंदयशोदेसहित पै।' –ह ११.२२२. 'कारागिरास... धंदा मुख्य व शिक्षण हें उपांग असतें.'–टि ४.७८. २ साधन,साहित्य, सामग्री यापैकीं गौण वस्तु; उपसाहित्य. 'कां गीत राहतां उपांगा। वोहटु पडे।'–ज्ञा १८.१०९३. ३ उपशास्त्र,मुख्य शास्त्राची, विद्येची पुरवणी. जसें–वेदांचें उपांग, पुराण; न्याय, मीमांसा व धर्मशास्त्र. [सं.उप+अंग] **०राग**–पु. (संगीत) मूळचा जो राग असेल त्याच्या स्वरांमध्यें थोडा बदल करून जो रागाचा पोटभेद तयार होतो तो. **०ललिता**–स्त्री. आश्विन शुद्ध पंचमीस (ललितापंचमीस) पूजन करावयाची एक देवता. **०वियोग**–पु. एखाद्या वस्तूचे भाग निरनिराळे करणें, मोकळे करणें, उलगडणें, पृथक्करण.

**उपाग्रसर**—पु ( गणित ) प्रमाणांत असलेल्या दोन संख्यां पैकीं ( युग्मापैकीं ) दुसरी संख्या; पहिलीस अग्रसर म्हणतात. –छअ १०४. अग्रसर पहा. [ सं. उप+अग्र+सृ–सर ]

**उपाट**—क्रिवि. तोंडोतोंड; सांडेपर्यंत; गच्च; वाहण्यासारखें (पाण्यानें भांडें भ.**ण**, सपत्ति). उपट अर्थ १ पहा. [ सं. उत्+पत्–पात ]

**उपाड**—न. १ ( बडोदें ) उचल; उचापत; उधार. 'वर्षप्रतिपदेनिमित्त व्यापारीवार होणाऱ्या उपाडाची रीतसर बिलें तयार होऊन...' –ऐरापु २.४७. २ खप; विक्री; उठाव ( मालाचा ). 'कमी उपाड झाल्यास त्याजबद्दल सरकारांतून नुकसान मिळणार नाहीं अशी शर्त ठेवावी.' –स्वारी नियम ( बडोदें ) ९६. [सं. उत्+पत ; गु उपाडवु=उचलणें]

**उपाडा**—पु. उच्छेद; पराभव; पाडाव. 'आवडी नावडीचा. उपाडा। करूनि निधडा भोजनीं ॥' –एभा ११.९३६. [ सं. उत्+पत्=पडणें ]

**उपाणणें**—उपणणें पहा.

**उपाणें**—न. उखाणा, कोडें. –शर.

**उपांत**—पु १ सींव; काठ; कड; शेवट. २ डोळ्याचा कोपरा; अपाग [ सं उप+अंत ]

**उपांत-तिक**—वि. जवळचा; शेजारचा; शेवटाजवळील; कांठावरचा. [ सं. उप+अंत ]

**उपांतिम-उपांत्य**—वि शेवटच्या जवळचें; अखेरीच्या अलीकडचें; अंत्याच्या मागचा; उपांत्य ( वर्ण, स्वर ). 'अंतिम तो अंतिम, तो उपांतिम होऊं शकत नाहीं, किंवा अंतिमाच्या खालच्या पायरीचाही असणें शक्य नाहीं.'–टि ३ २४८. [ सं. उप+अंतिम ]

**उपात्त**—वि. गृहीत; स्वीकृत, स्वीकारलेलें; कबूल केलेलें. 'उपात्तविद्यो गुरुदक्षिणार्थी।' –रघुवंश ५.१. [ सं. ]

**उपादान**—न. १ ग्रहण; स्वीकार; घेणें; कबूल करणें; मान्य करणें; मान्यता; मंजुरी. २ प्राप्ति; संपादन. 'एथ अविद्यानाशु हें स्थळ। तेणें मोक्षोपादान फळ।' –ज्ञा १८.१२४३. ३ साक्षात् कारण; समवायिकारण. उपादानकारण पहा. (जसें– घटास माती). 'येर आत्मतत्त्व उदासीन। तें ना हेतु ना उपादान।' –ज्ञा १८.३०६. [ सं. उप+आ+दा ] **०कारण**–न. ( तत्त्व ) समवायिकारण; घटकद्रव्य. 'कार्याचे उत्पत्तीस ज्या जड द्रव्याची आवश्यकता असते त्यास उपादानकारण म्हणतात. पुस्तकांचें कागद, शाई, दोरा हें; मेजाचें लांकूड, खिळे हें उपादानकारण होय.' –न्यायप २६. **०लक्षणा**–स्त्री. ज्या लक्षणेनें वाक्यार्थाचा अन्वयबोध व्हावा म्हणून शब्दांच्या मुख्यार्थासह त्या मुख्यार्थानें सूचित केलेला इतर अर्थ याचें ग्रहण करितात तिला उपादानलक्षणा म्हणतात.' अजहत्स्वार्थलक्षणा पहा. 'शोकीं बुडवूं पाहे स्वावासा पर जसा परावासा।' ( स्वावासा=आपल्या घरांतील मनुष्यास ) –मोभीष्म ३.४८. 'तो चमत्कार पाहण्यास पांचशें गाडी लोटली होती.' येथें गाडी या शब्दांत त्यांतील मनुष्यें अंतर्भूत होतात.

**उपादेय**—वि. स्वीकार करण्यास योग्य; मान्य करण्यालायक; स्वीकारार्ह; ग्रहणार्ह; ग्रहण करण्यास योग्य. [ सं. उप+आ+दा ]

**उपाद्धीक**—न. ( कुण. ) उपाध्यायपण; जोसकी; भिक्षुकी; उपाधपण पहा. [ सं. उपाध्याय ]

**उपाध**—स्त्री.त्रास;पीडा;दुःख. उपाधि पहा. 'जाणतियां पाठीं लागला उपाध। नेणता तो सिद्ध भोजनासी ॥' –तुगा ३५०६. [ सं. उपाधि ]

**उपाधपण, उपाध्यपण, उपाधीक**—नस्त्री. १ उपाध्यायाची वृत्ति, काम; पौरोहित्य; जोसकी; भिक्षुकी. २ उपाध्यायास मिळणारी बिदागी, वेतन, प्राप्ति, दक्षणा. ३ उपाध्यायास असणारें वतन. [ सं. उपाध्याय ]

**उपाधपेठ, उपाधपेठीचें**—वि. १ उपाध्यायास लग्न, मुंज वगैरे प्रसंगीं देतात तसें (सणंग, पागोटें वगैरे). २ हलक्या प्रतीचें; कमी किंमतीचें; अगदीं साधें; क्षुल्लक; टाकाऊ [ सं. उपाध्याय+पेठ ]

**उपाधि**—पुस्त्री. १ शुद्धस्वरूप पदार्थावर अन्यरूपता भासविण्यास कारणीभूत असणारें पदार्थांतर. उ० रंग द्रव्यानें पाण्यास रंगीत स्वरूप येतें, येथें रंगद्रव्य हा उपाधि होय. 'आकारविशेषरूप उपाधि झाला म्हणजे सुवर्ण अलंकारादि व्यपदेश पावतें.' २ कोणेका पदार्थापासून विलक्षण कार्य उत्पन्न होण्यास प्रयोजक असें कांहीं एक; ( सामा. ) कारण, उत्पादक, प्रवर्तक, परिणामकारक, कार्यकारक गोष्ट. उ० अग्नीपासून धूर होतो त्यास आर्द्रेंधनसंयोग उपाधि होय. ३ प्रसंग; कारण; निमित्त; प्रयोजन. ४ विशेष गुणधर्म; गुणविशेष. ५ पदवी; टोपण नाव; अन्वर्थक नांव; विशेषण ( आवडीनें किंवा उपहासानें दिलेलें ). ६ ( वेदांत ) जग; माया; बाह्यपाश, संग. 'करिती नावडतेयां त्याग। उपाधींचे।'—ज्ञा १७.३६२. ७ प्रपंच; संसार. 'जीवु तैसा उपाधि। आवडे लोकां।'—ज्ञा ४.२१. ८ विकार;विचार. —आगमसार पंचिका १.२.५०. ९ त्रास; अडथळा; उपसर्ग; अडचण; आपत्ति; संकट; भानगड; लचांड; लिगाड. 'रायाच्या मनीं नव्हतें, पडूं नये उपाधीला।'—ऐपो ४१०. 'राजकीय बाबतींत अशा उपाधी म्हणजे लोकांचा असंतोष, आग्रह...ह्याच होत.'—टि ३.२५९. १० ( रामदासी ) चळवळ; खटपट. 'उपाधीसी विस्तारावें। उपाधींत न सांपडावें।'—दा ११.५.९. 'सांकडीमधें वर्तो जाणे। उपाधीमधें मिळों जाणे॥'—दा ११.६.१३. [ सं. ] ०**निरास**—पु. उपाधि नाहींशी करणें.

**उपाधीक**—वि. ( प्र. ) औपाधिक; उपाधि असलेलें; उपाधीसंबंधीं. [सं. उपाधि ]

**उपाध्यक्ष**—पु अध्यक्षास मदत म्हणून किंवा त्याच्या गैरहजेरींत काम करण्यास घेतलेला किंवा निवडलेला मनुष्य. [ सं. उप+अध्यक्ष ]

**उपाध्या-य**—पु. १ पुरोहित; भटजी; भिक्षुक; धार्मिक कृत्य चालविणारा; तीर्थक्षेत्रादि स्थळीं यात्रा व इतर धर्मकृत्यें यथासांग घडविणारा; कुलोपाध्याय; ग्रामोपाध्याय; तीर्थोपाध्याय. 'सांगे उपाध्या संध्यावंदन।'—दावि २१. २ ( ल. ) भामटया; —मनको. ३ वेदादि विद्या शिकविणारा गुरु. [ सं. उपाध्याय ] ( कोणेक वस्तूस ) **उपाध्या भेटणें**—वस्तु चोरीस जाणें. —**चें सणंग, पागोटें**—उपाधपेठ पहा. **म्ह०** नवरा मरो कीं नवरी मरो उपाध्याला दक्षिणेशीं कारण=मतलबाशीं गांठ घालणाऱ्याबद्दल वापरतात.

**उपाध्येपणा**—पु. भिक्षुकी; उपाध्यायाची वृत्ति. उपाधपण पहा.

**उपानयन**—न. घोडयावर स्वार बसला असतां घोड्यानें पुढचे दोन्ही पाय वर करणें ही खोडी. उपाई येणें पहा.—अश्वप १०१. [सं.]

**उपानह**—पु. पादत्राण; पायतण; जोडा. 'जेआं हृदए उपानहौ सदैवीं। मैळविजति॥'—ऋ ३५. [ सं. उपानह्; हिं उपानत; गु उपान ]

**उपाय**—पु. १ युक्ति; योजना; इलाज; तजवीज; साधन; उपयुक्तक्रियाविनियोग 'तूंनें करूनि पुढें। जे उपायें घेती दवडे। तयां टाकसी वहुतें पाडें। मागांचि तूं॥'—ज्ञा १७.१२. २ साम, दाम, दंड, भेद यांपैकीं प्रत्येक. [ सं. उप+इ, उपाय ] ०**चतुष्टय**—न. साम, दाम, दंड, भेद हे युद्धशास्त्र किंवा राजनीतींतील चार उपाय.

**उपायन**—न. १ देणगी; भेट; नजराणा; उपहार. 'समर्पिलिं उपायनें। राया कृष्णजीतें॥'—रास १.११९; 'समर्पितों याच उपायनाहीं।'—सारुह १.३४. २ वायन; वाण. [सं. उप+इ]

**उपायिणें-लें**—उपाइणें-लें पहा.

**उपायीं, उपायीं येणें**—उपाई येणें पहा. १ पुढील पाय उचलणें. 'उडी मारून त्याजवर बसतेवेळीं तो उपायी ( दोन पायांवर ) उभा राहील.'—अश्वप २२६. २ निकरावर येणें. 'चिनी सरकार विशेष उपायीं न येतां सामोपचारानें, शिस्तीनें झगडत आहे.'—के १६.४.३०.

**उपायी**—वि. उपाय योजणारा; युक्त्या काढण्यांत तरबेज; कल्पक बुद्धीचा; युक्तिबाज; प्रयत्न करणारा. [ सं. उप+इ ]

**उपाये**—पु. उपाय पहा. 'जेथें श्रवणाचा उपाये। आणि परमार्थसमुदाये।'—दा १.८.२१. [ सं. उप+इ ]

**उपायेण**—न. उपायन पहा. 'नातरी तेणें आणिलें। उपायेण श्रीकृष्णजीतें।'—रास १.१२.

**उपार**—पु. उपहार; उतारा; देवांदिकांस किंवा भूतपिशाचादिकांस तांदूळ, साखर वगैरे अर्पण केकेले पदार्थ. [ सं. उप+आहार ]

**उपार्जणें-र्जिणें**—१ क्रि. मिळविणें; संपादन करणें. 'जेणें प्रकृतीचें भोगिजे। उपार्जिलें।'—ज्ञा ८.३३. २ आर्जव करणें; खुशामत करणें. [ सं. उप+अर्ज् ]

**उपार्जन**—न. संपादन; मिळविणें; प्राप्त करून घेणें. 'जया राज्य द्रव्य करणें उपार्जना। वश दंभमाना इच्छे जाले॥'—तुगा १०६५. [ सं. उप+अर्ज् ] ०**पट**—पु. वृत्तिपत्र; इनामपत्र.

**उपार्जना**—स्त्री. १ आर्जव; खुशामत; खुषमस्करी; याचना; नीचसेवा. २ मिळविणें; संपादन करणें. [ सं. उप+अर्ज् ]

**उपार्जित**—वि. संपादिलेलें; मिळविलेलें. 'उत्पन्न झालेले उपार्जित गुण' –नीतिशास्त्र प्रवेश ३२१ सामाशब्द-पूर्वोपार्जित, आत्मोपार्जित. [ सं. उप+अर्ज् ]

**उपाव-वो**—पु. युक्ति; इलाज. उपाय पहा. 'येविषईं असे उपावो।' –विपु २.४८. 'आतां हें न चले कांहीं। उपाव सांगतां देही॥' –ब ६१३. 'तुटली आयुष्याची दोरी नाहीं उपाव।' –ऐपो १५४. [ उपाय अप. ]

**उपावणें**—अक्रि. १ पायांच्या टांचा वर करून आंगठयावर भार देऊन उभें राहणें; पायाच्या बोटांवर उभें राहणें. २ मागल्या पायांवर उभें राहणें ( घोड्यानें ); उपाई येणें पहा.

**उपाशी, उपाशीपोटीं, उपाशेपोटीं, उपाशीतापाशी, उपाशी वनवाशी**—वि. क्रिवि. न जेवलेला, रिकाम्या पोटीं; अन्न विरहित; न जेवतां, न खातां, अनशवे पोटीं. उपासी पहा. [उप+वस्] 'हिंदुस्थानची स्थिति कशी आहे हें उपाशी पोटी आम्हास जितकें समजतें तितकें ... समजणें कठिण आहे.' –टि २.३९९. **म्ह०** १ उपाशी मागती भाकर शिळी, देव देतो साखरपोळी. २ ( क. ) ब्राह्मणाला उपाशी ठेवूं नये आणि मुसलमानाला जेवायला घालूं नये. ३ ( गो. ) उपाशी असलेल्याक उष्ट्याचो कंटाळो ना. =उपाशी माणसास कांहींहि चालतें. ४ उपासाला केळें आणि वनवासाला सिताफळें.

**उपांशु**—क्रिवि. हळू, हलक्या आवाजांत; शब्द बाहेर न उमटतां [ सं. ]

**उपास**—पु. उपवास पहा. [ सं. उपवास; प्रा. उआस ] **उपासाची चूल करणें**—जेवणाचा स्वयंपाक झाल्यावर निराहाराचे पदार्थ शिजविण्यासाठीं पोतेरें घालून चूल सोंवळी करणें.

**उपासआनास-तापास**—पु. १ उपवासादि व्रतनियम; कडक व्रत. २ (ल.) देहदंडन; कष्ट. [ उपास द्वि; उपास+तपस् ] **उपासीं तापासीं बसणें**—कांहीं न खातां राहणें; जिवाचे हाल करून घेणें.

**उपासक**—पु. उपासना, पूजा करणारा; भक्त; सेवेकरी. [सं. उप+आस्=बसणें] **०बंधुत्व**—न. उपासकांमधील बंधुभाव. 'त्यांच्यामध्यें ( उपासकांमध्यें ) उपासक बंधुत्वाची बुद्धि जागृत होते.' –टि १.४८७.

**उपासकर-री**—पु. उपास करणारा.

**उपासंग**—पु. बाण ठेवण्याचा भाता. 'या सैन्याबरोबर... उपासंग...इ० साधनें होतीं' हिंलइ. २२. [ सं. ]

**उपासणें**—क्रि. उपासना, आराधना करणें; प्रार्थणें; पूजा करणें; भक्ति करणें. 'आम्हीं हा स्वधर्मुचि विहिला असे। यातें उपासा मग आपैसे। पुरती काम।' –ज्ञा ३.८८. 'कवण उपासूं गे देवता। कवणकवण्या जाऊं तीर्था। कवण नवस नवसूं आतां। कृष्णनाथ प्राप्तीसी।' –एरुस्व २.४२. [ सं. उप+आस् ]

**उपासतान**—स्त्री. १ उपास आणि तहान. २ (ल.) कष्ट; देहदंडन [ उपास+तहान ] **०काढणें**—अन्नपाण्याशिवाय काळजीनें, कष्टानें, दुःखानें दिवस काढणें. **०पाहणें**—एखाद्याची काळजी वाहणें; त्याच्या अन्नपाण्याची तजवीज करणें.

**उपासन**—न. उपासना, पूजा; पूजन; अर्चन; आराधना; होम हवन इत्यादि उपासना पहा. 'मग उपासन जिहीं आणिलें। योगाग्नीचें।' –ज्ञा ४.१२२. 'वेदभूषणा वरदराजा। उपासन करावें।' –वेमीस्व १२.४४. [ सं. उप+आसन ]

**उपासना**—स्त्री. १ भक्तिः पूजा; अर्चा; सेवा; आराधना. 'मुख्य उपासनालक्षण। नाना कवित्वलक्षण। नाना चातुर्यलक्षण। बोलिलें असे।' –दा १.१.१०. २ सेवा; नेमधर्म; ( गुरुमंत्र जपण्याचा इ० ) सामाशब्द–आत्मोपासना, ज्ञानोपासना; कर्मोपासना. ३ ( रामदासी ) उपास्यदैवत 'उपासना तेथ उभी आहे।' –रामदासी २.७९. [ सं. उप + आस् ] **०कांड**—न. वेदाच्या तीन कांडांपैकीं ज्यामध्यें उपासना सांगितली आहे तो भाग; यजुर्वेद. **०निरूपण**—न. केलेल्या कर्माचें अखेरीस जें देवतेला समर्पण करितात तें. **०मार्ग**—पु. ईश्वराचें चिंतन, मनन, ध्यान इत्यादींचें आचरण. 'उपासनामार्गानें जाणाऱ्या भक्तांना भक्तिमार्गी म्हणतात.' –टिसू ३८. **०यंत्र**—न. ग्रह व देवता यांची उपासना करण्यासाठीं धातूवर किंवा कागदावर काढलेली विशिष्ट आकृति. 'ना तरी उपासनायंत्र। तैसें दिसे सैन्यसूत्र। भीमकी मध्यपीठ पवित्र। कृष्णक्षेत्र निजबीज।' –एरुस्व ६.५५.

**उपासपारणें**—न. उपास करणें व सोडणें; उपासतापास. ( क्रि० करणें; धरणें; मांडणें; लागणें ). [ उपास+पारणें ]

**उपासमर-मार-मारा**—स्त्रीपु. १ अन्नावांचून मरणें किंवा मारणें; अन्नान्नदशा. २ अर्धपोटीं ठेवणें; कंजूषपणा करणें; एखाद्यास कोणतीहि वस्तु पुरेशी न देणें. [ उपास+मरणें ]

**उपासमाजगा-माजरू**—वि. ( माण. व. ) उपाशी राहून सुद्धा कामधंदा न करणारा; अन्नान्नदशा असूनहि माजलेला. [ उपास+माजणें ]

**उपासित**— वि. ज्याची पूजा, भक्ति, अर्चा इ० केली आहे असा, सेवा केली आहे असा; आदरिलेला; पूजिलेला. [ सं. ]

**उपासी**—वि. १ उपास केलेला; अन्न न खाल्लेला; उपवासी. 'तीन दिवसांचा उपासी अंतेज।' –रामदासी २.१५८. **२ भुकेलेला;** भूक लागली आहे असा. [उपास] **०मरणें**–भुकेमुळें व्याकुळ होणें; खायाप्यायास न मिळून मृतप्राय होणें. **म्ह०** पिकल्या झाडाखालीं उपासी मरणें ( अगदीं ऐदी, आळशी माणसाला लावितात ). **०अनासी-तापासी-कराडी-पोटी**—वि. क्रिवि. १ अन्नाशिवाय.

भुकेलेला; अन्नावांचून असलेला. २ उपवासी; उपास केलेला. **उपासी पोटीं अन्न ठेवणें**–आपण उपाशी राहून दुसऱ्यास अन्न ठेवणें ( शुद्ध सेवेचा एक प्रकार ).

**उपास्ति**—स्त्री. १ उपासना; भक्ति; पूजा; अर्चा; आराधना; सेवा. 'उपास्तिवेऱ्ही राबतया । उपायफळि येती मोडोनियां ।' –अमृ २.१७. 'तैसी दोनी ये मतें । सूचिती एका कारणातें । परी उपास्ति ते योग्यते । आधीन असे ।' –ज्ञा ३.४०. 'त्यां मज सूर्याची उपास्ती । सौरसूक्तीं त्रैविद्या ।' –एभा ११.१३३२. [ सं. उप+आस् ]

**उपास्य**—न. ज्याची उपासना करावयाची ती देवता, दैवत, आराध्य दैवत. –वि. पूजा करण्यास योग्य; पूजनीय. **०दैवत**–न. १ उपासनेची देवता. २ पूज्य व्यक्ति. [ सं. ]

**उपाहार**—पु. १ फराळ; जेवणांतील मुख्य पदार्था ( भाता ) शिवाय इतर पदार्थ; अल्पाहार. २ फराळ करणें. [ सं. उप+आहार ]

**उपाळा**—पु. १ उमाळा; उपळी; आवेग; उकळी. 'फुटला शरिरांत ह्या काम उपाळा । कर शांत नृपाळा ।' –प्रला १२७ २ अश्रू; पाणी. उपळ पहा. 'आम्हांस टाकुन जाशी कृपाळा । पशुपक्षांच्या नेत्रीं उपाळा ।' –प्रला २५९. [ सं. उत्+प्लु ]

**उपाळी**—स्त्री. उपहास; थट्टा; निंदा; चेष्टा; टवाळी; मस्करी. [ प्रा. उप्फाल=खल, दुर्जन ? ]

**उपिकणें**—अक्रि. अविकणें; पिकून अधिक होणें; वाजवीपेक्षां अधिक पक्व होणें. [ सं. उत्+ पच् ]

**उपिट, उप्पिट्टु**—न. १ (क) तिखटमीठ घालून ओलें करून वाफ दिलेलें लाह्यांचें पीठ २ तिखटमिठाचा सांजा. [ का. उप्पु= मीठ+इट्टु=पीठ ]

**उपिठणें**—अक्रि. आर्द्रता कमी झाल्यामुळें किंवा सारखें भाजलें न गेल्यामुळें भाकरी वगैरेस भेगा पडणें; पिठुळणें. [ सं. उत्+पिष्ट ]

**उपीठ**—वि. उपिठलेली (भाकरी, खापरपोळी इ०) [ सं. उत्+ पिष्ट; म. पीठ ]

**उपींत वेणें-पिणें**—अक्रि १ उच्छृंखलपणें, अविचारानें वागणें. २ अतिशय घाईंत असणें. [ सं. उत्+पत् ]

**उपीवणें**—अक्रि. (व.) गुप्त होणें; नाहींसें होणें. [ सं. उत+ पत् ]

**उपेखणें**—उपेक्षणें पहा. 'तरि केवीं तिये वरि स्वामियान । उपेखुनु बोलिलें ।' --खिपु २.३६.३७. [ सं. उप+ईक्ष् ]

**उपेग**—पु. उपयोग; प्रयोजन; जरूरी; गरज; फळ. 'एरी भणे जरि तिएचा अनुरागु । तरी एथ आलेआ कवण उपेगु ।' –शिशु १८२. 'एथ एकचि उपेगा जायें । परमामृत ।' –ज्ञा २. ६७. [ उपयोग ]

**उपेगा-गी**—वि. उपयोगी. 'येऱ्हवीं परादिका चौथी । जीव मोक्षाच्या उपेगीं ।' –अमृ ३.२. **०येणें**–उपयोगी पडणें. 'येथें येतां न भागा त्वरित हरजगा तीर्थ आलें उपेगा ।'–ब ६८७. [ उपयोग ]

**उपेड**—वि (राजा.) जेथून दूरवरचें दृश्य दिसेल अशी उंचावर असलेली; उंचाड; उंचवट ( जमीन ). [ सं. उत+पीठ ]

**उपेणी-णें**—स्त्रीन. १ वस्ती; वास; विश्रांतिस्थान; राहण्याची जागा; राहावा 'नानारुची केली उवेणी । कीं पाचि प्रभेची वाणी ।' –ऋ ८३. 'स्वर्गा करौनि उपेणें । मागिजे मुखाचें केणें ।' –शिशु ८५८. 'तैसेनि आइतेपणें । कवित्व जालें हें उपेणें ।' –ज्ञा १८. १७४६ २ जवळ जाणें, येणें. 'उपेणें करितां कुसुमाकरां । झाडे वेधेति शृंगारा । तेथ कोकिळांची पाति दर्दुरा । केवि लाभे ।' –ऋ ५२. 'उपेणें पावला चकोरु ।' –कृमुरा ३५.४७. [ सं. उप+इ= जाणे ]

**उपेत**—वि जवळ गेलेला. [ सं. उप+इत ]

**उपेंद्र**—पु इंद्राचा धाकटा भाऊ. विष्णु. 'उपेक्षिसी तूं मज कां उपेंद्रा ।' –सारुह १.९. [ सं. उप+इंद्र ]

**उपेंद्रवज्रा**—स्त्री. एक समचरण वृत्त. याच्या प्रत्येक चरणांत ११ अक्षरे असुन ज, त, ज, ग, ग असे गण येतात. उ० चले वदेही वर दान देही । तथापि हा राघव दान देही । न देह हा भाग्य अहो जनाचें । विचित्र कर्तव्य निरंजनाचें ॥' [ सं. उप+इंद्र+वज्र ]

**उपेय**—वि. उपायानें प्राप्त करून घेण्यासारखी; साध्य (गोष्ट). 'म्हणौनि उपेयही हातीं । जालया उपायस्थिती ।' –ज्ञा १८. १२८५. [ सं. उप+इ ]

**उपेक्षक**—वि. उपेक्षा, अव्हेर करणारा; दुर्लक्ष, टाळाटाळी करणारा. [ सं. उप+ईक्ष् ]

**उपेक्षणीय-क्ष्य**—वि उपेक्षा करण्यास योग्य; कानाडोळा करण्यासारखा; लक्ष न देण्यासारखा. [ सं. ]

**उपेक्षणें**—उक्रि. १ उपेक्षा करणें; दुर्लक्ष करणें; अव्हेर करणें; 'जेवीं नव्हे या बुद्धी । उपेक्षिला ।' –ज्ञा १०.१६१. २ त्याग करणें; सोडणें. 'नाहीं आइकिली मागें ऐसी मात । जे त्वां शरणागत उपेक्षिले ।' –तुगा १६३३. 'उपेक्षूं नको गुणवंता अनंता । रघुनायका मागणें हेंचि आतां ।' –राक. [ सं. उप+ईक्ष् ]

**उपेक्षा**—स्त्री. १ हयगय; दुर्लक्ष; अनादर; अव्हेर. 'किंवा उपेक्षेवरी । वाळूनि सांडिलें ।' –ज्ञा १८.१५४२. २ चालढकल; कानाडोळा; डोळेझांक ( गुन्ह्यांकडे, दोषांकडे ). ३ त्याग; सोडणें. [ सं. उप+ईक्ष् ]

**उपेक्षित**—वि. उपेक्षा केलेला; अव्हेरलेला; त्याग केलेला. [ सं. ]

**उपोद्घात**—पु. १ आरंभ; सुरवात; प्रस्तावना. २ परिचय; विषयप्रवेश. ३ (न्याय) ग्रंथातील प्रतिपाद्य विषयाला अनुरूप असें ग्रंथ–प्रकरणनाम; अवतरणप्राय ग्रंथाश. ४ उदाहरण; दृष्टांत. –अमरकोश. ५ पृथक्करण; विवरण; स्पष्टीकरण; तत्त्वशोधन. [सं. उप+उद्+हन्]

**उपोषण**—न. उपास; उपवास; निराहार, निरशन. [स. उप+वस्] ०**मंडळ**–न. (ख्रि) पुनरुत्थानाच्या सणाच्या पूर्वी करावयाचें चाळीस दिवसाचें उपोषण; लेन्ट या सॅक्सन शब्दाचा पर्याय लेन्ट म्हणजे वसंत. हे उपवास वसंतांत येतात म्हणून यांना वसंतोपवास असेंहि म्हणतात. 'उपोषणमंडळाचा आरंभ ॲश वेन्स्डे (राखेचा बुधवार) या दिवशीं होतो.' –उमं ५

**उपोषित**—वि. १ उपवास केलेला २ उपाशी [उप+उषित

**उपौडु**—जागृति. उपवड–ढ पहा.

**उप्तरणें**—अक्रि. (व.) फुगणें; सुजणें; उतणें त्याचें तोंड उप्तरलें आहे' उबतरणें पहा.

**उप्परमाडी**—स्त्री दुसरा मजला दुमजली घर; वरची माडी उपरमाडी पहा. 'ईश्वर त्याची मस्ती मोडी, आता कैची उप्परमाडी.' –अमृत ५२. [सं. उपरि; हिं. उप्पर+माडी]

**उप्पुपिंडी (शिरा)**—पु. (तेलगु) तिखटमिठाचा साजा उपिट पहा. –गृशि ४४५. [का. उप्पु=मीठ]

**उप्रांत**—अ. नंतर; मागाहून; उपरांत पहा.

**उफका–खा**—पु नाश. उपखा पहा. [सं. उप+क्षि]

**उफखणें–उफगणें**—अक्रि. उपखणें पहा. रिकामा होणें; रिक्त होणें; संकोच पावणें. 'आणि फुंकें भाता फुगे। रचिलिया सवेंचि उफगे।' –ज्ञा १३.६६४. [सं. उप+क्षि]

**उफट**—वि १ निस्तेज; फिकट; फिक्का (रक्तनाशामुळें). २ रोगट; आजारी. [सं उत+स्फट=तुटणें]

**उफटणें–डणं, उफंडणें**—अक्रि. फिकें पडणें, निस्तेज होणें पांढरें पडणें. –ज्ञा १७ १५६ [उफट]

**उफणणें**—उक्रि. उपणणें; वारवणें; वाऱ्यानें भूस उडविणें पाखडणें. [उत्+पवन; प्रा. उप्पण]

**उफणणें**—अक्रि. १ जोरानें वर येणें; वाढणें (पीक, झाड, मूल वगैरे). २ उतणें; अंगावर उठणें (पुरूळ, फोड, बिबा शेर, ज्वर वगैरे इ० उठणें, उतणें). ३ कुजणें; नासणें (फळें वगैरे). नासणें आंबणें; फुटणें (दूध वगैरे). ४ फुगणें; ताठणें (गर्वानें). ५ उसटणें तोडणें. 'नमोजी स्वच्छंदा सकल भवबंधा उफणिता॥' –वामन (व्याधाख्यान) २३ उपणणें पहा. [स उत्पन्न; प्रा. उप्पण्ण]

**उफर–रा**—पु (राजा. कु.) बाज; बार; बहर; पीक (वृक्ष, लता, शेत इ० स येणारा). [सं. उत्+भृ–भर; किंवा पूर]

**उफर–रा**—पु (राजा कु.) उपणणें; वारवणें [सं. उपरि; हिं उप्पर]

**उफरणें**—उक्रि. (राजा कु.) उपणणें, वारवणें; वाढवणें. [उफर]

**उफराटणें, उफरांडणें**—क्रि. १ उलटें होणें; अंग, तोंड विरुद्ध दिशेस फिरणें. उरफाटें होणें; उलट बाजूस जाणें; विपरीत होणें. २ डोळे चढले जाणें, फिरणें (मृत्युसमयीं किंवा बेशुद्धीनें); डोळे या शब्दाबरोबर किंवा नुसता प्रयोग. –सक्रि. उफराटा, उलटासुलटा करणें; वरचें अंग खालीं व खालचें वर असें करणें (धक्का इ० नें) 'त्या गड्यास या म्हशीनें उफरांडून पाडलें.' [सं. उत्+परावृत्]

**उफराटसुफराट, उफराटासुफराटा**—वि. उलटासुलटा; वरील बाजू खालीं व खालील बाजू वर असा. आंतील बाजू बाहेर व बाहेरील बाजू आंत असा; पुढील बाजू मागें व मागील बाजू पुढें असा व्यस्त व्युत्क्रम [सं उत्+परावृत; सु+परावृत]

**उफराटा**—वि क्रिवि. १ उलटा; विपरीत, परावृत्त; मागें; विरुद्ध; 'अहा कटा हें वोखटें। मृत्युलोकींचें उफराटें॥' –ज्ञा ९.५१५. 'उफराटे नमंदेही। अधो पाहात होते मही।' –नव १३.१३. २ (ल) चुकीचा. ३ उलट. प्रत्युत्तरदर्शक. 'बरवेपणें मोटी। होतें लक्ष्मीचें पोटीं। कृष्ण देखोनियां दृष्टी। तेही उफराटी लाजली।' –एरुस्व १.७३ [सं. उत्+परावृत] ०**न्याय**–पु. विचित्र, विपरीत न्याय; अन्याय. **म्ह०** उफराटा न्याय गालगुंडे खाय. –**टी गंगा**–स्त्री. उलट दिशेनें वाहणारी गंगा; संसाररहाटी, माया यांस उपमा देतात. 'उफराटीगंगा पाहतां मिळणें। सकळांस तेथें॥' –दा ११.७ ११. –**टी दुनिया**–स्त्री. उलटें जग; अव्यवस्था; बेबंदशाही; अनिर्बंधता. अन्यायाचरण –**टा बाहुली**–स्त्री अगदीं डोळ्यांजवळ धरल्याशिवाय दिसत नाहीं अशी दृष्टि, अधुदृष्टि; मंददृष्टि; दूरचें दिसत नाहीं अशी नजर –**ट्या काळजाचा**–वि. निष्ठुर; निर्दय. कृतघ्न. अति धाडशी अविचारी (मनुष्य). –**टें भांडण**–न कृतघ्नतेचें भांडण उपकार विसरून केलेलें भांडण; अन्यायाचें भांडण. उपकार, प्रेम करणाऱ्याशीं वितुष्ट. –**टें शहाणपण**–न. मूर्खपणा

**उफलणें**—अक्रि १ फुलणें. विकासणें; उमलणें. २ (ल.) उघडणें. विस्तीर्ण होणें उलणें. ३ पाझर फुटणें; द्रव येणें (हृदयास). ४ उदयास येणें. उघडणें अनुकूल होणें (दैव); [सं. उत+फल्]

**उफळणें**- अक्रि १ वर उडणें. जोरानें जाणें; वर जाणें. 'जो वरी उफळता खुर लागलाहे.' –नळ ३१. 'उफळाया बघती वेगें.' संग्रामगीतें १७ २ फाळानें उकरली जाणें (जमीन). उपळणें पहा [सं उत्+फल्, किंवा सं. उत्पाट्य्; प्रा. उप्फाल= उठवणें, उखडणें]

**उफा**—स्त्री (व.) अफवा; वदंता; ऐकीव बातमी; अवाई. [फा. अफवा]

**उफाट-ड-डा**—पु जोर; वेग; शीघ्रगति. 'उफाड जोड करीतु। पांचविअे धारें वावडतु॥' –शिशु ५३४. 'तें व्यार्थीचिया उफाडा। देतां सत्कथा काढा॥' –एभा १० १५. [ सं. उत्+फल ]

**उफाट्ट**—वि. ( गो. ) उफराटा पहा. –पु जोर; आवेग

**उफाडणें**—अक्रि. उडणें; उफळणें. 'व्याघ्र निज छायेसि उफाडे॥' –विपू ७ ४६. [ उफाट ]

**उफाड्याचा**—वि १ लवकर वाढणारा, जोराचा. २ भरदार; सुदृढ बांध्याचा; दणगट; फार सशक्त (वृक्ष, मनुष्य, पीक, मूल इ०). 'कशी उफाड्याची पोर आहे ती.'–मोर ११ –**चें हाड**–न सशक्त, जोरानें वाढणारें शरीर. –**ने वाढणें, वाढीस येणें**–क्रि लवकर, जोरानें वाढणें. –**ची जमीन–शेत**–स्त्री न लवकर व जोरदार पीक येणारें शेत.

**उफाणणें**—क्रि सुजणें. उफणणें पहा. 'त्याचें सर्वांग उफाणलें आहे.'

**उफाणा, उफान**—न.पु १ उकळी, कढ, ऊत. (क्रि० येणें). २ उतूं जाणें; कढ वर येणें(क्रि० जाणें) –वि उधळ्या [उत्+पवन] ०**गिरी**—स्त्री. १ चंगळ; समृद्धि. गडगंज. २ ( ल. ) उधळपट्टी; उधळेपणा; एखादी गोष्ट वाजवीपेक्षां जास्त असणें, ऊत येणें.

**उफार**—पु. ( गो. ) उपहार; फराळ. [ सं. उप+आहार ]

**उफारटा**—उफराटा पहा

**उफारशेट्या**—पु. कृतघ्न, उपकार कर्त्यावर उलटणारा, मित्रावर उलटणारा मनुष्य. [ उफराटा+शेट्या ]

**उफाळ-ळा**—वि. अधिक; वाजवीपेक्षां जास्त, पुरून उरलेलें; शिलकी ठेवलेलें. [ सं. उत्+फल् ] –पु १ उकळी, ऊत; उत्साह; जोर; आवेश; उफाड पहा. 'उफाळेंचि जाती भुजा फुरफुरीती।' –राक. 'पुण्याच्या पुण्यप्रदेशांत उफाळ्याला आलेला तो एरंड...' –इंप ८९. २ एकदम वर येणें; जोरानें उठणें; जोरानें बाहेर येणें, उसळी; ऊत (पाणी वगैरेस); ( क्रि० निघणें; येणें ). 'आंगें घेतुसे उफाळा। सिगेवरि॥' –ऋ ८१. 'नंदाचें मूल काळें। त्यासि नेलें काळें। कोण्हींयेका काळें। चालिलें उफाळें॥' –दावि २४१ 'नाना तीर्थींचीं कारंजीं बहुत। घरोघरीं उफाळत।'–राव ३६. १७२. ३ शिल्लक; वाढ.

**उफाळणें**—अक्रि. उफळणें पहा. १ उकळी येणें, ऊत येणें. २ वर येणें; वर चढणें ( जाळ वगैरे ). 'केला जरी पोत वळेंचि खालें। ज्वाला तरी ते वरती उफाळे।' –वामन ३ उसळणें; वर उडणें ( पाणी वगैरे ). 'कोठें गुप्त कोठें प्रगट। जैसें जीवन उफाळे आट।' –दा ९.८.२७. 'अभ्रीं उंच उफाळला। क्षितीतळीं तो येथ आंदोळतां।' –आक २१. ४ गर्वानें फुगणें, ताठणें. ५ फार वाढणें; वाजवीपेक्षां जास्त होणें. ६ नांगरणें; उकरणें. ७ उधळणें; धांवणें 'जैसा सिंह उफाळला हिमगिरीच्या गव्हरापासुनी'–आसी ६३. [ सं. उत्+फल्, फाल प्रा. उप्फाल ]

**उफाळणें**—उपणणें पहा.

**उफिटणें**—उपिठणें पहा.

**उफेणणें, उफिणणें**—अक्रि. ( कों. ) अधिक होणें; कुजणें; नासणें. भविकणें ( फळ वगैरे ). इतर अर्थीं उफणणें पहा.

**उफेवणें, उफेणें**—अक्रि. ( गो. कु. राजा ) वर येणें; (पाण्यांतून ) पृष्ठभागावर येणें, तरंगणें, उसळणें. उफणणें पहा.

**उंब**—पु एक मोठा वृक्ष.

**उंबई**—स्त्री. ( ना ) ओंबी पहा. [ सं. उंबी, उंबिका=ओंबी ]

**उबक-ग**—पु ( काव्य ) १ वांती; ओकारी; उमळ. २ ( ल. ) उमाळा; दुःखाचा आवेग; दयेचा पाझर; कींव. ३ कंटाळा; त्रास, वीट, उद्वेग. 'लौकिकाचा उद्वेगु। शास्त्रांवरी उबगु।' –ज्ञा १३ ११२. 'उबग मानूनी तो वना जाय। मार्गीं येऊनि त्या बोभाये।' –सुआदि २.४४. 'भागलिया आला उबग सहज। न धरितां काज आलें मनीं।'–तुगा १८५५. [सं उत्+पच्; का. उब्बु; उब्बिके=उमाळा, वर येणें; गु. उबक=वांती; हि. उबकना=ओकणें ]

**उबगट**—उबट पहा.

**उबगणें**—अक्रि. गुदमरणें; दरदरून घाम येणें; गदमदणें; उष्णता व गर्दी यांमुळें घाबरणें; गदगदणें. [ का. उब्बे=उष्णता, वाफ ]

**उबगणें**—अक्रि. कंटाळणें; त्रासणें; वीट येणें; ओकारी येणें. 'भणौनि उबगैलासि पोसु। जीवजातां।' –ऋ ३२. 'एथ अर्जुन म्हणे कटकटा। उबगिलों मागिल्या संकटा।' –ज्ञा ११.४५२. 'गगन शून्यत्वा उबगलें। कृष्णभेटीसी उदित जाहलें।'–एरुस्व ७७. –उक्रि. १ उपेक्षा करणें; तिरस्कार करणें; हयगय करणें; आबाळ करणें. 'उगें किमपि भाविका उबगशील तूं देव कां।' –केका २०. 'कदाचित तृणांकुरा उबगिजेल दिखारणी।' –आशिबी १४. २ टाकणें; त्याग करणें. 'मग उबगून विषयांसीं।' –पाप्र ५.२७१. [ उबक ]

**उबगणें**—उक्रि. शोधून काढणें; ओळखणें. उमगणें पहा. 'सापत्नभावाचें जणो उबगोनि चित्तीं।'–विवि ८.७.१२३. [सं. उपगमन –उबगअण–उबगण–उबगणें. –राज. भाअ १८३२. ]

**उबगवट्ट**—पु. कंटाळा. –शर ( ज्ञायो २.७७. )

**उबगवाणें**—वि. कंटाळवाणें. –शर ( भावार्थ रामायण १. २.५२ )

**उबजणें**—उमजणें पहा.

**उबजणें**—उक्रि. ( क. ) भातावर आधण घालून त्याचे उबजे करणें. उबजा पहा.

**उबजण**—( व. ) उभरणें पहा.

**उबजत**—उपजत पहा.

**उबजरणें**—अक्रि. क्षीण झालेली शक्ति पुन्हां येणें; पुनरुज्जीवन होणें, नवीन उत्साह धारण करणें; टवटवीत होणें ( प्राणी, वनस्पती ). [ सं. उत्+जृ ]

**उपोद्घात**—पु. १ आरंभ; सुरुवात; प्रस्तावना. २ परिचय; विषयप्रवेश. ३ (न्याय) ग्रंथांतील प्रतिपाद्य विषयाला अनुरूप असें ग्रंथ–प्रकरणनाम; अवतरणप्राय ग्रंथांश. ४ उदाहरण, दृष्टांत. –अमरकोश. ५ पृथक्करण; विवरण; स्पष्टीकरण; तत्त्वशोधन. [ सं. उप+उद्+हन् ]

**उपोषण**—न. उपास; उपवास, निराहार, निरशन. [ सं उप+ वस् ] ०**मंडळ**–न. (ख्रि ) पुनरुत्थानाच्या सणाच्या पूर्वी करावयाचें चाळीस दिवसाचें उपोषण; लेन्ट या सॅक्सन शब्दाचा पर्याय लेन्ट म्हणजे वसंत हे उपवास वसंतांत येतात म्हणून याना वसंतोपवास असेंहि म्हणतात. 'उपोषणमंडळाचा आरंभ ॲश वेन्स्डे ( राखेचा बुधवार ) या दिवशीं होतो.' –उमं ५

**उपोषित**—वि. १ उपवास केलेला. २ उपाशी [ उप+उषित

**उपोडु**—जागृति. उपवड–ढ पहा.

**उप्तरणें**—अक्रि (व.) फुगणें; सुजणें; उतणें. 'त्याचें तोंड उप्तरलें आहे' उबतरणें पहा.

**उप्परमाडी**—स्त्री दुसरा मजला दुमजली घर. वरची माडी उपरमाडी पहा. 'ईश्वर त्याची मस्ती मोडी, माता केली उप्परमाडी.' –अमृत ५२. [ सं. उपरि; हि. उप्पर+माडी ]

**उप्पुपिंडी ( शिरा )**—पु. ( तेलगु ) तिखटमिठाचा सांजा उपिट पहा. –गृशि ४८५. [ का. उप्पु=मीठ ]

**उप्रांत**—अ. नंतर; मागाहून; उपरांत पहा.

**उफका–खा**—पु नाश. उपखा पहा. [ सं. उप+क्षि ]

**उफखणें–उफगणें**—अक्रि. उपखणें पहा. रिकामा होणें; रिक्त होणें; संकोच पावणें. 'आणि फुंकें भाता फुगे। रचिलिया सवेंचि उफगे।' –ज्ञा १३ ६६४. [ सं उप+क्षि ]

**उफट**—वि १ निस्तेज, फिकट, फिक्का ( रक्तनाशामुळें ). २ रोगट; आजारी [ सं उत+स्फट=तुटणें ]

**उफटणें–डणें, उफंडणें**—अक्रि. फिकें पडणें, निस्तेज होणें पांढरें पडणें. –ज्ञा १७ १५६ [ उफट ]

**उफणणें**—उक्रि उपणणें; वारवणें; वाऱ्यानें भूस उडविणें पाखडणें. [ उत्+पवन; प्रा उप्पण ]

**उफणणें**—अक्रि. १ जोरानें वर येणें; वाढणें (पीक, झाड, मूल वगैरे). २ उतणें; अंगावर उठणें ( पुरूळ, फोड, बिबा शेर, ज्वर वगैरे इ० उठणें, उतणें). ३ कुजणें; नासणें ( फळ वगैरे ) नासणें आंबणें; फुटणें (दूध वगैरे). ४ फुगणें; ताठणें ( गर्वानें ). ५ उसळणें तोडणें. 'नमोजी स्वच्छंदा सकल भवबंधा उफणिता॥' –वामन (व्याधाख्यान ) २३ उपणणें पहा. [ सं उत्पन्न; प्रा. उप्पण्ण ]

**उफर–रा**—पु. ( राजा. कु. ) बाज; बार; बहर. पीक ( वृक्ष, लता, शेत इ० स येणारा ). [ सं. उत्+भृ–भर; किंवा पूर ]

**उफर–रा**—पु (राजा. कु.) उपणणें; वारवणें. [ सं. उपरि; हि उप्पर ]

**उफरणें**—उक्रि (राजा. कु.) उपणणें; वारवणें; वाढवणें. [उफर]

**उफराटणें, उफरांडणें**—क्रि. १ उलटें होणें; अंग, तोंड विरुद्ध दिशेस फिरणें; उरफाटें होणें; उलट बाजूस जाणें; विपरीत होणें २ डोळे चढले जाणें, फिरणें (मृत्युसमयीं किंवा बेशुद्धीनें); डोळे या शब्दाबरोबर किंवा नुसता प्रयोग. –सक्रि उफराटा, उलटामुलटा करणें; वरचें अंग खालीं व खालचें वर असें करणें ( धक्का इ० नें ) 'त्या गड्यास या म्हशीने उफरांडून पाडलें.' [ सं. उत्+ परावृत् ]

**उफराटसुफराट, उफराटासुफराटा**—वि. उलटासुलटा; वरील बाजू खालीं व खालील बाजू वर असा; आंतील बाजू बाहेर व बाहेरील बाजू आंत असा; पुढील बाजू मागें व मागील बाजू पुढें असा व्यस्त, व्युत्क्रम [ सं उत्+परावृत; सु+परावृत ]

**उफराटा**—वि क्रिवि १ उलटा; विपरीत, परावृत्त; मागें; विरुद्ध; 'अहा करा हें वोखटें। मत्युलोकींचें उफराटें॥' –ज्ञा ९.५१५. 'उफराटें नम्रदृष्टी। अधो पाहात होते मही।' –नव १३. १३. २ ( ल ) चुकीचा ३ उलट, प्रत्युत्तरदर्शक. 'बरवेपणें मोठी। होतें लक्ष्मीचे पोटीं। कृष्ण देखोनियां दृष्टी। तेही उफराटी लाजली।' –एरुस्व १ ७३ [ सं. उत्+परावृत् ] ०**न्याय**–पु विचित्र, विपरीत न्याय, अन्याय **म्ह०** उफराटा न्याय गालगुंडे खाय. **–टी गंगा**– स्त्री. उलट दिशेनें वाहणारी गंगा; संसाररहाटी, माया यांस उपमा देतात 'उफराटीगंगा पाहतां मिळणें। सकळांस तेथें॥' –दा ११. ७ ११. **–टी दुनिया**–स्त्री. उलटें जग; अव्यवस्था; बेबंदशाही; अनिर्बंधता, अन्यायाचरण **–टा बाहुली**–स्त्री अगदीं डोळ्यांजवळ धरल्याशिवाय दिसत नाहीं अशी दृष्टि, अधुदृष्टि; मंददृष्टि; दूरचें दिसत नाहीं अशी नजर **–ट्या काळजाचा**–वि. निष्ठुर; निर्दय, कृतघ्न अति धाडशी अविचारी ( मनुष्य ). **–टें भांडण**– न कृतघ्नतेचें भांडण उपकार विसरून केलेलें भांडण; अन्यायाचें भांडण, उपकार, प्रेम करणाऱ्याशीं वितुष्ट **–टें शहाणपण**–न. मूर्खपणा

**उफ़ळणें**—अक्रि १ फुलणें; विकासणें; उमलणें. २ ( ल. ) उघडणें, विस्तीर्ण होणें उलणें ३ पाझर फुटणें; द्रव येणें (हृदयास). ४ उदयास येणें उघडणें अनुकूल होणें (देव); [सं. उत+फल् ]

**उफळणें**– अक्रि १ वर उडणें, जोरानें जाणें; वर जाणें. 'जो वरी उफळता खुर लागलाहे.' –नळ ३१. 'उफळाया बघती वेगें.' सग्रामगीते १७ २ फाळानें उकरली जाणें ( जमीन ). उपळणें पहा [ सं उत्+फल्, किंवा सं. उत्पाट्य्; प्रा. उप्फाल= उटवणें, उखडणें ]

**उफा**—स्त्री (व.) अफवा; वदंता; ऐकीव बातमी; अवाई. [ फा. अफवा ]

**उफाट-ड-डा**—पु जोर; वेग; शीघ्रगति. 'उफाड जोड करीतु। पांचविअे धारें वावडतु ॥ ' –शिशु ५३४. ' तै व्याधीचिया उफाडा। देतां सत्कथा काढा ॥ ' –एभा १०.१५. [ सं. उत्+फल ]

**उफाट्ट**—वि. ( गो. ) उफराटा पहा. –पु जोर; आवेग

**उफाडणें**—अक्रि. उडणें, उफळणें. 'व्याघ्र निज छायेसि उफाडे ॥ ' –विपू ७.४६. [ उफाट ]

**उफाड्याचा**—वि १ लवकर वाढणारा; जोराचा. २ भरदार, सुदृढ बांध्याचा. दणगट; फार सशक्त (वृक्ष, मनुष्य, पीक, मूल इ०). 'कशी उफाड्याची पोर आहे ती '–मोर ११. –**चें हाड**–न सशक्त, जोरानें वाढणारें शरीर. –**नें वाढणें, वाढीस येणें**–क्रि लवकर, जोरानें वाढणें. –**ची जमीन-शेत**-स्त्री न लवकर व जोरदार पीक येणारें शेत.

**उफाणणें**—क्रि सुजणें. उफणणें पहा. त्याचें सर्वांग उफाणलें आहे. '

**उफाणा, उफान**—न.पु १ उकळी; कढ; ऊत. (क्रि० येणें) २ उतूं जाणें; कढ वर येणें (क्रि० जाणें) –वि. उधळ्या [उत्+पवन] ०**गिरी**—स्त्री. १ चंगळ; समृद्धि. गडगंज. २ ( ल ) उधळपट्टी; उधळेपणा; एखादी गोष्ट वाजवीपेक्षां जास्त असणें, ऊत येणें.

**उफार**—पु. ( गो. ) उपहार; फराळ. [ सं. उप+आहार ]

**उफारटा**—उफराटा पहा

**उफारशेट्या**—पु. कृतघ्न, उपकार कर्त्यावर उलटणारा, मित्रावर उलटणारा मनुष्य. [ उफराटा+शेट्या ]

**उफाळ-ळा**—वि. अधिक; वाजवीपेक्षां जास्त, पुरून उरलेलें; शिलकी ठेवलेलें. [ सं. उत्+फल् ] –पु. १ उकळी, ऊत; उत्साह; जोर; आवेश; उफाड पहा. ' उफाळेंचि जाती भुजा फुरफुरीती । ' –राक. ' पुण्याच्या पुण्यप्रदेशांत उफाळयाला आलेला तो एरंड... ' –इंप ८९. २ एकदम वर येणें; जोरानें उठणें; जोरानें बाहेर येणें, उसळी; ऊत (पाणी वगैरेस); ( क्रि० निघणें; येणें ). ' आगे घेतुसे उफाळा । सिंगवरि ॥ ' –ऋ ८१. ' नंदाचें मूल काळें । त्यासि नेलें काळें । कोण्हींयेका काळे । चालिलें उफाळें ॥ ' –दावि २४१ ' नाना तीर्थींचीं कारंजीं बहुत । घरोघरीं उफाळत । '–राव ३६ १७२. ३ शिल्लक; वाढ.

**उफाळणें**—अक्रि. उफळणें पहा १ उकळी येणें, ऊत येणें. २ वर येणें; वर चढणें ( जाळ वगैरे ). ' केला जरी पोत बळेंचि खालें । ज्वाला तरी ते वरती उफाळे । ' –वामन ३ उसळणें; वर उडणें ( पाणी वगैरे ). ' कोठें गुप्त कोठें प्रगट । जैसें जीवन उफाळे आटे । ' –दा ९.८.२७. ' अभ्रीं उंच उफाळला । क्षितीतळीं तो येथ आंदोळतां । ' –आक २१. ४ गर्वानें फुगणें, ताठणें. ५ फार वाढणें; वाजवीपेक्षां जास्त होणें. ६ नांगरणें; उकरणें. ७ उधळणें; धांवणें ' जैसा सिंह उफाळला हिमगिरीच्या गव्हरापासुनी '–आसी ६३. [ सं. उत्+फल्, फाल प्रा. उप्फाल ]

**उफाळणें**—उफणणें पहा.

**उफिटणें**—उपिठणें पहा.

**उफेणणें, उफिणणें**—अक्रि. ( कों. ) अधिक होणें; कुजणें; नासणें. अविकणें ( फळ वगैरे ). इतर अर्थी उफणणें पहा.

**उफेवणें, उफेणें**—अक्रि. ( गो. कु. राजा ) वर येणें; (पाण्यांतून ) पृष्ठभागावर येणें, तरंगणें, उसळणें. उफणणें पहा.

**उंब**—पु एक मोठा वृक्ष.

**उंबई**—स्त्री. ( ना ) ओंबी पहा. [ सं. उंबी, उंबिका=ओंबी ]

**उबक-ग**—पु ( काव्य ) १ वांती; ओकारी; उमळ. २ (ल.) उमाळा; दुःखाचा आवेग; दयेचा पाझर; कींव. ३ कंटाळा; त्रास, वीट, उद्वेग. ' लौकिकाचा उद्वेगु । शास्त्रांवरी उबगु । ' –ज्ञा १३ १९२. ' उबग मानूनी तो वना जाय । मार्गीं येऊनि त्या बोभाये । ' –मुआदि २.४४. ' भागलिया आला उबग सहज । न धरितां काज आलें मनीं । '–तुगा १८५५. [सं उत्+वच्; का. उब्बु; उब्बिके=उमाळा, वर येणें; गु. उबक=वांती; हि. उबकना=ओकणें ]

**उबगट**—उबट पहा.

**उबगणें**—अक्रि. गुदमरणें; दरदरून घाम येणें, गदमदणें; उष्णता व गर्दी यांमुळें घाबरणें; गदगदणें. [ का. उब्बे=उष्णता, वाफ ]

**उबगणें**—अक्रि. कंटाळणें; त्रासणें; वीट येणें, ओकारी येणें. ' भणौनि उबगैलासि पोसु । जीवजातां । ' –ऋ ३२. 'एथ अर्जुन म्हणे कटकटा । उबगिलों मागिल्या संकटा । ' –ज्ञा ११.४५२. ' गगन शून्यत्वा उबगलें । कृष्णभेटीसी उदित जाहलें । '–एरुस्व ७७. –उक्रि. १ उपेक्षा करणें; तिरस्कार करणें; हयगय करणें; आबाळ करणें. ' उगें किमपि भाविका उबगशील तूं देव कां । ' –केका २०. ' कदाचित तृणांकुरा उबगिजेल भिकारणी । ' –आशिबी १४. २ टाकणें; त्याग करणें. ' मग उबगून विषयांसीं । ' –पाप्र ५.२७१. [ उबक ]

**उबगणें**—उक्रि. शोधून काढणें; ओळखणें. उमगणें पहा. ' सापत्नभावाचें जणों उबगोनि चित्तीं । '–विवि ८.७.१२३ [सं उपगमन –उवगअण–उबगण–उबगणें. –राज. भाअ १८३२. ]

**उबगवट्टु**—पु. कंटाळा. –शर ( ज्ञायो २.७७. )

**उबगवाणें**—वि कंटाळवाणें. –शर ( भावार्थ रामायण १. २.७२ )

**उबजणें**—उमजणें पहा.

**उबजणें**—उक्रि. ( क. ) भातावर आधण घालून त्याचे उबजे करणें. उबजा पहा.

**उबजणें**—( व ) उभरणें पहा.

**उबजत**—उपजत पहा.

**उबजरणें**—अक्रि. क्षीण झालेली शक्ति पुन्हां येणें; पुनरुज्जीवन होणें, नवीन उत्साह धारण करणें; टवटवीत होणें ( प्राणी, वनस्पती ). [ सं. उत्+जॄ ]

**उबजरा**—पु. टवटवी; ताकद; उत्साह परत येणें. (क्रि० येणें; आणणें). **उबजऱ्यास येणें**–क्रि. पुनरुज्जीवन होणें.

**उबजळणें**—अक्रि. कंटाळणें; त्रासणें; वीट येणें. ' उबजळली बाळा । गेली सवतीच्या माहेरां. ' [का. उब्बे; तुल. सं. उत्+ज्वल्]

**उबजळा**—पु. कंटाळा; त्रास; वीट; कंटाळणें; डोकें उठणें; त्रासणें. ( क्रि० देणें; आणणें; लावणें; लागणें )

**उबजा**—पु. भातावर आधण घालून ते भात खापरांत भाजून निववून कांडिलें असतां जो तांदूळ होतो तो. ( अव. ) उबजे. [ का. उब्बे=उष्णता, वाफ ]

**उबजें**—न. उबजे करण्यासाटीं आधणाचें पाणी घालून ठेवलेलें भात. [ का. उब्बे ]

**उबट**—वि. १ किंचित उष्ण; कोंबट. २ घाण, दुर्गंधी येणारा (अर्धवट कुजल्यामुळें, धान्य वगैरे पदार्थ ) ३ चांगलें जून होण्या पूर्वी पिकविल्यामुळें नासलेलें ( फळ वगैरे ). [ का. उब्बे=उष्णता ]

**उबटणें**—१ नासणें; कुजणें; बुरसणें व त्यामुळें दुर्गंधियुक्त होणें ( फळें वगैरे ). २ जून होण्यापूर्वी पिकवल्यामुळें खराब होणें. ३ पिकण्यापूर्वी नासणें ( फळ वगैरे ). उबट होणें. [ का उब्बे ]

**उबटाण-ठाण-साण**—स्त्री. १ कुजलेल्या वस्तूची दुर्गंधी. २ ओलसर, उष्ण व बंद जागेस येणारी दुर्गंधी. [ का. उब्बे ]

**उबडण**—न. उद्भव. [ सं. उद्भवन ]

**उबडणें**—अक्रि. १ उद्भवणें; उत्पन्न होणें. ' कीं उबडला देखौनि सोच्यु । काळवंडैला । '–ऋ ४०७. 'शीतकाळरूपें आळस उबडे । शरीरामाजीं देवाच्या । ' –स्वादि ७.४.२८. २ प्रकाशणें. ' जयाचे उजियेडें । तारागण उबडें ॥ ' –ज्ञा १३.९२७. [सं. उद्भवन ]

**उबडणें**—उक्रि. विरमणें; घालविणें; नाश करणें. ' दोरीचें अज्ञान तरी गेलें । सर्पबुद्धीसि ही उबडलें । परी भयकंपादि राहिले । संस्कारें भले दृढ असती ॥ ' –रंयोवा ९.२३६.

**उबडहांडी**—स्त्री. ( ना. ) उपडहंडी अर्थ १ पहा.

**उबडा**—वि. उपडा; पालथा; अधोमुख. ' तैसें विषयांचेनि कोडें । जेणें परत्रा केलें उबडें । ' –ज्ञा १६. ४५२. 'सांडिलीं पुरुषार्थलुगडीं । केवळ नागवीं उघडीं । विन्मुख पडती उबडीं । मेलीं मढीं होऊनि ठेलीं ॥ ' –एरुस्व १२.५६.

**उबणें**—अक्रि. १ उकाडा होणें; तापणें; गरम असणें, होणें; उष्णता पावणें. २ गुदमरणें; गदमदणें; कोंडल्यासारखें वाटणें; खतखतणें. ३ (ल.) त्रासणें; अस्वस्थ होणें. ४ उष्णता व ओलसरपणा यामुळें खराब होणें; कुजणें; नासणें ( फळें वगैरे ) ५ कुबटणें; उबटणें; बुरसणें ( धान्य वगैरे ); उबेनें विकृत होणें. ६ पिकणें; पुवळणें ( गळू वगैरे ). [ का. उब्बे ] **उबत ठेवणें**–पिकण्यासाठीं उबेंत ठेवणें; वाफ–ऊब देणें ( तंबाकू, गळू वगैरेस ).

**उबणें**—अक्रि. (कों.) थांबणें; ओसरणें; उघडणें (पाऊस वगैरे). ( प्र. ) उभणें पहा. ' पाऊस उबाला. '

**उबत्रा**—पु. उंबरा, उंबरठा; दाराच्या चौकटीचें खालचें किंवा वरचें लांकूड. [ सं. उंबर=दरवाजाच्या चौकटीचें वरचें लांकूड ]

**उबदरणें**—अक्रि. ( प्रा. ) १ गुदमरणें; गदमदणें. २ ( ल. ) त्रास, हाल सोसणें. ३ ( गळू वगैरे ) पिकावयास तयार होणें. [ का. उब्बे ]

**उबदार**—वि. गरम; उष्ण; उष्णता उत्पन्न करणारें ( कापड वगैरे ) [ का. उब्बे ]

**उंबर**—पुन. १ एक वृक्ष; हें झाड सर्वत्र होतें. यास अंजिरासारखीं फळें येतात हिरव्या फळांची भाजी करतात. याचें लांकूड चिकट असतें. सालीचा रस औषधी आहे. [ सं. उदुंबर, प्रा. उंबर; गु. उंबरो ] २ उंबरवडा; वायनासाठीं भोंक न पाडितां करतात तो वडा. **म्ह**० ( कों. ) १ भटा तुमचें पोट हो कां वांकडें तर म्हणाला उंबर राहिले म्हणजे झालें ! २ भरलेपोटा उंबर कडू=पोटभर जेवण झालें असतां गोड पदार्थहि कडू लागतो. –न. १ उंबराचें फळ. **म्ह**० उंबर फोडून केंबरें काढणें=स्वतःच्या थोड्या लाभाकरितां दुसऱ्याचें मोठे नुकसान करणे. २ एक पक्कान्न; पिकलेलें केळें तांदुळाचे पिठांत कुसकरून आंत साखर घालून त्याच्या गोळया करून त्या भजांप्रमाणें तुपांत तळतात –गृशि ४५८. ३ बरक्या फणसाचे गरे कुसकरून त्यांत तांदुळाचें पीठ भिजवून तें पुरीप्रमाणें थापून तेलांत अथवा तुपांत घारग्यांप्रमाणें तळतात. ' पुरिया उंबरवाणें तळिती. ' –वसा ८. **–राचें फूल**–न. (ल.)( उंबराचें फूल अदृश्य असल्यावरून ) दुष्प्राप्य, दुर्मिळ वस्तु; क्वचित भेटणारा मनुष्य. ' आतांशा अगदीं उंबराचेंच फूल झालें आहे. ' –सागोप्र ३.१. [ तुल० प्रा. उंबर पुप्फ=अद्‌भुत गोष्ट ]

**उंबर**—वि ( राजा ) दमट; ओलसर; पावसाळ्यांत बहुतेक पाणी सांचणारी, पाणथळ ( जमीन ); अशा जमिनीत पावसाळी पीक होत नाहीं, उन्हाळी ( रब्बी ) पीक मात्र होतें. [ का. उब्बे ]

**उंबर**—स्त्री. उमर ( अप ). वय. ' येवढी उंबर झाली भेट दिली नाहीं कोणाला. '–ऐपो १८. ' चुकी नसतां गांजिल्यामुळें खरें बसली कंबर । त्यांत बहरांत ऐन उंबर । ' –प्रला १६९. [ अर. उम्र; म. उमर ]

**उंबरघाट**—पु. ( उंबरा हाच कोणी घाट यावरून ) पुढील दाराच्या चौकटीचें खालचें लांकूड. [ उंबर+घाट ] **०ओलांडणें–सुटणें**–(उप. ) घरांतून बाहेर पडणें; घरांतून क्वचित बाहेर पडणाऱ्या व्यक्तीस योजतात. ' उंबरघाट सुटणें हें महा कठीण. '

**उंबरठा–डा**—पु. १ घराच्या पुढच्या दाराच्या चौकटीचें खालचें लांकूड; उंबरा. २ उंबऱ्याच्या आसपासचा प्रदेश. ३ ( व्यापक ) घर. [ सं. उंबर+स्था ] **०चढणें**–शिरणें; प्रवेश करणें.

' चांगला सुतार सुद्धां ... शाळेचा उंबरठा न चढतां वीस पंचवीस रुपये सहज मिळवितो. '

**उबरणें**—अक्रि. १ ( खरूज, जखम, गळूं वगैरेंतून ) पाणी बाहेर येणें; चिघळणें; वाहणें; पिकणें; वाहायास लागणें; पूर्ण फुलणें ( देवी, गोवर, इ० ); दाठरणें. [ ऊब ] २ आकारास येणें; वाढणें; वर व्यवस्थित दिसूं लागणें ( मुडी, इ० ). [ सं. उद+भृ-भर् ; तुल. का. उब्बे ]

**उंबरवट**—पु. उंबरा, घराच्या दाराच्या चौकटीचें खालचें लांकूड. ' ते राजद्वार नमस्करौनि । देखे उंबर वटु । ' –ऋ ६०. [ उंबरा ]

**उबरा**—पु. ( कों. ) ओढ्याच्या किंवा नदीच्या कांठीं पाण्यासाठीं खणलेला झरा. [ सं. उद्+भृ ]

**उबरा**—वि. ( राजा. ) जो पदार्थ खाल्ला असतां अंगावरील जखमेंत पू वगैरे वाढतो, जखम उबरते असा ( पावटा, भोंपळा, वगैरे पदार्थ ). [ उबरणें ]

**उंबरा, उमरा**—पु. १ दाराच्या चौकटीचें खालचें लांकूड. २ ( ल. ) घर; वस्ती. ' या गांवांत शंभर उंबरा आहे. ' ' या शहरांत लाख उंबरा आहे. ' [ सं. उंबर=दाराच्या चौकटीचें वरचें लांकूड; ' उम्बरोगृहदेहलिः ' –हेमचंद्र प्रा. उंबर; दे. उम्मर. ] **०उंबरपट्टी**–स्त्री. घरपटी. –ख ३९४. **०चढणें**–घरांत जाणें; उंबरठा चढणें पहा. **–ऱ्याची साल काढणें, –माती राहूं न देणें, उंबरा झिजविणें**–एखाद्याच्या घरीं एकसारख्या येरझारा घालणें, वरच्यावर जाणें. **वरचा उंबरा**–पु. दाराच्या चौकटीची वरची बाजू. **खालचा उंबरा**–पु. दाराच्या चौकटीची खालची बाजू. दरवाजाच्या बाहेरच्या चौकटीच्या लांकडास उंबरा म्हणतात व आंतील चौकटीच्या लांकडास लतकोरा म्हणतात.

**उंबराव**—पु. उमराव ( अप. ) पहा. ' बावीस उंबराव मिळून आले बाच्छाय सभेला. ' –इपुत्रीपो ६.

**उंबरेड**—पु. ( व. ) उंबरठा.

**उंबऱ्या**—वि. उंबरासारखा लाल रंगाचा ( घोडा ). [ उंबर ]

**उबलक-ख, उबलंग**—वि.क्रिवि. १ असंख्य; मुबलक; फार समृद्ध. २ बेहिशेबी; बेअंदाजी; मोघम. ३ अनिश्चितपणें; मोघमपणें. [ अर. अब्लह्=अज्ञानी ]

**उंबलणें**—सक्रि. (सोनारी धंदा) सोन्याचे बारीक तुकडे करून ते एकमेकांवर ठेवून त्यास मोरचूद वगैरे लावून ते शेगडींत तापवून त्यांचा आकार न बदलतां एकजीव होतील असे करणें. [ उबाळा ]

**उंबला, ओंबील, वाळंबा**—पु. (झाडावर वगैरे आढळणारा) तांबडा मुंगळा, मुंगी.

**उबली**—स्त्री. ( कु. ) दरवाज्यावर असलेली छावणी; दरवाज्यावरील कोनाडा; वस्तु ठेवण्यासाठीं दरवाज्यावर मारलेली फळी; दारुस्ती. [ सं. उंबर=उंबरा ]

**उंबलें**—न. पोहे किंवा लाह्या करण्यासाठीं आधण घालून ठेवलेलें भात. [ का. उब्बे ]

**उबलें**—न. ( कु. ) दाराची चौकट; दरवाजा. [ सं. उंबर ]

**उबवण**—न. (कु.) आंबे वगैरेची आढी घालण्याकरितां वापरण्यांत येणारें गवत. [ का. उब्बे; म. उबवणें ]

**उबवणें, उबविणें, उबावणें**—सक्रि. १ ऊब देणें; उष्णता देणें. २ गुदमरविणें; गदमदविणें. ३ उष्णता देऊन पिकविणें (आंबे अढींत घालून वगैरे ). ४ उष्णता देऊन वाढविणें ( अंडीं वगैरे ). ५ पिकविणें ( गळूं वगैरे ). –अक्रि. उबणें पहा. [ का. उब्बे ]

**उबवरा**—वि. पुरेशी ऊब न जिरल्यामुळें चिकट, चबचबीत झालेला ( भात, खिचडी ). [ का. उब्बे ]

**उबवलें**—न. अतिशय उष्मा होत असलेली, हवा येत नाहीं अशी, बंद जागा.

**उबशी**—वि. ( गो. ) दमेकरी. [ उबस ]

**उबस**—स्त्री. (गो ) दमा. ' उबस मारता. ' [का. उब्बस=दमा ]

**उबसळ**—स्त्री. भांड्यांना झिलई देण्याचें गोल रंध्यासारखें हत्यार.

**उबसाण**—स्त्री. उबट किंवा कुजट घाण; उबटाण. [ ऊब-उवस+घाण ]

**उबळ**—स्त्री. खोकल्याची उसळी, ढांस [ का. उब्बल, (धातु उब्बळिसु=ओकारी येणें )] ' प्रत्येक खोकल्याची उबळ येण्यापूर्वी मुलास सूचना होऊन तें साह्यासाठीं आईकडे पळतें. ' –गृहवैद्य ४४.

**उंबळ**—( गो. ) पावसाळ्यांत जमिनींतून झरे वाहूं लागणें; उपळ पहा.

**उबळक**—उबलक अर्थ २ व ३ पहा.

**उंबळणें**—क्रि. ( गो. ) १ साबण वगैरे लावून ( घरींच ) कपडे धुणें. २ सुपानें विशिष्ट प्रकारें हालवून कण्या व पीठ किंवा कोंडा वेगळा करणें. उभळणें पहा. [ का. उब्बलु=कोंडा ]

**उबळणें**—अक्रि. १ अतिशय उष्णतेमुळें ( फळ वगैरे ) कुजणें, नासणें. २ गर्भ नासणें; गर्भस्राव होणें. [ का. उब्बे ]

**उंबळा**—पु ( क. ) उचला, तात्पुरता, आटोपशीर संसार. ' आमच्या सासूबाईचा उंबळा संसार असतो. '

**उबळी**—एक झाड.

**उंबळी**—स्त्री. ( गो. ) उपळ पहा. [ सं. उत्+प्लवन ]

**उंबळें**—वि. ( गो. ) धुतलेलें ( वस्त्र ). [ उंबळणें ]

**उबा**—स्त्री. उष्णता. ऊब पहा. ' तेवींचि वन्हित्व आंगीं । आणि उबे उबगणें आगी । '–ज्ञा १८.२२०. ' कां गजबजिला उबा । पांघुरणें केळीचा गाभा ॥ ' –अमृ ५.६०. [ का. उब्बे ]

**उबागळी**—स्त्री. (व) समृद्धि; रेलचेल; आधिक्य. 'पैशाची उबागळी असली म्हणजे सर्व कांहीं सुचतें.' [ ऊब+आगळी ]

**उबागी**—पु. ताठा; गर्व. 'तुम्हां चढलासे उबागी। हरिदास गास रंगीं॥' –ब ६११. उबगणें पहा. [ का. उब्बु=सुजणें, फुगणें ]

**उबाणा**—पु. (व.) खटाटोप. 'कामाचा उबाणा फार झाला.' –जनाबाई (नित्यपाठ) २. [ का. उब्बण=अडसर ? ]

**उबार**—स्त्री. १ (जमाखर्च) रोजखर्चावर पूर्वदिवशीं निघालेली शिल्लक दुसऱ्या दिवशीं जमा धरतात ती; हातांतील शिल्लक. –वि. (व.) फाजील; जास्त; अधिक. 'उबार बोलशील तर थुतरींत देईन.' २ बाकी; उधारी. 'गिऱ्हाइकाकडे दुकानदाराची बरीच उबार निघते.' ३ हातांतील शिलकेसंबंधीं. [ हिं उबारना= शिल्लक ठेवणें. तुल० सं. उत्+भृ; का. उब्बर = आधिक्य ]

**उबार**—वि. (गो.) उंच. [ सं. उपरि ]

**उबार-डंग**—वि. (ना.) (ग्राम्य) ऐतखाऊ; उनाड; भटक्या. [ स. उद्+भृ ]

**उबारणें**—सक्रि. १ उबवणें (अंडीं वगैरे). २ पिकविणें; अढी लावणें (फळें वगैरेची) –अक्रि. १ उष्णता व आर्द्रता यांच्या योगानें नासणें, कुजणें (फळें किंवा इतर पदार्थ). २ उष्मा होणें; गदमदणें. 'ग्रीष्मकाळ दाखवी उष्णा। उबारोनि माझिया प्राणा। कासावीस करीतसे।' –मुआदि ४८.७५. ३ खरूज, जखम, पुटकुळ्या वगैरेंतून पू वाहणें. [ का. उब्बे; म. उबारा ]

**उबारणें**—उक्रि. उभारणें पहा. १ (राजा. कु.) आकारांत आणणें; तयार करणें (वाफा वगैरे). २ (राजा. कु.) अस्ताव्यस्त करणें; विसकटणें; अव्यवस्थित करणें (केस किंवा कांहीं वस्तु). ३ (प्र.) उभारणें; शिवावयाच्या कपड्याचे भाग एकत्र करून दोरा घालणें. [ सं. उद्+भृ; का. उब्बर=आधिक्य; म. उभारणें ]

**उबारा**—पु. १ उष्णता; उष्मा, उन्हाळा; उकाडा. 'तंव येरीकडे धनुर्धरा आसनाचा उबारा॥' –ज्ञा ६.२२१. 'नका कांहीं उपचार माझ्या शरीरा। करूं न साहावे मज बहु होतो उबारा॥' –तुगा ११७. २ (ल.) संपत्ति; द्रव्य; मालमत्ता. 'त्याजपासीं कांहीं उबारा आहे.' ३ (ल.) पराक्रम; तेज. 'तो माझेआं भुजांचा उबारा। कांइ साहिल॥' –शिशु. ८९३. ४ (सामा.) ऊब पहा. ५ (ल.) आश्रय. 'मातें तुझाचि उबारा.' –रामदासी २.१७२. [ का. उब्बे; सं. उष्मतर–उब्बअर–उबार–उबारा–राज. भाअ १८३३ ] ०देणें–ऊन करणें; तापविणें; उष्णता देणें.

**उबारा**—पु. आधिक्य; समृद्धि. 'ऐसा कस्तूरियेचा निकरा। तेथें परिमळाचा उबारा।' –विपू ७.१०६. [ सं. उद्+भृ; का. उब्बर=आधिक्य ]

**उबारी**—स्त्री. (गो.) उंचवटा. [ सं. उपरि ]

**उबाल, उबाला, उंबाळ**—न.पु. विस्तार; फोंफावणें; अतिशय दाट माजणें (तण, झाडझुडुप). 'महा मोहाचें उंबाळ.' –भाए ३०७. [ का. उब्बर=आधिक्य; फुगणें; माजणें ]

**उबावणें**—अक्रि. उबणे १ उकाडा होणें; उष्मा होणें; गदमदणें. २ उष्णतेनें किंवा उबेनें नासणें, कुजणें (फळें वगैरे). [का. उब्बे ]

**उबाळ**—पु.स्त्री. १ (गो.) उन्हाळा [ का. उब्बे ] २ आकाशाची अभ्राच्छादित स्थिति. 'आज पावसान् उबाळ धल्या.'=आज पावसानें काळोखी धरली आहे; उबाळा पहा.

**उबाळ**—स्त्री ढांस; खोकल्याची उबळ पहा.

**उबाळणें**—अक्रि. १ उकळणें; शिजणें. २ उष्णतेनें नासणें, कुजणें (फळें वगैरे). [ का उब्बे ]

**उबाळा**—पु. १ हवेंतील उष्णता; उष्मा; गर्मी २ उन्हाळा. [ का. उब्बे=उष्णता ]

**उबाळा**—पु १ पाण्याचा कढ, ऊत, उकळी. (क्रि० येणें). २ उमाळा; आवेग (सुख, दुःख, करुणा इ०). (क्रि० येणें). ३ (व.) जाळ; ज्वाळा उठणें, उसळणें (विस्तवाची). 'उठती वन्हीचे उबाळे.' –दा १६.६.८. 'संध्याकाळीं सूर्य उबाळ्यासारखा दिसतो.' [का. उब्बु=वर उडणें; फुगणें; (तुल० गु. उबाळो=सर्पण)]

**उबाळा**—पु. १ (कांसारी धंदा); भांड्यांच्या बुडास आकार देण्याचें हत्यार, हें जमिनींत उभें पुरून त्याच्या माथ्यावर भांडें ठेवून हातोड्यानें ठोकतात. २ (कों.) (सोनारी धंदा) आंगठी, जोडवे वगैरेस वाटोळा आकार देण्याचें हत्यार. [ सं. ऊर्ध्व; प्रा. उब्भ; म. उभा+ला ]

**उंबाळा**—पु. (कु) फेस. [ उमाळा ]

**उबाळू**—न. उन्हाळ्यांत उष्णतेमुळें होणारें गळूं. [ऊब+आवाळू]

**उंबी**—स्त्री. धान्याचें (गहूं वगैरेचें) ओलें कणीस; ओंबी. [ सं. उंबी ]

**उबीन**—स्त्री. (सोनारी धंदा) चांदी.

**उबीर**—(गो.) बांधकामाकरितां किंवा गिलाव्याकरितां केलेला चिखल. [ सं. उद्+भृ ]

**उंबील**—पु. उंबला पहा.

**उंबूर**—पु. (व.) बाजरीचा हुरडा; निंबूर; लिंबूर. [ सं. उंबी= हुरडा ]

**उबेजणें–उबेणें**—अक्रि. उबणें; उकडूं लागणें. 'अथवा पक्वान्नें भुकेलि। गंगेसि तृशा उपजलि। काइ चंद्रकळा उबेजली। व्यंजनातें इच्छिल॥' –रास ५.८०८. [ का. उब्बे ]

**उबो**—वि. १ (गो.) उभा. २ (ल.) उभें गंध लावणारा (वैष्णव). [ सं. ऊर्ध्व; प्रा. उब्भ; म. उभा ]

**उब्या**—पु. (व. ना.) विस्तव; जाळ. [ का. उब्बे ]

**उब्हतमंझिलत**—वि. वैभवसंपन्न. –राज ७.१७२. [ अर. उब्हत्=वैभव ]

**उभ**—स्त्री. उभारणी; उत्पत्ति. [ सं. ऊर्ध्व; प्रा. उब्भ; किंवा सं. उद्भव; प्रा. उब्भव ] –वि. उभय, दोघे. [ सं उभय ]

**उभउभ्या**—क्रिवि. उभाउभीं; तत्काळ. ' अविश्वासें कवळिल्या चित्ता । अभिमानें म्हणे मी ज्ञाता । तेव्हां उभउभ्या पळे आस्तिकता । देखे नास्तिकता सर्वत्र ॥ ' –एभा २३.३१०. [ उभ द्वि ]

**उभक**—न. ( कों. ) बैल किंवा रेडा ज्याभोंवतीं फिरतो तें रहाटगाडग्याचें उभें लाकूड. [ सं. ऊर्ध्व+काष्ठ; म. उभकट ? ]

**उभकुडी**—स्त्री. पांढरी माती पाण्यांत कालवून तिनें भिंतीस दिलेलें सारवण. [ उभा+कूड ]

**उभग**— उबग पहा.

**उभगणें**—उबगणें पहा. ' एक भागली, एक उभगली अशी व्यवस्था उभयतारा जाहली होती ' –भाव २०. ( पाठभेद )

**उभगात**—न. खाटेच्या चौकटीचीं जीं दोन उभीं गातें ( लांकडें ) त्यांपैकीं प्रत्येक. याच्या उलट आडगात [ उभें+गात्र ]

**उभजणें**—क्रि. कंटाळणें; त्रासणें; खेद पावणें. ' तें सुवियता तोखें । उभेजहीना । ' –ज्ञा १४.३२९. ' जो गुरुभक्ती उभजे । ' –ज्ञा १३.६७२. [ सं. उद्+भज् ]

**उभट, उभंड**—वि.१ उभा. २ उंच; उंचवट ( भांडें, पगडी ). ३ उभ्या अंगाचा; उंचेला; उभ्या ठेवणीचा. ४ उघड; वर; स्पष्ट; जाहीर. ' उभंड निंदा धरिली मुखीं । ' –दावि १६४. [ उभा ]

**उभड-डा, उभंड**—पु. ( क. ) उभट. १ उमाळा; उसळी; गहिंवर; आवेग. ' त्याचेनि दुःखें उभड आला । ' –मुवन ८.८१. ' गोपाळां उभडु नावरे दुःखाचा । कुंठित हे वाचा जाली त्यांची । ' –तुगा ४५. ' तेणें बहुत दुःखी जाला । देखोनियां उभड आला । ' –दा ३.५६. ' स्मशान वैराग्य दुसरियास सांगावें परंतु ज्याचा उभड तोच जाणत असेल. ' –भाव ९४. २ खालून वर उसळणारा प्रवाह ( पाणी, रक्त इ० चा ) झरा; लोट; पूर. ' जैसा प्रळयांबूचा उभडु । ' –ज्ञा १६.१३८. ' पहिलिया संकल्पजळाचा उभडा ' –ज्ञा ७.६९. [ सं. उद्+भूत; किंवा सं उद्भट; प्रा. उब्भड=प्रबल, प्रचंड ? ]

**उभंड**—उभट, उभड पहा.

**उभडणें**—१ उत्पन्न होणें; प्रादुर्भूत होणें. २ उमाळा; पूर येणें; उसळी येणें; वाढणें. ' देहीं शीतळता उभडे । कां उष्णता अत्यंत चढे । ' –एभा २८.५९९. [ उभड ]

**उभणी-नी**—स्त्री. उभार; उभारणी; प्रसंग; हकीगत; बनाव. ' तन्हीं आइकतु रसाळ । उभणी ते । ' –शिशु ७६०. ' तेयां भीतरी उभनी गोमटी । ' –शिशु ५६९. [ उभा, उभणें ]

**उभणें**—उक्रि. १ उभारणें; उभारलें जाणें; रचणें; रचलें जाणें; तयार होणें; करणें. ' तेव्हेळीं मायाभूमिकेचेनि पसारें । उभिली लिंगदेहांचीं धवळारें । ' –शिशु ९३. ' तैसियां गुढियां उभिलियां । घरोघरीं । ' –शिशु ५९२. ' कां प्रभेचा उभला । दीपप्रकाश संचला । ' –अमृ ७.१७०. ' उभिला जैसा देउळीं । जाणोनि कुंचा । ' –ज्ञा १३.६५८. [ सं. उद्+भवन; प्रा. उब्भवण ]

**उभणें**—अक्रि. थांबणें; ओसरणें ( पाऊस वगैरे ). [ उभा ]

**उभय**—सना. दोघे; दोन; द्वय; दुक्कल; जोडी; जुळें. याचा उत्तरपदाशीं समास होतो. उ० उभयब्राह्मण ( दोन जे ब्राह्मण ); दोन स्वामी ज्याचे तो उभयस्वामिक; उभयसत्ताक; इ० [ सं. ] ०**कुल**–न. शरीरसंबंधामुळें जोडलेलीं दोन्ही कुळें; माहेर व सासर. ' उभय कुलाला बट्टा न देई असा मुलगा असावा ! ' ' उभय कुलानंददायिनी ' ' उभयकुलोद्धार ' [ सं. ] ०**खुरी-मुखी**–वि. गाय वितांना वासरूं बाहेर पडतेवेळीं दोन्ही बाजूस दोन ( गाईचें व वासराचें ) खुर किंवा तोंडें दिसतात म्हणून त्या स्थितींत असलेली ( गाय ). ' तंव पुढें देखे कामधेनु । उभयखुरी प्रसवतां अधेक्षणु । राहिला तेथें । ' –कथा ३.६८३. ०**गामी**–वि. दोन्ही ( दिशां बाजू ) कडे जाणारा. ०**चर**–वि. जलस्थलवासी; पाण्यांत व जमिनीवर किंवा हवेंत राहणारा. ०**दर्शी**–वि. दोन्ही बाजू पाहणारा, लक्षांत घेणारा; दोन्ही बाजूंचा विचार करणारा. ०**द्वारें**–न. अव. शरीराचीं मलमूत्रोत्सर्गाचीं दोन गुह्यद्वारें. ' राजसेवक फिरती नम्र । उभयद्वारें मुक्त सांडोन । ' ०**निष्ठ**–वि. दोन्ही बाजूंविषयीं प्रेम, अगत्य असणारा; दोन्ही पक्षांना सांभाळणारा. ०**पण**–न. द्वैत. ०**पराङ्मुख**–वि. दोहोंपैकीं कोणतीहि गोष्ट न स्वीकारणारा, रुचणारा; दुराग्रही; हट्टी. ०**पक्ष**–पु. दोन्ही बाजू, पक्ष, तट. –क्रिवि. दोहोंकडे; दोहींकडे; इह आणि परलोकीं. ' तयांसी लाभे प्रत्यक्ष । महा आनंद उभयपक्ष । ' –गुच ५१.६५. ०**पक्षींसमान**–वि. १ दोहोंबाजूंनीं, दोन्ही दृष्टींनी सारखा; दोहोंबाजूस चालण्यासारखा; दोन्ही बाजूंसंबंधीं अगत्य बाळगणारा. २ निःपक्षपाती, पूर्वग्रह विरहित; निःस्पृह; निर्विकल्प. ३ दुतोंड्या; वेळ पाहून वागणारा; दोन्ही डगरींवर हात ठेवणारा; सव्यसाची. ०**लिंगी**–वि. १ ज्या प्राणी–वनस्पति–जातींत स्त्री व पुरुषजननेंद्रियें एकाच शरीरांत असतात असे ( प्राणी, वनस्पती ). ( इं. ) हर्माफ्रोडाईट. २ संशयित लिंगी; हिजडा; हवा. ०**लोक**–पु. स्वर्गलोक व मृत्युलोक; इहपर लोक. ' जेणें करितां उभयलोक । संतुष्ट होती । ' –दा ११.३.२. ०**विध**–वि १ दोन प्रकारचा, तऱ्हेचा, स्वभावाचा वगैरे. २ ( ल. ) स्त्री–पुरुषयुक्त; उभयलिंगी पहा. ३ सकर्मक व अकर्मक दोन्ही जातींचें ( क्रियापद ). ४ दुतोंड्या; आंत–बाहेर वेगळें असणारा; दोन दगडींवर हात ठेवणारा; एकनिष्ठ नसणारा. ०**शौच**–न. मन व शरीर या दोहोंची शुद्धि. ' गृहस्थें व्हावया निष्पाप । ठाके तो

करावा जपतप । उभयशौचांचें स्वरूप । अति साटोप करावें ॥ ' –एभा १८.३१८. ०साधारण–सामान्य–उभयपक्षींसमान पहा. ' कांहीं व्रतें स्मार्तांचीं, कांहीं वैष्णवांचीं आहेत, कांहीं उभय साधारण आहेत. ' ०स्वामिक–सत्ताक–वि. दोन धनी असलेला; दोघांच्या सत्तेखालीं असलेला.

**उभयतः**—क्रिवि. दोहींकडे; दोन्ही बाजूंनी, दोहोंकडून. [सं] ०पाशरज्जु–स्त्री. (ल.) दोहोंबाजूंनीं येणारी अडचण; कात्री इकडे नई इकडे वई अशी स्थिति; शृंगापत्ति; (सामा.) पेंच, पंचाईत. (इं.) डायलेमा.

**उभयतां**—सना. दोघेजण; दोन्ही; उभय; द्वय. [सं. उभयतः] ०सरदार–(सांकेतिक) शिंदे–होळकर. ' उभयतां सरदारांत पेंच दिसतो. ' –राज ३.१३८.

**उभयतोमुख**—वि. दोन्ही दिशांनीं पाहणारा; द्विमुखी; दोन दर्शनी बाजू असलेला; दुतोंड्या. [सं.]

**उभयतोमुखी**—स्त्री. १ उभयखुरी पहा. २ दोन प्रवाहांनीं वाहणारी नदी, झरा. [सं.]

**उभयतोवाही–वाहिनी**—वि. दोन प्रवाहांनीं वाहणारा (प्रवाह, नदी); उभयतोमुखी. [सं.]

**उभयत्र**—क्रिवि. दोन्ही बाजूंनीं; दोन्ही ठिकाणीं; दोन्हीकडे; इकडे आणि तिकडे. [सं.]

**उभयां**—क्रिवि. उभाउभी; उभ्याउभ्या. ' एकां उभयांचि प्राण गेले. ' –ज्ञा १.१३५. [उभा]

**उभयान्वयी**—वि. १ दोघांस जोडणारा; दोहोंबाजूंचा; उभयपक्ष–निष्ठ; दोन्ही पक्षांशीं संबंध ठेवणारा; दुतोंड्या. ' उत्तर हिंदुस्थानांतले उपद्व्यापी ... संस्थानिक, कर्नल हस्करासारखे त्याचे हस्तक व प्रो. रशब्रुक वुल्यम्ससारखे उभयान्वयी स्वार्थसाधक त्यांचें स्तोम माजणार कसें ? ' –केसासं २.१९३. ०अव्यय–न. (व्या.) दोन शब्द किंवा वाक्यें जोडणारा शब्द. उ० आणि, व, जर, तर, परंतु इ०.

**उभयान्वित**—वि. १ दोन्हीं बाजूंनीं जोडलेला; दोन्ही बाजूंशीं संबंध असलेला. २ उभयान्वयी (अव्यय) पहा. [सं.]

**उभयार्थ**—वि. १ ज्याचे दोन अर्थ होतात असा. द्व्यर्थी; दोन तऱ्हांनीं लावतां येईल असें; ' हें बोलणें खग मनीं उभयार्थ लेखी ' –नळ १२२. २ (ल.) अनिश्चितार्थ; संशयितार्थी; दुटप्पी; दुरोखी (वचन, भाषण, वक्रोक्ति; श्लेष इ०). [सं.]

**उभयालंकार**—पु. मिश्र अलंकार; शब्दालंकार आणि अर्थालंकार'यांचें मिश्रण. उ० ' शृंगार शृंगालय केसरी हो । सांगा अनंगा.नटकेसरी हो । कासे विकासे पट केसरी हो । श्रीशंकली पंकजकेसरी हो ॥ ' –वामन.

**उभरंग**—पु. फिक्का, फिक्कट रंग; अस्पष्ट, विटलेला रंग. –वि. फिक्कट रंगाचें; विटलेलें; विटलेल्या रंगाचें (वस्त्र). [सं. उद्+भर+रंग. उभरा+रंग]

**उभरणी**—स्त्री. उभणी, उभारणी पहा.

**उभरणें**—उक्रि. १ उफणणें; वारवणें. उफणणें पहा. २ (व.) उतणें (बिब्बा वगैरे). ' बिब्बा उभरला म्हणजे खोबरेल तेल लावतात. ' ३ (धान्य, वाळू वगैरे) ओतणें; रिकामें करणें. [उद्+भृ; खा. उभरवणें, हिं. उभरा=रिकामें करणें]

**उभरा**—वि. फिक्का; फिक्कट; विटलेला.

**उभवण**—न. पाऊस निवारण करण्याचें साधन; छत्री; इरलें; वगैरे. [उभवणें; तुल० का. उब्बे=पाऊस+सं. आवरण]

**उभवण, उभवीण**—स्त्री. (विणकाम) ताणा; उभे दोरे; याच्या उलट आडवण. [उभी+वीण]

**उभराभरी**—स्त्री. (भरीवर भर) गर्दी; दाटी; रांग; पंक्ति. ' आतां काय करूं या वरि । रिगैन परमेश्वराचां मंधिरीं । दोषांची उच्चारीन उभराभरि । सासदोंती फुडां ॥ ' –ख्रिपु २.३७.६४. [सं. उद्+भर+भर]

**उभला–लें**—पु.न. उंबरठा; उंबरा; दारवठा. ' वाणसियेचें उभलें । कोण न रिगे । ' –ज्ञा १३.७००. [उंबरा पहा]

**उभवट**—स्त्री. उभारणी; बांधा; ठेवण. ' म्हणे धाकटी उभवट माझी नवी तरणी माती । ' –पला ७६. [उभा+वट प्रत्यय]

**उभवणी**—स्त्री. १ उभारणी; उठावणी; रचना; स्थापना; बांधणी; उभणी पहा. ' जेवीं कां नटाची रावोराणी । दोघें खेळती लटिकेपणीं । तेवीं प्रकृतिपुरुषउभवणी । मिथ्यापणीं जो जाणें ॥ ' –एभा १९.२७. २ (ल.) (दारिद्र्य, आजार वगैरेपासून) मुक्तता; उर्जितावस्था; वर डोकें काढणें, उठणें, उठवणें; पायावर उभें करणें. ३ धंदा, व्यापार वगैरेची स्थापना, उभारणी. ४ पसारा; ज्याची उभारणी केली आहे ती वस्तु, गोष्ट. ' असो हें उभवणी मायामय । जेणें रचिली ॥ ' –विपू ४.७९. [उभा, उद्भवन]

**उभवण–णें, उभविणें**—सक्रि. १ उभारणें; उभें करणें; रचणें; स्थापन करणें. ' गगनावरी उभवावें । घडे केवी ॥ ' –ज्ञा १.१२. ' मठ मंडप उभविले । ' –मुआदि २७.५२. २ थांबविणें; उभें रहावयास लावणें. ३ पाऊस थांबेपर्यंत आश्रय घेणें, थांबणें; पर्जन्य टाळणें. ' म्यां पाऊस उभविला, मग निघालों. ' ४ उपयोगानंतर उभें करणें, जागेवर ठेवणें (जातें वगैरे). ५ विस्कटणें; उभें करणें; विखुरणें (केंस वगैरे) [सं. ऊर्ध्व+भू–भवन; किंवा उद्+भवन]

**उभवणें**—अक्रि. १ उभें राहणें; ताठ, सरळ होणें; स्थापित होणें; रचलें जाणें. २ (ल) आजारांतून उठणें; गरीबींतून किंवा अज्ञात स्थितींतून वर येणें; स्वतःच्या पायावर उभें राहणें. ३ बंद होणें; थांबणें (पाऊस). [उभा; सं. ऊर्ध्व; प्रा. उब्भ+सं. भू, भव ?]

**उभविता**—वि. उभवणी, उभारणी करणारा. 'याचा प्रभु तोचि उभविता तनया।' –मोमंभा २.२६. [उभविणें]

**उभस्वना**—स्त्री. (कों.) निर्भर्त्सना; चारचौघांत फटफजिती; उपहास. [सं. उद्+भर्त्सन]

**उभळ**—स्त्री. कोंडयांतून उभळून वेगळी काढलेली कणी. [सं. उद्+भल्ल्; प्रा. उब्भालण=सुपानें पाखडणें]

**उभळ-ळी**—स्त्री. १ खोकल्याची ढांस. उबळ पहा. 'उभळीचा उजगारा। उबगु सेजारिल्या घरा॥' –एभा ९.२७०. २ तीव्र उत्कंठा; उत्सुकता; उतावळी. [का.]

**उभळणें**—उक्रि. १ सुपानें कोंडा वगैरेंतून कणी वेगळी करणें, पाखडणें. २ नवीन जात्यांत थोडें धान्य दळून तें चालू करणें व तें कसें चालतें तें पाहणें; जात्यांतील घास काढून टाकणें. [प्रा. उब्भालण; तु० सं. उद्+भल्ल्; का. उब्बलु=कोंडा]

**उभळणें**—उक्रि. (प्रा.) उकळणें (मद्य वगैरे). [का. उब्बे]

**उभळणें, उभळेणें**—अक्रि. (राजा.) उत्कंठित होणें; अधीर होणें; उतावीळ होणें. [उबळ]

**उभळा**—वि. उभारलेला. [उभा]

**उभा**—वि. १ ताठ; वर; खडा; आडवा नसलेला; न वांकलेला; न बसलेला. 'उभा राहून किती वेळ बोलशील? ये, इथें झोपाळयावर बैस.' २ सरळ दिशेंत असलेला; लांबीच्या अनुषंगानें सरळ रेषेंत असणारा (रस्ता). याच्या उलट आडवा (रस्ता). ३ चालू; सुरू असलेला (धंदा वगैरे). 'माझें घर बांधण्याचें काम उभें आहे.' ४ न कापलेलें; शेतांत उभें असलेलें (पीक वगैरे). 'शेतांतील उभें पीक शत्रूनें कापून नेलें.'. ५ तयार; उत्सुक; पुढें आलेला; सिद्ध. 'त्याचें घर विकत घेण्यास कोणी उभा रहात नाहीं.' ६ सतत; अढळ, जागृत; पक्का; तीव्र (द्वेष, दावा वगैरे). 'त्या दोघांमध्यें उभा दावा आहे.'. ७ संपूर्ण, सर्व; अथपासून इतिपर्यंत (संवत्सर, साल, वर्ष वगैरे). 'उभ्या वर्षांत धंद्यामध्यें कांहीं फायदा झाला नाहीं.'. ८ सारखा; चालू असलेला; खळ न पडणारा; फार वेळ टिकणारा; अविरत (पाऊस, वारा वगैरे). 'उभ्या पावसांत शेतलावणीचें काम चालू होतें.' ९ सरळ धारा पडत आहेत असा (पाऊस). १० थेट समोरून येणारा; तोंडावर येणारा; विरुद्ध दिशेकडून येणारा (वारा वगैरे). 'वारा उभा असल्यामुळें गलबताची गति खुंटली, मंद झाली.' ११ गति नसलेला; थांबलेला; स्थिर [सं. ऊर्ध्व; प्रा. उब्भ; सिं. उभो; बं. उबु] **०करणें**-क्रि. १ थांबविणें; गति बंद करणें; स्तब्ध करणें 'गाडी उभी कर.'. २ बंद करणें; तात्पुरता थांबविणें; कांहीं काळ थोपविणें (धंदा, काम वगैरे). 'मंदीमुळें सध्यां धंदा उभा केला आहे.' ३ रचणें; उभारणें; तयार करणें. 'पोलिसांनीं खोटा खटला उभा केला.' ४ (बायकी) धुतांना लांब वस्त्र एका पदरापासून दुसऱ्या पदरापर्यंत सारखें करून घेणें. ५ उत्पन्न करणें, आणणें. 'शिवाजीमहाराजांच्या नेत्रांतून देखील अश्रू उभे केले.'–इंप १०६. ६ आडवी पडलेली वस्तु लंबरेषेंत ठेवणें. 'समई आडवी पडली आहे ती उभी कर पाहूं!' **०होणें**–थांबणें; तात्पुरता बंद होणें; विश्रांति घेणें. **०धरणें**–निर्बंधांत ठेवणें; कडक शिस्तींत वागविणें; जांचणूक करणें; त्रास देणें (धनकोनें रिणकोस, मुलानें आईस वगैरे)' 'केव्हांपासून यानें मला अगदीं उभें धरिलें आहे, जरा ये तरी!'. **०जाळणें**–अत्यंत हाल करणें; अतिशय त्रास देणें; छळणें. **०ठाकणें**–उत्पन्न होणें; समोर येणें. 'संगतीच्या लोकांचा भोग। उभा ठेला।'–दा१२.९.२४. **०नाहणें**–सर्वांग भरून येणें, पाझरणें, निथळणें (घाम, रक्त वगैरेंनीं). **०राहणें**–१ मिळणें; प्राप्त होणें; लाभणें (फायदा, नफा वगैरे); परत मिळविणें; वसूल होणें; संपादन करणें. 'व्यापारांत घातलेलें माझें भांडवल अद्यापि सारें उभें राहिलें नाहीं.'. २ घडणें; जवळ येणें; निकट येणें (एखादी गोष्ट किंवा कृत्य); प्राप्त होणें; आवश्यक होणें. ३ साहाय्य करण्यास पुढें येणें, तयार होणें, सिद्ध होणें. 'बहुत जन वास पाहे। वेळेसी तत्काळ उभा राहे॥' –दा १९.४.११ ४ एखाद्या संकटांतून वर येणें; नशीब काढणें. ५ पोटांत गोळा उभा राहणें; संकट येणें, उपस्थित होणें. ६ आड येणें; अडचण, प्रतिबंध होणें; पुढें येणें. 'त्यावेळीं एक गोष्ट उभी राहिली, तेणेंकरून माझा बेत जागच्याजागींच राहिला.' 'माझ्या मुलीचें लग्न उभें राहिलें आहे, तुम्हाला द्यावयाला मजजवळ पैसे नाहींत.' ७ उत्पन्न होणें; मिळणें; प्राप्त होणें (किंमत वगैरे). 'या मालाचे रुपये पांच हजार उभे राहिले कीं, माझे वडील भाग्योदय मानतील.' –विवि. १०.५.१९७. ८ अनुकूल होणें. 'उभें राहिलें भाग्य बिभीषणाचें।' –राक १.७१. **०इंद्र करणें**–पुन्हां सुरुवात करणें; नव्यानें आरंभ करणें (काम, धंदा वगैरेंस). **०छेद**–पु. (गणित, स्थापत्य, चित्रकला) एखादी वस्तु उभी (ओळंब्यांत) वरपासून खालपर्यंत कापली असतां दिसणारें दृश्य. **०तांब्या**–पु. राजापुराकडील उभट आकाराचा पितळेचा किंवा तांब्याचा लोटा. **०दांडा**–पु. १ उभा, सरळ खांब. २ (ल.) सरळ व्यवहार; सरळ वर्तन; युक्तीचें, कुशलतेचें वर्तन. [उभा+दंड] **०दावा**–पु. हाडवैर; अक्षय, कायमचें वैर. **म्ह०** जावा जावा, उभा दावा. **(उभे) दोन प्रहर**–पु उभीदुपार पहा. 'आपल्या झोपडयांवर उभ्या दोन प्रहरीं चांगलें ऊन पडतें.' –पाव्ह २७. **०दोरा**–पु. धांवदोरा; कच्ची शिवण; टीप याच्या उलट. **०नासणें**–सर्व नाश होणें; तात्काळ नासणें. 'जे शब्दीं वदोनि उभा। संसारनासी॥' –दा १.२.९. **०पाहारा**–पु. १ खडा पाहारा; अत्यंत काळजीपूर्वक, डोळयांत तेल घालून केलेली राखण. २ सारखें उभें रहाणें, बसावयास फुरसत न मिळणें; एकसारखे कष्ट; विश्रांतीचा

अभाव. 'दिवसभऱ्याच्या उभ्या पाहाऱ्यांत अंग भरून येऊन रात्रीं मेलं केव्हां एकदां आडवी होईन असं होऊन गेलं.' –नाटयछटा (फाटक) २. ३ (ल.) एकसारखी केलेली चाकरी, सेवा; एखाद्या आजाऱ्याची एकसारखी केलेली सारखी शुश्रूषा. ०पाऊस–पु मोठा, सरळ धारांनीं पडणारा पाऊस. न खळणारा पाऊस ०बाजार–पु. १ या टोंकापासून त्या टोंकापर्यंत सर्व बाजार सगळी बाजारपेठ. 'तूं दिलेल्या रंगाची लोंकर उभ्या बाजारात मिळत नाहीं.'. २ भरबाजार; बाजाराचा मध्य भाग; चव्हाटा. 'उभ्या बाजारांत कथा। हे तों नावडे पंढरीनाथा॥' ०मार्ग–पु. १ राजरस्ता; सार्वजनिक रस्ता; रहदारीचा रस्ता. मोठा रस्ता. हमरस्ता. २ या टोंकापासून त्या टोंकापर्यंत सर्व, सगळा रस्ता ३ सरळ रस्ता; आडवा नसलेला, वांकडातिकडा नसलेला रस्ता ४ (ल.) सरळ, प्रामाणिकपणाचें वर्तन, शहाजोग व्यवहार. उभ्यामार्गानें जाणें, येणें–न. सरळ मार्गानें, न थांबतां, वाकडे तिकडे न जातां जाणें. ०माल–पु तयार झालेलें, पण न कापलेलें शेतांतील पीक उभ्या मालाची पाहाणी–स्त्री. शेतांतील पिकाचा अंदाज म्ह० उभ्यानें यावें आणव्यानें जावें=वेळ प्रसंग पाहून वर्तन करावें, नम्रतेनें वागावें.

**उभाईत**—वि. (कों) समाईक; दोघांच्या मालकीचा उभा गत पहा. [सं. उभयतां]

**उभाउभीं**—क्रिवि त्वरेनें; घाईघाईनें; लवकर, तात्काळ, ताबडतोब 'उभाउभी फळ। अंगीं मंत्राचिया बळ॥' –तुगा २४.७२. [उभा द्वि] ०घाईघाईनें–वरील अर्थ पहा

**उभा खडपा-सूळ**—पु सरळ, लंबरेषेंत असलेला, डोंगराचा खडपा, कडा, सुळका [उभा+खडपा, सूळ]

**उभांग**—वि. उंचट, सामान्यापेक्षां अधिक उंची असलेला उंचेला; उभार, अंगापिंडानें चांगला [उभा+अंग]

**उभागत**—वि समाईक; वाटण्या न केलेलें, दोन मालकांचें (शेतांतील उभें पीक इ०) उभाईत पहा. [उभय+गत]

**उभाट-ड**—वि उंच, उंच बांध्याचा (मनुष्य वगैरे): सरळ, वर वाढणारें, न पसरणारें (झाड वगैरे). [उभा]

**उभाड, उभाडांग, उभाड्याचा, उभाटा**—वि वयाच्या मानानें अधिक उंच; विशेष वाढ झालेला; जोमदार; चांगला तयार; सशक्त; (मुलगा, झाड इ०).

**उभार**—स्त्री. १ उंची; उभट, उंचट आकार, डौल (पात्र, पागोटें इ०चा). २ उभारणी; रचना. 'ब्रह्मांडपिंडउभार। पिंडब्रह्मांड संव्हार।'–दा १२५.१४. ३ बायकांच्या चोळीचे पुढील दोन तुकडे. –पु १ उत्साह. २ गर्व; ताठा.–वि. १ उंच, वर आलेलें, भरलेलें. 'उभार छाती तरतरित। सुरुप गुणानें अशी जी कांता ती पाणी करते झरझरित।' –प्रला १६८. २ आडवें नसलेलें; सरळ; उंचवट (पात्र, पागोटें इ) [सं. उद्+भृ–भर; उभा+आकार]

**उभार**—पु १ उवार; ऊर; पुरेसा होऊन अधिक राहिलेला, अवशिष्ट पदार्थ. २ घोड्याच्या तोबऱ्यांतील घोडयानें खाऊन उरलेले दाणे; चारण्याच्या दाण्यांतून पुढें दुसऱ्या वेळीं चारावयाकरितां काढून ठेवितात तो दाणा. [उवार पहा]

**उभारणी**—स्त्री. १ मांडणी; रचना; बांधणी; पसारा; विस्तार. उभवणी पहा 'ऐसी जाली उभारणी। आतां ऐका संव्हारणी।' –दा ११ १.११. 'विश्वाची उभारणी व संहारणी हा क्षराक्षरविचाराचाच प्रमुख भाग आहे' –गीर १६६ २ उभें राहण्याची क्रिया. 'कंठ दाटला दोघांचा। उभारणी जाहली रोमांचा।' [उभारणें]

**उभारणी**—स्त्री. उंसाचा रस कढवितांना त्याला येणारी उकळी. [सं उद्+भृ] **उभारणीस येणें**–तयार होण्यापर्यंत पोचणें; सिद्धसमीपावस्थेस येण.

**उभारणें**—उक्रि १ उभें करणें; रचणें, स्थापन करणें; सरळ, लंबरेषेंत बसविणें. 'परी महाभूतांचें दळवाडे। उभारी भलें।'–ज्ञा ५.७८. २ चालू करणें, सुरू करणें; गति देणें (धंदा, काम वगैरे) स्थापना करणें. 'लॉर्ड रेडिंग यांनीं लष्करी कोर्ट उभारण्याची चुकी केली.' –के १०.६.३०. ३ वर आणणें; ऊर्जितावस्थेस आणणें; पुढें आणणें (व्यापार, धंदा) ४ प्रवृत्त करणें; पुढें करणें. ५ वर उचलणें; उंची वाढविणें (ठेंगण्या वस्तूची किंवा इमारतीची). ६ उत्पन्न करणें; कल्पिणें, मनाशीं बांधणें (तर्क, कल्पना, पद्धति वगैरे). 'म्हणुनी तर्क उभारिती कामिनी।' ७ (शिवण) एखादें शिवावयाचें वस्त्र तुकडे जोडून व धावदोरा घालून एकत्र करणें; कच्चें काम करणें; एखादा सांगाडा वगैरे तात्पुरता रचणे. –अक्रि. १ उठणें, उभें राहणें; ताठ, खडा होणें, सरळ होणें. 'पालवितो करीं उभारूनि बाहे। कृपावंता पात्र सजकडे।' २ उभें राहणें; सरळ होणें (केस वगैरे). ३ वर येणें; उठणे, उत्पन्न होणें; बाहेर पडणें (पुळी, गळूं वगैरे). 'तो तमा गिळितसा न उभारे' –गजेंद्रमोक्ष (रघुनाथ पंडित) ३७. [उभा, उभार]

**उभारत**—क्रिवि. १ समायिक मालमत्ता, भांडवल, मालकीची वस्तु वगैरेचे निरनिराळे मालकीचे विशिष्ट भाग प्रत्यक्ष न पाडतां; एकत्रित रीतीनें. २ अनिर्णित; विचार चालू असतांना; शेवटास गेलें नसतांना; निकालांत न निघतां. 'माझी पंचाईत उभारत राहिली आहे.' ३ सामान्यतः विशिष्टव्यक्तीस उद्देशून नसलेलें; सर्वसाधारण (भाषण). 'या गांवचे लोक फार लबाड असें मी उभारत बोललों आणि तुलाच कां राग आला?' ४ पक्का ठरलेला नसतांना (पगार वगैरे); दोन्ही बाजूंनीं निश्चितपणें मान्य केलेली नसतांना (किंमत, अट वगैरे); नक्की न तोलतां; अमोज; अमाप (धान्य वगैरे). 'त्या शेताचें धान्य म्या उभारत त्याचे स्वाधीन ठेवलें.' उभाईत, उभागत पहा. [उभार?] ०पणा–पु. निःपक्षपातीपणा; निस्पृहता.

**उभारस्ता**—उभामार्ग पहा.

**उभारा**—पु. १ उभारणी; रचना; विस्तार; मांडणी. 'तरी सत्यचि गा धनुर्धरा। सर्व कर्माचा उभारा।' –ज्ञा १८.३०४ २ स्थिति; अस्तित्व; 'शीत उष्ण पर्जन्यधारा। अंगीं न लागती अंबरा। तेवीं साधूचा उभारा। द्वंद्वसंभारानिर्द्वंद्व।' –एभा ११. ९४७. ३ शरीराची ठेवण, बांधा 'अंगें सर्वांग सुकुमार। मनोहर उभारा।' –एरुस्व १५ ५०. [उभा+कृ] ४ पोकळ अवसान; उठावणी; आकार, डौल. 'तुका म्हणे उभारायानें। खरे कोण मानि-तसें।' –तुगा ३१८६ ५ फैलाव; दरवळणें; पसरणें, प्रसार, विस्तार. 'जैसा कस्तुरीचा निकरा। तेथें परिमळाचा उभारा। तैसा ज्ञानानें शिष्यवरा। जन्मलासि तूं।' ६ चालू स्थिति; स्थिरता. अस्तित्व. 'ऐश्वर्येशीं ईश्वरा। जियेचें आग संसारा। आपलाही उभारा। आपणचि जे॥' –अमृ १ २९. [सं उद्+भृ, उभार]

**उभारा**—पु. १ इच्छा, प्रवृत्ति, उमाळा 'वनि व्याघ्र मृका दिक सारे हिमचा त्यजति उभारा।' –केप ८८ ८. २ उसाचा रस कढवितांना त्यास येणारी उकळी, ऊत. (क्रि० येणें). 'रसास उभारा येतो म्हणजे...रस उतूं जाऊं लागतो. '–कृपि ४७२. **उभारा धरणें**–पुढाकार घेणें; उद्युक्त होणें. 'परित्राणाय साधूच्या उभारा, धरी निवटाया सर्व भूमिभारा।' –कृष्णजन्म (देवनाथ) ३८. [उद्+भृ–भर]

**उभारा-ळा**—पु. नालबंदाची ऐरण, ठोकळा. [उभार]

**उभारिणें**—उभारणें पहा.

**उभारी**—स्त्री. (व.) बैलगाडींत भरती जास्ती व्हावी म्हणून उभी लावलेली काठी. खुंटाचे खाचरांत कापूस वगैरे भरण्याचे वेळीं खाचराच्या टोंकावर भोंवतालीं दोन हात लांबीची उभीं दांडकीं लावतात ती. [सं. उद्+भृ–भर]

**उभारी**—स्त्री. उत्साह; नेट, जोर. (क्रि० धरणें). 'अरी भारी भारी अवघड उभारी धरितसे।' –द्रौपदीवस्त्रहरण (किंकर) ४३. [उद्+भृ–भर]

**उभारू**—पु. (काव्य.) १ ताठा, दांडगेपणा; मगरूरी. २ उभार, उभारणी, उभवणी पहा.

**उभा लगाम**—पु. कमानदार लगाम. [उभा+लगाम]

**उभावणें**—उभणें, उभविणें पहा. 'नीलांकुरोद्रेक मध्यें उभावे –मुद्गलार्या भाषांतर (हरिराज) ८७.

**उभा शिवार**—पुन. न कापलेलें, उभें पीक. ०**टाकून जाणें**–**पळणें**–परचक्र वगैरे आलें असतां पीक काढून न घेतां, कांहीं बरोबर न घेतां पळून जाणें. [उभा+शिवार]

**उभासणें**—अक्रि. भास होणें; दिसणें. –शर (वामन–चित्सुधा १) [सं. उद्+भास्]

**उभासूळ**—उभा खडपा, कडा पहा.

**उभासोट**—वि.क्रिवि. अगदीं सडक उभा; उभाच्या उभा. [उभा+सोट]

**उभाळ**—पु (व.) ज्वाळा उबाळा अर्थ ३ पहा.

**उभाळा**—पु. उबाळा, उभडा पहा. 'दुःखाचे डोंगर उभाळा सुटला.' –एपो ३३६.

**उभी**—उभा पहा ०**कुडी**–स्त्री. उंच, सडपातळ बांधा; उभी ठेवण. 'ही गाय उभ्या कुडीची आहे.' [उभा] ०**चाकरी**–स्त्री. त्रासदायक, जोखमीची चाकरी, सेवा. ०**चतुर्थी**–**चौथ**–स्त्री. वद्यपक्षांतील चतुर्थी; संकष्ट चतुर्थी. या दिवशीं सकाळपासून चंद्र उगवेपर्यंत उभें राहण्याचें कांहींचें व्रत असतें. [उभी+चतुर्थी, चौथ] ०**दुपार**–स्त्री. भर दोन प्रहर, ऐन दुपारची वेळ; ऐन माध्यान्ह. ०**धांव**–स्त्री. सरळ, वर, डोंगरावर चढणें. 'उभी धाव घ्यावी गिरी तो चढावा.' –दावि १४५. ०**पेठ**–स्त्री. या टोंकापासून त्या टोंकापर्यंतचें सर्व शहर, बाजार; उभा बाजार पहा. ०**रास**–स्त्री. १ मोज–माप न करितां, न विभागतां जशीच्या तशीच ठेवलेली धान्याची रास; शेतांतून आणलेलें धान्य प्रथम नुसतें ढीग करून ठेविलेलें असतें त्यास म्हणतात. २ (ल.) सर्व मालमत्ता; कुटुंबाची अविभक्त व मोल न केलेली मालमत्ता, संपत्ति, जिंदगी. **अजमास उभी रास–गल्ला**–पिकाचा किंवा धान्याचा अंदाज. ०**विळी**–स्त्री. ज्या विळीचें पातें मोडतां येत नाहीं किंवा मिटतां येत नाहीं अशी विळी.

**उभीं**—क्रिवि. उभ्याउभ्या; घाईनें. 'मनादिकें व्यापारु। साडिती उभी।' –ज्ञा १८.७३७. [उभा]

**उभें**—१ उभारणी, मांडणी. 'म्हणोनि समभागें शुभाशुभें। मिळोनि अनुष्ठानाचें उभें।' –ज्ञा १८.२४७. २ वस्त्र सरासरी नुसतें गुंडाळून घ्यावें असा स्त्रियांचा वस्त्र नेसण्याचा प्रकार.

**उभें**—वि. उभा पहा. ०**काम**–न. जरूरीचें, अगत्याचें, निकडीचें काम. 'माझीं अगदी उभीं कामें तीन आहेत, तेव्हां मला तुमच्या बरोबर यावयास फुरसत नाहीं.' ०**कुंकू**–न. वैष्णव स्त्रिया लावतात त्या पद्धतीचें, उभ्या गंधासारखें (बदामी आकाराचें) लावलेलें कुंकू. ०**कुंड**–न. (चांभारी धंदा) चामडें भिजत ठेवण्याकरितां लागणारें रांजणाच्या आकाराचें खापराचें कुंड. ०**खाणें**–क्रि. सर्व–समूळ नाहींसें करणें. 'लोह उभें खाय माती। तें परिसाचिये संगती। सोनें जालया पुढती। न शिविजे मळें।'–ज्ञा १८.१४०७. ०**नेसणें–घेणें–लावून घेणें–लावणें**–(लुगडें, पडदणी, धोतर वगैरे)=तात्पुरतें (सरासरी दहा–अकरा हात) वस्त्र, प्रथम पदर घेऊन बाकीच्या वस्त्राच्या निऱ्या करून पोटावर मधोमध धरून उजवीकडील पदराचें आणि डावीकडील पदराचें अशीं दोन टोकें घेऊन त्यास निऱ्यांवर घट्ट गांठ मारल्यावर शेवटच्या पदराचें टोंक धरून कासोटा घालणें; कसें तरी एखादें वस्त्र नेसणें; स्नान करण्याकरितां

लहानसें वस्त्र नेसणें; आडवें नेसणें याच्या उलट. या दोन वाक्प्रचारांचे अर्थ कोंकण व देश या प्रांतांत परस्परविरुद्ध आहेत. कोंकण प्रांतांत आडवें नेसणें याचा अर्थ व्यवस्थितपणानें व पद्धतशीरपणानें नेसणें असा होतो, तर देशावर, आडवें नेसणें याचा अर्थ आड लावून घेणें, तात्पुरतें किंवा लहान वस्त्र नेसणें असा होतो. ०**पीक**–न. शेतांत तयार झालेलें पण न कापलेलें पीक. ' या जागेंत उभीं पिकें असून... ' –डुकराची शिकार ( बडोदें ) २०. ०**वर्ष**–न. सबंध वर्ष; आरंभापासून अखेरपर्यंत वर्ष. ' उभ्या वर्षांत मी आईबापांना भेटलों नाहीं. ' ०**दुखणें**–न. आंथरुणास न खिळविणारें, साधें दुखणें; किरकोळ दुखणें. ०**पण**–न. १ उभा असलेली स्थिति. २ ( ल. ) जिवंतपणा. ' आतां उभयां उभेपण नाहीं जयाचें । मा पडिलिया गहन कवण तयाचें । '–ज्ञा ८.६३. ०**पळणें**–क्रि. उभ्याउभ्या, न थांबतां एकसारखें पळत जाणें. ०**वारें**–न. १ गडबड; गोंधळ; धांदल; त्रेधा. २ उदासीनता; औदासिन्य. ( क्रि० सुटणें ). ०**वैर**–उभादावा पहा ०**सुकणें**–१ झाड उभ्या स्थितींत असतांच वाळणें.२ सर्व शरीर दुःखानें, काळजीनें कृश होणें, वाळणें. ' लेंकरूंवाचेनि दुःखें । जेवि माउली उभी सुके । ' –ऋ ४६.

**उभेआं**—क्रिवि. उभें; उभ्यानें. ' तुआं लग्न लावावें श्रीचक्रधरा । उभेआं ठाकौनि । ' –शिशु ७२७. [ उभा ]

**उभेउभ्या, उभेउभ्यांनीं**—क्रिवि. ताबडतोब; घाईनें; तत्परतेनें; तत्क्षणीं; तेव्हांच. [ उभा ]

**उभेटा**—वि. उभंट, उभट पहा.

**उभेट्या**—क्रिवि. ( गो. ) उभ्यानीं; उभ्यानें. [ उभा ]

**उभेणें**—अक्रि. १ उभें राहणें; उभणें. ' उठोनि उभेला सन्मुखी. ' –दावि ४०१. २ उभारणें. ' रामराज्याची उभेली गुढी. ' –दावि १६७. [ उभा ]

**उभेया**—क्रिवि. १ उभ्या; उभ्या स्थितींत. २ (ल.) जिवंतपणीं. ' उभेयां उभेपण नाहिं जेयाचें । पडिलेयां गहन कवण तेयाचें ॥ ' –राज्ञा ८.६२.

**उभैता**—वि. दोघे; दोन्हीं; उभयतां पहा. [ सं. उभयतः ]

**उभौ**—वि. दोन; दोघे. ' कां उभौं येकत्वीं वर्णितां ॥ –दावि २५७. [ सं. ]

**उभ्यां उभ्यां, उभ्यां उभ्यांनीं**—उभेउभ्यां, उभ्याघाई पहा. ' तूं जरा बैस, मी उभ्यां उभ्यां जाऊन येतों.' [ उभा ]

**उभ्यांघाई**—क्रिवि. १ उतावीळपणानें; अतिशय घाईनें; उत्सुकतेनें; उत्कंठेनें (हांक मारणें, ओरडणें इ० ) (क्रि. करणें). २ मोठ्या कळकळीनें; आग्रहानें; जोरानें ( धांवणें, विनविणें इ० ). [ उभा ]

**उभ्या जन्मांत**—क्रिवि. सबंध आयुष्यांत, कारकीर्दीत. 'धृतराष्ट्रानें ही करामत उभ्या जन्मांत एकदांच केली.' –भा ३९.

**उभ्यानें**—क्रिवि. १ उभें राहून; ताठपणानें. २ अविनयानें; मग्रूरीनें. म्ह० उभ्यानें मुतावयाचें मग गुरूला काय विचारावें=जाणून बुजून करावयाच्या गैरशिस्त गोष्टीबद्दल सल्ला विचारणें हें मूर्खपण.

**उभ्या पायानें**—क्रिवि. अतिशय तत्परतेनें ' शंकरजी व परशुराम हे दोन महत्त्वाकांक्षी ब्राह्मण नेहमीं बाईसाहेबांच्या तैनातींत उभ्या पायानें असतात. ' –स्वप १३१.

**उमकळणें**—सक्रि. (गो.कु.) लोंबकळत ठेवणें, टांगणें. [ उत्+कलन=धरणें ]

**उमका–खा**—स्त्री. उत्कट इच्छा; प्रवृत्ति; आवेग. ' बोलण्याची मला उमका नव्हती. ' कोरकि ४६३. [ सं. उद्+मनीषा ]

**उमग**—पु. १ आढळ; शोध ( लपलेली, हरवलेली गोष्ट ); ठावठिकाणाचें ज्ञान (क्रि. पडणें; पाडणें). ' कुंतीचा भाउ मग स्थिर राहे घेत आप्तलाभा उमग । ' –मोकृष्ण ४९.६. २ समज; समजूत. उमज पहा. [ उद्+मज्ज्; प्रा. उम्मग्ग=वर येणें, तरंगणें ]

**उमगणें, उमंगणें**—उक्रि १ आढळणें; दिसणें; सांपडणें; शोध लागणें. २ शोधणें; धुंडाळणें; ओळखणें; समजणें. ' काळातें दमणार मी उमगितें धुंडोनियां वाळ जी ॥ '–आपू ९. ' हें अक्षर अमक्याचें असें मी उमगीन. ' ' समुद्रावरील वाळवंटांतला एखादा खडा नाहींसा झाला असतां कुणाला उमगला जाणार नाहीं ... ' –नि २४४. –अक्रि. उघडकीस येणें; जाहीर होणें; गुप्त न राहणें; उलगडा होणें; प्रकाशांत येणें. [ सं. उद्+मज्ज्; प्रा. उम्मग्ग ]

**उमगा**—वि. ( कर्ना. ) उमगावयाची; गुपित; गुप्त ( गोष्ट ). [ उमग ]

**उमग्या**—वि. उमगून काढणारा; शोधून काढणारा; धुंडाळणारा. [ उमग ]

**उमच**—स्त्री. उपकारांची परत फेड; प्रत्युपकार. [ सं. उद्+मज्जन; प्रा. उम्मज्ज ]

**उमचणें**—उक्रि. उपकारांतून बाहेर पडणें; उपकाराची फेड करणें; उसनें फेडणें. ' हारी उमचावया । जुंवारी जैसा ये डाया ॥ ' –ज्ञा १३.५४१. ' आणि दान जया द्यावें । तयातें ऐसेंया पाहावें । जया घेतलें नुमचवें । कायसेनहीं ॥ ' –ज्ञा १७.२७८. [ सं.उद्+मज्जन ]

**उमचळणें**—क्रि. उन्मळणें; उपटून येणें; उलथून पडणें (झाड वगैरे ); उमचळून पडणें असा सामान्यतः प्रयोग. [सं. उत्+चलन ]

**उमज**—पु. १ समज; समजूत; बोध; ज्ञान; उमग. 'तुम्ही बहु भले मला उमज होय ऐसें कथा. ' –केका १००. ' उमज पडला भीमसेना ॥ ' –मुआदि २९.१०५. ' पाप करूं नये म्हणून म्हटलें तस्मात् पापानें नाश होतो असा उमज पडतो. ' २ आकलनशक्ति; शहाणपणा; अक्कल ' कासवीचे परी पाहें दृष्टीं मज । विज्ञानी उमज दावुनियां ॥ ' –तुगा १०८०. ( क्रि० दाखविणें; दावणें;

देणें ). ३ ( कु. ) पहिली नांगरणी; नांगरणीचे जे उमज, दुरो, तास, अडास हे चार प्रकार त्यांपैकीं पहिला प्रकार. [ सं. उद्+मज्ज् ] ०समज–स्त्री. वरवर; सामान्य समजूत, ज्ञान ( पक्कें नव्हे ).

**उमजणें**––उक्रि. १ समजणें; लक्षांत येणें; समजूत पटणें; माहीत होणें; 'असें उमजतां भले न गुरुभाव तो टाकिती.' –केका ९७. उमजणें व समजणें यांमध्यें असा फरक आहे कीं समजणें यानें केवळ सामान्य ज्ञान होतें. परंतु उमजणें म्हणजे पूर्णपणें समजणें; आंतील रहस्य माहीत होणें असा बोध होतो. उ० हा मघाशीं समजला होता खरा परंतु उमजला नव्हता. २ आजारांतून उठणें; टवटवीत होणें. ३ जागृत होणें; सावध होणें. 'जयां दोघांमाजि येखादें। विपायें उमजलें होय निंदें॥' –अमृ १.१४. ४ ( गो. ) मापाचा उतार पहाणें; उमजुंचें. [ सं. उन्मज्जन ]

**उमजीक**—वि. १ तत्काल उमजणारा. २ ( ल. ) बुद्धिवान; हुषार; चलाख; तीक्ष्ण, तीव्र बुद्धीचा. [ उमज ]

**उमट**—१ आढळ; शोध; थांग; प्रकटता; परिस्फुटता. ( क्रि० पडणें ). २ स्पष्ट; ठळक; प्रामुख्यानें पुढें येणें, दिसणें ( अज्ञात गोष्ट ). ३ निश्चित; पूर्ण कल्पना; ज्ञान; समज (क्रि. पडणें; होणें). ४ उबळ; मळमळ, उबक; आवेग (ओकारीचा वगैरे). [सं. उन्मथ्–उम्मट ]

**उमटणें–उमंटणें**—अक्रि. १ दिसणें; आढळणें; प्रकट होणें; जाहीर होणें; उघडकीस येणें. 'हा राजकुमरु उमंटला.' –उषा ४८. ४२. २ स्पष्ट होणें; स्वच्छ होणें; पूर्ण होणें (ध्वनि, आवाज वगैरे). 'शब्द ना उमटती पुढती.' –संग्रामगीतें ७२. ३ वर येणें; उठून दिसणें; स्पष्ट होणें. 'तैसें अवयेवु उमटलें। वालिपें आडौनी।' –शिशु ७२०. 'उमटती अंगावरी काटे।' –गीताचंद्रिका २९. ४ उत्पन्न, उद्भूत होणें; उपजणें. 'ऐसी वाट पाहे कांहीं निरोप कां मूळ। कांहो कळवळ तुम्हां उमटेचि ना।' –तुगा ४५२. 'ऐसा हा सत्त्वगुण। देहीं उमटतां आपण।। –दा २.७.८. ५ ( ठसा, चित्र, प्रतिबिंब इ० ) वठणें; स्पष्ट दिसणें; स्वच्छ, अंकित होणें. ' जेथ हें संसार–चित्र उमटे.' –ज्ञा ५.१५६. ६ बाहेर पडणें, येणें. 'वरुणावती बाहेर सप्तयोजन, द्वार केलें उमटावया।' –पांप्र १०.१४७. ७ (गो.) उपटणें; उपटून काढणें. [ सं. उन्मथ्–उम्मट ]

**उमटणें**—उबटणें पहा.

**उमटा**—पु. ( व. ) आवड; नाद. ( किंचित तिरस्कारव्यंजक ). 'तिला खाण्याचा मोठा उमटा आहे.' [ सं. उद्+मन्–मत; प्रा. उम्मत=उत्कंठा ]

**उमठणें**—उमटणें पहा.

**उमंडणें**—क्रि. उमंटणें; उत्पन्न होणें; सांपडणें. उमटणें पहा. 'मृगजळ जेथें उमंडे। तेथें असे पां कोरडें।' –अमृ ६.३४. [उमटणें]

**उमण**—( गो. ) ओमण पहा.

**उमणणें**—क्रि. मापणें; मोजणें; उमाणणें पहा. [सं. उद्+मा]

**उमतणें**—उक्रि. ( माण. ) ओतणें. [ सं. उद्+मथ् ]

**उमती**—स्त्री. उमेदी; ज्वानी; तारुण्य. 'छान छबेली सुरत फाकडी पुढें उमतीमधें येणारू।' –पला ४.४०. [ सं. उद्+मद्–मत्त; प्रा. उम्मत्त ]

**उमथा**—वि. ( गो. ) पालथा; उपडा. 'उमथ्या कळशार पाणी.' =पालथ्या घागरीवर पाणी. [ सं. उद्+मथ्; प्रा. उम्मत्थ= अधोमुख ]

**उमदगी**––स्त्री. मोठेपणा; थोरवी; मातब्बरी; संपन्नता. [ अर. उम्दगी ]

**उमदळणें**––अक्रि. उमळणें; मळमळणें; कालवाकालव होणें; ढवळणें ( पोटांत ). 'मला उमदळतें.' 'पोटांत उमदळतें.' [ सं. उद्+मूलन ] –सक्रि. कालवणें; ढवळणें; गढूळ करणें ( पाणी इ० ). [ सं. उद्+मूलन किंवा उन्मर्दन; प्रा. उम्मलण ]

**उमदा**—वि. १ थोर; श्रेष्ठ; शूर; पराक्रमी; विश्वासू; मोठ्या मनाचा. २ भव्य; सुंदर; देखणा; पाणीदार (माणूस, वस्तु). [अर. उम्दा ]

**उमदा**—पु. ( व. ) जागरण; श्रम. [ सं. उद्+मद् ]

**उमन**—स्त्री. ( कु. ) पहिली नांगरणी. उमज पहा. [सं. उद्+मथ् ]

**उमन**—पु. ( सोला. माण. ) उखाणा. [ सं. उद्+मन् ]

**उमप, उमाप**—वि. पुष्कळ; अतिशय; खूब; अमोज; अगणित; 'जें एकें वळें फेडावा भारू। उमपपणाचा॥' –शिशु ७५. 'डाहाळिया जाती उमपा। ऊर्ध्वाही उजू॥' –ज्ञा १५.१४४. [सं. उद्+मा ]

**उमपणें**—उक्रि. वर येणें; उडणें. 'मग ते निघाली तेथोन। तत्काळ उमपली गगन॥' –कथा १.६.१५९. [ सं. उद्+मा ]

**उमर**—उंबर पहा.

**उमर, उम्मर**—स्त्री. वय; आयुष्य. 'विसां आंत उम्मर, नरम कंबर, पितांबर पैठणचे नेसल्यें!' –प्रला २२९. [ अर. उम्र ]

**उमरठ–ठा**—पु दाराच्या चौकटीची खालची बाजू; उंबरठा. उंबरा पहा. [ सं. उंबर; प्रा. उम्मर ]

**उमरडणें**—क्रि. १ ओलांडणें; उल्लंघन करणें; सोडणें; त्याग करणें. 'स्वर्गाची आडवंगी। उमरडूनि॥' –ज्ञा १३.१६२. –एभा १०.४. [ सं. उद्+मृद्; म. उमरा+सोडणें ]

**उमरदराज**—पु. चिरंजीव; पुत्र; मुलगा. [ अर. उम्र ]

**उमरा**—पु. उंबरठा. उंबरा पहा. [ सं. उंबर; प्रा. उम्मर ]

**उमराव**—पु. सरदार; मानकरी; श्रेष्ठ जन; अमीर; खासा. 'राजे बाहादर रंगराव होळकर स्वतां आदि उमराव.' –ऐपो २६७. [ अर. अमीर अव. ] ०जादा–दी–पु. सरदाराचा मुलगा, मुलगी.

**उमलणें**—अक्रि. १ विकासणें; फुलणें. 'तें उमललें अष्टदळ। ठेऊं वरी॥' –ज्ञा १५.६. २ भेग पडणें; फुटणें; उकलणें. ३ सैल होणें; विरघळणें (कपड्यावरचा मळ, चुन्याची कळी, मातीचें ढेंकूळ वगैरे). 'वरचें खरकटें उमललें म्हणजे मग भांडें घांस.' ४ फुगणें; लाही व्हावयाजोगें फुलणें. (भिजत घातलेलें धान्य वगैरे); ५ प्रफुल्लित होणें; उल्हासयुक्त होणें (मन वगैरे). ६ प्रकट होणें; उत्पन्न होणें. 'परी येकी केधवां गेली। शाखाकोडी केधवां जाली। हें नेणवे जेवीं उमलली। आषाढअभ्रें।' –ज्ञा १५.१२५. –उक्रि. १ उचलणें; उखळणें (वाकवून घट्ट बसविलेलें खिळयाचें टोंक वगैरे). २ सुटें करणें; उघडणें; खोलणें (कोयंडयाचीं मिळविलेलीं दोन टोंकें वगैरे). ३ क्षार लावून तापवून सांधणें, एकत्र करणें (सोन्याच्या दागिन्याचीं टोंकें).४ सोलणें; मोकळें करणें; काढून टाकणें (धान्य भिजवून त्याचीं सालें वगैरे). [सं. उद्+मील-उन्मीलन; प्रा. उम्मीलण]

**उमला**—उंबला पहा. 'उमले व डोंगळे यांचें विष जालीम असतें.' –प्राणिमो ११८

**उमलें**—न. १ आधण घालून भिजत ठेवलेलें भात, जोंधळे वगैरे (लाह्या वगैरे करण्याकरितां). २ (व.) सपीट, रवा वगैरे काढण्याकरितां भिजत ठेवलेले गहूं. 'रव्यासाठीं उमलें कालच केलें, आज तें दळून घ्या.' [सं. उद्+मील्]

**उमलें**—न. मळमळ; उमळ पहा.

**उमस**—पु. १ श्वास, दम; उमास–सा. २ उसंत; विसावा; विश्रांति; अवकाश; स्वस्थता; स्वास्थ्य. 'सत्व उर्मी अंतःकरणासहीं। उमस घेवों नेदी।' –ज्ञाप्र १३५. 'मागें असतासी कळला। उमस घेऊं नसता दिला।' –तुगा ४०९६. ३ स्फूर्ति; उद्भव; विस्तार. 'वाग्देवतेची स्तुति। वाचाचि जाहली वदती। तेथें द्वैताचिये संपत्ती। उमस चित्तीं उमसेना॥' –एभा १.२८. [सं. उद्+मिष्]

**उमस**—पु. उमज; समज; जाणीव. 'म्हणोनि आत्मा आत्मलाभें। नांदऊनि शब्द शोभे। येईल ऐसा न लभे। उमसु घेवों॥' –अमृ ६.९४. [उमज]

**उमसणें**—उक्रि. १ सांगणें; उघड करणें; प्रकट करणें. 'जीवु जावो परि नुमसें। ठेविला ठावो॥' –ज्ञा १३.२०२. २ प्रकट होणें; दिसणें; माहीत होणें. 'एवं द्वैतासीं उमसों। नेदुनि ऐक्यासि विसकुलों॥' –अमृ २.६९. [उमज]

**उमसु–सो**—पु. विसावा. उमस पहा. 'उमसु नाहीं युद्ध सप्त अहोरात्रें' –कृमुरा ६९.२८.

**उमळ**—स्त्री. १ मळमळ; ओकारी वाटणें. २ उमाळा पहा. [सं. उद्+मूल]

**उमळ–ट**—स्त्री. उपळ पहा. १ पावसाचें पाणी जिरून जमिनींतून झरे वाहूं लागण्याची स्थिति; उपळ. २ फुरसें, घोणस वगैरे चावलें असतां अंगांतून रक्त वाहूं लागण्याची स्थिति. ३ अकालीं गर्भस्राव होणें. ४ उष्णता व आर्द्रता यांमुळें फळें कुजून त्यांतून रस वहावयास लागणें अशी स्थिति. ५ मऊ होणें (कळीचा चुना, मातीचें ढेंकूळ इ.). [सं उद्+मूल्] ०**पडणें**–अतिशय पाऊस पडल्यामुळें पीक कुजावयास लागणें.

**उमळणें**—क्रि. उमळ यापासून क्रियापद. उपळीनें विशिष्ट होणें. उमळ, उमळणें, उबटणें पहा.

**उमळणें**—क्रि. फुलणें; उमलणें (कळी वगैरे). [सं. उद्+मील्]

**उमळणें**—उक्रि. (कु. गो.) धुणें; खळबळणें (वस्त्रें, भांडीं वगैरे). [सं. उत्+मल्]

**उमळणें**—अक्रि. १ पोटांतील कोंवळ्या गर्भास उष्णविकृति झाल्यामुळें तो स्रवणें, पडणें. २ उलथणें; उपटून येणें. 'इया उमळती दाढा। दांतांसहित।' –ज्ञा १३.५६८. 'पदस्पर्शें ज्याच्या तरुयुगुल तत्काळ उमळे।' –सारुह १.५७. [सं. उद+मूल]

**उमळशीक**—स्त्री (गो.) उत्कंठा; आतुरता; औत्सुक्य. [उमाळा; प्रा. उम्मला=तृष्णा]

**उमळा**—वि. (राजा.) बुळबुळीत; मळमळीत; गळगळीत; लिबलिबीत (पातळसर अन्न, ज्यांतून रस पाघळत आहे असें फळ, वगैरे). [उमळ]

**उमळावण**—स्त्री. (राजा.) मळमळ; पोटांत ढवळण्याची क्रिया; तोंडास ओकारीपूर्वी पाणी सुटतें ती स्थिति. (क्रि० सुटणें; येणें.) [उमळ+पाणी; उमळणें प्रयोजक]

**उमळी**—वि. स्वतंत्र; निर्वंध. –ख ९३१.

**उमळी**—स्त्री. एक झुडूप. उंबळी पहा.

**उमा**—स्त्री. पार्वती; गौरी; दुर्गा. ०**कांत–वर**–पु. उमेचा पति; शंकर; शिव. 'तांडव विसरले उमाकांत। अति अद्भुत हरिलीला।' –एरुस्व ३.१०. [सं. उमा=पार्वती+कांत, वर=नवरा]

**उमा**—पु. (गो.) मुका; चुंबन. –खिपु [ध्व. का. उम्मु=चुंबन]

**उमा**—वि. (व.) खेडवळ; अडाणी; साधा; भोळा; अशिक्षित. 'आपण मराठी उमे माणूस, आपणाजवळ द्राखला नाहीं.' [सं. उन्मत्त ? दे. उम्मइय=मूढ; अर. उम्मी=अशिक्षित]

**उमाटा**—पु. उमाठा पहा. 'अवनीचे उमाटे उलले।' –कृमुरा ४१.२५.

**उमाठ, उमेठ**—वि. उंच; उंचवट; वर आलेली; फुगलेली. (जमीन) (पाणथळच्या उलट). [सं. उद्+मस्त(क)]

**उमाठा**—पु.१ उंचवटा; उंच जागा; डोंगराचा माथा. 'उमाठयावरी येतसे सूर्य जेव्हां।' 'एके उमाठयाचे जाग्यावर उभी राहून... तिनें तिला हाका मारल्या.' –बाळ २.१६६. २ द्वार; उंबरठा. 'एक

श्रवणाच्या राजबिदीस आले। तेथून हरिरूप निर्धारिलें। एक कीर्तनाच्या उमाठीं ठाकले। प्रेमें हरिरूप विलोकिती॥' –ह २३.२२६. ३ (ल.) प्रसिद्धि; (विशेषतः) कुप्रसिद्धि; बोभाटा; बभ्रा; एखादी गोष्ट उघडकीस येणें. (क्रि० होणें). (विरू.) **उमाठ्यास येणें**. स्पष्ट, ठळक दिसूं लागणें. (क्रि० पडणें; होणें). [सं. उद्+मस्त(क); प्रा. उम्मत्थ–उम्माथा; म. उमाठा]

**उमाड**—स्त्री. (कों.) तुफान; वादळ; खवळणें; क्षुब्धपणा (समुद्राचा). [सं. उद्+मद्, उन्माद]

**उमाडा**—पु. उमाळा. उवळ पहा. १ मळमळ, खळबळ (पोटांतील); पोटांत ढवळणें. २ जोराची उकळी; ऊत; उडणें (पाणी). ३ (ल.) हुंदका; आवेग; उमाळा (दुःख इ० विकारांचा). [सं. उद्+मद्]

**उमाणणें**—उक्रि १ मोजणें, मापणें. 'हा संसार उमाणितें माप। कां अष्टांगसामग्रीचे दीप।' –ज्ञा ६.४६३ 'वारा उमाणावा वावें।' –एभा ११.१४६०. 'व्यास वाल्मीकि व्यापारी। कीर्तन करणें उमाणिती।' –भवि २९.५५ २ (ल) हिशोब देणें; झाडा देणें. ३ ताडून पाहणें; तुलना करणें. 'तयांची उमाणितां कीर्ति। उणीव दिसे आपाडे।' –मुआदि ११.९३. ४ (ल.) अटकळ करणें; अजमास करणें. 'करीं गिरि धरूनि उमाणिली। महेंद्रमहिमा।' –ज्ञा १०.२८९. [सं. उद्+मा–मान; प्रा. उम्माण]

**उमाणा**—पु. १ माप. 'उमाणा घेऊनि परेशीं। सुखाडिजे।' –ज्ञा १८.५२२. २ तुलना; बरोबरी. 'चंद्रासि घे उमाणे। रसरंगीं भुलवणें।' –ज्ञा १३.११५७. [सं. उद्+मा-मान, प्रा. उम्माण]

**उमाणा-णें**—पुन. उखाणा; हुमाणा; कोडें; कूट प्रश्न. 'पुरुषेवाचुनी जाली। आपणा आपण व्याली। पोटींचे घेउनि गेली। उमाणें माझें।' –दावि ५०२. 'आतां मी पुसेन तें सांगा उमाणें.' –निगा ९७. [हुमाणा]

**उमाणी-णें**—स्त्रीन. माप; मोजणी; झडती; अटकळ; अनुमान. 'कर्ता कर्तव्या घे उमाणें।' –ज्ञा १८.५००. [सं. उद्+मा]

**उमानणें**—उक्रि. मापणें; मोजणें; उमाणणें पहा. 'आगाधा जाणिवांतें उमानी' –ऋ ३. 'तेथ मापें उमानीति खरे। खोटें म्हणति' –ऋ १२१. 'तेयां रुखांचे उमानें। कवन घे।' –शिशु ६१९. [सं. उद्+मा]

**उमाप**—वि. अमूप; अमोज; अगणित; अतिशय. 'ब्रह्मांड भरुनि उरलें ऐसें सौभाग्य तें उमाप तिचें।' –मोभनु ५.२६. [सं. उद्+मा; म. माप] **म्ह०** उमाप लगीन सावधान=द्रव्याचा अति व्यय अगर उधळेपणा या अर्थी ही म्हण योजतात.

**उमापणें**—उमाणणें पहा.

**उमास-सा**—पु. १ मळमळ; पोटांतील खळबळ; पोटांत ढवळणें, कालवणें (क्रि० येणें). २ उमाळा; आवेग; उकळी; लाट (हर्ष, शोक वगैरेचा). 'अभिमानाचे आळेपिळे। महत्त्वउमासे येती बळे।' –एभा ८.२१२. ३ उद्भवण्याची स्थिति, तयारी (वादळ, रोग, गळूं वगैरेची). धुमसणें; पिकणें; तयार होणें. ४ खोकल्याची उवळ. ५ जंत वगैरे झाल्यामुळें होणारा अन्नद्वेष वगैरे (क्रि० येणें). [सं. उद्+मथ्; दे. उम्मच्छिअ=व्याकुळ]

**उमास-सा**—१ श्वास; उच्छ्वास; उसासा. (क्रि. टाकणें). 'अपरिमित तियेला येति तेणें उमासे.' –सारुह ३.६३. 'मला उमासा टाकायाला फावत नाहीं.' २ विश्रांति; उसंत; विसावा. 'सैन्य पळालें दशदिशा। म्हणती त्राहें त्राहें जगदिशा भीमें आकांत मांडिला कैसा। पळतां उमासा घेऊं नेदी॥' –जै १३.६३. ३ घेरी; बेशुद्धि. 'उमासा येऊनि पडिला वनीं। परी दृष्टीसि कोठें न दिसे पाणी॥' –महिपतिकथासारामृत २४.१९०. [सं. उद्+मिष्. प्रा. उम्मिस] **उमस, उमास खाणें**–विश्रांति घेणें; दम टाकणें.

**उमाळ**—क्रिवि. अतिशय, अमोघ, अगणित; अलोट. 'याजवर मागून उमाळ गोळ्या पडूं लागल्या.' –भाब १३८. [सं. उद्+मा]

**उमाळा-ळी**—पुस्त्री. १ मळमळ; पोटांतील खळबळ; कळमळ, उमळ. २ हुंदका; उकळी; आवेग; उसळी; लहर (राग, प्रेम, दुःख, शोक वगैरे विकारांची). 'स्वानंदाचे उमाळे देती। सारासार विचारें तळपति।' ३ तीव्र इच्छा. 'देहे खेगतां सर्व जाळी उमाळी.' –दावि १७८. ४ उकळी; कढ; ऊत (पाणी, दूध वगैरे पदार्थांचा). ५ सुटका; सोडवणूक; मुक्तता; मोकळीक (एखादा धंदा, कार्य वगैरेतून). (क्रि० पडणें). ६ लोट; गर्दी; हल्ला; उठाव. 'तो देखौनि यादवांचा उमाळा। एरी सिंहनादु दीन्हला॥' –शिशु १०४१; 'तैसे दृश्याचे डाखळे। नाना दृष्टीचे उमाळे।' –अमृ ७.१४३. ७ उद्भव; जोर; प्रभाव. 'जेयांचा देखौनि उमाळा। पळे महामोहाचा पाळा।' –शिशु ३८४. 'भंगोनि विघ्नांचा उमाळा.' –मुआदि ३५ १०२. [सं. उद् + मूल; तुल० का. उम्मलु=श्वास घेण्यास येणारी अडचण, कफ] ७ (काव्य.) ज्वाला; झोत; लोळ, तरंग (आग, वीज वगैरेचा). 'कोटी रविशशि तेज उमाळा॥' –दावि ३३५. 'जैसे कल्पांतविजूंचे उमाळे।' –रावि १.१२. [का. उम्मळ=उष्णता] **०पडणें**–अतिशय पाऊस झाल्यामुळें पिकें कुजावयास लागणें. उमळ पडणें पहा. **उमाळीं-उमाळीस-उमाळ्यां-उमाळ्यास पडणें-येणें**–उघडकीस येणें; माहीत होणें; दिसणें; आढळणें; बभ्रा होणें.

**उमाळा**—वि. (ना.) ओंगळ; मळका; घाणेरडा. [सं. उद्+मल्]

**उमेठा**—पु. १ समुदाय; मेळावा. 'उमेठेयां देवां निचनवा। आठाइतेआं देवां बंबाळु दीवा॥' –शिशु १५३. –वि. १ सामुदायिक; एकगट. २ अतिशय; पुष्कळ; उमाप. 'किंबहुना सात्त्विका आठां। चाचरु मांडतां उमेठा॥' –ज्ञा १८.१६०६. [सं. उद्+मित]

**उमेद्**—स्त्री. १ आशा; धीर; भरंवसा; खात्री; विश्वास. 'त्याची उमेद अशी होती कीं, ' २ आकांक्षा; हिंमत; उत्साह; धैर्य; हौस; अवसान; ईर्षा. 'अब्दालीचीं बोलावणीं बहुत उमेद लावून गेलीं.' –ख १.३४. ३ तारुण्य; ज्वानी; वय. 'आबाजी आपले उमेदींत आलियावरी ता॥ म॥ देशमुखी करावयास आले.' –रा १७.५. [फा. उमैद, उमीद्, उमेद] **उमेदीस येणें**–१ वयांत येणें; पणांत येणें (स्त्री वगैरे). २ जोमांत, भरभराटीस येणें (कार्य वगैरे). ३ बहार येणें (झाडास वगैरे).

**उमेदगी**—स्त्री उमेदवारी. 'हे उमेदगीची व रयासतीची कोण वजे (तऱ्हा) ते दर्याप्त करावी.' –ख ७.३५७. [फा. उमैद्, उमेद्]

**उमेदणी–नी**—स्त्री. (कों.) मळणी झाल्यावरचीं खळ्यांतील कामें (वारवणी, मापणी, साठवणी वगैरे). [सं. उद्+मथ्; किंवा उद्+मर्दन]

**उमेदवार–द्वार**—वि.पु १ धीट; आशापूर्ण; हिमतवान; निश्चयी; धीराचा. २ वयांत आलेला; तरुण; पूर्ण वाढ झालेला (मनुष्य, पशु, झाड वगैरे). 'गडी पडला उमेदवार!' –मोर ९. ३ इच्छू; गरजू; पदान्वेषी. 'तुम्ही इकडील लक्ष्यांत राहून कल्याणाचे उमेद्वार (हितेच्छु) असावें.' –रा ८.५. ४ अर्जदार; नोकरी मिळण्याकरितां खटपट करणारा. ५ काम शिकण्यासाठीं राहिलेला; पसंतवारीचा; कच्चा (नोकर). ६ परीक्षा देण्यास आलेला. ७ नवशिक्या. [फा. उमीद्वार; उमैद्, उमेद्+वार]

**उमेदवारी–द्वारी**—स्त्री. १ आशावादीपणा; आकांक्षा; खात्री; निश्चय; दृढता; हिंमत; विश्वास. 'त्यांची उमेदवारी पेशवे सर करूं सहजांत.' –ऐपो २७७. 'त्यास स्वारी निघावयाचा मार्ग पहात आम्हीं उमेदवारीनें बैसलो आहोंत.' –ख ८.४६६०. २ तारुण्य; ज्वानी; पूर्ण वाढ; जोम; जोर. 'हे आपले उमेद्वारींत आल्यानंतर त्यांचें लग्न केलें.' –मदरु १.११. ३ उमेदवारपणा; कच्ची, पसंतीच्या अटीची नोकरी; उमेदवार बनून राहणें. [फा. उमीद्वार]

**उमेदी**—स्त्री. ज्वानीचा, मनोविकाराचा भर. 'शृंगार घालितां उमेदी चढे ग। खेळतां गंजिफा येतें रडें ग॥' –प्रला १४६. उमेद पहा.

**उमेराघामेरा**—वि. घामानें थबथबलेला, भरलेला, डबडबलेला, डवडवलेला; घामाघूम. [घामेरा द्वि]

**उमेळा**—वि. (ना.) ओंगळ; मळका; घाणेरडा. [सं. उद्+मल्]

**उमोप**—वि. अतिशय; पुष्कळ; अगणित; अमोज. उमाप पहा. 'तुझेचि करुणा गेवा मन धरी उमोप द्रवा.' –केका २०. [सं. उद्+मा]

**उम्दगी**—स्त्री. थोरवी; मातब्बरी; श्रेष्ठपण. उमदगी पहा. 'जमियतच्या सर्दारास दोनी सर्कारच्या बुजुर्गी व उम्दगीवर प्रतेष्टतेचे व इज्जतीचें रस्म अमलांत येतील.' –पेअ ५८. [अर. उम्दगी]

**उम्दा**—वि. १ थोर; विश्वासु; उत्कृष्ट. उमदा पहा. 'दोन उम्दे मनुष्य दिली दोस्ती जाहीर करावयास रवाना करीत आहों.' –पेअ ६५. २ भारी; किंमतवान; बहुमोल. 'तलफ चुकऊन पोशाख दिधला खूप उम्दा भर्जरी.' –पला ८९. [अर. उम्दा]

**उम्दान**—वि. (ना.) उत्तम; फक्कड. [अर. उम्दा]

**उम्देतुल्मुल्क**—पु. दौलती (राज्या)चा खांब. विठ्ठल शिवदेव विंचूरकर यांना दिल्लीच्या बादशहानें ही पदवी दिली होती. [फा. उम्दत्=स्तंभ, आधार+उल्+मुल्क=राज्य]

**उम्मस**—वि. (ना.) हूड; आडदांड.

**उम्मस**—पु उसंत; विश्रांति. उमासा पहा. 'स स स्वपना सारिखा परी नाहीं कीं उम्मस।' –दावि २१४.

**उम्हळ, उम्हळणें, उम्हास–ळा**—उमळ, उमळणें, उमाळ वगैरे पहा. 'हल्लींच्या तापाचीं मुख्य लक्षणें...वांत्या व उम्हासे... हीं होत.' –टि १.५७५. 'विरह दुःखाचे कितीदा उम्हाळे।' –टिक ५९.

**उम्हाट**—(ना.) उमाठा पहा. 'तें घर उम्हाटावर आहे.'

**उयला**—पु. (कों.) पावट्याचा सोलाणा. [सं. उद्+वल्न; तुल० का. उय=धान्याचें टरफल]

**उर**—स्त्री. हौस. –शर (सोहि महदनु). [का. उर=उतावळेपणा]

**उर**—ऊर पहा.

**उरउरीत**—क्रिवि. उरलेला; वेगवेगळेपणानें; अलग. 'सांगायासी लोकां। उरउरीत उरला तुका॥' –तुगा ३८०७. [सं. उर्वरित]

**उरउळी**—स्त्री. १ (कु.) रोवळी (तांदूळ धुण्याची); दुरडी. २. तेल घालण्याचें नरसाळें. [का. उरळि=वाटोळें भांडें]

**उरक, उरका**—पु. काम त्वरित करण्याचें सामर्थ्य, कौशल्य, उत्साह; आटोप; आवरशक्ति. 'ज्याला ज्या कामाचा उरका असेल त्याला तें काम सांगावें.' [दे. उर=आरंभ; का. उर=उतावळेपणा; तळखपणा, प्रयत्न, किंवा का. उर्कु=शक्ति, पराक्रम] ०**उरकणें**–१ काम पार पाडणें, पुरें करणें. २ दुसऱ्याच्या कामांत ढवळाढवळ करणें. ०**पडणें**–(कामाचा) संपविण्याची जबाबदारी अंगावर घेणें, पडणें.

**उरक**—पु. जोर; उत्कर्ष; जोम; उत्साह; उल्हास. 'भीतरिं अवस्था व्यापिलें। उरकें वागिंद्रिय कोंदलें॥' –ऋ ४३. 'तें उरके आली फळां।' –भाए ३१४. [का. उर्कु=पराक्रम]

**उरकणें**—सक्रि. १ पुरें करणें; पार पडणें; संपविणें; शेवटास नेणें; तडीस नेणें. २ भानगडींत पडणें; ढवळाढवळ करणें. 'आपण आपल्या कामांत असावें, लोकांची कुचनिंदा उरकूं नये.' –अक्रि. १ आटपणें; संपणें; शेवट होणें; खलास होणें; नाहींसें होणें. २ (ल.) मरणें. ३ आटोक्यांत येणें; पसंतीस येणें; यथायोग्य होणें; सोपें होणें. [उरक]

**उरकता मार्ग-रस्ता, उरकती वाट**-पु.स्त्री. लवकर संपणारी वाट ( सरळ, छाया असलेली, जवळची, सोपी म्हणून ).

**उरकमणें**—सक्रि. स्वच्छ करणें; घासून-पुसून काढणें; निर्मळ करणें ( भांड्याचें खरकटें, कपड्याची घाण वगैरे ). -अक्रि. विलग होणें; सुटणें; निघून येणें ( भांड्यास, वस्त्रास लागलेली, खरवड, कपच्या, घाण, मळ वगैरे ).

**उरकाउरक**—स्त्री. घाईघाईनें, गर्दीनें, काम संपविण्याची, आवरण्याची क्रिया; आटपाआटप; आवराआवर. [ उरक द्वि. ]

**उरकुडा**—पु. ( व. ) उकिरडा पहा. [ उत्+कृ ]

**उरग**—पु. सर्प; साप; नाग. 'तरी सरोवर तरंगीं। सांडिलें आकाश मेघीं। का चंदनाचें उरगीं। उद्यान जैसें ॥' -ज्ञा १७.२२५. [ सं. उरस्=छाती+गम्=जाणें ]

**उरंग-गु**—वि. १ विटलेल्या रंगाचा; हीन रंगाचा. २ शिळा; नावडीचा. 'ते आवडी कां उरंगु। आतां जाली' -भाए १४०. [ सं. उद्+रंग ]

**उरंगणें**—अक्रि. विटणें; हीनरंग होणें. 'उरंगे ना साडेपन्हर सोनें' -दाव २९.

**उरगळी**—वि. ज्याच्या डोळ्यावर, उरावर व गळ्यावर मण्यासारखें चिन्ह आहे असा ( घोडा ). हें घोड्याचें अशुभ लक्षण होय. [ ऊर+गळा ]

**उरगुडें-ढें**—न. ( का. ) खेड्यांतलें देऊळ. 'जेणें कैलासदुर्गा पाडिलें। सत्यलोकीं ठाणें घातलें। सोनकारनें उरगुढें घेतलें। वैकुंठींचें ॥' -शिशु १६०. [ का. ऊरु=गांव + गुडि = देऊळ ]

**उरजणें**—अक्रि. बलवान् होणें; बलिष्ठ होणें; सुस्थितींत येणें; उत्कर्ष होणें. [ सं. ऊर्ज् ]

**उरजा**—स्त्री. जोपासना; निगा; काळजी; सुव्यवस्था. ( क्रि० राखणें ). [ सं. ऊर्जा ]

**उरंडा**—पु. वरवंडा; ढीग. 'पाथरांचे उरंडे यापरी। जाहाले येरुसालेमांतु।' ख्रिपु २.४२.१३०. [ सं. वरंड = ढीग, समूह ]

**उरण**—पु. मेंढा; बकरा. 'तैं उमजसील न उरे व्याघ्र रवें वीर्य लेशहि उरणीं' -मोकर्ण २८.८३. [ वै सं. उरा = मेंढी; सं. उरण = मेंढा, ऊर्णा=लोंकर ]

**उरणी**—स्त्री. एक वृक्ष, वेल. 'केळी कल्हार निंबुणी। मालती मोगरे उरणी ॥' -कथा २.१५.१४२.

**उरणें**—अक्रि. १ शिल्लक, बाकी राहणें; मागें राहणें; पुरून राहणें; अवशिष्ट राहणें; जास्त होणें. 'तेथें लोक कैंचे उरती' -उषा १७६७. २ शक्य होणें; परवडणें; पुरवणें. 'ज्या इंद्रियांस जो भोग। तो तो करी येथासांग। ईश्वराचें केलें जग। मोडितां उरेना ॥' -दा १७.५.२८. [ सं. उत्+पृ = उत्पूर; प्रा. उव्वर-उर्वर किंवा ऋ=जाणें ] **उरता करणें**-क्रि. बाकी ठेवणें; अंशतः फेड करणें.

**उरता**—स्त्री. बाकी; शिल्लक; अवशिष्ट; अंश ( क्रि० राहणें; देणें; राखणें; ठेवणें; धरणें; बाळगणें ). [ उरणें ]

**उरता**—स्त्री. अरुता ( अप. ) १ भीड; मुरवत; आक्षेप. 'मी कोणाशीं कांहीं पण बोलूं लागलों तर कोणाची उरता ठेवणार नाहीं.' २ खोळंबा मानणें; उणीव भासणें. 'तूं माझी उरता धरूं नको.' =माझ्यासाठीं खोळंबूं नकोस. ३ अरुता; सबब 'त्यांच्याकडून तो माल न आल्यामुळें येणाऱ्याची उरता न सांगतां बाजारांत जसा भाव असेल त्याप्रमाणें घेऊन द्यावा लागतो.' -मुंव्या २५१. [ अरुता ] **०न धरणें**-क्रि. मान न राखणें; भीड न धरणें; वाट न पाहणें.

**उरदाणा**—पु. घोड्याच्या तोबऱ्यांतील शिल्लक राहिलेला हरभरा, घांस. [ उरणें+दाणा ]

**उरपणें, उरबणें, उरंबणें, उरमणें**—अक्रि. उरीं फुटणें; उरीं भरणें; अति श्रम केल्यामुळें छातींत दुःख उत्पन्न होणें. ( घोडा, बैल वगैरेस ). [ ऊर ]

**उरःपार्श्वार्धमंडल ( संयुतहस्त )**—न. ( नृत्य ) उजवा हात अराल व डावा हात पल्लव करून दोन्ही हात उराच्या जवळ आणणें व मग उजवा हात उजव्या बाजूस व डावा हात डाव्या बाजूस वर्तुलाकार करणें.

**उरफाटणें, उरफाटफारफाट, उरफाटसुरफाट, उरफाटा, उरफाटासुरफाटा**—उफराटा इ० पहा.

**उरफोड**—स्त्री. अतिशय श्रम; अतिशय कष्ट; उरस्फोट-ड पहा. [ सं. उरस्+स्फुट्; म. ऊर+फोडणें ]

**उरबंद**—पु गोरबंद; घोड्याच्या गळ्यांत बांधण्यासाठीं खोगिरास लावलेला पट्टा. [ ऊर+बंद ]

**उरमोडा**—पु. ( माण. ) जनावरास होणारा एक रोग; यानें जनावर छातींत आखडतें [ सं. उरस्+मोटनं; म. ऊर+मोडणें ]

**उरम**—न. उमर ? एक पक्कान्न. उंबर ? पहा. कदाचित घुरमाबद्दल मुद्रणदोष असावा ? 'मालपुव्यादी सकुपमार ( सकुरपार ?= साखरपारा ? )। उरम मृदु भक्षितो।' -नव ९.११६.

**उरमट-ठ**—वि. उद्दाम; दांडगा; मग्रजोरी; उद्धट; मस्त. [ सं. उन्मत्त ]

**उरमटणें**—क्रि. उरमट, मगरूर होणें; अरेरावी दाखविणें; दिमाख मिरविणें.

**उरमटाई-ठाई**—स्त्री. उरमटपणा; मगरूरी; बेपर्वाई; उद्धटपणा.

**उरमाल**—पु. ( कों. गो. ) रुमाल ( अप. ) पहा.

**उरलासुरला, उरसूर, उरलापुरला**—वि. अवशिष्ट राहिलेला; शिल्लक; शेष. [ उरणें द्वि. ]

**उरले गड्डे**—पुभव. ( तं ) बटाटे. [ का. उरळि; ता. उरुळै=गोल ]

**उरवई**—स्त्री. शिल्लक; बाकी; अवशेष. [ सं. उर्वरित ]

**उरवणें-विणें**—उक्रि. बाकी ठेवणें, राहूं देणें; शिल्लक ठेवणें; मागें टाकणें; बाकी राखणें; राखून ठेवणें. 'तन्हि कुरुपांडवयुद्धारंभसमय यश तिचें न तें उर्वी ॥' –मोकर्ण ८.१५. 'सर्व तूप वाढूं नको, थोडेंस उरव'. [सं. उर्वरित; तुल० का. उर्विसु=वाढविणें]

**उरवळी, उरोळी**—स्त्री. रोवळी; तांदूळ वगैरे धान्य धुण्याकरितां वांबूचें किंवा धातूचें केलेलें सच्छिद्र पात्र; दुरडी. [का. उरलि=वाटोळें भांडें.]

**उर्वी**—स्त्री. पृथ्वी. [सं. उर्वी]

**उरशी**—स्त्री. स्तनांचा प्रादुर्भाव झाला आहे अशी स्त्री; वयांत आलेली स्त्री; तरुणी. [सं. उरस्]

**उरसिज**—न स्तन; उरोज. 'येइल बहूपचारें वंध्योरसिजासि काय ओलावा।' [सं. उरस्–सप्तमी एकवचन उरसि+ज]

**उरःसर**—पु उरानें सरपटणारा प्राणी; सर्प; नाग; साप. उरग पहा. [सं. उरस्+सृ]

**उरःस्थल**—न. वक्षःस्थल; वक्षप्रदेश, छाती. [सं. उरस्+स्थल]

**उरस्फोट-ड**—स्त्री. १ अतिशय श्रम, कष्ट; जिवापाड मेहनत; अत्यंत नेटाचा प्रयत्न; रक्त आटविणें; आंतडीं तोडणें (एखादा विषय फोडून सांगतांना); माथेफोड. २ अत्यंत कळकळीची विनंति. 'पदरीं धरिसी। किति करिसी उरस्फोड'. [सं. उरस्+स्फोट] **०करून घेणें**–जीव तोडून सांगणें; जिवापाड मेहनत करणें.

**उरःक्षत**—पु छातींत होणारा एक रोग; एक प्रकारचा क्षयरोग; यामुळें छातींत व कुशींत पीडा होते [सं. उरस्+क्षत]

**उरा**—पु. नदीच्या पात्रांतील कमी पाणी असलेली किंवा उघडी पडलेली जमीन; उतार; भाट. [सं. उर्वरित]

**उराउरी**—क्रिवि. (छातीला छाती लावून) झटपट; झट्कन्; झडकर; एकदम; तावडतोब; तत्काल. 'चांग तें उराउरीं मागों।' –ज्ञा ११.५४९. [उर द्वि.]

**उराक, उऱ्हाक**—स्त्री. (गो.) स्वाद नसलेली दारू. [पो. उऱ्हाक; इं. अरॅक; अर. अरक]

**उराचा तख्ता-पांजरा-शिंप-शिंपी**—पुस्त्री. भरदार, विस्तीर्ण छाती; बरबडया. ऊर पहा.

**उराझुरा**—वि. अलग राहणारा; दूरदूर असणारा; मनमोकळा न वागणारा; कुढा; आंतल्या गांठीचा. (क्रि० वागणें) [उरणें द्वि; किंवा ऊर+झुरणें ?]

**उराटी-ठी**—स्त्री. १ (घोडयाच्या) उराला बांधावयाचा खोगिराचा बंद, गांठ (बांडगें याच्या उलट). [ऊर+अठी=गांठ]. २ उंच, उभी चढण. ३ एका जातीचा साप चावला असतां येणारी रक्ताची गुळणी; झेड. [सं. उरस्]

**उराड**—न. १ अतिशय वर आलेली छाती. २ ऊर यालाच हीनार्थक शब्द; छाताड. ३ छातीवर येणारें वजन किंवा दाब. (क्रि० लागणें). **०काढून चालणें**–छाती पुढें करून गर्वानें चालणें.

**उराडी**—स्त्री १ भरलेली, प्रशस्त छाती; रुंद, विशाल उरोभाग २ (खाटिक) उराचें हाड; जनावराचें ऊर. **उराडी-भरणें**–इ० वाक्प्रचार ऊर शब्दापुढें पहावे. [सं. उरस्]

**उराळणें, उराळ होणें**—अक्रि. १ गाडींत मागें अतिशय भार झाल्यामुळें जूं बैलांच्या मानेवरून वर तरंगणें. २ गाडींत मागें फार भार होणें उलाड पहा. 'बाळासाहेबांची गाडी वाटेंत उराळली.'

**उराळा**—पु. (व.) खांबाशिवाय तयार केलेला मंडप. [सं. ऊर्ध्व+आलय]

**उरी**—स्त्री. १ बाकी; अवशेष; शिल्लक; शेष. 'जंव भरली आथी उरी। वळाची ते।' –ज्ञा १८.४२६. 'नायकसी माझें सांगितलें जरी। शरिराची उरी उरों नेदी।' –ब १३४. २ आश्रय; ठाव; ठिकाण; जागा. 'तैसे तातलीये लोहीं। तुषारां उरी नाहीं।' –ज्ञाप्र ७०२. 'आम्हां अनाथा कैंची उरी' –दावि १०. ३ भीड; मर्यादा; मुरवत 'आपणांस जे मानेना। तेथें कदापि राहावेना। उरी तोडून जावेना। कोणीएकें।' –दा १२.२.१४. 'आम्हापासीं असत्य बोलतां। उरी सर्वथा न ठेवीं।' –भवि ८.१५८. ४ अवसान; टिकाव; धडगत; स्थिति. 'एरिकेच्या निजघायीं। यादवांसि उरी नाहीं। दुधड तोडूनियां पाही। पडती ठायीं परस्परें।' –एभा ३०.१४९ ५ इच्छा; हेतु. 'भक्तां श्रुतेयां जिविची उरी। पुरविल स्वामी।' –खिपु १.१.१४९. [सं. उर्वरित; म. उरणें]

**उरु**—ऊरु पहा.

**उरु**—वि. मोठा; थोर; विशाल. 'हरणार कसें म्हणशी तूं हितकर या अशाहि उर्वरितें।'

**उरुद्रोणी**—पु. घोडयाचा एक रोग. यानें घोडयाच्या दोन्हीं पायांमध्यें सूज येते. –अश्वप २.२८३. [सं. ऊरु+द्रोणिः, द्रोणी]

**उरुळी**—स्त्री. रोवळी. उरवळी पहा.

**उरूकें**—न. वेल, वेलीचा धुमारा, अंकुर. 'मौक्तिकांचे झुलुंबकें। तेजाचेनि उरूकें' –शिशु ४२४. [सं. उलुप=एक गवत; का. उर्कु=पराक्रम]

**उरूज**—पु. (माळवी) उन्नति; वढती; महत्त्व. [सं. ऊर्ज्]

**उरूफ**—वि. उर्फ; दुसऱ्या नांवानें माहीत असलेला; टोपण नांव असलेला; उपनांवाचा. 'अफ्जलपूर महमुदशाही उरूफ करा बावधन' –इम ४८. 'नहीसादुर्ग उरूफ पन्हाळा' –रा ३.५४. [अर. उर्फ=विख्यात, माहीत असलेला.]

**उरूबरू, उरूबुरू**—क्रिवि. समक्ष; प्रत्यक्ष. 'उरुबरु येऊन विनंती करीन।' –रा ३.१२३. 'उरूबुरू स्वामींच्या समक्ष मनचें-मनीं कुरकुरतों आम्हीं' –होला ९७.१३४. –स्त्री. उपस्थिति; हजीरी; प्रत्यक्षत्व; समक्षता. [फा. रूबरू=प्रत्यक्ष]

**उरूस**—पु. १ पिराचा उत्सव; ( सामा. ) पुण्यतिथि; जत्रा. २ लग्नांतील मेजवानी. **म्ह॰** आलें उरूस तें चुकवूं नये गुरुस [ अर. उर्स=१ देवतेस उपचारसमर्पण. २ लग्नाची मेजवानी ]

**उरूसा-उरोसा**—पु. ( ना. व. ) पडसें, सर्दी;

**उरेबकसोटा**—पु. ( हिं. ) ( मल्लविद्या ). १ कुस्तींतील एक डाव. जोडीदाराच्या एका हाताचा पंजा धरून तो झिटकून देऊन जोडीदाराच्या गळ्याच्या घाटीवर मूठ वळवून मारणें. २ जोडीदाराचा एक हात आपण आपल्या हातांत धरून तोच हात आपल्या हातानें जोरानें झिटकून देऊन कसोटा मारल्यासारखी हूल दाखवून जोडीदाराच्या दुसऱ्या बाजूच्या गळ्यावर आपली मूठ वळवून मारणें. [ अरेब=कुशल ? + कसोटा; अर. अरबद्=युद्ध ? ]

**उरेबधोबीपछाड**—( हि. ) (मल्लविद्या) जोडीदाराचा एक हात आपल्या खांद्यावर असतांना धरून आपण गुडघा देऊन ऊंस मोडतो त्याप्रमाणें जोडीदाराच्या कोंपराच्या खालीं आपला खांदा देऊन धुतांना परीट ज्याप्रमाणें वस्त्र फिरवून टाकतो त्याप्रमाणें जोडीदाराला फिरवून टाकणें. [ अरेब=कुशल, अक्कलवान+धोबी+पछाड=झापटी ]

**उरोगामी**—पु. सरपटणारा प्राणी ( साप, वगैरे ). अशा प्राण्यांचा वर्ग. [ सं. उरस+गम् ]

**उरोग्रह**—पु. एक रोग; यकृतांतील रक्त दूषित झाल्यामुळें हा होतो. [ सं. उरस्+ग्रह ]

**उरोज**—पु. स्तन. ' पुढें होउनी तत्करांभोरुहातें । उरोजीं धरी गाढ रंभोरु हातें । ' -राधाभुजंग ( वामन ) ३२. [ सं. उरस्+ज ]

**उरोटा**—पु. १ विहिरीजवळचें पाण्याचें टाकें, द्रोण, कुंडी. २ अवशिष्ट; शिल्लक; बाकी राहिलेलें. [ सं. उर्वरित; म. उरणें ]

**॰पुरोटा**-पु. ( उरोट्याला पुरोटा ) उणें पडेल तें पुरें करणें. [ सं. उर्वरित+पृ ]

**उरोध**—पु. उपरोध; औपरोधिक भाषण; व्याजोक्ति. 'उरोधु वादुबल्लु । प्राणितापढाल्लु । उपहासु चाल्लु । वर्मस्पर्शु ॥ ' -ज्ञा १३. २७०. [ उपरोध अप. ]

**उरोमंडलकरण**—न. ( नृत्य ) पाय स्वस्तिकाकार ठेवून नंतर एकमेकांत गुंतविणें, मग हात छातीसमोर आणून उद्वेष्टित करणें. [ सं. उरस्+मंडल ]

**उरोमंडल(संयुतहस्त)**—पु. ( नृत्य ) दोन्हीं हात छातीसमोर आणून एका हातानें दुसऱ्या हातास तर्जनीच्या बाजूनें आरंभ करून तळहाताच्या बाहेरच्या बाजूनें आंतील बाजूस विळखा घालणें व काढणें. [ सं. उरस्+मंडल ]

**उरोमुरो**—वि.(बायकी) उरलेंसुरलेलें. 'उरोमुरो बाळापोटीं दूध जिरो. '=मुलाला पाजतांना असें अंगाईगीत म्हणतात. [उरणें+मुरणें] **-न.** २ अपहार; खाणें; चापणें; लांबविणें. ( क्रि॰ करणें ). ' या वस्तूचें यानें उरोमुरो केलें. ' [ सं. उर्वरित; उरो द्वि. ]

**उरोळी**—स्त्री. शेताची हद्द दाखविण्याकरितां सरकारी अधिकाऱ्यानें शेताच्या सीमेवर घातलेला मातीचा बांध; वरंबा; वरुळी.

**उरोळी**—स्त्री. रोवळी. उरवळी, उरूळी पहा.

**उर्जा**—स्त्री. ( प्र. ) ऊर्जा; सतेजता; निगा; तजेला ( क्रि॰ ठेवणें; राखणें ). [ सं. ऊर्जस् ]

**उर्जित**—वि. ( प्र. ) ऊर्जित. बलिष्ठ; मोठा. [ सं. ऊर्जित ]

**उर्जी**—पु. (क.) शेतीसंबंधीं खर्च; मशागतीचा खर्च. 'जमिनीबद्दल किती उर्जी आला ? ' [ सं. ऊर्ज् ]

**उर्णनाभ ( हस्त )**—पु. (नृत्य) आंगठयासह सर्व बोटें विरळ ठेवून पहिल्या पेरांत वांकवून तीं सर्व तळहाताकडे वाकडीं करणें. [ सं. ऊर्णनाभ=कोळी ]

**उर्णनाभि-का**—पु. कोळी; ज्याच्या बेंबींतून तंतु निघतो असा प्राणी. ' नातरी उर्णनाभिका जैसा । ऊर्णा वमूनि करी फांसा। ' -रंयोवा. १०.३४६. [ सं. ऊर्णा+नाभि ]

**उर्णपट**—पु. लोंकरीचें वस्त्र; बुरणूस. ' आसन सोरटा उर्णपटीं । पुढां मांचळी चौपुटी. ' -ऋ ८०. [ सं. ऊर्णा+पट ]

**उर्णा**—स्त्री. लोंकर. [ सं. ऊर्णा ]

**उर्ता**—स्त्री. ( क. ) काळजी. [ सं. आर्तिः ]

**उर्दाबेगनी**—स्त्री. ( हिं. ) जनानखान्यांतील सशस्त्र अंगरक्षक स्त्री; ( सामा. ) दासी; परिचारिका; बटीक. [ तु. उर्दू=सैन्य, तळ, लष्कर, बाजार+बेगम=स्त्री, तरुणी ]

**उर्दू**—१ सैन्याचा तळ; लष्कर. २ एक देशी भाषा; ही मूळ लष्करांतील भाषा असून हिच्यांत हिंदी, फारसी इ॰ अनेक भाषांचें मिश्रण आहे हिला हिंदुस्थानी भाषा असेंहि नांव आहे. ३ बाजार. [ तु. उर्दू=सैन्य, छावणी ]

**उर्फ**—अ. उपनांव; टोपण नांव; प्रसिद्धीचें नांव; अमक्या नांवानें मशहूर; म्हणजे. ' रघुनाथ बाजीराव उर्फ दादासाहेब. ' उरूफ पहा. [ अर. उर्फ् ]

**उर्फाटा**—उफराटा पहा.

**उर्बुद रोग**—पु. शरीरावर उत्पन्न होणारी गांठ, गळूं; आवाळूं. [ सं. अर्बुद ]

**उर्मट**—वि. उद्धट; उरमट पहा. **॰पणा**-पु. उद्धटपणा; अरेरावी. ' सरकारी अधिकाऱ्यांचा उर्मटपणा उतरेल व रयतेस कांहीं फायदा होईल. ' -टि १.५८९.

**उर्मल**—पु. ( कु. ) रुमाल; उरमाल पहा. ' माथ्याक उर्मल बांद. ' [ रुमाल, अप. ]

**उर्मी**—स्त्री. ऊर्मी; उमाळा; उठाव; लहर; तरंग; लाट; निकराचा जोर. ऊर्मी पहा. ' भीतरिं भरलिया उर्मी । भणे आहोजी स्वामी ॥ ' -ऋ ४३. 'जय विषयोर्मीच्या आकळिया । उल्लाळे घेती ॥ '-ज्ञा ७.७५. ' आली उर्मी साहे । तुका म्हणे थोडें आहे ॥ ' -तुगा ३३४०. [ सं. ऊर्मि=लाट ]

**उर्वरित**—वि. बाकी; अवशिष्ट; शिल्लक राहिलेलें; मागें टाकलेलें. 'आहाराच्या घासें पचोनियां जिरे। वासनाहीं उरे उर्वरित॥' –तुगा १२२०. [सं.]

**उर्वी-उर्वीमंडल**—स्त्री.न. पृथ्वी; धरित्री; जमीन. 'मग वज्रासन तेचि उर्वी.' –ज्ञा ८.४९. 'नातरी घ्यावया उर्वीचा भार। यास्तव अवतरला फणिवर॥' –संवि १७.२. 'दणाणीत उर्वीमंडल।' [सं. उर्वी]

**उऱ्हाई**—स्त्री. (ना. व.) पडसें.

**उल**—(गो.) लघुत्वदर्शक प्रत्यय. उ० –कोयती–कोयतुल, [कोयती+उल–कोयतुल=ल्हान कोयती.]

**उल-ळ**—पु. (कों. कुलाबा.) कांदा; पाती असलेला ओला कांदा (अव.) उली. [का. उळ्ळि=कांदा, लसूण वगैरे]

**उलकटणें**—सक्रि. १ उलथणें; उलथेंपालथें करणें; उलगडणें; अस्ताव्यस्त करणें; उचकटणें; विस्कटणें; उलटापालट करणें (एखाद्या पेटीचें झांकण, बैठक वगैरे). २ उकलणें; मोकळें करणें; वेगळेंवेगळें करणें; सोडविणें (एखाद्या वस्तूचे भाग). ३ संपविणें; उलगडणें. [सं. उत्+कल्=फेंकणें; म. कलथणें]

**उलखणें**—अक्रि. १ (सोन्याच्या दागिन्याची) झिजून लाख बाहेर दिसूं लागणें; माशी लागणें (लाखेच्या दागिन्याला). २ (व्यापक.) लाख निघून जाणें; निखळणें; सांधा सुटणें (कडी, फांसा, खीळ, जोड वगैरेचा). [सं. उद्+लाक्षा; म. लाख]

**उलग**—उळीग पहा. **०घारणें, वारून टाकणें**–उळीग पहा.

**उलगडणें**—सक्रि. १ सोडविणें; मुक्त करणें; मोकळें करणें. उलकटणें. 'संकटपाशनिबद्ध प्राणिगणाला त्वदन्ये न उलगडी।' –मोकर्ण ४२.११. २ एखाद्या वस्तूचे भाग सोडविणें, अलग करणें (यंत्र इ०). ३ उघडणें (घडी केलेलें वस्त्र, पुस्तकाचें पान वगैरे). ४ व्यवस्थितपणें लावून ठेवलेला वस्तूंचा ढीग किंवा साठा सोडवून पृथक् करणें; एखादी विशिष्ट रचना मोडणें. ५ संपविणें; शेवटास नेणें; पार पाडणें; तडीस नेणें (एखादें कार्य वगैरे). –अक्रि. १ सुटणें; मोकळें होणें. २ मोडणें; भाग वेगळे वेगळे होणें. ३ बंधन सुटणें; विसकटणें. ४ एखादा मोसम वगैरे संपणें, आटोपणें. [सं. उद्+लग्]

**उलगडा**—पु. १ उलगडणें; सोडवणूक; मोकळीक (कर्ज वगैरेची); सुटण्याची किंवा मुक्त होण्याची क्रिया (एखादें संकट किंवा कोडें वगैरेंतून). २ निकाल; शेवट; व्यवस्था (प्रश्नाचा, कामाचा, वादाचा वगैरे). ३ फेड; मुक्तता (कर्ज वगैरेची). [सं. उद्+लग्]

**उलगणें**—अक्रि. संपणें; निघून जाणें; बंद होणें; थांबणें (हंगाम, तारुण्य इ०). 'पर्जन्याचे दिवस उलगले.' –केक १३१. 'काजूचे दिवस उलगले.' [सं. उद्+लग्] –सक्रि. १ मोकळें, रिकामें करणें (शेत, बाग, कोठार इ० कांतील पीक, जिन्नस इ० काढून घेऊन). २ खलास करणें; नेणें (पीक; जिन्नस, वस्तु, साहित्य इ०). ३ आटोपणें; संपविणें; पुरें करणें (काम, चाकरी, समारंभ इ०).

**उलगवाडी**—स्त्री. उलगणें; अखेर; समाप्ति (हंगाम वगैरेची). 'विषयांचिया उलगवाडी।' –भाए १८२. [सं. उद्+लग्]

**उलगाउलग, उलगामालगी**—स्त्री. १ आवराआवर; आटोपाआटोप; निरवानिरव (एखादें कार्य उरकल्यानंतर सामानाची, सर्व गोष्टींची). २ समाप्ति; अखेर; उपसंहार. [उलग द्वि.]

**उलगाघाल**—स्त्री. १ घालमेल; मोडतोड; उलथापालथ. २ खटाटोप; उठाठेव; भानगड; उलाढाल. [उलगडणें+घालणें.]

**उलघाल**—स्त्री. १ अस्वस्थता; बेचैन; असमाधान; (ताप, तहान, भूक, पित्त, मृत्युसमय इ. वेळीं होणारी शरीराची स्थिति). २ उलगाघाल; भानगडीचा व्यवहार; घालमेलीचा, उलाढालीचा धंदा [उलगडणें+घालणें.]

**उलझा**—पु (व.) १ अनिर्णित गोष्ट; वांधा; गुंता. २ निर्णय लावणें. [अर. उल्झन्=गुंतागुंत; हिं. उलझाव]

**उलट**—पुस्त्री. परावर्तन; परतणें (चेंडू वगैरे). २ ओहोटी (समुद्राची) ओसर. ३ पुनरुत्थान; फेर उचल; पुनरुज्जीवन (पराजित शत्रु वगैरेचें). ४ माघार; परत, मागें आणणें; विरुद्ध गति (चाक, त्यावरचा दोर वगैरेची). ५ पुनरागमन; प्रत्यावर्तन; प्रत्यागमन (ताप, साथ, दुष्काळ वगैरेचें). ६ माघार; विन्मुखता; भंग (वचन वगैरेचा). ७ पराङ्मुखता; सोडून जाणें; विमुखता; त्याग (एखादें काम किंवा गोष्टीपासून). (क्रि० करणें). ८ ओकारी; वमन; वांती. ९ प्रत्यावर्तन; बद्दल देणें; फेड; परत करणें; (उपकार, अपकार, आदर, सन्मान वगैरेचा).) [सं. उद्+लट्; दे. उल्लट्ट] –वि. उफराटें; प्रतिकूल. –क्रिवि. परत; मागें; विरुद्ध दिशेनें; विरुद्ध मार्गानें, रीतीनें. 'त्यानें तिकडून दगड मारितांच मीं इकडून उलट दगड मारिला.' **०अहेर**–एखाद्या कार्यांत मिळालेली देणगी, अहेर (वस्त्र, वगैरे) याबद्दल दुसरा आपला अहेर देणें; परत अहेर. **०इन्साफ**–पु. एखाद्या दिलेल्या निकालाचा विचार करून पुन्हां दिलेला निकाल, निवाडा; दुसरा, फेर निवाडा. **०उत्तर**–न. प्रत्युत्तर; जबाब. २ विरुद्ध भाषण. **०करार**–पु. केलेल्या कराराच्या प्रतिपालनार्थ प्रतिपक्ष्यानें केलेला दुसरा करार; एका कराराच्या विरुद्ध दुसरा करार. **०करारांचें गहाण**–न. बाह्यतः खरेदी केलेली मिळकत तत्त्वतः गहाण समजून किंमत परत दिल्यास मूळ मालकास परत द्यावयाच्या अटीवर केलेला व्यवहार. **०घेणें**–हरकत घेणें; प्रतिकार करणें. **०गोष्ट**–स्त्री. प्रत्युत्तर; फेर जबाब; उद्दामपणानें दिलेलें उत्तर. **०ढाल-ढाला**–स्त्री. १ स्वारी परत फिरविणें; सैन्याचा मोर्चा विरुद्ध दिशेला (कूच करण्यासाठीं)

वळविणें. ( क्रि० देणें ) उलटी ढाल पहा. २ स्वपक्ष सोडून प्रतिपक्षास जाऊन मिळणें; वचनभंग करणें शब्द मोडणें; फितूर होणें; बंड करणें. **०पालट–सुलट**–स्त्री. उलटापालट. उलटासुलटा पहा. **०पुलट**–स्त्री. उलथापालथ; फिरवाफिरव; खालींवर, इकडेतिकडे करण्याची क्रिया. **०बाजी**–स्त्री. प्रतिकार; परत फिरविलेला डाव. **०मजकूर**–पु. प्रत्युत्तर; परत जबाब; फेर निरोप; उलट उत्तर. **०पत्र**–न. उत्तरादाखल लिहिलेलें पत्र. **०भेट**–स्त्री. आपल्या भेटीस आलेल्या गृहस्थाच्या घरीं भेटावयास जाणें; भेट परत करणें; परत भेट. **०मान**–पु आपला ज्यानें सन्मान केला त्याचा आपण उलट सन्मान करणें, उलट मेजवानी, उलट जाबसाल–जबाब वगैरे वाक्प्रचारांत परत फेड असा अर्थ होतो. उलट अहेर पहा. **०तपासणी**–स्त्री. १ एखादी गोष्ट पुन्हां शोधून किंवा तपासून पाहणें, विचार करणें; २ साक्षीदारास प्रतिपक्षानें विचारलेले प्रश्न. **०मनसुबी**–स्त्री. दिलेला न्याय किंवा निकाल फिरविणें; उलट इन्साफ पहा. **०लढाई**–स्त्री. फेर हल्ला, पराजित झाल्यावर पुन्हां केलेली उठावणी; पुनरुत्थान ( पराभवानंतरचें ). **०वारा**–पु विरुद्ध दिशेकडून येणारा वारा. ( क्रि० येणें, लागणें ). **०सनद**–स्त्री. जुन्या सनदेवरून कायम करून पुन्हां दिलेली सनद. **०हुकूम**–पु. १ पुन्हां केलेला पहिलाच हुकूम. २ विरुद्ध हुकूम; पहिला हुकूम रद्द करणारा दुसरा हुकूम; दुसरा हुकूम. **०हुंडा**–पु. वधूपित्यानें वराकडून घ्यावयाचें द्रव्य, शुल्क. ' माझा उलटहुंडा घेण्यासाठीं वडिलांनीं मला मुद्दाम विन लग्नाची वाढविली. '–सारं २.४१५. [ उलट द्वि. ]

**उलटकर**—वि. उलटण्यासारखा; डळमळीत; अस्थिर, कच्चा आधार असलेला ( दगड, लांकूड इ. ). [ उलट ]

**उलटणी**—स्त्री पुन्हां, परत क्रिया ( करणें ); फेरतपासणी; फेर मोजणी; फेर पाहणी, उजळणी ( करणें. ) [ उलटणें ]

**उलटणें**—सक्रि. १ पालथें करणें; उलथणें; उपडें करणें. २ ( वस्त्राची ) आंतील बाजू बाहेर करणें, वळविणें; उरफाटें करणें. ३ एखादी गोष्ट पुन्हां करणें; पुनरावृत्ति, उजळणी करणें; तपासणें. (धान्य वगैरे पुन्हा मोजणें, लेखन तपासून पाहणें, ज्ञानाची, अभ्यासाची उजळणी करणें ) ४ पार पाडणें; पुरें करणें; संपविणें (एखादें काम, भानगडीचा हिशोब वगैरे). ' हें सारें लिहिणें पडलें आहे, हें उलटावयास मला दोन महिने पाहिजेत ' ५ उलगडणें; सोडविणें, स्पष्ट करणें; अर्थ सांगणें (एखादा प्रश्न, कोडें, स्वप्न, भास वगैरेचा ). –अक्रि. १ उलंडणें; पालथें होणें. २ मागें फिरणें; विरुद्ध दिशेनें जाणें. ३ पुन्हां उचल खाणें; पुन्हां सुरू होणें ( रोग, साथ वगैरे ). ४ संपणें, निघून जाणें; मागें पडणें ( हंगाम, काल, वय वगैरे ). उ० तिशी, चाळिशी, साठी उलटणें. **उलटून गोष्टी सांगणें**–जाबसाल करणें; उलट उत्तर करणें; उद्धटपणें बोलणें. **उलटून बोलणें**–१ पुन्हां बोलणें; परत म्हणणें. २ प्रत्युत्तर करणें; उमटपणानें उत्तर देणें.

**उलटणें**—न. (कों.) खळ्यावर नुकत्याच मळलेल्या धान्याचें अंदाजानें माप करण्याकरितां योजतात ती टोपली. [ उलट ]

**उलटा**—वि. विपरीत; विपर्यस्त; परिवर्तित; उपडा; पालथा; विरुद्ध दिशेचा, बाजूचा; वरची बाजू खालीं असलेला; आंतील बाजू बाहेर आलेला; मागील बाजू पुढें असलेला; उलट पहा. –क्रिवि. विरुद्ध; परत. ' म्यां त्याला रुपया दिल्हा त्यानें माझा उपकार मानावा परंतु तो उलटा मला मारायाला पाहतो. ' **-मोल**–पु १ तोड, किल्ली, उत्तर ( एखाद्या कोड्याचें ); एखाद्या श्लोकास परत समानार्थक किंवा विरुद्ध अर्थी प्रतिश्लोक, वचन; नक्कल; प्रतिमा २ प्रत्युत्तरादाखल किंवा परतफेडीदाखल दिलेलें उत्तर, वस्तु वगैरे. मामाशब्द– उलटा अहेर. उलटा दगड; उलटा निकाल; उलटा हल्ला. उलट पहा. ३ विष वगैरेवरील उपाय उतारा अर्थ ४ पहा. [ उलट ] **०खप्पा**–पु ( मल्लविद्या ) आपल्या एका हातानें जोडीदारावर तो उभा किंवा बसलेला असतांना त्याच्या खांद्यावरून आपला हात आणून आपल्या हाताच्या पोटरीनें जोडीदाराच्या गळ्याची घाटी दाबून ज्या हातानें जोडीदाराच्या गळ्याची घाटी दाबतों त्या आपल्या हाताचा पंजा आपल्या दुसऱ्या हाताच्या कोपराच्या लवणींत घालून व आपल्या दुसऱ्या हाताची पोटरी जोडीदाराच्या मानेवर ठेवून त्याला घुसमटून मारणें [उलट+फा खुफ़तन=निजणें, खफाह=(कुस्तींत) गळा दाबणें] **०गिरा**–पु ( मल्लविद्या ) आपला एक हात जोडीदाराच्या बगलेंतून बरगडीवर ठेवून बरगडीवर ठेवलेल्या हाताच्याच बाजूचा आपला पाय जोडीदाराच्या पायाच्या ढोणशिरेवर दाबून ठेवावा व आपल्या दुसऱ्या हातानें जोडीदाराच्या दुसऱ्या पायाच्या गुडघ्याच्या लवणीत धरून पाय वर उचलावा म्हणजे जोडीदार चीत होतो. [उलटा+हि. गिराना=पाडणें ] **०पट**–पु. ( मल्लविद्या ) जोडीदारानें आपल्यास उभ्यानें खालीं धरलें असल्यास आपल्या आंतील हातानें आपल्या पुढील जोडीदाराच्या पायांतून गुडघ्याच्या लवणींत बाहेरून हात घालून व आपला आंतील पाय जोडीदाराच्या दुसऱ्या पायाच्या गुडघ्याच्या लवणींत बाहेरून घालून आपला गुडघा जोडीदाराच्या गुडघ्याच्या लवणींत टेकून गुडघ्यानें त्याच्या पायाच्या लवणींत जोरानें धक्का देऊन व हातानें जोडीदाराचा पाय वर उचलून त्यास चीत करणें. [ उलटा+सं. पत्; हिं. पटकना= पाडणें ] **०पहारा**–पु. विपरीत काळ; फिरलेला काळ. ' कलीयुगाचा उलटा पहारा जाहल्या या चाली । ' –गापो १०२. [उलट+सं. प्रहर, म. पहारा] **०पालट**–स्त्री. १ विपरीत रचना; उलथापालथ; उलटसुलट करणें; अव्यवस्था. २ (ल.) परस्पर प्रश्नोत्तरें; उत्तरप्रत्युत्तर. [ उलटा द्वि ] ३ दुनियेची उलटापालट=जगांतील, संसारांतील घडामोड, मोठा खटाटोप; धाडस; (व्यापारांत) रुपयांची, पैशांची उलाढाल; पैशांची मोड; चलनी अदलाबदल. –क्रिवि. अव्यवस्थित

रीतीनें. [तुल० सं. उपर्यस्त+पर्यस्त; प्रा. उवल्लत्थ-ड+पल्लत्थ-ड] **०पालटा-सुलटा**-वि.वरची बाजू खालीं व खालची बाजू वर असा; आंतील बाजू बाहेर व बाहेरील बाजू आंत असा; मागील बाजू पुढें व पुढील बाजू मागें असा; विरुद्ध मार्गाचा किंवा दिशेचा; अस्वाभाविक; उरफाट्या क्रमाचा; व्युत्क्रम; वेडावांकडा; विलोमअनुलोम. **०सुलटा उभा राहणें**-क्रि. विरुद्ध दिशेस तोंड करून उभें राहणें. **०सुलटा पहारा**-पु. दोन पहारेकरी विरुद्ध दिशांस तोंडें करून उभे राहून करीत असलेला पहारा.

**उलटी**—स्त्री. १ वांती; ओकारी; वमन. २ विरुद्ध गति; प्रत्यावर्तन; उरफाटा प्रकार, स्थिति ( क्रि० देणें; घेणें; मारणें ). ३ कोलांटी उडी; उलटी उडी. 'आनंदें कल्लोळा बाळा खेळती सकळा। देती उलटिया चपळा एकी एकीहुनी ॥'-तुगा १३३. ४ ( ल. ) करारभंग; वचनभंग; तत्त्वाविरुद्ध आचरण; विपरीत वर्तन ( क्रि० मारणें, करणें). 'म्हणुनी फिरून नानांनीं उलटी मारुनी केली गल्लत.'-ऐपो ३९५. [उलट] **०अंबारी**-स्त्री. भिक्षेची झोळी. ( अंबारी उलटी केली असतां झोळीसारखी दिसते यावरून ). **उलट्या अंबारींत बसणें**-भिकेस लागणें; दरिद्री होणें. 'घरचा सुखी होतों पण नशिबानें उलट्या अंबारींत बसविलें.' **०उडी**-उलटी अर्थ ३ पहा. **०ढाल**-उलटढाल पहा. **०दुनिया**-स्त्री. सार्वत्रिक अव्यवस्था; अराजकता; गोंधळ; बेबंदशाही; न्यायाच्या विरुद्ध पद्धति. **०पूजा**-स्त्री. अपमान; मानहानि; मानखंडना; उपहास. **०बाहुली**-स्त्री. अदूरदृष्टिदोष; लांबचें न पाहतां येणें; डोळ्यांतील एक खोड. **०बुकी**-स्त्री. टोशासटोसा; आघातास प्रत्याघात; उसनें फेडणें. **०शिवी**-स्त्री. अपशब्दास प्रति अपशब्द; शिवीस शिवी; उत्तरास प्रत्युत्तर; शब्दास शब्द; खरडपट्टीची, शिवीगाळीची परत फेड. **०सुलटी, उलटीसुलटी हजामत**-स्त्री. १ ( शब्दशः ) केंसांच्या विरुद्ध दिशेनें, खालून वर केलेली हजामत. २ ( ल. ) खरडपट्टी; ताशेरा; रागानें शिवीगाळ करणें; तासडपट्टी; भोसडपट्टी; अपशब्दांनीं संभावना. **०सूज**-स्त्री. शरीराच्या खालच्या बाजूकडून वरच्या बाजूस वाढत जाणारी सूज; पायाकडून वर चढणारी सूज.

**उलटून**—क्रिवि. १ परत; प्रत्युत्तरादाखल; विरुद्ध दिशेनें. २ अनादर करून; फाजीलपणें.

**उलटें**—वि. उलट पहा. **०दर्शन**—न. १ परत आल्यावर घेतलेली भेट; परतभेट. २ श्रेष्ठ मनुष्यानें कनिष्ठ प्रतीच्या मनुष्याच्या घरीं जाऊन त्याची घेतलेली भेट. **०दान**-न. परतभेट; परत अहेर, देणगी; आपणास भेट, नजर, बक्षीस, म्हणून मिळालेल्या वस्तूबद्दल परत दिलेली भेट, बक्षीस, देणगी. **०शहाणपण**-न. शहाणपणाच्या उलट वावगा सल्ला; मूर्खपणाचा सल्ला. ( क्रि० शिकविणें ).

**उलठणी**—स्त्री. १ ( शब्दशः ) कलाटणी; उलटणें. २ ( ल. ) टोमणा; टोला; खोंचदार उत्तर. 'ऐसीं देतां उलठणी। अनुरागरोपाची लावणी ॥'-शिशु ६८१. [ उलटणें ]

**उलंडणें**—उक्रि. १ कलंडणें; लवंडणें; पालथें करणें; सांडणें. 'दिव्य रत्न गोफणिलें। अहा अमृतपात्र उलंडिलें॥' -ह ३०. १९. 'तों पितर क्रोधें पाहती। याणें अन्याय केला म्हणती। दुग्ध उलंडिलें क्षितीं। निष्कोध पुत्र देखोनी॥' -जै ९६.१५. २ उलटून पडणें; उन्मळून पडणें; उपटून येणें. 'जें तुटलिया मुळापाशीं। उलंडेल कां शाखांशीं॥'-ज्ञा १५.५०. 'तंव देखिले सहोदर। जैसे उलंडले तरुवर॥' -कथा २.१२.८४. ३ उसळून येणें. ४ भरून वाहणें; तुडुंब भरणें. 'दुराशेनें हृदय उलंडी.'-दावि २८४ ५ ( लवंडणें या अर्थी ) खालीं पडणें, निजणें. 'भूमीवरी उलंडली।'-रावि ३८.६. 'मूर्छना येऊनि उलंडला।' -सप्र १२.२८. ६ त्याग करणें; सांडणें; टाकणें. 'भले अवघेचि सोडा। आधी देवाला धुंडा। आशा ममता उलंडा। ज्ञानें काळाला दंडा॥' -दावि ४८०. ७ ओलांडणें पहा. [ सं. उत्+लुंठ्; प्रा. उल्लुंड; किंवा सं. उत्+लुट्; प्रा. उल्लुट ]

**उलंडा**--वि. ( नाविक ) कलथा; कलंडा; एकदम उलथणारा ( इं. ) क्रँक.

**उलंडी**—स्त्री. ( नाविक ) होडी स्थिर राहावी म्हणून तिला दोन आडवीं व एक उभें ( पाण्यांतलें ) अशीं लांकडें लावतात तीं; होडीच्या एका अंगास ती उलटूं नये म्हणून बावखंडाच्या टोंकास जें पाण्यांत एक लांकूड बांधतात ते. ( इं. ) आऊटरिगर. उडली पहा. [ उलंडणें ]

**उलडू**—उगव. -शर.

**उलढाल**—उलाढाल पहा.

**उलणें**—अक्रि. १ ( शब्दशः व ल. ) उकलणें; दुभंगणें; फांकणें; उतटणें; भेगा पडणें; भेगळणें; आंतील नेटानें फाटणें ( जमीन, शरीर, फळ इ० ). 'वसंतें उल्हास तरुवरां। उलोनि लागल्या स्वानंदधारा।'-एभा १२.१५. 'तरि इष्टव्यसनघना घातशतें तूं नृपा न उलतास।'-मोकर्ण ३.४६. 'पिता सांगे हितावबोध। म्हणे हा सन्निपातला वृद्ध। हृदय उले ऐसा बोले शब्द। त्याच्या भारें दुःखी धरा॥' -ह २७.१३२. २ ( ल. ) उचंबळून येणें; पाझर फुटणें; सद्गदित होणें. 'श्रीकृष्ण मथुरेसी जाईल। प्रेमाचा सागर उचंबळेल। ते कथा ऐकतां हृदय उलेल। प्रेमळ सद्भाविकांचें।' -ह १७.२१६. [ सं. उत्+लू=कांपणें; दे. उल्लक=भग्न, फुटलेलें ]

**उलथ**—उलथी पहा.

**उलथ**—वि. स्पष्ट; उलथा अर्थ ५ पहा. 'जाग्रती उलथ नव्हे स्वप्न। साक्षात्कारचि तो परिपूर्ण।'-दावि १८६.

**उलथ**—पुस्त्री. एखाद्या टेकडीची, गांवाची दूरची बाजू, सीमा, टोंक; दूरचा, अखेरचा, शेवटचा भाग.

**उलथणी**—स्त्री. उलथ; कलाटणी; उलथी पहा.

**उलथणें**—क्रि. फाटणें; दुभंग होणें. 'तो शोक सांगतां उलथे धरणी।' –रावि २४.४०. [ सं. उद्+तल ]

**उलथणें**—न. १ सराटा; कलथा; भाकरी वगैरे परतविण्यासाठीं, आटवण्याचें दूध ढवळण्यासाठीं, केलेला पितळ किंवा लोखंडाचा पसरट तोंडाचा दांडा; उलथा. ( व. ) उलथन. २ ( चांभारी धंदा ) जोडयाचीं ढोंपरें व्यवस्थित करण्यासाठीं उपयोगांत आणावयाचें लांकूड. उलथा पहा. [ सं. उत्+तल ; प्रा. उत्थल्ल ]

**उलथणें**—सक्रि. १ उलटें करणें; उताणें करणें; खालची बाजू वर करणें. उलटणें. 'आकाश पडावया गडाडी। पृथ्वी उलथावया हडबडी॥' –एभा १७.१४२. २ आंतील बाजू बाहेर करणें; फिरविणें ( अंगरखा, पागोटें इ० ). ३ पुरी व्यवस्था लावणें; उरकणें; पुरें करणें; पार पाडणें; तडीस नेणें ( एखादें भानगडीचें काम किंवा प्रश्न ). ४ उलथेंपालथें करणें; चाळविणें; खालींवर करणें; हुडकणें (एखाद्या राशींतून वगैरे); धुंडाळणें. ५ उत्पन्न होणें; प्रादुर्भूत होणें. 'परमतृप्ती उलथल्या पोटीं। अमृतही न लाची ओंठीं।' –एभा १२.५९१. ६ पुन्हां करणें; परत करणें. 'तेंचि उलथोनि ज्ञान कथा। उद्धवासि होय सांगता।' –एभा ११.२५५. ७ खालवर करणें (उखळांतील धान्य). –अक्रि. १ उलटें होणें; दुसरी बाजू वर येणें. २ परतणें; पुन्हां येणें. ३ ( ल. ) आकस्मिक मृत्यु येणें; तटकर मरणें; मरून पडणें ( सामा. शिवी देतांना वापरतात ). 'एवढा बाप्या पण पटकीनें हां हां म्हणतां उलथला.' 'उलथत नाहीं मेला एकदांचा!' ४ उठणें; लोटणें. 'घननीळ सांवळा। परब्रह्माचा पूतळा। पाहावेया गाओ आला। उलथौनियां॥' –शिशु ५३५. [ सं. उद्+तल्; प्रा. उत्थल; म. उथळ वर्णव्यत्यास ] ०जाणें–क्रि. मरणें. 'त्याचे म्हातारडे आईबाप तिकडे उलथून गेले.' –नामना ११४.

**उलथा**—वि. उताणा; तोंड वर असलेला; पाठीवर पडलेला, पालथा याच्या उलट. –पु. १ कलथा; सराटा; उलथणें पहा. २ उलट विरुद्ध, ( बाजूचा मनुष्य ) प्रतिपक्षी. ३ कांडतांना उखळीच्या तळाशीं राहिलेलें धान्य उखळून वर काढण्याची क्रिया. ४ (ल.) ठसा; संस्कार. 'निद्राकाळीं बुद्धीचा माथां। बैसे जागृतीचा उलथा॥' –विउ २.५२. ५ ( ग्राम्य ) उत्तर; जबाब; टोमणा. ( क्रि० देणें. ) ६ उलट व्यत्यास; स्थितिः प्रतिपक्ष; विरुद्ध गोष्ट, अर्थ, वस्तु. 'तूं म्हणसी जे स्वप्नावस्था। ते तंव जागृतीचा उलथा। तरी जागृती तत्कार्य व्यवस्था। केवीं घडे।' –विउ ९.३१. 'स्वप्न जागृतीचा पै उलथा। जागृतीमाजी इंद्रियें करिती ज्या ज्या अवस्था। तदनुसार नाना परी व्यवस्था। मक्करी स्वप्नामाजीं।' –स्वादि ५.२.४४. [ सं. उत्+तल् ] ०जमीन–स्त्री. १ ( कों. ) एकाच शेताचा किंवा मळ्याचा थोडा दूर असलेला भाग, पुरवणी भाग; मुख्य शेतास राब, कवळ वगैरेचा पुरवठा करणारी पड जमीन किंवा सामान्य पडीत जमीन. 'माझी उलथा जमीन येथून कोसभर आहे.' २ (सामा.) पडीत जमीन. ०पसा–पु. उताणा हात; भिक्षा मागण्याकरितां पुढें पसरलेला हात. ०पालथ–था–स्त्री.वि. वरखालीं करणें; उलटापालट. उलटापालटा पहा. [ सं. उद्+तल्; प्रा. उत्थल्ल+पत्थल्ल; हि. उथलपाथल ]

**उलथी**—स्त्री. उलटी; कलाटणी; परिवर्तन; उलटण्याची क्रिया. ( क्रि. खाणें; घेणें; देणें ).

**उलपा–फा, उलपो**—पु. ( राजा. क. ) शिधा. 'भटजींना उलपा व दक्षणा दिली.' [ अर. उल्फा=रोजमुरा ]

**उलफुली**—स्त्री. ( गो. ) टाकळयासारखें एक झाड; याची भाजी करतात. [ सं. उत्+पुष्प ]

**उलमत**—वि. उन्मत्त. 'आजळ कापी जळ सारसत, अंगरख चरख उलमत कस्तुरीमृग कस्तुरी नाभित लागला पगला.' –ऐपो २४३. 'साठ कोट उलमत्त डुलतात कुंजर.' –ऐपो २४३. ( टीप शितुत ३३१. ) [ सं. उद्+मत्त ]

**उलमा**—पु. विद्वान. [ अर. उलमा, अलीम अव. ]

**उलमी**—स्त्री. ( कों. ) एक प्रकारची होडी.

**उलव**—स्त्री. ( कर्ना. ) चाहूल; हालचाल; जाग ( माणसाची वगैरे ). [ का. उलुवु–उलिवु=आवाज ]

**उलवण**—न. ( विणकाम ) कापड विणल्यानंतर फणींत राहिलेले धागे, दोरे. [ सं. उद्+वलन ]

**उलवणें, उलैणें, उलौणें**—( गो. ) बोलणें. [ सं. उद्+लप्; प्रा. उल्लव=सांगणें. किंवा सं. उल्लपन; प्रा. उल्लवण=कथन ]

**उलसमार**—स्त्री. ( गो. ) जेवणानंतर येणारा आळस. [ सं. लस्=काम करणें, किंवा सं. अलस=आळस ]

**उलसा, उलिसा, उलुसा**—वि. थोडा; किंचित्; इवला; इवलासा पहा. 'उलुसि साखर खर्जुर खोबरें।' –मंराधा २३. [ सं अल्पीयस् ]

**उला**—पु. ( व. ) वैल; अवेल ( चुलीचा ). वैल पहा. [ दे. उल्ली=चुला ]

**उलागीर**—वि. १ प्रवासी; उपऱ्या; तात्पुरता राहणारा. २ अनाहूत; आगंतुक. ३ मंत्रानें उठविल्याशिवाय किंवा बोलाविल्याशिवाय अचानकपणे येणारें; प्रकट होणारें ( भूत, पिशाच्च वगैरे ) ४ विन जरूरीचें; फालतू; फाजील ( सामान, वगैरे ). [ सं. उद्+लग् ]

**उलाघाल–ढाल**—स्त्री. १ अस्वस्थता; बेचैन ( तापानें वगैरे होणारी ). २ भानगड; चळवळ; खटपट; धडपड ( कामधंद्याची

वगैरे ). ३ खळबळ; घालमेल; क्रांति. ' सातव्या-आठव्या शतकांतील मोठी उलाढाल म्हटली म्हणजे बुद्धधर्माचा ऱ्हास ' -टि ४. ११५. या व इतर अर्थी उलगाघाल, उलेंढालें पहा. [ सं. उद+घात (धातु-हन्) ]

**उलाघाली-ल्या, उलाढाल्या**—वि. उलाघाल करणारा; चळवळ्या; गडबड्या; खटपट्या; नमल्या उठाठेवी करणारा. [ सं. उद्+घात-धातु-हन् ) ]

**उलाट**—पु. १ उलटी; वांती. 'पीत उसळलें उलाट जाला ।' -दा ३.६.३३. २ उडी. 'दाटे थाट उलाट घेति गगनीं थोडी तयां वाट ते.' -आसे ३७. [ सं. उद्+लुंट्; प्रा. उल्लट्ट ]

**उलाटयंत्र**—न. तोफ उल्हाटयंत्र पहा. 'भांड्यादि बंदुखा उलाटयंत्र ।' -दावि ३६३. [ सं. उल्हाटयंत्र ]

**उलाड**—वि. उलार; उलटण्यासारखी; मागच्या बाजूस अधिक वजन असलेली ( गाडी.) [ उलटणें; सं उद्+लुंट्; प्रा. उल्लालिअ= वर फेंकलेली ]

**उलांडणें**—उक्रि. ओलांडणें; उल्लंघणें; पलीकडे जाणें. 'रामराम जप जपोनि दोष खाणिला । हा महाभवांवुनिधी बा उलांडिला ।' -आप ८. [ ओलांडणें ]

**उलांडी**—उलंडी पहा. ०**बाजू**-स्त्री. उलांडीकडील होडीची बाजू.

**उलार**—( ना. ) उलाड पहा.

**उलाळ**—पु. मोठा आवाज; उल्लोळ. 'खणण खणण खणखणिती ताळ गणिती मस्त दस्त कीं हस्ती ताळ उलाळ उफाळती नेमे पाळिती जाणिजेत समस्ती ' -दावि ४१७. -वि. उंच; वर 'आतां कोण्या नृपाळें धनु करकमळें ऊचलीजे उलाळे ।' -सीतास्वयंवर (अनंत) ७८. [ ध्व; उद्+लल् ]

**उलाळ**—न. उडी. 'परतिला पाचारोनी । उलाळें घालितु ।' -शिशु १०७६. [ सं. उद्+लुट्; प्रा. उल्लाल=उंच, वर फेंकणें ]

**उलाळणें**—क्रि. उड्या मारणें 'काळ चळाळ उलाळत आहे जेर सकळ जन रे ।' -दावि १२३. [सं. उद्+लुट्. प्रा. उल्लाल=वर फेंकणें हिं; उलालना ]

**उलिग-गें**—न. १ नियमित काम, नेमलेलें काम, सेवा, चाकरी. 'वृत्ति जाणौनि उलींगें । वोळगवीति ।' -ऋ ३४. २ वेठकाम, बिगार. -वि. नियमित; ठराविक. [ का. ऊळिग=सेवा, चाकरी ]

**उलिगवाडी**—स्त्री. चोरी; लुटालूट; वाटमारी. 'करित उलिंगवाडी तिये तपोवनीं.' -भाए ४३४. [ का. उळि=चोर ]

**उलिंगी**—पु. चाकर; नोकर; सेवक. 'कीं आरोगितां परमानंदु । उलिगिए लाहाति प्रसादु ।' -ऋ ७८. [ का. ऊळिग=सेवा, चाकरी ]

**उलु-लू-क**—पु. घुबड; दिवाभीत. [ सं. ]

**उलूक**—पु. घोड्याच्या पायास होणारा एक रोग.

**उलूखल**—न. उखळ. 'उलूखलीं दाटुनि सत्वर । तप्त मुसळें चेंचिती ।' [ वैसं. उलूखल; तुल० का. उरूकल; उरुकु=स्थिर+ कल्लु=दगड ]

**उलेंढालें**—न उलाढाल; मोठमोठे बेत; मोठ्या प्रमाणावर खटपट, धडपड; द्रव्यार्जनार्थ केलेले अनेक तऱ्हेचे प्रयत्न, उद्योग, भानगडी, घडामोडी; उपद्व्याप; संसारांतील दगदग. [ उलाढाल ]

**उलेमा**—पु. इस्लामी पंडित, धर्मवेत्ता, आचार्य. [ अर. उलमा, अलीम अव. ]

**उलो**—स्त्री. ( गो. ) हाक [ सं. वल्ग्=बोलणें; किंवा सं. उद्+ लप्; प्रा. उलव ] ०**भर**-क्रिवि. हांकेवर.

**उल्का**—स्त्री. १ एकाएकीं तुटणारा, तुटलेला तारा; अशनि; आकाशांतून पडणारा तारा. २ चुडी; पलिता; कोलीत. 'वीरांसि आज्ञा दिधली म्हणे घ्या रे उल्का ।' -कमुरा ३६.१२. [ सं. ] ०**पात**-पु. १ उल्कांचा, ताऱ्यांचा वर्षाव; तारे निखळून पडणें. २ ( ल. ) अनर्थ; संकट. ( जाळपोळ, लुटालूट इ० ). [ सं. ]

**उल्फा**—१ उलफा पहा. 'मिंध उल्फे ' -मदरु १.८१.

**उल्फा भोजन**—न. लग्नानंतरचें जेवण. 'लग्नानंतर उल्फाभोजनाचें आमंत्रण येतें ' -गेरापुविवि १९१. [ अर. उल्फत्=मैत्री ]

**उल्ब**—न. गर्भावरील वेष्टण; गर्भाच्छादन. 'नातरी उल्बाची खोळी । गर्भस्थासी ' -ज्ञा ३ २६०. [ सं ]

**उल्बण, उल्बाण**—न १ वातपित्तादिकांचा अतिशय क्षोभ. २ ( ल. ) भयंकर संकट; आपत्ति; अनर्थ ( दुष्काळ, रोग, लुटालूट, परचक्र वगैरे ) 'काळक्षोभाचिये दृष्टी, शतवर्षें अनावृष्टी । तेणें अत्युल्बणें आटे सृष्टी । पृथ्वीच्या पोटीं कांहीं नुरे ।' -एभा ३. १५८. ३ सार्वत्रिक पीडा; त्रास; दुःख; आकांत. [ सं. उल्बण ]

**उल्बण (संयुतहस्त)**—पु. (नृत्य) हात उपपद्मक करून त्यांच्या अग्रभागास तर्जनीपासून बाहेरून आंत विळखा घालणें व मग ते हात एकमेकांत गुंतवून तसेच गुंतलेले हात डोक्यावर नेणें. [ सं. ]

**उल्मुक**—न. कोलीत; पलिता; मशाल; पेटलेली चूड, लांकूड, गोंवरी इ०. [ सं. ]

**उल्लंघ, उल्लंघन**—न. १ अतिक्रम; ओलांडणें; पार जाणें; पलीकडे जाणें. २ नियमभंग; मर्यादातिक्रम; आज्ञाभंग. [ सं. उद्+ लंघ् ]

**उल्लंघणें**—उक्रि. १ ओलांडणें; पलीकडे जाणें; पार होणें. २ मर्यादा सोडणें; अतिक्रमण करणें ( मर्यादा, रीत इ० ). 'उल्लंघेली लाज । तेणें साधियेलें काज ॥ -तुगा १९८८. [ सं. उद्+लंघ् ]

**उल्लंघित**—वि. १ ओलांडिलेलें; पलीकडे गेलेलें; अतिक्रांत. २ मर्यादा सोडलेला; आज्ञाभंग केलेला; नियम मोडलेला.

**उल्लसणें**—क्रि. १ विलसणें; प्रकाशित होणें; तेजयुक्त होणें; प्रकट होणें. 'समुद्र कां वायुवशे। तरंगाकार उल्लसे॥' –ज्ञा १५. ३४४. २ आनंदित होणें; प्रसन्न होणें; संतुष्ट होणें. [सं. उद्+लस्=प्रकाशणें, खेळणें]

**उल्लसित**—वि. १ प्रफुल्लित; आनंदित; संतुष्ट; हर्षयुक्त. २ सुशोभित; सतेज; प्रकाशित. [सं. उद्+लस्]

**उल्लाट**—वि. उग्र –शर. [सं. उद्+लट्]

**उल्लास**—पु. (विरू.) उल्हास. १ उत्साह; आनंद; प्रसन्नता; संतोष; सुस्वभाव. 'भाग्य तेथ विलासु। सुख तेथें उल्लासु॥' –ज्ञा १८.१६३७. २ हौस; आनंद वाटणें; आवड असणें; गोडी लागणें. 'आधींच शंखाचा उल्लास। त्यांत पातला फाल्गुनमास॥' [सं उद्+लस्]

**उल्लासणें**—अक्रि. आनंदित होणें; संतोषणें; उल्लासयुक्त होणें. 'आला नीरधराभिराम निकटीं हस्तींद्र उल्लासला॥' –गजेंद्रमोक्ष (रघुनाथपंडित) ४९. [सं. उद्+लस्]

**उल्लासी, उल्हासी**—वि. आनंदी; उत्साही; प्रसन्न.

**उल्लाळ–ळा, उल्हाळा**—पु. १ उडी उलाळ पहा. 'आडाऊं ऊंठिलें उल्लाळे घालितु। धनुवाडेयां पुढां॥' –शिशु ९५२. 'उल्लाळ देत कवणे परी। वैकुंठ कैलासाहूनि वरी॥' –एरुस्व १७.२६. 'लवणाची मासोळी। जीवनीं घेत्ये उल्लाळा॥' २ उसळी; ऊर्मी; उमाळा. 'जेथ विषयोर्मीच्या आकळिया। उल्लाळे येती॥' –ज्ञा ७.७५. 'एवं इंद्रियवृत्तिउल्लाळे। मोडिले गुरुवाक्य प्रतीतिबळें। निजाधिष्ठानमेळें। कळसले एकेवेळें अखंड कुडपे॥' –एभा २.५१४. 'कर्कश शब्दाचे उल्लाळ। नादें नभ दणदणी॥' –वेसीस्व १४.११९. ३ आनंद; उत्साह. 'वत्सें आणि गोवळे। जाती परम उल्लाळें॥' –ह १०.२६५. [सं. उल्लोल=लाट, प्रा. उल्लाल=वर फेंकणें]

**उल्लाळणें, उल्हाळणें**—अक्रि. १ उड्या मारणें; उड्या मारून वर, बाहेर येणें (पाण्यांतून मासा इ०). २ नाचणें; बागडणें; आनंदित होणें. 'ती माहेरीं जायला मोटी उल्लाळली.' –उक्रि. वर उचलले जाणें; उलटणें (मागच्या बाजूस अधिक ओझें झाल्यामुळें गाडी वगैरे). **उल्लाळ जाणें**–असाहि प्रयोग होतो. [उल्लाळ]

**उल्लाळणें**—उक्रि माखणें; लेप करणें, लावणें; 'चंदनें श्रीकर उल्लाळिले। वरि उष्णोदकें प्रक्षाळिले॥' –ऋ ५३९ [सं. उद्+लालय्; प्रा. उल्लाल=पीडणें, ताडणें]

**उल्लिंग**—वि. नभ. [सं. उद्+लिंग]

**उल्लू**—न. घुबड. -वि. १ (ल.) मूर्ख; अविचारी; मंद; खराब; टोणपा. २ धुंद; गुंगींत असलेला; कैफांत असलेला. ३ उतावीळ; हांवरा. 'उल्लू आहे बेटा!' [सं. उलूक=घुबड, हिं. उल्लू] **०पणा**–पु. अविचार. 'हा आपला केवढा उल्लूपणा.' –चंद्रगुप्त १६९. **०बनणें**–अविचारी, वेडा होणें. **०मशालजी**–वि उतावीळ; मूर्ख; अविचारी (मनुष्य). 'परिषदेस जाण्याकरतां हपापलेल्या उल्लूमशालजींना नाचवून भागावयाचें नाहीं.' –के १९.७.३०. **म्ह०** उल्लूकाभाई मशालजी=घुबडाला उजेड सहन होत नाहीं तेव्हां त्याच्याशीं स्नेह अशक्य.

**उल्लेख**—पु. १ उच्चार; निर्देश; दिग्दर्शन; प्रस्ताव. २ (लेखामध्यें) समावेश; निर्देश करणें; लिहून व्यक्त करणें. [सं. उद्+लिख्]

**उल्लोकित (दर्शन)**—वि. (नृत्य) नृत्यामध्यें उंचावरचें पाहणें. [सं. उद्+लोक]

**उल्लोच**—पु. चांदवा; छत; पाल; मंडप. [सं.]

**उल्हा, उल्हाणें**—पु न. (व.) वैल; अवेल, वैल पहा. 'उल्हाण्यावर भाजी शिजते.' [दे. उल्ली=चुला]

**उल्हाट–टी**—पु स्त्री. (व.) उलटी; ओकारी; वांती. 'मघाशीं त्याला एक उल्हाट झाला त्यांत अन्नच पडलें.' [सं उत्+लट्; म. उलटी]

**उल्हाटयंत्र**—न. तोफ; गरनाळ. 'उल्हाटयंत्राचेनि मेळें। षट्चक्रपाळें भेदिलें॥' –एभा ९.१२३. 'लघु उल्हाटयंत्रें आधीं। घेऊन पुढें धावती खांदी॥' –ह २२ ३३. [सं.]

**उल्हाटशक्ति**—स्त्री. कुंडलिनी. 'तेथ उल्हाट शक्तीचेनि उजिवडें.' –ज्ञा ९.२१४. [सं.]

**उल्हास, उल्हासणें, उल्हासी**—उल्लास, उल्लासणें, उल्लासी पहा. 'आलिंगनास ते पाणी। उल्हासती पै माझे॥' –मुसभा ८.९८. [सं.] **म्ह०** आधींच उल्हास त्यांत फाल्गुनमास.

**उल्हाळ**—उल्लाळ पहा. १ वर उडी. 'मज जीवनीं मासोळी उल्हाळ घेती प्रीती करून॥' –सला ३. २ उमाळा. 'त्या मुलाला पाहतांच प्रेमाचा उल्हाळा आला.'

**उल्हाळें**—(विणकाम) हातमागाची ओवी एके जागीं बसविण्याची खुंटी; खिटी.

**उवगा**—पु. बांबू; वेळू.

**उवणें**—अक्रि. उद्भवणें. 'ऐसें बोलें सनानिली। तंवकें बैठी ठेली। जैसी शृंगाराची दाटि उविली। मदनमंत्रें॥' –शिशु १८६.

**उवला**—वि. उवा असलेला. [सं. यूका; दे. ऊआ]

**उंवला**—पु. (राजा.) हरभरे, पावटे वगैरेचा सोलाणा [सं. उद्+वल्]

**उवस**—(गो.) दमा; उबस पहा.

**उवळ, उंवळ, उंवीळ**—वि. पुरेसा पीळ नसलेलें; पीळ उडालेली, सुटलेली (दोरी, सुंभ इ०). [सं. उद्+वल्]

**उवळणें, उंवळणें**—क्रि. पीळ सुटणें; उलगडणें; पीळ सैल होणें (दोरीचा वगैरे). [सं. उद्+वल्]

**उवळणें**—क्रि उपळणें, उबळणें पहा. १ उष्णतेनें पिकावयाच्या आधीं कुजावयास लागणें (फळ वगैरे). २ फुरसें किंवा

घोणस चावल्यामुळें शरीराच्या छिद्रांतून रक्त वहावयास लागणें. ३ अर्धवट बडवलेला बैल पुन्हां वीर्ययुक्त होणें. ४ उघडणें; द्रव येणें; पाझर फुटणें ( हृदयास ). [ उबळणें ]

**उवळा**—वि. १ उष्णतेमुळें जून होण्याच्या पूर्वीच पिकलेलें (फळ); मिळमिळीत; लिबलिबित; बिलबिलित. २ निस्तेज; दुबळा निरुत्साही; मंद ( भाषण, चेहरा ). [ उबळणें ]

**उवळा, उंवळा**—वि. ( राजा. )पुरेसा पीळ नसलेला ( दोर वगैरे ). [ सं. उद्+वल् ]

**उवाइणें, उवायिणें**—क्रि. १ प्रसन्न होणें; संतोषित होणें; आनंद पावणें. ' देखें कूर्म जियापरी। उवाइला अवयव पसरी।' —ज्ञा २.३५२. ' ते काई पां चित्त उवाइलें। इये बोलीं तुझें।' —ज्ञा ५.१६२. २ शांत होणें. ' क्षोभलेपणें माजे। उवाइला ठायीं गाजे।' —ज्ञा ६.२१५. ३ स्पष्ट करणें; विस्तारानें सांगणें. ' जो सांख्यशास्त्रीं आहे। उवाइला।' —ज्ञा १८.५१९. ' तोचि सामग्रीनें उवाइला।' —रंयोवा १.७६७. [ सं. उप+दिश्; प्रा. उवइस ] ४ स्थापन करणें; उभारणें. ' मी कळसु याचि कारणें। अठरावा अध्यायो म्हणें। उवायिला बादरायणें। गीताप्रासादा।'—ज्ञा १८.३३. [ सं. उप+इ=जाणें; उपाहित—उवाइअ+ल=उवाइल. —भाअ १८३५. ]

**उवाइला-यिला**—पु अभिप्राय. 'ऐसा श्रीगुरुचा उवायिला। निवृत्तिदासासी पातला।' —ज्ञा ५.१४३. —वि. प्रशस्त; मोठा; विस्तीर्ण;. ' वरि आपुलिया स्मरणाची उवाइली। हींव ऐसीं करी साउली।'—ज्ञा ८.१३३ [ सं. उप+इ ]

**उवाय**—पु. १ सुख; आनंद. उवाव पहा. ' जो बहुवे विषयविलासें गुंफे। तो म्हणती उवायें पडिला सापे।'—ज्ञा ९.५०९. 'होऊनि यावें उवाया। कैवल्याचिया।' —ज्ञा १६.२७०. २ उत्कर्ष; भर; विकास. 'वयसेचेनि उवायें। संपत्तीचेनि सावायें।'—ज्ञा १३.७७१. ' आंगाचिया आटणिया। कांत उवाया आणिला जिया। स्वसंकोचें प्रिया। रूढविली जेणें।' —अमृ १.३२.

**उवार**—पु. ( गो. ) पूर; ओर (नदीचा वगैरे ). ' पावसाचो उवार आयला=पावसाचा पूर आला. ' [ सं. आ+पूर ]

**उवारीस येणें, उवाऱ्यास येणें**—क्रि. अधिक होणें; उरणें; वांझ्यास रहाणें; पुरून उरणें; वारीस येणें पहा. [ उरणें+येणें ]

**उवाव**—पु. १ आनंद; उत्साह. ' फेडितां बंधनाचा ठावो। तूं जगद्बंधु ऐसा भावो। धरूं वोळगे उवावो। तुझाचि आंगीं।' —ज्ञा १७.१०. २ उत्कर्ष; प्रसार; भर; उसळी. ' जें निरोधिलें घे उवावो। जया संयमुचि होय सावावो।—ज्ञा ६.४१६. ३ विस्तार; सामर्थ्य. ' केवढा माझा उवावो। करितां कोण प्रस्तावो।' —ज्ञा १८.६२२. ' आणि सुखाचें घेणें देणें। निकें उवाया ये येणें।'—ज्ञा १७.१३६. [ सं. उप+इ किंवा वा ]

**उवाव**—पु. अवकाश; वाव. ' तेथ साउमा घेयावा उवावो। तंव वोडवला आन प्रस्तावो।' —ज्ञा १६.६२. [ उ+वाव ]

**उंवाळ्ळॅलॉ**—वि. (गो.) १ ओंवाळलेला. २( ल. ) वाईट स्वभावाचा; कोणास नको असा. [ ओंवाळणें ]

**उर्वीळ**—उवळ पहा.

**उवेड-ढ**—वि. १ उलगडा करणारा. २ वेढा उठविणारा. [ सं. उद्+वेष्ट्; म. वेढणें ]

**उवेडा-ढा**—पु. १ वेढा उठविणें. ' जे अमरावतीये आला धाडा। तै म्यां एकलेनि केला उवेडा।' —ज्ञा ११.३८७. ' न करितां रे उवेढा। केवी जाऊं पाहसी पुढां।' —एरुस्व ८.२८. २ (ल.) उलगडा; मोकळीक. [ सं. उद्+वेष्ट्; म. वेढा ]

**उवेर-री**—स्त्री. अवशिष्ट भाग; अवशेष; ऊर; राहिलेला भाग. [ सं. उत्+पृ-पूर; प्रा. उव्वर; उर्वरित ]

**उवेरा-ला**—वि. उवा असलेला ( माणूस, डोकें ). [ सं. यूका; प्रा. ऊआ ]

**उशना**—पु शुक्राचार्य; दैत्यगुरु. 'कविं आंतु धैर्या ठाओ। उशनाकवि तो मी।' —राज्ञा १०.२७१; —एभा १.११६. [ सं. ]

**उशागति, उशेगत**—स्त्री. १ बिछान्याची किंवा पलंगाची डोक्याकडची बाजू. २ शेताची, मैदानाची वरची बाजू. [सं. उत्+शीर्ष; प्रा. उस्सीस+गात्र, गत ]

**उःशाप, उश्शाप, उश्राप, उच्छाप**—पु. शापनिवृत्ति; शापमोचन; शापाची तीव्रता कमी करणारें वचन, वर. [ सं. उत्+शप् ]

**उशाळ**—पु (कर्ना.) उंसाच्या मळ्यांतील आठ इसमांवरील मुख्य. [ सं. इक्षु; म. ऊंस ]

**उशिटणें**—अक्रि. उष्टे करणें, होणें. ' ऐसें उपाधी उशिटलें। काय वर्णूं।' —ज्ञा १८.२२. [ सं. उच्छिष्ट ]

**उशि(सि)टा**—वि. उष्टा; उच्छिष्ट. ' जें काळाचा खिच उशिटा। जें आशेचा आंगवठा। जन्ममरणाचा वोलिंवटा। स्वभावें जें॥' —ज्ञा ८.१४४. ' तऱ्ही नव्हेचि उसिटी। दिठी जयाची।' —अमृ २.१५. [ सं. उच्छिष्ट ]

**उशिणी**—स्त्री. उसनवारी; कर्ज देणें. ' परि अनारिसें पद्मपुराणीं। कीं दहा अवतारांची उशिणी। ते भाष फेडाया लागुनि। केलें येणें॥' —कथा ७.५.१२८. [ उसनें अप. ]

**उशिरां**—क्रिवि. विलंबानें; दिरंगाईनें; अतिकालीं. [ उशीर ]

**उशिशी**—स्त्री. उशी पहा. ' करोनी अग्निधाराची उशिशी। शरपंजरीं निजविली जैसीं। नेतवट शय्यारूपें तैसी। वल्कलेंवीण॥' —ज्ञाप्र ७७२. [ सं. उत्+शीर्ष ]

**उशी, उंशी**—स्त्री. डोक्याखालीं घ्यावयाची लहान गादी, गिरदी; उसें. [ सं. उत्+शीर्ष. प्रा. उस्सीस ] **०उशापायतीं असणें, उभा राहणें, बसणें, लागणें**—१ नेहमीं जवळ असणें;

संनिध असणें (पुढील गोष्टीसाठीं). २ (ल.) संरक्षण करणें; मदत करणें; साहाय्य करणें; सेवा करणें. ३ (ल.) त्रास देणें; उपद्रव देणें; वाटेंत येणें; आड येणें. **०उशापायतीं रडणें**–एकसारखी तक्रार करणें; सतत कटकट करणें; किरकीर लावणें; त्रास देणें.

**उशी**—स्त्री. उसळी; उडी; चेंडू आपटला असतां वर येतो ती क्रिया. 'लागोनि अधोदेशीं ते घेउनियां सुमंत्रितेषु उशी।' –मोभीष्म ११.१४१. [सं. उत्+सृ–शी]

**उशी**—स्त्री. (गो.) ऊंस. [सं. इक्षु]

**उशीकांडो, उशेकांडो**—न. (गो.) उसाचें कांडें.

**उशीर**—पु. १ अतिकाल; बराच वेळ. २ विलंब; दिरंगाई; खोळंबा; वेळ टळणें. 'भोजनासी उशीर जाले तुम्हा।' –सप्र १४.५. ३ अवकाश; अवधि. 'अरे, अजून भोजनास किती उशीर आहे?' [सं. उत्+चिर] **०धरणें**–क्रि. थांबणें; वाट पाहणें. **उशीरावर येणें–धरणें**–क्रि. दिरंगाई करणें; विलंब करणें; वाट पहावयास लावणें; ताटकळत ठेवणें.

**उशीर**—पु. एक जातीचें सुगंधी गवत (वाळा, इ०) [सं.]

**उंशील, उशेल**—न. (राजा. गो.) उंसाचें शेत; उंसाची लागवड. [सं. इक्षु; गो. उशी; म. ऊंस]

**उश्टर**—पु. (प्र.) उष्टर पहा.

**उश्रम-मा**—पु. १ उसासा; जोराचा श्वास; दम. (क्रि० घेणें; टाकणें). २ विसांवा; विश्रांति. (क्रि० घेणें). [सं. उत्+श्रम्]

**उश्रमा**—१ पृच्छा; प्रत्युतर. 'त्यावर बावांनीं (महादजी शिंदे यांनीं) उश्रमा केली कीं' –मरिउ २.४५. २ याचना; मागणी. 'उश्रमा न करी कवणापुढें' –दावि ४५६. [सं. उत्+स्मृ]

**उश्रमा**—पु. (व.) राग; रुसवा; गाऱ्हाणें. 'तुम्हीं लग्नाला आले नाहीं याबद्दल बंडूचा तुमचेवर उश्रमा आहे.'

**उश्रामा**—पु. केलेल्या उपकाराची स्मृति; आठवण. [सं. उत्+स्मृ]

**उश्राप**—पु. उःशाप पहा. 'उश्राप काळीं पुन्हां आले। पूर्वदेहीं' –दा ९.८.९. 'मागुता उश्राप दिधला' –वेसीस्व ३.३०.

**उश्वास**—पु. उच्छ्वास, बाहेर टाकलेला श्वास; जोराचा श्वास; उसासा. 'उश्वास टाकोनि दुस्तरी। मंचकीं बेसे॥' –कथा १.८.७३. 'भरोसा नाहीं वाचेल ऐसा। म्हणोनि उश्वास टाकीत।' [सं. उत्+श्वस्]

**उषःकाल**—पु. पहांट; प्रभात; सूर्योदयापूर्वीच्या दोन घटका. 'पंचपंच उषःकालीं रविचक्र निघो आलें।' –होला १७. [सं. उषस्+काल]

**उषःपान**—न. उषःकालीं करावयाचें उदकपान; रात्रीं निजतांना उशाशीं झांकून ठेवलेलें पाणी पहाटेस पिणें; असें पाणी नाकानें पिणें हितावह समजतात. यापासून मलशुद्धि होते. हें पाणी प्याल्यावर एक झोंप घ्यावयाची असते. [सं. उषस्+पान]

**उषा**—स्त्री. १ संधिप्रकाश. २ उषःकाल; प्रभात; पहांट. 'उघडि नयन रम्य उषा, हंसत हंसत आली।' –रेंदाळकर. [सं.]

**उषा**—उशी अने० पहा. 'खाशा वेन्यावाणी पाठि लागते आणखी उषा उसोशा।' –सला ८५.

**उष्टणें**—क्रि. अलग करणें; सोडविणें; उचकणें; उचकटणें; उपटणें; बाहेर काढणें. [सं. उत्+स्यूत]

**उष्टर**—पु उंट. 'उष्ट्रें डसोन उचलिती' –दा १.१०.५८. [सं. उष्ट्र; फा शुतुर किंवा उश्तुर] **०खाना**–पु. उंटांची पागा, शाला; उंटखातें किंवा कारखाना; अठरा कारखान्यांपैकीं एक. 'मागें उतरला उष्टरखाना' –ऐपो २१५ –इतिहास ऐतिहासिक २२.२४.

**उष्टवड–ळ**—स्त्री. उष्टावळ पहा.

**उष्टवण, उष्टावण**—न. १ लहान मुलास प्रथम अन्नप्राशन करावयाचा विधि, संस्कार (मामाकडून सोन्याच्या अंगठीनें खीर मुलाच्या तोंडास लावून हा संस्कार करितात). (गो.) उष्टवणी. २ उष्टें खाणें. 'भीमक करिताहे विनंती। अवघ्यां झाली परमतृप्ती। उष्टावणालागीं श्रीपती। ठायीं टेविती निजमुद्रा।' –एरुस्व १५.५. [सं. उच्छिष्ट+वृत्]

**उष्टवणी**—न. उष्टें केलेलें पाणी, ज्यामध्यें उष्टीं–खरकटीं भांडीं वगैरे धुतात असें पाणी; शिळें, वापरलेलें पाणी; वखट, ओखट वणी. [सं. उच्छिष्ट+वन=पाणी]

**उष्टा**—वि. १ टाकलेला; सोडलेला; त्यक्त (अन्न, भक्ष्य, इ०). २ खाल्लेल्या अन्नांतील अवशिष्ट राहिलेला भाग; पानांत टाकलेलें (अन्न वगैरे). 'ही उष्टी भाकरी भिकाऱ्याला दे.' ३ जेवण झाल्यावर हात, तोंड धुतल्याशिवाय असलेला, खरकट्या हाताचा, तोंडाचा. ३ (ल.) अशुद्ध; विटाळ झालेला. 'मी उष्टा आहे, आंचवून आल्यावर हीं मोतीं पाहीन.' ४ (ल.) वापरलेलें; उपयोग केलेलें; उपभुक्त (वस्त्र, वस्तु इ०). 'तें खोबरें त्यानें उष्टें केलेलें आहे, तूं तें खाऊं नकोस.' ५ दुसऱ्यानें पूर्वी उपयोग केलेलें, वापरलेलें, लिहिलेलें, बोललेलें (भाषण, वचन वगैरे). जसें– उष्टें भाषण; उष्टा बोल. [सं. उच्छिष्ट] **०होणें**–क्रि. घाईघाईनें थोडेसें खाणें; पोटभर न जेवणें. **म्ह०** उष्ट्या हातानें कावळा हांकीत–मारीत नाहीं=कंजूष मनुष्याबद्दल वापरतात. **०उपास**–पु. जेवणांत अडथळा आल्यामुळें थोडेसें खाऊन उठणें; उपास मोडून पोटभर जेवणहि न मिळणें; नांवाला जेवणें; पानावर बसणें. **०नवरा**–पु. बिजवर. 'इतके दिवस मुलीला स्थळ पाहतां पाहतां शेवटीं उष्टा नवरा

पथकरावा लागला.' ०पाष्टा-माष्टा-वि. खाल्लेल्या अन्नांतील राहिलेला अवशिष्ट भाग; पानांत टाकलेलें (अन्न वगैरे). उष्टा पहा [ उष्टा द्वि. ] ०विटाळ-पु. उष्ट्या अन्नाचा किंवा उष्ट्या मनुष्याचा विटाळ; उष्ट्यामुळें आलेली अशुद्धता, अपवित्रता. 'उष्ट्या विटाळानें मला किंवा ह्या पाण्याच्या हंडयाला शिवूं नको.'

**उष्टावणें, उष्टाविणें**--उक्रि. १ उष्टें करणें; चाखून पाहणें; उष्टावण करणें. २ विटाळणें.

**उष्टावळ**—स्त्री. पंगत जेवून उठल्यावर जें उष्टें राहतें तें; उष्टें अन्न; उष्टेंखरकटें. 'जेविले ते संत मागें उष्टावळी। अवघ्या पत्रावळी करुनी झाडा ॥' -तुगा २०३०. 'हा प्रभाकर म्हणजे धुंडिराजपंतांच्या घरच्या उष्टावळीवर वाढलेला तुम्हां सर्वांचा एक जन्माचा गुलाम आहे.' -भा ८२ [ सं. उच्छिष्ट+आवलि=पंगत ]

**उष्टी**—वि. उष्टा पहा. ०कल्पना-स्त्री. नवीन नसणारी, पूर्वी कोणी काढलेली कल्पना; उष्टा विचार. उष्टा अर्थ ५ पहा. ०पत्रावळ-स्त्री. (ल.) अनेकांनीं उपभोगिलेली स्त्री; व्यभिचारी स्त्री; वेश्या. ०स्त्री-स्त्री. उपभोगिलेली स्त्री; कौमार्य नष्ट झालेली स्त्री; क्षतयोनि स्त्री. ०हळद-स्त्री. लग्नांत वधूच्या अंगास लाविल्यानंतर राहिलेली हळद; ही नंतर वराच्या अंगास लावावयास नेतात

**उष्टें**—न. १ जेवून राहिलेलें अवशिष्ट अन्न; पानांत, पात्रांत उरलेलें अन्न; खरकटें. २ ज्यांत भोजन केलें आहे असें पात्र. 'सांवडीन मी उष्टीं.' -मोसभा २.११. म्ह० तुपाच्या आशेनें उष्टें खाणें=कांहीं लाभ होईल या आशेनें वाईट काम करणें. ०खरकटें-न. उष्टें; उष्टीं पानें; उष्टावळ. ०खरकटें करणें-क्रि. जेवणानंतर उष्टीं भांडीं, पात्रें, जमीन इ० स्वच्छ करण्याचें काम करणें. ०खळी-स्त्री. उष्टें-खरकटें, उष्ट्या पत्रावळी टाकण्याची जागा; उकिरडा; कचरा टाकण्याची जागा.

**उष्टेवारो**—पु (गो.) उकिरडा, उष्टेखळी; केरकचरा टाकण्याची जागा. [ सं. उच्छिष्ट+वृ ]

**उष्ट्र**—पु. उंट. 'वऱ्हाड सिद्ध जाहलें फार। लागले वाद्यांचे गजर। उष्ट्रें घोडे रहंवर। चालिले फार तेधवां ॥' -संवि १.१५८. [ सं. उष्ट्र, फा. शुतुर किंवा उश्तुर् ] ०सेना-स्त्री. सांडणीस्वार; उंटांचें सैन्य. ०लगुडन्याय-उंटाला मारावयाची काठी, तो स्वतःच आपल्या पाठीवर वाहून नेत असतो, यावरून ज्याचें त्याच्याच हातून शासन करविणें.

**उष्ट्रासन**—न. (योग.) जमिनीवर उपडें निजून दोन्ही पाय ढोपरांत मोडून मांडीला मांडी लावून खोटा कुल्यांना लागतील असें करणें व दोन्ही हातांच्या चिमटीनें दोन्ही पायांचे आंगठे धरणें व खांदे जमिनीला लावून मान उचलवेल तितकी वर उचलणें. -संयोग ३४८. [ सं. उष्ट्र+आसन ]

**उष्ट्री**—वि. उंटाची; उंटासंबंधीं (गति इ०). 'तो निघाल्या अश्वरत्नांच्या हारी। दाखविती गती नानापरी। उष्ट्री नाकुळी हंसी मयूरी। पांचवी नीरी बोलिजे ॥' -जै ८.२२. [ सं. उष्ट्र ]

**उष्ण**—वि. १ तप्त, गरम; दाहयुक्त. २ ऊन; थंड न झालेला; न निवलेला (अन्न वगैरे पदार्थ). ३ (ल.) रागीट; आवेशयुक्त; तडफदार; उतावळा; प्रखर. ४ शरीरांत उष्णता उत्पन्न करणारा (सुंठ, मिरीं इ० पदार्थ) ५ तिखट; जालीम; कडक (पदार्थ). -न. १ ऊन, गरम हवा; ताप. २ उष्ण विकृति: शरीरांतील उष्णता, दाह, गरमी; याविरुद्ध शैत्य. [ सं. उष्=जाळणें ] ०कटिबंध-पु. पृथ्वीच्या दोन्हीं अयनवृत्तांमधील भाग; भूमध्यरेषेपासून दक्षिणोत्तर २३॥ अंशांपर्यंतचा प्रदेश 'उष्णकटिबंधावर सूर्याचे किरण लंबरूपानें पडतात.' -मराठी ६ वें पुस्तक (१८७५) २९७. ०काल-पु. उन्हाळा. ०दर्शक-वि. उष्णता दाखविणारा (इं.) थर्मोस्कोप. [ सं उष्ण+दृश् ] ०मान-न. उष्णतेची तीव्रता, प्रमाण, माप (इं.) टेंपरेचर. ०मापक-न. उष्णतेची तीव्रता मोजण्याचें (उष्णतामापक) यंत्र. (इं.) थर्मामीटर. ०वात, वायु-पु. १ उष्णतेनें पोटांत गुबारा धरणें. २ अंबट, करपट, ढेंकरा येणें. ०वास-पु. पंचाग्निसाधन. 'उष्णवास जळवास। शीतवास अरण्यवास ॥' -दा ४.१.१२. [ सं. उष्ण+वस् ] ०वीर्य-वि. शरीरांत उष्णता उत्पन्न करणारें, उष्ण परिणामकारक (औषध). [ सं. उष्ण+वीर्य ]

**उष्णता, उष्णत्व**—स्त्रीन. १ तप्तता; गरमपणा; उष्णपण. उष्ण पहा. 'उष्ण प्रकाश तो सूर्याचा। शीत प्रकाश तो चंद्राचा। उष्णत्व नस्तां देह्याचा। घात होये ॥' -दा १६.२.१०. २ उष्ण विकृति (शरीराची). [ सं. उष्=जळणें ] ०गतिशास्त्र-न. उष्णता आणि यंत्रसिद्ध काम यांमधील संबंध दाखविणारें शास्त्र. (इं.) थर्मोडायनॅमिक्स. ०जन्यविद्युत-स्त्री. उष्णतेपासून उत्पन्न होणारी वीज; (इं.) थर्मो इलेक्ट्रिसिटी. -तेचें यांत्रिक सममूल्य-न. एक भाग उष्णता उत्पन्न करावयास करावे लागणारें काम किंवा श्रम; (इं.) मेकॅनिकल इक्विव्हॅलेंट ऑफ हीट. ०द्रव-पु. द्रवरूप उष्णता, (इं.) कॅलोरिक फ्लुइड. ०धारणशक्ति-स्त्री. उष्णता टिकून राहण्याची शक्ति. ०परिमाण-न. उष्णतेचें माप; (इं.) क्वांटिटी ऑफ हीट. ०मान, उष्णमान-न. उष्णतेची तीव्रता; (इं.) टेंपरेचर. ०मापक-न. पदार्थांतील उष्णता मोजण्याचें यंत्र; (इं.) कॅलोरीमीटर. ०मापन-न. पदार्थांतील उष्णता मोजण्याची क्रिया; (इं.) कॅलोरीमिट्री. ०यंत्र-न. उष्णतेनें चालणारें इंजिन; (इं.) हीट इंजिन. ०वहन-न. एका परमाणूची उष्णता त्याच्या अतिनिकट परमाणूस मिळण्याची क्रिया, (इं.) कंडक्शन. ०विसर्जन-न. उष्ण पदार्थांतून उष्णता बाहेर पडून जाण्याची क्रिया; (इं.) रेडिएशन. ०विस्तृति-स्त्री. उष्णता सर्वत्र पसरण्याची क्रिया; (इं.) डिफ्यूजन ऑफ हीट. **उष्णतोत्पादक**-वि. उष्णता उत्पन्न करणारा; (इं.) एक्सोथर्मिक.

**उष्णा, उष्णेंवाण**—वि. उसना, उसनें वाण पहा. [उसना अप.]

**उष्णावणें**—अक्रि. तापणें; गरम होणें. 'ऐसेंचि बोलतां उष्णावले.' –दावि ४०८. [सं. उष्ण]

**उष्णांशु**—पु. ज्याचे किरण उष्ण आहेत असा; सूर्य. [सं. उष्ण+अंशु=किरण]

**उष्णीष**—न. पागोटें; शिरोवेष्टण; रुमाल; मंदील. [सं.]

**उष्णेंवाण**—न. उसनें वाण पहा.

**उष्णोदक**—न. तापलेलें पाणी; ऊन पाणी; गरम पाणी. [सं. उष्ण+उदक]

**उष्मज**—वि. उष्म्यापासून उत्पन्न झालेला (जंतु, प्राणिवर्ग).

**उष्मा**—पु. १ उष्ण; उष्णता. 'कां कस्तुरीसगट परिमळ। उष्मेसगट अनळ॥' –अमृ १.४२. २ उकाडा; दाह; गरमी. [सं. उष्=जाळणें]

**उस**—उद्गा. हाय! दुःखोद्गार; एकाएकीं दुःख झाल्यामुळें किंवा कळ वगैरे निघाल्यामुळें निघणारा उद्गार. (क्रि० म्हणणें; करणें). [ध्व.; सं. उत्+श्वस्; तुल० का. उस=हुश्श]

**उसउस, उसउसो**—पु. (गो.) अस्वस्थता; गडबड; धांदल. –वि. अस्वस्थ; अस्थिर. [सं. उत+श्वस्]

**उसकटणी**—स्त्री. उसकटाउसकट; उचकाउचक; उसकटणें पहा.

**उसकटणें**—क्रि. १ अव्यवस्थित करणें; इकडेतिकडे टाकणें; विस्कटणें; उचकटणें (व्यवस्थित रचलेल्या वस्तू); अस्ताव्यस्त करणें; बिघडविणें (घडी वगैरे). २ उलगडणें (भाग); मोकळें करणें (एखादें यंत्र, घड्याळ वगैरे). ३ (विंचरलेले केंस, गवताची गंजी) विस्कटणें; इकडेतिकडे पसरणें. [सं. उत्+शकल]

**उसकटाउसकट**—स्त्री. अव्यवस्था; घडामोड; विघाड; मोडतोड; उसकटणें पहा.

**उसकणें**—क्रि. विसकटणें; अव्यवस्थित करणें. 'जैसा उदक कुंभ साचार येथें। तो मळ उसके जेथें तेथें।' –नव १२.९. [सं. उत्+ष्वक्=जाणें, हालणें; प्रा. उस्सक; उत्+शकल]

**उसकी**—स्त्री. (गो.) उचकी. [ध्व.]

**उसको, हुसको**—पु. (गो.) हुरहूर; काळजी. [सं. उत्+ष्वक्; प्रा. उस्सक=उत्कंठित होणें.]

**उसंग**—स्त्री. (प्र.) उत्संग, मांडी. 'जननीयां घेतला उसंगा' –उषा ७.६३. 'उल्हासचंद्रिका सावध केली। मृणालिका उसंगिंअें घेतिली।'–शिशु ७५९. 'घेउनि अज्ञानें उसंगिए। आर्ती लाल्हाति जिये।' –ऋ ५. [सं. उत्संग]

**उसण, उसणव ?, उसणावळ, उसन**—स्त्री. कमरेंत किंवा पाठींत उठणारी कळ, लचक, तिडीक. (क्रि० भरणें; निघणें; चालणें). [प्रा. ऊसण = गतिभंग] **उसण उतरणें**–१ मंत्र वगैरे टाकून पाठींत भरलेली लचक उतरणें. २ (ल.) एखाद्याचा दिमाख उतरणें; ऐट उतरणें, जिरविणें. **०मारणें**–(गो.) लचकणें; वातानें कळ येणें. [सं. उत्+सद्]

**उसण, उसणवार, उसणवारी, उसणा, उसणें, उसणेंवाण**—उसना, उसनेंवाण पहा. 'मुष्टिभर पोहे उसणे आणूनि। विप्रा हातीं देतसे।' –ह २९.४९. 'तुझ्या पुत्राचा नंदन। त्यासी मारिलें जैसा मत्कुण। तुजलागीं सांगतां न घेसी उसण। तरी मग आजा कायसा॥' –जै ८७.४६.

**उसणून उठणें, उसणावणें**—अक्रि. (माण. व.) झोपेंतून ओरडत उठणें. [उसण+उठणें]

**उसंत, उसंथ, उसंधि**—स्त्री. १ विसांवा; विश्रांति; आराम. (क्रि० खाणें; घेणें) 'म्हणौनि व्यापाराहातीं। उसंतु देहा ना राती।' –ज्ञा १४.२४१. २ फुरसत; रिकामा वेळ. 'कदां उसंत नाहीं।' –ज्ञाप्र १४२. 'त्यास बहुत रात्रीं झोप नव्हती, दिवसां उसंत नाहीं.' –भाब ११२. [सं. विश्रांत; प्रा. वीसंत; सं. उत+संधि]

**उसंतणें**—उक्रि. आक्रमण करणें; उलंघन करणें; पलीकडे जाणें. 'चाले झडझडां उसंतूनी वाट। पाहे पाळतूनी उभा तोचि नीट वो।' –तुगा ११२. २ दूर करणें. 'परी नोसंतितां विवसी। भेटी नाहीं निधीसी॥' –ज्ञा १७.३११. ३ थांबणें; बंद होणें. 'आंग मोडामोडी। कार्येजातां अनावडी। नुसंतें परिवडी। जांभैयांची॥'–ज्ञा १४.१७९. ४ विसांवा घेणें. ५ आश्रय करणें. 'भार्या म्हणे प्राणेश्वरा। उसंतूं नको शोकसागरा। मीं सांगेन त्या विचारा। भल्यादरें अनुग्री॥'–मुआदि ३८.२२. ६ शेवटास नेणें; पुरें करणें; निस्तरणें. 'तुका म्हणे आपुलालें। उसंतिलें ज्यांणीं तें॥' –तुगा २२०८. 'योगी उसंतिती योगपंथा।' –रास ५.९३. [सं. विश्रांत; प्रा. वीसंत; सं. उत्+संधि]

**उसती**—स्त्री. (व.) उशी. 'उसती अंथरुणांत आहे.' [सं. उत्+शीर्ष]

**उसनघट, उसनवारी**—स्त्री. उधारी; कर्ज; ऋण. –वि. उसनवार; उसना दिला-घेतलेला; कर्जाऊ; उधार. **उसनवट, उसनवार, उसनवारी**–वि.क्रिवि. उधारीनें; परत बोलीनें; कर्जाऊ; भाड्यानें (आणणें, देणें, घेणें वगैरे). **उसणाघाई, उसिणाघायी, उसिणेंघाई**–क्रिवि. घावाला घाव किंवा माऱ्यास मारा देऊन; समोरासमोर; उसनें न ठेवतां. 'निष्कपटा होआवें। उसिणाघाई झुंझावें।' –ज्ञा २.१९०. 'उसणें घाई वीर सकळ। हाणताती परस्परें।' –ह २४. १४. **उसनी गोष्ट सांगणें**–आपल्याला जी गोष्ट करतां येणें शक्य आहे ती दुसऱ्यास करावयास सांगणें.

**उसना**—वि. १ परत देण्याच्या बोलीनें आणलेला ( पदार्थ, वस्तु ). ' म्हणे उसनें आणितें मेळऊनि '–कचेसुदा ४. २ कर्जाऊ; उधार ( व्यवहार, व्यापार ). ३ ( ल. ) उदासीन; लक्ष, मन लावून काम न करणारा; उपरा; चुकार; हलगर्जी ( नोकर, नातेवाईक वगैरे ). ४ हलगर्जीचें; बेफिकिरीचें ( काम ). ५ वरवर; दिखाऊ पणाचें; मायावी ( भाषण ). [ सं. वस्न = मूल्य ]

**उसनें**—न. सूड; बदला. 'उसनें संभाजीचें घ्यावें '–ऐपो १८. **उसनें घेणें, उगविणें, फेडणें**–सूड घेणें, बदला घेणें; परत करणें; फेड करणें. **उसनेंपासनें**–वि. उधार; कर्जाऊ; मागून आणलेलें; परत बोलीचें; उसनवार. ( उसनें द्वि. ) **उसनें वाण**–न. १ कोणी कांहीं जें केलें असेल त्याचा मोबदला देणें; प्रत्युपकार; परत भेट; परत फेड. २ सूड; बदला. **म्ह०** उसन्यापायीं फांसण्या= उसनें काढण्यापासून होणारा त्रास, जिकीर.

**उसपण-णी, उसपा**—स्त्रीपु. १ काढून टाकणें; बाहेर काढणें उपसणी, उपसा. ( होडींतील, डबक्यांतील पाणी, भांड्यांतील दूध, तूप, तेल वगैरे ). २ कोरडें, रिकामें करणें ( बालडी, चमचा, पळी, टोपली, हात वगैरेच्या साहाय्यानें ). ३ बाहेर काढणें, वर काढणें; मोकळे करणें; उघडें करणें. (म्यानांतून तरवार, गवसणींतून, आच्छादनांतून वस्तु वगैरे ). [ सं. उत्+सृप् ] वाक्प्रचार–१ अंगावर उसपणें=रागावून टाकून बोलणें, धावून जाणें. २ काम–धंदा उसपणें=काम धंदा उरकणें, पार पडणें, संपविणें. ३ शिंग उसपणें= शिंगें उगारणें, शिंगें उगारून मारावयास धावणें.

**उसपणें**—सक्रि. उसपाउपस करणें; काढून टाकणें; बाहेर काढणें ( भांडें वगैरेंतून वस्तु इ० )

**उसपाउसपी**—स्त्री. एकदम जोरानें बाहेर काढण्याची क्रिया ( पाणी, म्यानांतून तरवारी वगैरे ). [ सं. उत्+सृप्; म. उसप द्वि. ]

**उसपाभर**—क्रिवि. १ निष्कारण किंवा व्यर्थ वरचेवर बाहेर काढणें व पुन्हां भरणें. २ ( ल. ) उठाठेव; रिकामी दगदग; त्रास. [ उसपणें+भरणें ]

**उसबकी**—स्त्री. एक प्रकारचा रस्सा करण्याचा मसाला. –गृशि २.५२. [ उसबक=एक अफगाणी जात ]

**उसंबणें**—क्रि. स्फुंदणें; हुंदके देणें; हुंदके देऊन रडणें. [ सं. उत्+स्फुंदन ]

**उसबु**—स्त्री. वाळू. ' लाज्या लाह्या कीं लेप्या लालु । कानुडे तयासी वदती आरलु । सिकता वालु उस्क्या उसबु वालु । नदीतीर खडया म्हणणें कीं ॥ ' –दावि ५४. [ का. उसुबु=वाळु ]

**उसमट**—पु. ( गो. ) घुसमट पहा. [ उस+मर प्रत्यय ]

**उसमटणें**—क्रि. ( गो. ) गुदमरणें; घुसमटणें पहा. [ का. उस्स, उस्सने=कष्टानें श्वास घेणें; म. उस=दीर्घश्वास ]

**उसर-री**—१ स्त्री. वाळविलेली भाजी; सुकविलेली भाजी ( अळूं, मेथी, गाजरें इ० ). सुकलेल्या आंब्याच्या फोडी; वाळवलेल्या पालेभाजीस पळवा म्हणतात. ' या आंब्याच्या उसऱ्या आहेत. ' २ ( ल. ) कृश; वाळलेलें शरीर. ' तत्सुख हे मत्सुख तनु होतचि होती तदाधिनें उसरी । '–मोआदि ३५.४. ' रोग न ये हा भोग लागला देह वाळून उसरी । '–पला ७६. **उसर करणें**–क्रि. वाळविणें; कृश करणें; निगा न राखून, त्रास देऊन किंवा छळ करून ( जनावर, मनुष्य यास ) कृश करणें; हयगय करणें. [ सं. उष्=उष्णता देणें, जाळणें. ]

**उसरत, उसरपत**—स्त्री. ( गो. ) उसंत; विश्रांति; रिकामपण; फुरसत. ' तारामती भावें काम करी । उसरत नाहीं दिवस रातीं. ' ' ऐशा करितां येरझारा । उसरपत नाहीं भवसागरा । माजी बुचकळ्या देत असे ॥ ' [ सं. उत्+सृ ]

**उसरमा**—पु. उश्रमा पहा. ' उसरमा मनींचा वदतां नये। ' –विठ्ठलकृत रसमंजरी ५०.

**उसराण**—न. ऊंसाचें शेत; ऊंस लावण्याची जमीन. [ ऊंस+रान ]

**उसरीं**—उशिरां पहा.

**उसल**—पु. ( कर्ना. ) श्वास. [ का. उसलु=श्वास ]

**उसल, उंसल**—स्त्री. ( प्रा. ) उंसाची जमीन; उंसाचें शेत. [ सं. इक्षु+आलय ]

**उसवण**—उसण पहा.

**उसवणी**—स्त्री. शिवण काढून टाकणें; टाके उलगडणें, उसवणें. [ उसवणें ]

**उसवणें, उसविणें**—उक्रि. १ शिवण काढून टाकणें; टाके उलगडणें; दोरा काढणें; उधडणें (शिवण्याच्या उलट क्रिया) २ (कों.) घरावरील शिवलेलें गवत काढून टाकणें. [सं. उत्+सिव्=शिवणें] **म्ह०** १ उसवलें त्यास शिवील पण निसवलें त्यास काय करील. २ उसवल्याला दोरा, निसवल्याला वारा.

**उसवणें**—क्रि. (राजा.) सूज उतरणें, ओसरणें. [सं. उत्+श्वि= सुजणें, वाढणें ]

**उसवास**—उच्छ्वास पहा.

**उससणें**—अक्रि. १ उसासा टाकणें; श्वास टाकणें. ' मग उससौनि किरीटी । वास पाहिली ॥ '–ज्ञा ११.२५३. २ वाढणें; उत्पन्न होणें; जिवंत होणें; जीवन पावणें; प्रकट होणें. ' तंव आयुष्यनदी उससे । देहाचि देहा ॥ '–ज्ञा १७.१३२. 'परी तें असो हें ऐसें । कावरें झाड उससे । यया महदादि आरवसें । अधोशाखा ॥ ' –ज्ञा १५. १०९. [ सं. उत+श्वस्; प्रा. उस्सस ]

**उससा**—पु. उच्छ्वास; सुस्कारा; उसासा. ' वागर्था पडत मिठी । उससांचिया ॥ ' –ज्ञा १८.१६०५. [ सं. उत् + श्वस्; प्रा. उस्सस ]

**उसळ**—स्त्री. कोणतेंहि कडधान्य ( प्रथम भिजत ठेवून ) शिजवून मसाला घालून तयार केलेलें भाजीसारखें खाद्य. [का. उसळि= उसळ ]

**उसळणें**—उक्रि. उसळ करणें. [ उसळ ]

**उसळणें**—क्रि. १ वर उडणें (तुषार, लाटा, कण); वर जाणें. 'जैसीं प्रळयाचेनि समीरें । वृक्षपर्णें उसळती ॥' –मुवन १०. १०६. २ वर उडी मारणें; उंच जाणें. 'स्वरथावरूनि बाणाघातें उसळोनि पावती पतन।'–मोउद्योग १३.११३. 'दक्षशिर गगनीं उसळलें । वीरभद्रें पायातळीं रगडिलें ॥' –शिवलीलामृत १३.५८. ३ क्रोधानें अंगावर धावून जाणें; फार रागावणें; उखडणें. 'हाक देओनि उसळैला।' –शिशु१०६७. ४ जोरानें, जलद वाढणें (मूल, शेत, झाड वगैरे). ५ एकदम बाहेर, वर येणें. ( पाण्यांतून, गर्दींतून). ६ वर उशी घेणें; आपटला असतां जमीनीवरून वर उडणें (चेंडू वगैरेनीं ). ७ निघणें; उत्पन्न होणें; वाहणें. 'हालविशी कर्णयुगुळें। तेथूनि जो कां वारा उसळे ॥ '–गुच १.२. [सं उत्+शल्=वर उडणें]

**उसळणी**—स्त्री. उसळणें; उसळी पहा. [ उत्+शल् ]

**उसळपा**—पु. १ ( राजा. ) सर्पणाचा ओंडा; फोडलेलें जळाऊ लांकूड. २ ( सामा. ) ओंडा; ओंडका. 'लांकडाचा मोठा उसळपा पर्वतावरून कोसळला.' [ सं. उत+सृप् ]

**उसळवट**—वि. झरे, पाझर असलेली जमीन; उपळीची जमीन. [ सं. उत +शल्+वत् ]

**उसळवाटीं**—क्रिवि. सळसळ आवाज करीत. 'कांई सांगौं या परौती । उदकें उसळवाटीं कढती ॥'–शिशु ७४९. [ सं. उत्+शल्+वत् ]

**उसळा**—( राजा. ) उसळ पहा.

**उसळी**—स्त्री. १ पाण्याचे तुषार, लाटा वगैरे हवेंत उडणें. २ उडी; उशी ( पाण्यांतून वगैरे ). ( क्रि० खाणें; मारणें ). ३ ( ल. ) बंधनांतून जोरानें बाहेर पडण्याची क्रिया. ४ ( ल. ) क्रोधाची लहर; रागाचा आवेश; प्रेम वगैरे विकारांची लाट; आवेग. ५ जोरानें वर येण्याची किंवा उडण्याची क्रिया. ( क्रि० खाणें ). उसळणें, उसाळी पहा. [ सं. उत्+शल् ]

**उसां**—क्रिवि. उशाला. 'मौनेंच येऊनि मोक्षदानी। सत्य भामेचे शिर उचलूनी। उसां आपुली मांडी देऊनी। चक्रपाणि बैसला।' –ह २६.११३. –स्त्री (कु.) उशी; उसें; उशास घ्यावयाची वस्तु. [ सं. उत्+शीर्ष ]

**उसाण**—न. १ (कों.) उधान; पौर्णिमेची अगर अमावास्येची समुद्रास येणारी अतिशय मोठी भरती. २ महापूर ( नदीस येणारा). [ सं. उत्+श्रि; उच्छ्रि=वर येणें, उच्छ्रयण; प्रा. उस्सयण. ]

**उसाबर-भर**— (कर्ना.) धंदा; काम; संबंध; भानगड; उठाठेव. 'त्याच्या उसाभरीला जाऊं नको.'=त्याच्याशीं संबंध ठेवूं नको' [ अर. इस्तिब्रा=संबंध तोडणें; मोकळें होणें. ] **०करणें**– ( माण. ) व्यवस्था ठेवणें.

**उसार**—पु. रिकामी जागा; मोकळी जागा ( गलबत, घर यांमध्यें ) [ हिं. उसारा=देवडी ? ]

**उसास**—उच्छ्वास पहा.

**उसासणें**—क्रि. १ उसासा टाकणें; दम घेणें. 'मग देओ भणे हो हो कां उसाससी। राहे राहे कां पळिसी।'–शिशु १०६८. २ उसळणें; वर येणें. 'सागरीं लहरी उसासे। उसासली ते सर्वेचि नासे।' –एभा २८.२८६. ३ उमटणें; उन्नत होणें; ज्वानींत येणें; फुलणें; भरणें ( स्त्रीचे स्तन ). 'संगीन कुच भरदार सजिव सजदार गुलगेंद उसासले।' –प्रला ११३. ४ टाकणें; त्याग करणें. 'लक्ष्मी उसासिली।' -भाए १११. [ सं. उत्+श्वस्=उल्लसित होणें; श्वास टाकणें; प्रा. उस्सास ]

**उसासा**—पु. १ दीर्घ श्वास; सुस्कारा. २ विसावा; विश्रांति. 'पाठीं व्याघ्रादि तामसा । योनी तो अलुमालु ऐसा । देहाधाराचा उसासा। आथी जोही।' –ज्ञा १६.४१५. ३ पाण्याच्या नळांत हवा येण्याकरितां ठेवलेलें उंच छिद्र. उच्छ्वास पहा. [सं. उत्+श्वस्; प्रा. उस्सास] **०असासा**–पु. जोराचा सुस्कारा, श्वास. ( क्रि० टाकणें ). [ उसासा द्वि. ]

**उसासी**—स्त्री. उशी. [ सं. उत्+शीर्ष; हिं. उसीसा ]

**उसाळणें**—सक्रि. हर्षविणें; आनंदित करणें. [ उसळणें सं. उत्+शल् ]

**उसाळा**—पु. उल्हास; उत्साह; आवेश; जोर; उमाळा. उसळी पहा. 'तेथें ऋषिकुळ सकळ नाचती निर्मळ उछायाचेनि उसाळे' –दा ४८९. 'सद्गुरु कृपेचेनि बळें । परोक्षज्ञानाचेनि उसाळें।' –दा ५ ३.४८. 'उसाळें नभामाजि दारू निघाली' –राक १.८८. [ सं. उत्+शल् ]

**उसाळी**—स्त्री. उडी; उसळी पहा. 'रोधिलें चित्त घे उसाळी। कथा संपतां अवलोकीं।' –मुआदि १३.१७. 'वाम हस्त ग्रीवेतळीं। दुजा सुदला पादमूळीं । गगनीं देऊनि उसाळी । धरातळीं टाकिला ॥ '–मुआदि ४१.१३७.

**उसिट**—न. उष्टें पहा. 'उसिटें लाहावेआचे सायासु। तेथ सेवेंची कवणी आसु।' –दाव २५३. 'तऱ्ही नव्हेचि उसिटी। दिठी जयाची।' –अमृ २.१५.

**उसित**—घशांत घास अडकणें; असूत, उशीत पहा. ( क्रि० जाणें) 'उचकी लागली उसित गेला। पीत उसळलें उलाट जाला।' –दा ३.६.३३. [ सं. उत+सिक्थ् ]

**उसिणें**—न. उष्टें; उसनें पहा. 'उसिणें घेतलें देवांचें। मूळ शोधिलें राक्षसांचें।' –दा १६.६.३१.

**उसीर, उसीरु**—उशीर पहा. 'आतां उसीरू होईलु अपडे ।' –शिशु १८५. 'आतां न लावावा उसीर' –वेसीस्व ३.५.

**उसीसें**—न. उसासा; श्वास; दमा. 'कीं संसाराचेनि त्रसें । जे करौनि होते उसीसें ।' –ऋ ६०. [सं. उत्+श्वस्]

**उसुलवार**—वि. (कों.) जोरानें वाढणारा; वर येणारा; वाढाळू (झाड, मूल वगैरे). [सं. उत्+शल्]

**उसू**—वि. (कों.) सैल; फट राहिलेला; घट्ट न बसलेला; शिथिल; पोकळ (खुंटी, दादरा, दार वगैरे). [सं. उत्+सिव्-स्यूत]

**उसूल**— पु. वसूल; जमा; उत्पन्न. [अर. वुसूल्]

**उसें**—न. १ बिछान्याची डोक्याकडची बाजू; उशागत पहा. २ उशी; गिरदी; निजतांना डोक्याखालीं घेतलेला आधार. ३ निजलेल्या स्थितींत ठेवलेलें डोकें 'उसें भुईवर ठेवूं नको, उशीवर ठेव.' 'उशाखालीं हात सांपडला.' [सं. उत्+शीर्ष; प्रा. उस्सीस; उच्छीर्षक-ऊसीसं-उसँ-उसें-रा. ग्रंथमाला] (कोणेकाचें) **मांडीचें उसें करणें**-आपल्या संरक्षणासंबंधीं सर्वस्वी एखाद्यावर विश्वास ठेवणें. ०**गत**-उशागत पहा.

**उसेती**—स्त्री. (नाविक) भरतीची वेळ. [उस+येणें]

**उस्करणें**—उक्रि. (प्र.) उस्तरणें; विसकटणें; अस्ताव्यस्त करणें; विखरणें. 'वीण रेसभरही उस्करली नाहीं.' –झांकली मूठ (हडप) १९. [सं. उत्+शकल]

**उस्कारा, उस्कारासस्कारा**—पु. उसासा; सुस्कारा; जोराचा श्वास; दम. (क्रि० टाकणें) [सं. उत् + श्वास; हुश्श+ सं. कृ]

**उस्क्या**—स्त्री. वाळु; रेती. उसवु पहा. 'लाज्या लाह्या कीं लेप्या लाळु । कालुडे तयासी वदती आरळु । सिकता वाळु उस्क्या उसबु वाळु । नदीतीरखड्या म्हणणें कीं ॥' –दावि ५४. [का. उसुकु=वाळु]

**उस्तरणें**—क्रि. १ घरावरील कवलें, गवत वगैरे आच्छादन काढणें; छपरावरील ओमण वगैरे काढणें. २ विस्कटणें; उलगडणें; उघडें करणें. ३ उसवणें; वीण काढून टाकणें; दोरा काढणें. ४ नासधूस करणें; मोकळें करणें; अलग करणें; भाग वेगळे वेगळे करणें. 'सारी पोथी उस्तरली पण तें पत्र कोठें सांपडलें नाहीं.' [सं. उत्+स्तृ]

**उस्तराउस्तर**—स्त्री. मोठ्या प्रमाणावर व सर्वत्र उस्तरण्याची क्रिया; उलगडणें; उस्कटणें; मोकळें करणें; उघडें करणें वगैरे. उलथापालथ, उस्तरणें पहा. [सं. उत्+स्तृ]

**उस्तरें**—न. (गो.) ठसका; उशीत; असूत-द पहा. (क्रि० जाणें). [सं. उत्+सिक्थ-उसित; उस्त+र]

**उस्तवारी**—स्त्री. १ डागडुजी; दुरुस्ती; व्यवस्था; मजबुती; पुनर्घटना. 'लोकांचे कर्जाचा मार्ग होऊन आपली उस्तवारी होईल.' –रा १३.९१. २ उपचार; तैनात; शुश्रूषा. 'जखमांची वगैरे पथ्यपाण्याची उस्तवारी बरीच आहे.' –ख ११.६०१७. 'राजाराणीची उस्तवारी करितात.' –प्राणिमो ११०. ३ मशागत; लागवड (शेत, जमीन वगैरेची). 'जमिनीची नीट उस्तवारी ठेविल्यास ती सुधारते.' –शे ३.२. ४ (माण.) उठाठेव; चौकशी. [फा. उस्तुवारी]

**उस्ताद, उस्तादगिरी, उस्तादी**—(हिं. गु.) वस्ताद पहा.

**उस्तें**—न. (कों.) पहाटेचा किंवा सकाळचा संधिप्रकाश; झुंजुकमुंजुक. [सं. उषा; प्रा. उसा]

**उस्मरणें**—अक्रि. १ सुस्कारा टाकणें; श्वास टाकणें. २ हुंदके देणें; स्फुंदणें. ३ धापा टाकणें. [सं. उत्+स्मृ-स्मृणोति]

**उस्मरणें, उस्मारणें**—उक्रि. १ आठवणें; आठवण करणें; स्मरण करणें; पुन्हां पुन्हां पुढें आणणें. २ उल्लेख करणें; सांगणें; दिग्दर्शित करणें. [सं. उत्+स्मृ-स्मरति]

**उस्मरा**—पु. १ विश्रांति; दम; श्रमानंतरचा विसांवा. (क्रि० घेणें). २ दीर्घ श्वास सोडणें; सुस्कारा टाकणें. (क्रि० टाकणें). [सं. उत्+स्मि-स्मेर ?]

**उस्मस्थड**—न.(गो.) बागाईत जमिनीशेजारची पडीत जमीन.

**उस्मारा, उस्रमा**—पु. १ उपकाराचें किंवा अपकाराचें स्मरण, आठवण, जाणीव, दिग्दर्शन. उ० उस्मारा टाकणें; उस्रमा करणें. २ (सामा.) उल्लेख; कथन; दिग्दर्शन. [सं. उत्+स्मृ]

**उस्रमा**—उश्रमा पहा.

**उस्रा**—स्त्री. गाय. 'राखिता कळप या वनि उस्रा.' –वामन विराट ८.४८. [सं.]

**उस्राप**—(कुण.) उःशाप पहा.

**उस्वास-सा**—पु. उश्वास पहा. 'स्वास उस्वास कोंडला । तेणें प्राणी जाजावला ॥' –दा ३.१.३९.

**उहापोह**—ऊहापोह पहा.

**उंहुं-हूं**—उद्गा. नव्हे, नाहीं, नको या अर्थी; नकारार्थी अव्यय. 'उपसी परि गांभीर्यें आपण न उहूं म्हणोनि त्या विटवी.' –मोसभा ५.८६. [ध्व.; सं. उत्+हुम्=संमति; म. हूं]

**उहू**—पु. १ व्यूह; विभू; कट; युक्ति; बेत; तर्क; कल्पना. (क्रि० रचणें). 'रात्रीं जाऊन घर वेढून त्याला धरावें असा उहू रचला.' २ परिस्थितीप्रमाणें मूळ सामान्य रीतीच्या वाक्यांत विशेषानुरोधानें केलेला फरक. (उ० एकवचनाच्या ठिकाणीं अनेकवचन, पुल्लिंगाच्या ठिकाणीं स्त्रीलिंग, अमुक शब्दाबद्दल विष्णु इ. नांव). 'यज्ञोपवीत धारण करावें हें सामान्यवचन, येथें दोन यज्ञोपवीतें धारण करावीं असा उहू केला पाहिजे.' हेतु कायम ठेवून शास्त्रवचनांत जरूर तो बदल करणें. ३ प्रथम उल्लेख; प्रस्तावना; परिस्फोट; विषयाची मांडणी (क्रि. काढणें). 'मी आपण होऊन उहू काढणार नाहीं, तुम्हीं उहू काढा म्हणजे मी मध्यस्थपणें बोलेन.' [सं. ऊह, ऊहा, व्यूह]

**उढू**—स्त्री. (खा.) (१) सून. (२) धाकटी भावजय. [सं. वधू–वढू–उढू–भात्रै ७.१–४]

**उळ**—न. फूल. 'उठणें कीं पडणें। कुचभाराचें कोण जाणें। फांकणें कीं सुकणें। जाउळा(जातीपुष्प)चें॥' –अमृ ४.८. [सं. पुष्प–फुल्ल–उल्ल–उळ]

**उळउळी, उरउळी**—स्त्री. अव. (गो.) पिसा; पिसवा. [का. हुळु=किडा, जंतु; हुळि=किड्यांनीं खाणें]

**उळउळीत**—वि. (गो.) किंचित तापलेलें; कोंबट. [का. उळगु=जाळणें ?]

**उळकंबणें, उळकुंबणें, उळकंबा, उळकुंबा**—ओळकंबणें; ओळकुंबणें. ओळकंबा पहा.

**उळग**—उळीग पहा.

**उळगाऊ, उळगी**—वि. उळिगाकरितां योग्य; अहेर किंवा इतर देणगी देण्यासाराखें (वस्त्र वगैरे). [का. उळ=उंची वस्त्र]

**उळगी, उळिगी**—स्त्री. १ एखाद्या कामाचें ओझें, भार; एखाद्याचे उपकार फेडण्याचें ओझें. २ बिगार. 'तरी कर्मप्रवृत्तीही लागीं। तया आयासु नाहीं आंगीं। जे प्रवृत्तीचेही उळिगीं। लोकुचि आथी॥' –ज्ञा १८.४५८. [का. ऊळिग=सेवा]

**उळंबणें**—उक्रि. अवलंबणें; आश्रय करणें; प्राप्त होणें. 'भगवंताचिये भक्ति। स्वर्गसुखातें उळंबिति॥' –रास १.६३२. [सं. अवलंब्]

**उळंबळणें**—अक्रि. तुडुंब भरणें (भांडें, नदीचें पात्र वगैरे). [सं. उत्+लंब्]

**उळपात**—कांद्याची पात. [ता. ते. तुळु. का. उळ्ळि=कंद, कांदा]

**उळवई–यी**—स्त्री. (कर्ना.) गाडीच्या चाकांच्या तुंब्यांतील (ज्यांत कणा असतो तें) लोखंडी कडें, वसवी, आवण.

**उळा**—पु. हवळा; हुळा; भाजलेला हरभरा. [का. उळगु= जाळणें; म: हुळा]

**उळिग**—स्त्री. भोंवरा. 'आठहि पाहार जैसें पायां। उळिग घापे॥' –ज्ञा १७.२०२. [का. उळ्ळु=वाटोळें फिरणें, गुंडाळणें]

**उळिग, उळीग**—स्त्री. १ सेवा; चाकरी. उळगी पहा. 'उळिग मी करीन। आंघोळीचें॥' –ज्ञा १३.४१९. २ काम; व्यवसाय; धंदा. 'चतुर्वर्णा धातली। सिनानीं उळिगे॥' –ज्ञा १८.८१७. ३ बिगार; पडलेलें काम. ४ उपकाराचें ओझें. (क्रि० वारणें). 'तरी कर्मप्रवृत्तीहीलागीं। तया आयासु नाहीं आंगीं। जे प्रवृत्तीचेही उळिगी। लोकुचि आथी॥' –ज्ञा १८.४५८. ५ (चि.) सण; श्राद्धपक्ष इ० नैमित्तिक विशेष. [का. ऊळिग=सेवा, चाकरी, काम]

**उळी**—स्त्री. (व.) (सुतारी धंदा) किकरें; पटाशी. [का. उळि]

**उळीगार**—पु. (गो.) ओघळ.

**उळ्ळा**—पु. (कर्ना.) एक प्रकारचें गवत.

**उक्षण**—न. (गो.) नांगरणी. [सं. उत्+खन्]

**उक्षण**—न. सिंचन; औक्षण. अवोक्षण पहा. [सं. उक्ष्=शिंपडणें]

**उक्षतरण**—विना. ऑक्सफोर्ड; इंग्लंडमधील ऑक्सफोर्ड शहर. 'वर्तमानकाळीं उक्षतरणनगरीं वास करणाऱ्या महा वैदिकांची माहिती ... ...' –नि ४२४. [सं. उक्ष=बैल+तरण]

**उक्षित**—वि. सिंचित; भिजविलेलें; ओलें केलेलें. 'स्वपरक्षतजोक्षित ते जेवि वसंतीं पलाशतरु फुलले।' –मोभीष्म २.९. [सं. उक्ष्=शिंपडणें]

**उक्षी**—स्त्री. एक वनस्पति. हीं झाडें डोंगराळ जमिनींत होतात, याच्या फळाचें चूर्ण पत्री, जायफळ इ० पदार्थांच्या चूर्णाबरोबर पंडुरोगावर देतात. –वगु १.७२. –शे ६.२८७.

---

# ऊ

**ऊ**—१ मराठी वर्णमालेंतील सहावा स्वर. अक्षर विकास उ प्रमाणेंच. २ शंकर–चंद्रवाचक शब्द.

**ऊ, ऊं**—स्त्री. केसांत किंवा मळीन वस्त्रांत घाणीनें उत्पन्न होणारा व चावणारा एक प्रकारचा लहानसा सहा पायांचा व कांटयांची सोंड असलेला किडा. (अव.) उवां–वा. 'अरिकरिघटा पहातां तुज नरसिंहा विमूढगति हो ऊ।' –मोकर्ण ७.१७. [सं. यूका; प्रा. जूआ; दे. ऊआ; सि. जुंअ; पं. हि. गु. जू; फ्रेंजि. जुव; आर्मेजि. झीऊ] ०**टिचणें**–ऊ मारणें.

**ऊं**—उद्गा. १ (प्रश्नार्थी) काय ? असें कसें ? २ (असंमतिदर्शक) अं: ? ३ (अवमानार्थी) थूः हट्! वा! शूः! 'ऊः ? तो काय मूर्ख आहे.' –मृ २०. ४ असें ? अॅ! असावधपणामुळें गोष्ट घडल्यानंतर ती स्पष्ट ध्यानांत आली असतां निघणारा उद्गार. [हिं. पं. गु. जू; जि. जुव]

**ऊ**—सना. (तृतीयपुरुषी एकवचनी सर्वनाम). तो, ती, तें. 'बाद ऊ (=त्याच्या मागून) अवलाद व अहफाद त्यासी रवा करणे.' –रा १५.३६४. [अर.ऊ=तो]

**ऊख**—पु. (हिं.) ऊंस. [सं. इक्षु; प्रा. इक्खु]

**ऊखर**— उखर पहा.

**ऊचवड**—उंचवट पहा. 'जे अवरां पैलीकडे। ब्रह्मस्वरूप ऊचवडें।' –ज्ञाप्र ५३५.

**ऊट**—स्त्री. १ गाडीच्या चाकाला गतिरोध करण्यासाठीं आडवा लावलेला दगड; ठेपा; टेका; आधार. (हा शब्द वऱ्हाडांत पुल्लिंगी वापरतात.) (क्रि० देणें) उटी पहा. २ चाकाला येणारा अडथळा

( दगड, उंचवटा, बांध यांचा ). ( क्रि० लागणें ). **०उतरणें**–१ ताठा, गर्व नाहींसा करणें; नम्र करणें; वठणीस आणणें. २ भिकेस लावणें; धुळीला मिळविणें; नाश करणें. ३ ( संकट, अपमान इ० च्या ). उतारास लागणें. ४ चीर; भेग.

**ऊंट**—पुन. १ उंट पहा. –वि. २ (ल ) लांबटांग्या; बारिकमान्या उंच व किरकोळ ( माणूस ) **म्ह०** ऊंट कोण्या कानीं बसेल कोण जाणें ?=दुसऱ्याच्या संकटाला कोणी हंसूं नये (केव्हां हसणाऱ्यावर आपत्ति कोसळेल याचा नेम नाहीं; कदाचित् ऊंट=अडथळा यावरून ). [ सं. उष्ट्र ]

**ऊठउठीं** —क्रिवि. उठाउठी पहा. ' एक म्हणती ऊठउठीं । चला घेऊं हरीची भेटी । घालूं हरिचरणीं दृढ मिठी । प्रेम पोटीं न समाये ।' –ह १६.१८८.

**ऊठ–ड**—पु. जोंधळ्यावरील एक रोग -शे ७.३२.

**ऊठकळा**—उठकळा पहा.

**ऊठनाउबड**—स्त्री. ( व. ) पुरून उरण्याइतका जिनसांचा पुरवठा. ' शंभर आंब्यानें ऊठनाउबड होतें. '

**ऊठपाय**—क्रिवि. १ एका पायावर तयार ( जाण्यास, करण्यास ); सदां उभा. २ ( ल. ) उठल्याबसल्या; सदांनकदां; सारखें तेंच; फिरून फिरून. ' तूं ऊठपाय त्याचे घरीं कां जातोस ? ' [ उठणें+पाय ]

**ऊठबशी, ऊठबस, ऊठाबशी**—स्त्री. उठणें व बसणें; वारंवार उठण्याबसण्याचा व्यापार. ऊठबैस पहा. (अव.) **उठाबशा**– १ शाळेंतील शिक्षेचा एक प्रकार. २ ( तालीम ) व्यायामाचा एक प्रकार; बैठका मारणें. ( क्रि० काढणें ). [ उठणें+बसणें ]

**ऊठबैस**—स्त्री १ ऊठबशी पहा. २ अस्थिरता; चंचलता.

**ऊठी**—स्त्री. बाकी; उचल; उचापत. -शर.

**ऊड**—स्त्री. ( कों. ) भिंतींतील लहान खिडकीच्या आंतील भिंतीच्या रुंदीपर्यंतचा उतरता व पसरट होत जाणारा भाग ( जास्त उजेड येण्यासाठीं ठेवलेला ).

**ऊड**—स्त्री. माया; कपट; दगा; धोका. ' प्रभु सुड घेइल पुढती अति ऊड करिन ।' –आप ६२. [ सं. कूट–कूड; प्रा. ऊड ? ]

**ऊडवें**—न. ( कों. ) भाताच्या पेंढ्या झोडून भात काढून घेतल्यावर पेंढ्या पुन्हां रचून ठेवतात तें; गंजी. (अव.) उडवी. उडवें पहा. [ सं. उटज; प्रा. उडव; प्रा. उड=समूह, रास; सं. कूट; प्रा. उड; का. उड्डी=ढीग ]

**ऊणखूण**—स्त्री. १ वर्म; रहस्य. उणखूण पहा. ' हे जिव्हारींची ऊणखूण । तुज संपूर्ण सांगीतली ।' –एभा ११.१५६०. २ प्रचीति; वाटाघाट; चर्चा. ' रिघोनि सद्गुरूस शरण । काढून शुद्ध निरूपण । याची करिसी ऊणखूण । प्रत्यक्ष आतां ।' –दा ६.१०. ५२. उणखूण पहा.

**ऊत**—पु. उतणें पहा. १ पदार्थ कढूं लागला म्हणजे त्यांतील पाण्याचा अंश, फेंस वगैरे वाफेच्या जोरानें वर उचलला जाण्याची क्रिया; उकळी. ' भीमाचें यश लाजवि सुरभिक्षीराचियाहि ऊतातें ।' –मोकर्ण ३८.२६. २ ( ल. ) फणफणाट; झणका; ताठा; डौल; उन्माद. ( क्रि० येणें; जिरणें; जिरविणें ). ३ उत्कर्ष; भरभराट; मर्यादेबाहेरची स्थिति; अतिशयपणा; ( तारुण्याचा, संपत्तीचा, चिलटांचा इ० ). ' यंदा आंब्यांना ऊत आला आहे. ' ४ उसळी; आंतून वर येणें. ' यमुनेच्या डोहावरी आला ऊत । काळया कृतांत धुधुकारे ।' –तुगा ५१. ५ ( ल. ) समुद्राची भरती. ' ये धर्मचमू भासे क्षुब्धाब्धीच्या उतासमा, राया ।'–मोभीष्म ९.१४. ६ उचंबळलेली मनोवृत्ति; गहिंवर; आवेग. [सं. उत्; तुल० का. ऊदु=फुगणें; वर येणें] **०मारणें**–चेव नाहींसा करणें, मोडणें; फुगवटा ( दुधावर आलेला) पाणी घालून नाहींसा करणें. **०येणें**–आंत न मावण्याइतकें पुष्कळ वाढणें. ' रूसो–जपानी युद्धाचे वेळीं जपानांतल्या आबालवृद्धांच्या देशाभिमानाला खरोखरीच ऊत आलेला दिसला. ' –के **०मात**–पु. उन्माद; माज; उद्धटपणा; बेफिकीरी; रागीटपणाचें कृत्य; धुंदी; उमेटपणा. ( क्रि० करणें; मांडणें; उतरणें; जिरणें; जिरवणें. [ उतणें+मातणें ]

**ऊद**—पु. १ एका वृक्षाचा सुगंधी चीक. ( धूपासाठीं जाळतात तो ) विस्तवावर टाकला असतां सुवास देणारा; लोबाण; धूप. तुर्कस्थान, पूर्व आफ्रिका, जावा, सुमात्रा या देशांत याचीं झाडें होतात. हा वात, कफ, कंडुनाशक आहे. याच्या उदबत्त्या करितात. उदाचे प्रकार–१ भीमसेनी. २ जनार्दनी. ३ लोहबंदी. ४ कवड्या. [ अर. उद] **०काडी–बत्ती**–स्त्री. १ उदानें माखलेली काडी. उदबत्ती पहा. २ (उप.) बोंबील. ( बोंबील भाजला असतां घाण सुटते म्हणून). **उदेल, उदाचा अर्क**–न.पु. उदाचें तेल; हें पांढऱ्या व कवड्या उदाच्या भरड कुटीपासून तयार करतात. **ऊदफूल–न.** उदाचें फूल; मडक्यांत ऊद जाळतात व त्याच्या धुरापासून घनीकरण क्रियेनें हें तयार करितात.

**ऊद**—पु. एक वृक्ष. [ अर. ]

**ऊद**—न. कांडेचोर; मांजराच्या जातीचा एक प्राणी. हा रात्रीं हिंडतो व तान्ह्या मुलास उचलून नेतो असा समज आहे. इतर हिंस्र पशूंप्रमाणें याच्या तोंडाच्या लाळेपासून जखम दूषित होण्याचा संभव असतो. [ सं. उद्र ]

**ऊदाईन**—न. ( शाप. ) ( इं. ) बेंझाईन. हा वर्णहीन स्फटिकरूप घन असून अल्कहल किंवा ईथर यांत वितळतो. याचा धूपाकडे फार उपयोग होतो. [ अर. ऊद ]

**ऊदाम्ल**—न. ( रसा. ) ( इं. ) बेंझाइक ॲसिड. हें मोठें शक्तिमान आहे. हें पोटांत गेलें असतां मूत्रमार्गाच्या अंतस्त्वचेंतील श्लेष्ममय पदार्थांस रोगबीजरहित करून उत्तेजित करतें.

**ऊदिन**—न. ( शाप. ) ( इं. ) बेंझिन; हें दगडी कोळशाच्या डांबरांत सांपडतें. ह्याचा डांबरी रंग करण्याच्या कामीं उपयोग होतो.

**ऊदिल अल्कहल**—न. ( रसा. ) ( इं. ) बेंझिल अल्कोहोल. हा जाई, मोगरा इ०च्या अत्तरांत सांपडतो. यास सौम्य सुगंध येतो. भानिल कर्बिनल ( फेनिल कर्बिनोल ).

**ऊदिल प्रायोज्जित**—न. ( इं. ) बेंझाल्डिहाइड. वर्णहीन सुगंधि द्रव्य; कडू बदामाचें तेल.

**ऊंधा**—वि. ( खा. ) उलटा; विरुद्ध. [ गु. सि. ऊंधो ]

**ऊन**—स्त्री. लोंकर. ' दुलया उनाच्या, शालनामाच्या संजापदार. ' –प्रसुतिकृत्यादर्श १. [ सं. ऊर्णा ]

**ऊन**—वि. कमी; उणें; अपुरें; थोडें; न्यून. उ० एकोन, अर्धोन, पाऊण. [ सं. ]

**ऊन–न्ह**—न. सूर्याचा ताप, तेज; किरणांचा प्रकाश; ओप; ओपाळी. ' सभ्य जनीं हित पृच्छक, सीतातेंहि कोण गा ! नये ऊर्नी ' –मोसभा ४.१०८. –वि. गरम; कढत; उष्ण. [ सं. उष्ण; प्रा. उण्ह; गु. उन्हु ] **०ऊन–आग**–वि. १ जळजळीत; कडक; होरपळण्यासारखें; चटका बसण्यासारखें. २ ( ल. ) ताजें; गरम; ऊष्ण; नवें कोरें; नुकतेंच केलेलें. **०खाणें**–उनांत बसणें. **०तावणें**–सूर्यकिरण जास्त प्रखर होणें. **०ताहान म्हणणें–पहाणें, मानणें**–( नकारार्थी प्रयोग ) कांहीं संकटांची वगैरे पर्वा न करतां कामास लागणें; कांहीं सबबी न सांगतां तावडतोब निघणें. **०पाऊस**–पु. ऊन आणि पाऊस; नागवा पाऊस; सूर्याचें ऊन पडलें असतांना पडणारा पाऊस. **०पारखा**–वि. आयुष्यांतील अडचणींचा अनुभव नसणारा; नाजुक; श्रीमंतींत लोळणारा. **०वारा**–पु. झळई; अहळी; ऊन, दाह करणारा वारा. **०वारा लागणें, सोसणें**–१ ( नकारार्थी प्रयोग ) संसारांतील अडीअडचणींना पारखा असणें. २ ( होकारार्थी प्रयोग ) सर्व संकटाना तयार असणें; सर्व प्रकारच्या हवा, परिस्थिती सहन करणें. **०परतणें**–ऊन कमी–खालीं होणें.

**ऊपाळणें**—सक्रि. उपाळणें; उपटणें. ' किती येक ऊपाळती लाग वेगें ' –राक २५. [ उत्पाटनं ]

**ऊब**—स्त्री. १ निर्वातस्थळाची, कोंदटपणामुळें उद्भवणारी उष्णता; गरमपणा. २ शिजणाऱ्या पदार्थापासून निघणारी वाफ. ३ विस्तवाची अथवा तापवलेल्या पदार्थाची उष्णता, धग. ' तेवींचि वन्हित्व आंगीं । आणि उबे उबगणें आगी । ' –ज्ञा १८.२२०. ४ प्राण्याच्या आंगची उष्णता. ५ उष्ण हवा: गरमी; उकाडा. ६ ( ल. ) विद्या, संपत्ति इ०चा गर्व, ताठा; त्यामुळें अंगीं असलेला आत्मविश्वास, धमक, भरंवसा. ७ सुख; साधन; आधार. ' त्याच्या जवळ पैशाची ऊब आहे. ' **०जिकणें**–भीड किंवा दरारा चेपणें; भीति नाहींशी होणें; परिचय, स्नेह होणें. **०जिरविणें**–रग उतरविणें; नांगी तोडणें; हड्डी नरम करणें. [ का. उब्बे=उष्णता, वाफ. तुल० सं. उत्तप–उप्पअ–उब्बअ–ऊब ]

**ऊर**—पु. १ पोटावरचा आणि गळ्याखालचा पुढल्या अंगाचा भाग; छाती. ' उरु कुहिजेल जळें । आसुवांचेनी ॥ ' –ज्ञा १३.५६०. ' किंवा व्याघ्र व्याघ्रा भेदी प्रखरें शिलीमुखें उर गा । ' –मोभीष्म ९.२४. २ ( स्त्रियांचे ) स्तन; वक्षःस्थल. ' तों तों तिचा उर भरींव दिसोनि येतो. ' –नळ ७०. [ सं. उरस्; प्रा. उर ] **म्ह०** ऊरीं केश माथां टक्कल=एका बाजूनें मिळविणें व दुसऱ्या बाजूनें गमावणें. **०उलणें**–अतिशय दुःख होणें. ' परतेल काय ऐकुनि हें साध्वींचीं उरेंचि उलतिल कीं । ' –मोवन १२.९८. **०काढून चालणें**–ऐटींत चालणें; बेमुर्वत वागणें. **०दडपणें**–भय, लाज, मत्सर वगैरेंनीं धैर्य नाहींसें होणें; उत्साह नष्ट होणें; छातीस धक्का बसणें; निराशा वाटणें. **०दबणें–बसणें**–गांगरून जाणें; भयचकित होणें. ऊर उलणें पहा. **०दाटणें–भरणें**–( दुःख, प्रीति यामुळें ) गहिंवरून येणें; छाती भरून येणें; बांध बसणें. **०पिकणें**–१ कफ दाटणें व त्यामुळें घसा बंद होणें; अति श्रमानें छातीस ताण बसणें. २ ( ल. ) त्रास, छळ होणें. **०पिकविणें**–त्रास देणें. ' पदोपदीं येउनि शीकवीला । तथापि तेणें उर पीकवीला ॥ ' –सारुह २.१४. **०फाटणें**–अतिशय दुःख होणें; ऊर उलणें–दबणें पहा. ' फाटे उर शोकानें बहु निंद्य क्षत्रधर्म त्या वाटे ॥ ' –मोअश्व ५.३९. **०फुटणें**–१ (स्त्रियांना उद्देशून). स्तनांचा उद्गम होण्याच्या वयास येणें ' ती ऊर फुटण्याच्या वयांत आली आहे. ' २ हृदयविकार होणें; छाती फुटून निकामी होणें (घोडा). ३ शोकानें, काळजीनें व्याकुळ होणें; उरीं फुटणें. ४ ( व. ) हिंमत चालणें. ' पुरांत उडी टाकून धारेपर्यंत पोहत आला पण पुढें ऊर फुटेना. ' **०फोडणें**–१ अतिशय श्रम करणें. २ आहाराबाहेर काम करून गळाठणें; मेटयास येणें. **०बडविणें**–दुःख–शोकप्रदर्शनार्थ छातीवर हात मारणें. **उरस्फोड करणें**–ऊर फोडणें; अतिशय श्रम करणें **उरापोटीं–करणें, धरणें, उरापोटावर उचलणें**–अतिशय श्रम करून काम करणें, चालविणें, उचलणें; ऊर फोडणें. 'अहो ! उरापोटीं करीन कसें तरी झालें ! '–एकचप्याला. 'ती आपल्या मुलांना उरींपोटीं धरते. ' **उरावर घालणें**–(शिवी) इच्छा नसतांना एखाद्यास देणें, द्यावयास भाग पडणें; ' गोणीभर होन ब्राह्मणांच्या उरावर घातले. ' –नामदेव नाटक १०५. **उरावर असणें**–एखाद्यावर अधिकार चालवणें–सत्ता असणें; एखाद्याच्या डोक्यावर असणें. **उरावर घेणें**–१ अतिशय कठिण काम पार पाडण्यासाठीं अंगावर घेणें, स्वीकारणें. २(ल.)(शिवी–स्त्रियांच्या बाबतींत) संभोग देणें. **उरावर धोंडा ठेवणें**–१ स्वतःचे मनोविकार दाबून धरणें; स्वतःवर जोर चालविणें. २ एखाद्यास अतिशय कठिण काम करावयास सांगणें ( पूर्वी

मोंगलाईत सरकारी वसूल करण्यासाठीं शेतकऱ्याच्या उरावर धोंडा ठेवीत असत यावरून ). सक्ति करणें; 'कोणी तुमच्या उरावर धोंड ठेवली होती ?'—नाकु ३.१५. **उरावर बसणें**-१ छातीवर बसणें. २ (ल.) टाळतां न येणारें काम अंगावर येऊन पडणें; त्यामुळें असहाय्यता येणें. ३ मागें लागून निकडीनें काम करून घेणें. ४ पुरुषानें एखाद्या स्त्रीवर बलात्कार करणें; स्त्रीसंभोग करणें. **उरावर हात ठेवणें-लावणें, ठेवून-लावून-सांगणें-बोलणें**-जोरानें वचन देणें; एखाद्याबद्दल खात्रीनें सांगणें. 'या श्लोकाचा अर्थ मला समजला आहे, असें मी उराला हात लावून तुला सांगतों' **उराशीं धरणें**-१ आलिंगन देणें. २ नम्रपणानें प्रार्थणें. ३ कांहीं झालें तरी (हातीं घेतलेलें काम) शेवटास नेण्याचा निश्चय करणें; सतत (गोष्ट) स्मरणांत ठेवणें. ४ स्वीकारणें; पतकरणें; आपलें म्हणणें; न सोडणें. **उरावर शेगडी**-अतिशय दुःख; विवंचना; त्रास. **उराला हात लावणें**-सत्यता, आत्मविश्वास, निश्चय, धमक दाखविण्यासाठीं छातीस हात लावणें. **उरास लावणें-उरीं पोटीं धरणें**-दादाबाबा करणें; मन वळविणें. उराशीं धरणें पहा. **उराची-शिप-शिंपी**-स्त्री. (निदाव्यंजक) खोल छाती; छातीचा खळगा. **उराचा तख्ता**-पु. भरदार छाती. **उराचा पांजरा-पिंजरा**-पु. क्षीणतेमुळें छाती वरील सर्व हाडें दिसणें; छातीचा सांपळा. **उरावरचा गोहो-धगड**-पु. १ ज्या व्यक्ती-अगर वस्तूविषयीं एखाद्यास सतत भीति वाटते ती वस्तु; उरावरील दडपण; धोंड. २ नवरा; जार. [कों. गोहो=नवरा] **उरीं डोंगर घेणें**-कठीण काम स्वीकारणें; अतिशय दगदग करणें. **उरीं डोंगर पुरीं काट्या घेणें**-(छातीवर पर्वत घेणें व नदीच्या पुरांतून काटेकुटे ओढून काढणें) पोटासाठीं अतिशय दगदगीचे काबाडकष्ट करून सर्व तऱ्हेचे उपाय करून पाहाणें. **उरीं पोटीं करणें**-अतिशय श्रम करणें उरापोटीं करणें पहा. **उरीं फुटणें**-ऊर फुटणें पहा. 'इतका अभ्यास करून उरीं फुटायचं आहे का काय?'—मी (आपटे). **उरीं भरणें**-१ दमणें. 'उरीं भरली ऊरपोट। केली चळवळ झाली घाबरी॥'—पला २. 'तो सक्तमजुरी करून उरीं भरला.' २ स्त्रियांच्या स्तनांचा उद्गम होणें; ऊर भरणें. **०तूट**-स्त्री. (उराशीं धरण्यांत, मिठी मारण्यात अडथळा, प्रतिबंध, व्यत्यय यावरून) वियोग; विरह. (क्रि० करणें; होणें). **०दुखी**-स्त्री. १ उरांतील दुःख. २ (ल.) मत्सर; हेवा. **०पाकीट**-न. (क. शिवण) छातीवरचा खिसा. [ऊर+इं. पॉकेट=खिसा] **०फोड**-स्त्री. उरस्फोड; अतिशय दगदगीचें व संकटमय काम; श्रम; उद्योग. -वि. असे श्रम पडणारें, फार मेहनतीचें (काम) **०भेट**-स्त्री. छातीस छाती लावणें; मिठी मारून भेटणें.

**ऊर**—स्त्री. १ उरलेलें; जास्त झालेलें काम, पदार्थ, गोष्ट; बाकी; शिल्लक; शेष. 'इतकें आवण एवढ्या खांचरास पुरणार नाहीं असें वाटत होतें; परंतु पुरून ऊर आली.' 'या उरींत (उरलेल्या कापडांत) एक जाकीट बसेल.' २ तूट; उणीव; उरता या अर्थी. [उर्वरित सं. उत्+ऋ] **०न पूर**-स्त्री. उरणें न पुरणें; प्रसंगीं कामाला न पुरण्यासारखें किंवा पूरून न उरण्यासारखें सामान, सामग्री; उणीव, तूट कमतरता. **०पूर**-स्त्री. पुरून उरण्याइतकी सामग्री; भरपूर; समृद्धि; आधिक्य. [उरणें+पुरणें] **०सूर**-स्त्री. १ शिल्लक; बाकी; अवशेष [ऊर द्वि.] -वि. शिलकी; उरलेलें; राहिलेलें.

**ऊर**—न.पु. ऊत; और; नदीचा पूर. [सं. पृ-पूर्; प्रा. ऊर]

**ऊरु, ऊर**—न. खेडेंगांव. ग्रामनामवाचक सामासिक शब्दांतील अन्त्य भाग म्हणून येतें. उ० जसें देव+ऊर=देवूर, चंद्र+ऊर=चंदूर. [सं. पुर, प्रा. उर; का. ऊरु]

**ऊरु**—पु.स्त्री. गुढघ्याच्या वरचा भाग; मांडी. 'तरी ऊरु या जघनासी। जडोनि घाली॥'—ज्ञा ६.१९२. [सं.] **०कर्म**-(नृत्य.) मांड्यांनीं केलेले अभिनय; नृत्यामध्यें ऊरुकर्में पांच आहेत—स्तंभन, कंपन, वलन, विवर्तन, उद्वर्तन. **०उद्वृत्त भौमिचारी**-१ (नृत्य) टांच बाहेरच्या बाजूस येईल असें चवड्यावर उभें राहून व जंघा वांकडी करून वरच्यावर फिरविणें. २ (करण) उजवा हात फिरवून मांडीच्या मागें वांकडा करून ठेवणें व पोटरी वांकडी करून वर उचलून बाजूस वळविणें, म्हणजे मांडी वर होऊन जरा वळली जाते. **०मूल-संधि**-न.पु. १ मांडीचा कमरेशीं संलग्न असलेला भाग. २ जांघ; वंक्षण; कटिसंधि; आडसंधि. **०स्तंभ**-पु. एक वातरोग; वातानें खालचें अंग जाणें; पुष्कळ दिवसांचा मांड्यांचा पक्षघात.

**ऊरूफ**—ऊर्फ पहा.

**ऊरूबरू**—क्रिवि. समक्ष; समोर. उरुबुरु पहा. [फा. रूबरू]

**ऊर्ज**—पु. हिंमत; शक्ति; ताकद; तेज. [सं. ऊर्जस्]

**ऊर्जा**—स्त्री. उस्तवारी; संरक्षण. 'उरजा' पहा. [सं. ऊर्जस्]

**ऊर्जित**—न. उत्कर्षाचा काळ; चढती कळा; बढती; भरभराट; कल्याण. [सं.] -वि. शक्तिमान्; चढता; उत्कर्षाचा. **०कळा-काल**-स्त्री.पु. भरभराटीचे दिवस.

**ऊर्ण**—न. लोंकर; तंतु; धागा. [सं.] **०तंत**-पु. कोळ्याच्या (किड्याच्या) जाळ्याचा धागा; 'हस्त (हत्ती) बांधीजे ऊर्णतंतें। लोभें मृत्य भ्रमरातें.'—दा २.१०.१५. **०नाभी**-पु. कोळी; किडा (याच्या शरिरांतून लोकरीसारखा धागा निघतो). ऊर्णनाभी पहा. 'ऊर्णनाभीचा तंतूसुत्रीं। जरि उचलिजेल धरित्री॥' [सं.]

**ऊर्णा**—स्त्री. १ लोंकर (मेंढी, ससा, उंट इ० चे केस). २ लोंकरीचें कापड. (शाल, घोंगडी). ३ दोन भुवयांमधील नाकाच्या मुळाशीं असलेले केस. या ठिकाणीं भोंवरा असणें हे सार्वभौमत्वाचें लक्षण समजतात. [सं. ऊर्ण]

**ऊर्ता**—स्त्री. (व.) वाट पाहणें; थांबणें. अरुता पहा. ' माझी ऊर्ता नको, तुम्ही लग्न जुळवा. ' [अरुता]

**ऊर्ध, ऊर्ध्व**—क्रिवि. वरती; उंच; वर. –वि. १ वरील; उंचावरचा. २ (गणित) उभा; लंब. (इं.) व्हर्टिकल. [सं. ऊर्ध्व] **ऊर्धगति**–स्त्री. वर चढणें; उंच उडणें, जाणें; आकाशांत भराऱ्या मारणें. ' विचारें ऊर्ध्व चढती । तयासीच ऊर्ध्वगति ॥ '–दा १७ ३.२२. **०मुख**–वि. वर तोंड करून पहाणारा. –क्रिवि. वर तोंड करून ' ऊर्धमुखें भेद तुटतो. ' –दा २०.३.२२. ' चिंतूनियां चेंडू हाणे ऊर्ध्वमुखें। ठेलीं सकळिक पाहतचि॥ ' –तुगा ४२.

**ऊर्ध्व**—पु. १ मरण्यापूर्वी लागलेला श्वास; घरघर. २ एक रोग; श्वास; दमा; छाती भरून येणें. ३ खस्वस्तिक. [सं.] **०गति**–वि. उंच जाणारा, उडणारा. **०जानु (आकाशीचारी)**–(नृत्य.) एक पाय आकुंचित करून गुडघा वक्षस्थळाइतका उंच करणें व दुसरा पाय तसाच ठेवणें. **०जानु करण**–न. (नृत्य) उजवा पाय कुंचित करून गुडघा उंच करणें, डावा हात वक्षस्थळावर व उजवा हात उजव्या पायाप्रमाणें कुंचित करून वर उचलणें. **०दृष्टि**–वि. वर किंवा आकाशाकडे, वरच्या दिशेकडे नजर लावलेला (माणूस); वरडोळ्या; दूर दृष्टीचा; उदात्त हेतूचा; गर्विष्ठ; महत्त्वाकांक्षी; थोर मनाचा. –स्त्री. १ आकाशाकडे असलेली नजर. २ (ल.) कपट; महत्त्वाकांक्षा; अभिमान; उच्च हेतु. **०देह**–पु. मरणोत्तर आत्म्याला प्राप्त होणारा देह. **०देहिक**–न. उत्तरक्रिया. और्ध्वदेहिक पहा. **०नाडी**–स्त्री. वर जाणारी नाडी; सुषुम्ना. इडा पहा. **०पंथ**–पु. (काव्य) वरचा मार्ग; वरची दिशा; स्वर्गास किंवा आकाशांत जाण्याचा रस्ता. ' जों जों वाढे पर्वत । मैनाक नामें अद्‌भुत । तों ऊर्ध्वपंथ आडवा येत । हनुमंतासी ते काळीं ॥ ' **०पातन**–न. पाणी अथवा इतर द्रव पदार्थ यांची आंच लावून वाफ करणें व त्या वाफेचें पुन्हां द्रवपदार्थांत रूपांतर करणें, या सर्व क्रियेस ऊर्ध्वपातन क्रिया म्हणतात. (इं.) डिस्टिलेशन. ह्या क्रियेनें पदार्थाचा अर्क काढणें. **०पान**–न. (सांकेतिक) दारू पिणें अथवा मादक पदार्थ सेवन करणें. **०पुंड्र**–पु.कपाळीं लाविलेला चंदनाचा उभा टिळा; उभें गंध. ' ऊर्ध्वपुंड्र भाळ । कंठीं शोभे माळ । कांपिजे कळिकाळ तया भेणें॥ ' –तुगा २२१४. **०बाहु**–पु. सतत वर हात ठेवणाऱ्या बैराग्यांचा एक पंथ. **०मस्तक**–न. डोक्यावरची कवटी. **०मुखी-गोम**–स्त्री. (घोड्याच्या अंगावरील) गोमेसारखा केसांच्या अग्रांचा वर वळलेला झुबका. हा अशुभकारक समजतात; याच्या उलट अधोमुखी गोम. **०मूळ**–वि. वर मुळें असलेला; उलटा १ (ल.) देह; शरीर. २ प्रपंच जगत्. **०मंडल**–न. (नृत्य) दोन्ही हात वर करून वाटोळें फिरणें. **०रेखा-षा**–स्त्री. १ तळहातावरील किंवा तळपायावरील वर जाणारी सरळ रेघ. ' ऊर्ध्वरेषा पाया असली म्हणजे राज्य किंवा तीर्थयात्रा. ' २(गणित) लंब रेषा; उभी रेषा. **०रेतस्क-रेता**–पु हनुमान, भीष्म इ० चिरब्रह्मचारी. –वि. नैष्ठिक; आमरण ब्रह्मचारी; ज्याचा कधींहि वीर्यपात होत नाहीं असा. ' तेथ वसती सनकादिक । ऊर्ध्वरेते देख महायोगी । '–एभा २४.२१७. ' तो राघवप्रिय विरक्त । ऊर्ध्वरेतस्क वज्रदेही ॥ ' ' ऊर्ध्वरेत मुनीश्वरांसी । ' –गुच १३.६९. **०लोक**–पु. १ स्वर्ग; इंद्रलोक. २ स्वर्गांतील अनेक लोक (चंद्रलोक, ब्रह्मलोक इ०). **०वात-वायु**–ऊर्ध्व अर्थ १ व २ पहा. **०वाट**–स्त्री. स्वर्गाची वाट; ऊर्ध्वपंथ. ' प्राणार्शी दुजायींच्या दाउन ऊर्ध्ववाट माघारे फिरती। '–ऐपो २६९. **०स्वस्तिक**–न. खस्वस्तिक. **०संस्थ (बाहु)**–(नृत्य) पाहणाराच्या मुखाआड न येतां, लोंबत सोडलेले बाहू वर नेणें.

**ऊर्ध्वाधर**—वि. खस्वस्तिक व अधःस्वस्तिक यांच्याकडे टोकें असलेला; लंब, सरळ रेषेंत उभा. [ऊर्ध्व+अधर]

**ऊर्ध्वासन**—न. (योग.) चौऱ्यायशीं आसनांपैकीं ताठ उभें राहणें हें एक आसन. [सं. ऊर्ध्व + आसन]

**ऊर्ध्वी**—स्त्री. ऊर्ध्वनाडी पहा. ' मग ऊर्ध्वीचिया रिगानिगा । पुढती तेचि शक्ति ` गा । ' –ज्ञा १८.३३७. [सं. ऊर्ध्व]

**ऊर्फ**—वि. नांवानें लोकांमध्यें माहीत असलेला; प्रसिद्ध नांवाचा; सामान्यतः; दुसऱ्या नांवाचा; टोपण नांवाचा; अथवा; म्हणजे. उर्फ पहा. ' माहे मोहरम ऊर्फ चैत्र. ' –मोल. ' बाळाजी जनार्दन ऊर्फ नाना फडनीस. ' [अर. उर्फ़=नांवाचा; प्रख्यात.]

**ऊर्मि-र्मी**—पुस्त्री. १ लाट; उसळी; उकळी; तरंग; लहर (पाण्याची). ' तुका म्हणे गंगासागरसंगमीं । अवघ्या झाल्या ऊर्मी एकमय। ' –तुगा ४०१६. ' आली ऊर्मी साहे। ' –तुगा. २ वेग; प्रवाह. ३ (ल.) आकस्मिक उत्कंठा; इच्छा; आग; वृत्ति (मनाची). ' किं क्रोधऊर्मी दारुण। सद्विवेकें आवरिजे। ' [सं. ऊर्मि]

**ऊर्मिका**—स्त्री. (लहरीप्रमाणें चमकणारी) अंगठी. ' उद्योत तो उत्कट ऊर्मिकांचा। ' –सारुह ८.१५२. [सं. ऊर्मि = लाट]

**ऊर्वी**—उर्वी पहा.

**ऊषर**—स्त्री. खाजण; खारी जमीन. [सं.]

**ऊष्मवर्ण, ऊष्मा**—पु. (व्या.) श, ष, स, या अक्षरांस ही संज्ञा त्यांच्या उच्चारावरून लावतात. हे उष्म म्हणजे उष्णता उत्पन्न करणारे अथवा प्रखर उच्चाराचे म्हणून यांना हें नांव आहे. कोणी ऊष्मवर्णांत ' ह ' चाहि समावेश करतात. [सं.]

**ऊष्मा**—उष्मा पहा.

**ऊस, ऊंस**—पु. साखर, काकवी, खडीसाखर, गूळ इ. ज्याच्या रसापासून तयार होतात अशी एक ५–६ हात उंचीची वनस्पती; ऊंस हिंदुस्थानांत सर्वत्र होतो. याचे पांढरा, तांबडा, काळा, पुंड्या, पटरी वगैरे प्रकार आहेत. तसेंच १ साल्या=दरसाल गाळला जाणारा; याच्या गुळाचा उतार कमी असतो. २ आड(ढ)साल्या=दीड वर्षानें गाळला

